महामुनि आदिकवि श्रीवाल्मीकिप्रणीत

# श्रीरामायण महाकाव्य

[ षष्ठ भाग ]

(६)

## सुंदर-कांड

( मराठी अनुवाद व उपसंहार यांसहित )

संपादक

श्रीपाद दामोदर सातवळेकर,
अध्यक्ष; स्वाध्याय-मण्डल,
औंध, ( जि. सातारा )

प्रथम आवृत्ति.

शके १८६४, सन १९४२.

मूल्य ४) रु०

# सुन्दर-काण्ड.



श्री महाकवि वाल्मीकिप्रणीत रामायण-महाकाव्याच्या खण्डशः प्रकाशनामधील हा **सहावा भाग** आहे. या भागामध्यें सर्व सुन्दरकाण्ड आलें आहे. याच्या उपसंहारामध्यें अनेक विषयांचा ऊहापोह केलेला आहे. तो पूर्वीप्रमाणेंच वाचकांस आवडेल, अशी आशा आहे.

औंध.
१।६।४२

—प्रकाशक.

**सर्ग १२, पृ० २०१–२०५**

फार काल सीता न दिसल्यामुळें सीतेविषयीं अशुभ शंका मारुतीचे मनांत येते ( १–४ ). स्वकर्तव्याची जाणीव होऊन, तो पुनः शोध करण्यास तयार होतो ( ५–२६ ).

**सर्ग १३, पृ० २०५–२१५**

सती पुष्कळ तपास करूनही त्याच्या नजरेस पडत नाहीं, तेव्हां पुन्हां अशुभ विचार मनात येतात ( १–१७ ). मारुतीचे दुःखद विचार (१८—४५). त्याच्या मनाची अस्वस्थता व त्याचा अशोकवनांत प्रवेश ( ४६—६८ ).

**सर्ग १४, पृ० २१५–२२४**

अशोकवनाचें वर्णन ( १—४१ ). सीतेची वाट पहात मारुती एका वृक्षावर बसतो ( ४२—५२ ).

**सर्ग १५, पृ० २२४—२३३**

अशोकवनाचें वर्णन ( १—२० ), शोकग्रस्त सीतेचे दर्शन (२१—२७), सीतेच्या वस्त्रालंकाराचें वर्णन ( २८—५४ ).

**सर्ग १६, पृ० २३३–२३८**

सीतेविषयीं मारुतीचे विचार. सीता असल्याची खात्री ( १—३२ ).

**सर्ग १७, पृ० २३८–२४४**

सीतेभोंवती असलेल्या राक्षसींचें भयंकर वर्णन ( १—१८ ). सीतावर्णन व मारुतीस रामलक्ष्मणाची आठवण होऊन केलेलें अभिवादन ( १९—३२ ).

**सर्ग १८, पृ० २४४–२४९**

रावणाचें अनेक स्त्रियांसह पहाटेच्या वेळीं अशोकवनांत आगमन (१—३३).

**सर्ग १९, पृ २४९–२५३**

रावणास पाहून सीतेची भयभीत स्थिति ( १—२२ ).

**सर्ग २०, पृ० २५३—२५९**

स्वतःच्या वैभवापुढें रामाचा कमीपणा दाखवून रामावरचे प्रेम सोडून दे,

व माझी भार्या हो, अशा प्रकारचें सीतेस उद्देशून रावणाचें भाषण ( १–३६)

सर्ग २१, पृ० १५९—१६४

सीतेचें रावणास उद्देशून मर्मभेदी व कठोर भाषण ( १— ३४ )

सर्ग २२, पृ० १६५—१७१

रावणाचें सीतेशीं धमकीचें बोलणें ( १—९ ) देवकन्या सीतेस धीर देतात ( १०—१२ ) पुन्हा सीतेचें रावणाशीं टीकात्मक भाषण ( १३—२२ ). रावण पुन्हा नाश करीन, म्हणून सीतेस धमकी देतो (२३—३१) तेथील राक्षसींचें अक्राळविक्राळ स्वरूप रावण त्यांना सीतेचें मन वळविण्यास सांगतो ( ३२—३८ ) रावण परततो ( ३९–४७ )

सर्ग २३, पृ० १७२—१७४

भयंकर राक्षसी सीतेची समजूत घालून, रावणाची भार्या होणें योग्य आहे, असें सांगतात ( १–२१ )

सर्ग २४, पृ० १७४—१८२

राक्षसी स्त्रियांचा उपदेश व नंतर सीतेस भेडसावणें ( १—४८ )

सर्ग २५, पृ० १८२—१८६

सीता दुःखावेगानें शोक करते राम, लक्ष्मण व काहीं अन्य यांची तिला आठवण होते ( १—२० )

सर्ग २६, पृ० १८६—१९३

सीतेची अयंत दैन्यावस्था ( १—२१ ) लंकेविषयीं अशुभ वचन ( २२—२६ ) रामलक्ष्मणांचा आठवण व शोक ( २७—४७ )

सर्ग २७, पृ० १९३—२०१

रामाचा उत्कर्ष व रावणाचा अधःपात याच्यासंबधीं त्रिजटेस पडलेलें स्वप्न ( १—४८ ).

सर्ग २८, पृ० २०१–२०५

जानकी सीता आपल्या जीवाचें शोकान्त्या भरात बरेंवाईट करण्यास तयार

होते; पण शेवटी शुभ शकुन झाल्यामुळें थांबते (१-१९).

**सर्ग २९, पृ० २०५-२०६**

सीतेस शुभशकुन झाल्यामुळें शोक नाहींसा होऊन, तिचें मुख प्रफुल्लित होतें (१-८).

**सर्ग ३०, पृ० २०६-२१३**

सीतेची गांठ घेण्याचा विचार (१-१५). पण गांठ घेतांच काय अनर्थ होतील, याचा मारुतीनें केलेला विचार (१६-४४).

**सर्ग ३१, पृ० २१४-२१६**

मारुती रघुवंशाची स्तुति करतो (१-६). नंतर रामाचा वनवास, सीताहरण, सुग्रीवसख्य इत्यादि वृत्तांत मारुती सीतेपुढें करतो. सीता आनंदित होते व तिला मारुती दिसतो. (७-१८).

**सर्ग ३२, पृ० २१७-२१९**

सीतेला मारुतीस पाहून कदाचित् हा राक्षस असेल, म्हणून भीति वाटते व हृदयाची कातरावस्था होते (१-१५).

**सर्ग ३३, पृ० २१९-२२४**

मारुती सीतेस तूं कोण? असा प्रश्न विचारतो (१-१०) सीता कोण ते सांगते (११-१६) व संक्षिप्त रीतीनें अयोध्येंतून तिथे कशी आली, तें सांगते (१७-३१).

**सर्ग ३४, पृ० २२४-२३०**

सीतेचें भाषण ऐकून, रामाचें कुशल व लक्ष्मणाचा नमस्कार सांगतो. (१-४) सीतेला मारुती हा वेषधारी रावण असावा, अशी शंका येते (५—१९). सीतेची शंका जाणून मारुती सीतेशीं बोलतो (२०-२७). मी रामाचा दूत आहे, असें सांगून सीतेस विश्वास ठेवण्यास सांगतो (२८-४०).

**सर्ग ३५, पृ० २३०—२४४**

मारुती रामकथा सांगून त्याच्या अवयवांचें वर्णन करतो (१-२१). पुन्हा त्या दिवसापर्यंत घडलेला वृत्तांत थोडक्यांत सांगतो (२२-९०).

सर्ग ३६, पृ० २४४—२५२

मारुती आपला विश्वास पटवितो (१-४). सीता त्याच्या पराक्रमाची स्तुति करते (५—१०). रामाविषयीं कुशल विचारते (११—३०). मारुती रामाचें कुशल सांगतो. सीतेस थोडासा शोक होतो (३१—४६).

सर्ग ३७, पृ० २५२-२६२

सीता मारुतीस आणखी प्रश्न विचारते (१-१९) मारुती स्वतःच तिला नेण्यास तयार होतो (२०-२९) सीता जाण्यास तयार होत नाही (३०-३२). मारुती आपलें सामर्थ्य पटवितो (३३-३७) सीता जाण्यास तयार न होता रामालाच इकडे येऊं दे, म्हणून सांगते (३८-६८)

सर्ग ३८, पृ० २६३-२७३

परपुरुषाला स्पर्श कसा करूं? असें म्हणून सीता त्याचेबरोबर जाण्याचें नाकारते (१-५). मारुती निरोप घेताना खुणेसाठीं वस्तु मागतो (६-१०) सीता चित्रकूटावरील एक प्रसंग खूण म्हणून सांगते (११-३४) तिला भडभडून येतें (३५-४६). मारुतीस खुणेसाठी रत्न देऊन, त्यास निरोप देते (४७-६५) मारुती अभिवादन करून, त्याचा स्वीकार करतो (६६-७०)

सर्ग ३९, पृ० २७३-२८२

सीता मारुतीस रामाचें मन वळविण्यास सांगते (१-१२). मारुती रामाच्या पराक्रमाचें वर्णन करतो (११-१७). सीता मारुतीस आणखी कांहीं काळ रहा म्हणून सांगते (१८-३१) मारुती सैन्य कसें आणता येईल, तें सांगतो व धीराचें भाषण करतो (३२-५४).

सर्ग ४०, पृ० २८२-२८६

सीता रामास सांगण्याकरिता निरोप देते (१-२१) मारुती उड्डाणाची तयारी करितो व उत्तर दिशेस जाण्याचें ठरवितो (२२-२५).

सर्ग ४१, पृ० २८६-२८९

खरा दूत कसा असावा, यासंबंधी मारुतीचा विचार (१-१३) नंतर वनाचा विध्वंस (१४-२१). .

सांगतो. तसेंच रामाचा पराक्रम वर्णितो (१-४४) रावण मारुतीच्या वधाची आज्ञा देतो (४५-४६)

सर्ग ५२, पृ० ३४३-३४७

विभीषण रावणास, दूताला मारणें बरें नहीं, असें सांगतो (१--२४). रावणास तें पटतें (२५)

सर्ग ५३, पृ० ३४७-३५३

रावण मारुतीला अन्य शिक्षा ठरावितो (१-१०). राक्षस मारुतीचें शेपूट पेटवून गावांतून धिंड काढतात सीतेला वाईट वाटतें (११--४१).

सर्ग ५४, पृ० ३५४--३६१

मारुती लंका जाळण्याचा विचार करून, आगी लावण्यास सुरवात करतो (१--२०) आगीमुळें गोंधळ (२१-४४) मारुती समुद्रांत आपलें शेपूट विझवितो (४४--५०)

सर्ग ५५, पृ० ३६१—३६७

मारुती लंका जाळल्याबद्दल पश्चात्ताप करतो व कदाचित् सीता तर जळाली नसेल ना असा विचार करतो ( १-२६ ) सीता सुखरूप असल्याची बातमी येते ( २७—३५ )

सर्ग ५६, पृ० ३६७—३७५

मारुती सीतेची गांठ घेतो (१-२). सीता-मारुती यांचें संभाषण (३-२१). मारुती परत येण्याकरता निघतो व आकाशांत उड्डाण करतो (२२-५१)

सर्ग ५७, पृ० ३७५-३८३

उड्डाणवर्णन ( १-१६ ) जाम्बवान आपल्या सर्व वानरांना हाक मारतो ( १७—२७ ) मारुती महेंद्रपर्वतावर उतरतो (२८—३२) मारुती लंकेतील हकीकत सांगतो (३३-४९) इतर संभाषण (५०-५४)

सर्ग ५८, पृ० ३८३—४०७

मारुतीचें प्रवासवर्णन ( १-४५ ). लंकेतील मंदिरें व त्याच्या कार्याचा अहवाल (१४६-१६९)

तसा सागतो ( १–१८ ). तसेंच सीतेचा व मारतीचा झालेला संवाद रामास कथन करतो ( १९—४४ ).

**सर्ग ६८, पृ० ४५१—४५५**

सीता व मारती याचा अशोकवनात झालेला संवाद मारती रामास सागतो ( १–२९ ).

---

# ( २ )

## सुंदरकाण्डाच्या

## निरीक्षणाची सूची.

## रामाचें वर्णन, पृ० ५१०



## स्त्रियांच्या अवयवांचें वर्णन, पृ० ५३३



## वरारोहा शब्दावर विचार, पृ० ५३६–५३८

## वाल्मीकीचा परिचय, पृ० ५३९

## कणृचा मुलगा वाल्मीकि, पृ० ५४०

महर्षींच्या प्रसादानें वाल्मीकीची प्रसिद्धि [ ५४० ]. प्राचेतस् वाल्मीकि, रामानंतर झालेला वाल्मीकि, चोविसाव्या युगांतील व्यास वाल्मीकि, एक व्याकरणकर्ता आचार्य ( विसर्ग- संधीचे ) नियम सांगणारा वाल्मीकि [ ५४२ ]. वाल्मीकींचे इतर ग्रंथ [ ५४२ ].



श्रीमहामुनि-वाल्मीकि-प्रणीतं

# श्री रा मा य ण म् ।

## सुन्दरकाण्डम् ।

ततो रावणनीतायाः सीतायाः शत्रुकर्षणः ।
इयेष पदमन्वेष्टुं चारणाचरिते पथि १
दुष्करं निष्प्रतिद्वन्द्वं चिकीर्षन्कर्म वानरः ।
समुदग्रशिरोग्रीवो गवां पतिरिवाबभौ २
अथ वैडूर्यवर्णेषु शाड्वलेषु महाबलः ।
धीरः सलिलकल्पेषु विचचार यथासुखम् ३
द्विजान्वित्रासयन्धीमानुरसा पादपान्हरन् ।
मृगांश्च सुबहून्निघ्नन्प्रवृद्ध इव केसरी ४

---

रावणाने चोरून नेलेल्या सीतेचे वसतिस्थान शोधून काढण्याकरिता शत्रुनाशक हनुमानाने चारण ज्या मार्गाने संचार करीत असतात, त्या उंच मार्गाने जाण्याचें मनात आणलें. ज्याचें मस्तक आणि कंठ हीं उन्नत आहेत, असा तो, दुष्कर आणि ज्यांत कोणाचेंही साहाय्य होण्याचा संभव नाहीं असें कार्य करण्यास सिद्ध झालेला वानर धिप्पाड बैलाप्रमाणे शोभूं लागला. प्रथमतः वैडूर्यरत्नासारखा ज्याचा रंग आहे, अशा कोमल तृणयुक्त आणि म्हणूनच जलाप्रमाणें मृदु असलेल्या प्रदेशावरून तो महाबलाढ्य धैर्यवान् हनुमान् सुखानें संचार करूं लागला. ( १-३ )

जातां जातां तो बुद्धिमान् हनुमान् पक्ष्यांना भय उत्पन्न करूं लागला, वक्षःस्थलाच्या योगानें वृक्ष बरोबर घेऊन जाऊं लागला आणि पुष्कळ वाढ झालेल्या

नीललोहितमाञ्जिष्ठपद्मवर्णैः सितासितैः ।
स्वभावसिद्धैर्विमलैर्धातुभिः समलंकृतम् ५
कामरूपिभिराविष्टमभीक्ष्णं सपरिच्छदैः ।
यक्षकिंनरगन्धर्वैर्देवकल्पैः सपन्नगैः ६
स तस्य गिरिवर्यस्य तले नागवरायुते ।
तिष्ठन्कपिवरस्तत्र ह्रदे नाग इवाबभौ ७
स सूर्याय महेन्द्राय पवनाय स्वयंभुवे ।
भूतेभ्यश्चाञ्जलिं कृत्वा चकार गमने मतिम् ८
अञ्जलिं प्राङ्मुखं कुर्वन्पवनायात्मयोनये ।
ततो हि ववृधे गन्तुं दक्षिणो दक्षिणां दिशम् ९
प्लवंगप्रवरैर्दृष्टः प्लवने कृतनिश्चयः ।
ववृधे रामवृद्ध्यर्थं समुद्र इव पर्वसु १०
निष्प्रमाणशरीरः संल्लिलङ्घयिषुरर्णवम् ।

---

सिंहाप्रमाणे असलेल्या मृगाचा वध करू लागला नील, आरक्त, गुलाबी, शुभ्र, कृष्ण आणि पद्मतुल्य रंगाच्या स्वत सिद्ध निर्मल धातूंच्या योगाने अलंकृत असून, स्वत त्या इच्छेप्रमाणे रूप धारण करणारे आणि परिवारासह असलेले असे देवतुल्य यक्ष, किंनर, गंधर्व आणि पन्नग यांनी वारंवार सेवित असा एक सपाट प्रदेश त्या श्रेष्ठ पर्वतावर हनुमानाला जाता जाता लागला. तेव्हा सर्वत्र उत्तमोत्तम गजांनी युक्त असलेल्या त्या श्रेष्ठ पर्वताच्या सपाट माथ्यावर तो वानरश्रेष्ठ हनुमान् उभा राहिला असता डोहामध्ये उभ्या असलेल्या गजाप्रमाणे तो शोभूं लागला ( ४–७ )

( त्या प्रदेशावर गेल्यानंतर ) प्रथमत सूर्य, इंद्र, वायु, ब्रह्मदेव आणि इतरही भूत यांना हात जोडून, नंतर त्याने पुढे जाण्याचें मनात आणले. पूर्वाभिमुख होऊन स्वत चा जनक जो वायु त्याला उद्देशून हनुमानाने हात जोडले आणि नंतर तो कुशल हनुमान् दक्षिणदिशेस जाण्याकरिता वृद्धिंगत झाला वानर त्याला पहात आहेत आणि ज्यानं समुद्रातून पोहून जाण्याचा निश्चय केला आहे, असा तो हनुमान् पर्वदिवशीं उद्दिगत होणाऱ्या समुद्राप्रमाणे रामाच्या अभ्युदया-

बाहुभ्यां पीडयामास चरणाभ्यां च पर्वतम् ११
स चचालाचलश्चाशु मुहूर्तं कपिपीडित ।
तरूणां पुष्पिताग्राणां सर्वं पुष्पमशातयत् १२
तेन पादपमुक्तेन पुष्पौघेण सुगन्धिना ।
सर्वतः स वृतः शैलो बभौ पुष्पमयो यथा १३
तेन चोत्तमवीर्येण पीड्यमानः स पर्वतः ।
सलिलं संप्रसुस्राव मदमत्त इव द्विपः १४
पीड्यमानस्तु बलिना महेन्द्रस्तेन पर्वतः ।
रीतीर्निर्वर्तयामास काञ्चनाञ्जनराजतीः १५
मुमोच च शिलाः शैलो विशालाः समनःशिलाः ।
मध्यमेनार्चिषा जुष्टो धूमराजिरिवानलः १६

करिता वृद्धिंगत झाला. सारांश, तो वानर प्रचंड शरीर धारण करून समुद्र उल्लंघन करण्यास प्रवृत्त झाला व हातांनी व पायांनी त्या पर्वताला पीडा देऊ लागला. ( ८-११ )

याप्रमाणे समुद्र उल्लंघन करण्यास तयार झाल्यामुळे हनुमानाच्या अंगात अवेशाचा संचार झाला. महान संचार करीत असतानाच तो पर्वत पीडित होऊन एकाएकी क्षणभर हालू लागला आणि प्रफुल्लित वृक्षावरील सर्वही पुष्पें त्या पर्वताने एका क्षणात पाडून टाकलीं. याप्रमाणे वृक्षावरून सुगंधी पुष्पांच्या राशी वाऱ्याने चोहोंकडे पसरल्या आणि सर्व बाजूंनी तो पर्वत पुष्पांच्या योगाने व्याप्त होऊन पुष्पमयच दिसू लागला. बलाढ्य हनुमानाच्या योगाने तो पर्वत दडपूं लागला आणि मत्त गजाच्या गंडस्थलांतून ज्याप्रमाणे मदाचा स्राव होऊं लागतो, त्याप्रमाणे त्या पर्वतांतून पाणी वाहू लागलें. त्या बलाढ्य हनुमानाच्या योगानें तो पर्वत जेव्हा दडपून जाऊं लागला, तेव्हा पीतवर्ण, कृष्णवर्ण आणि श्वेतवर्ण धातूंचे प्रवाह त्यांतून निघू लागले. हनुमानाच्या दडपणामुळे पीडित होऊ लागलेल्या त्या पर्वतापासून मनःशिलेसह मोठमोठ्या विस्तीर्ण शिळा बाहेर पडू लागल्या आणि मध्यम ज्वालेनें युक्त असलेल्या अग्नीच्या धुराच्या रेषेसारखा तो दिसू लागला. ( १२-१६ )

हरिणा पीड्यमानेन पीड्यमानानि सर्वतः ।
गुहाविष्टानि सत्त्वानि विनेदुर्विकृतैः स्वरैः १७
स महान्सत्त्वसंनादः शैलपीडानिमित्तजः ।
पृथिवीं पूरयामास दिशश्चोपवनानि च १८
शिरोभिः पृथुभिर्नागा व्यक्तस्वस्तिकलक्षणैः ।
वमन्तः पावकं घोरं ददंशुर्दशनैः शिलाः १९
तास्तदा सविषैर्दष्टाः कुपितैस्तैर्महाशिला ।
जज्वलुः पावकोद्दीप्ता बिभिदुश्च सहस्रधा २०
यानि त्वौषधजालानि तस्मिञ्जातानि पर्वते ।
विषघ्नान्यपि नागानां न शेकुः शमितुं विषम् २१
भिद्यतेऽयं गिरिर्भूतैरिति मत्वा तपस्विनः ।
त्रस्ता विद्याधरास्तस्मादुत्पेतुः स्त्रीगणैः सह २२
पानभूमिगतं हित्वा हैममासनभाजनम् ।
पात्राणि च महार्हाणि करकांश्च हिरण्मयान् २३

हनुमानामुळे पर्वताला पीडा होऊ लागली आणि तशी त्या पर्वतावर चोहो कडे गुहांतून असलेल्या प्राण्यांनाही पीडा होऊ लागली आणि तेही कठोर शब्द करून ओरडू लागले. पर्वताला पीडा होऊं लागल्यामुळे एकाद्या श्वापदा याप्रमाणे प्रचंड गर्जना केली व त्या ध्वनीने दिशा आणि उपवनें यासह सर्व पृथ्वी दुमदुमून गेली. स्पष्ट स्वस्तिक चिह्नें असलेल्या विशाल मस्तकांतून नाग भयंकर अग्नि बाहेर टाकू लागले आणि दातांनी शिळांना दंश करू लागले. याप्रमाणे क्रुद्ध झालेल्या विषारी नागांनी मोठमोठ्या शिळांना दंश केला असता, त्या शिळाही अग्नीच्या योगाने प्रज्वलित होऊन जळू लागल्या व त्यांचे हजारो तुकडे तुकडे होऊ लागले. त्या पर्वतावर असलेल्या विषघ्न वनस्पतीसुद्धा नागांचें विष घालविण्यास समर्थ झाल्या नाहीत. महाभूतें या पर्वताचे तुकडे तुकडे उडवीत आहेत असें समजून तपस्वी फार त्रस्त झाले आणि विद्याधरही आपल्या स्त्रीगणांसह त्या पर्वतावरून आकाशमार्गाने निघून गेले (१७-२२)

पानभूमीवर असलेली मद्याची आसनें, सुवर्णपात्रें, रत्न ठिकाणी असलेली

लेह्यानुच्चावचान्भक्ष्यान्मांसानि विविधानि च ।
आर्षभाणि च चर्माणि खड्गांश्च कनकत्सरून् २४
कृतकण्ठगुणाः क्षीबा रक्तमाल्यानुलेपनाः ।
रक्ताक्षाः पुष्कराक्षाश्च गगनं प्रतिपेदिरे २५
हारनूपुरकेयूरपारिहार्यधराः स्त्रियः ।
विस्मिताः सस्मितास्तस्थुराकाशे रमणैः सह २६
एष पर्वतसंकाशो हनूमान्मारुतात्मजः ।
तितीर्षति महावेगः समुद्रं वरुणालयम् २७
रामार्थं वानरार्थं च चिकीर्षन्कर्म दुष्करम् ।
समुद्रस्य परं पारं दुष्प्रापं प्राप्तुमिच्छति २८
इति विद्याधरा वाचः श्रुत्वा तेषां तपस्विनाम् ।
तमप्रमेयं ददृशुः पर्वते वानरर्षभम् २९

मोठी मोठी मूल्यवान् भारी सुवर्णाची उदकपात्रे, नाना प्रकारचे लेह्य व भक्ष्य पदार्थ, नाना प्रकारची मांसे, वृषभचर्मांच्या तयार केलेल्या ढाली आणि सोन्याच्या मुठी लावलेल्या तरवारी, हा सर्व टाकून देऊन ते कंठामध्ये माळा धारण केलेले, रंगीबेरंगी फुले व उटणी शरीरावर असलेले आणि कमलतुल्य नेत्रांनीयुक्त ते बलवान् विद्याधर आकाशमार्गाने चालते झाले तेव्हां चंद्रहार, तोरड्या, बाजूबंद, गोट वगैरे अलंकार धारण केलेल्या, स्मितमुखी विद्याधर-स्त्रियाही एकाएकी विस्मयचकित झाल्या आणि आकाशामध्ये आपआपल्या पतींच्या शेजारी जाऊन उभ्या राहिल्या. ( २३-२६ )

असो. " हा महावेगवान् व पर्वतप्राय वायुपुत्र हनुमान् वरुणाचें निवासस्थान असलेल्या समुद्राला उल्लंघून जाण्यास उद्युक्त झाला आहे. सारांश रामाकरितां आणि वानराकरितां दुष्कर कर्म करण्यास उद्युक्त झालेला हा हनुमान कोणासही जाण्यास अशक्य असलेल्या समुद्राच्या पलीकडच्या तीराला जाण्याची इच्छा करीत आहे " अशा प्रकारचा आकाशामध्ये संचार करणाऱ्या तपस्व्यांची भाषणे कानावर आली, तेव्हा विद्याधर खाली पाहूं लागले, तों त्या पर्वतावर असलेला तो अतर्क्य देह धारण करणारा वानरश्रेष्ठ त्यांच्या दृष्टीस पडला. ( २७-२९ )

दुधुवे च स रोमाणि चकम्पे चानलोपमः ।
ननाद च महानादं सुमहानिव तोयदः ३०
आनुपूर्व्या च वृत्तं तल्लाङ्गूलं लोमभिश्चितम् ।
उत्पतिष्यन्विचिक्षेप पक्षिराज इवोरगम् ३१
तस्य लाङ्गूलमाविद्धमतिवेगस्य पृष्ठतः ।
ददृशे गरुडेनेव ह्रियमाणो महोरगः ३२
बाहू संस्तम्भयामास महापरिघसंनिभौ ।
आससाद कपिः कट्यां चरणौ संचुकोच च ३३
संहृत्य च भुजौ श्रीमांस्तथैव च शिरोधराम् ।
तेजः सत्त्वं तथा वीर्यमाविवेश स वीर्यवान् ३४
मार्गमालोकयन्दूरादूर्ध्वप्रणिहितेक्षणः ।
रुरोध हृदये प्राणानाकाशमवलोकयन् ३५

---

अग्नितुल्य तेजःपुंज असलेल्या त्या हनुमानाने आपले अंग हालवून रोम हालविले आणि प्रचंड मेघाप्रमाणे मोठी गर्जनाही केली व आरंभापासून एकसारखे गोल आणि रोमांनी व्याप्त असलेलें आपलें शेपूट, पक्षिराज गरुड ज्याप्रमाणे सर्पाला वरचेवर उचलून खाली टाकीत असतो, त्याप्रमाणे, वारंवार उचलून भूमीवर आपटू लागला याप्रमाणे त्याचें तें पृष्ठभागी असलेलें अत्यंत भयंकर शेपूट वारंवार भूमीवर आदळू लागलें, तेव्हा ते गरुडाच्या तावडीत सापडलेल्या मोठ्या भुजंगाप्रमाणे दिसू लागले अशा रीतीने शेपूट खालीवर केल्यानंतर मोठमोठ्या अडसरासारखे असलेले विशाल हात त्या हनुमान् वानराने पर्वतावर ठेविले आणि वर अवसान घेतल्यामुळे कटिप्रदेशाचे ठिकाणी कृश बनून त्याने आपले पाय संकुचित केले नंतर त्या बलाढ्य हनुमानाने खांद्याजवळ आपले हात संकुचित करून कंठप्रदेशाचे ठिकाणी मानही संकुचित केली आणि नंतर आपल्या अंगी असलेलें तेज, शारीर बल आणि पराक्रम ही सर्व काही त्याने एकत्रित केली ( ३०–३४ )

नंतर दूरचा मार्ग अवलोकन करण्याकरिता त्याने आपली दृष्टि थोडी वर केली आणि आकाशाकडे पहात पहात हृदयामध्ये प्राणवायूचा निरोध केला नंतर•

पद्भ्यां दृढमवस्थानं कृत्वा स कपिकुञ्जरः ।
निकुच्य कर्णौ हनुमानुत्पतिष्यन्महाबलः ३६
वानरान्वानरश्रेष्ठ इदं वचनमब्रवीत् ।
यथा राघवनिर्मुक्तः शरः श्वसनविक्रमः ३७
गच्छेत्तद्वद्गमिष्यामि लङ्कां रावणपालिताम् ।
न हि द्रक्ष्यामि यदि तां लङ्कायां जनकात्मजाम् ३८
अनेनैव हि वेगेन गमिष्यामि सुरालयम् ।
यदि वा त्रिदिवे सीतां न द्रक्ष्यामि कृतश्रमः ३९
बद्ध्वा राक्षसराजानमानयिष्यामि रावणम् ।
सर्वथा कृतकार्योऽहमेष्यामि सह सीतया ४०
आनयिष्यामि वा लङ्कां समुत्पाट्य सरावणाम् ।
एवमुक्त्वा तु हनुमान्वानरो वानरोत्तमः ४१
उत्पपाताथ वेगेन वेगवानविचारयन् ।
सुपर्णमिव चात्मानं मेने स कपिकुञ्जरः ४२
समुत्पतति वेगात्तु वेगात्ते नगरोहिणः ।

पर्वतावर पाय घट्ट ठेऊन व कान संकुचित करून उडी मारण्यास तयार झालेला तो महाबलाढ्य कपिराज वानरश्रेष्ठ हनुमान् वानरांना म्हणाला, " ज्याप्रमाणे रामाने सोडलेला बाण वायुगतीने जाईल, त्याप्रमाणे मी, रावणाने संरक्षण केलेल्या लंका नगरीमध्ये जाईन आणि लंकेमध्ये जर ती जनककन्या सीता माझ्या दृष्टीस पडली नाही, तर त्याच वेगाने मी स्वर्गाला चालता होईन; परंतु असा प्रयत्न करून जर स्वर्गातही सीता माझ्या दृष्टीस पडली नाही, तर राक्षसराज रावणाला मी बांधून आणीन आणि सर्वस्वी कृतकार्य होऊन मी सीतेसह परत येईन अथवा रावणासह लंकाच उपटून घेऊन येईन " ( ३५-४१ )

याप्रमाणे वानरांना सांगून तो कपिश्रेष्ठ व वेगवान् हनुमान् दुसरें-तिसरें कांहीएक मनामध्ये न आणिता वेगाने उडाला आणि तो कपिश्रेष्ठ स्वतःला उड्डाण करण्यात श्रेष्ठ अशा गरुडाप्रमाणे मानूं लागला. हनुमान् वेगाने उड्डाण करूं लागला, तेव्हां त्याच्या त्या वेगामुळे त्या पर्वतावरील वृक्षही आपआपल्या

संहृत्य विटपान्सर्वान्समुत्पेतुः समन्ततः ४३
स मत्तकोयष्टिभकान्पादपान्पुष्पशालिनः ।
उद्वहन्नूरुवेगेन जगाम विमलेऽम्बरे ४४
ऊरुवेगोत्थिता वृक्षा मुहूर्तं कपिमन्वयुः ।
प्रस्थितं दीर्घमध्वानं स्वबन्धुमिव बान्धवाः ४५
तमूरुवेगोन्मथिताः सालाश्चान्ये नगोत्तमाः ।
अनुजग्मुर्हनूमन्तं सैन्या इव महीपतिम् ४६
सुपुष्पिताग्रैर्बहुभिः पादपैरन्वितः कपिः ।
हनूमान्पर्वताकारो बभूवाद्भुतदर्शनः ४७
सारवन्तोऽथ ये वृक्षा न्यमज्जँल्लवणाम्भसि ।
भयादिव महेन्द्रस्य पर्वता वरुणालये ४८
स नानाकुसुमैः कीर्णः कपिः साङ्कुरकोरकैः ।
शुशुभे मेघसंकाशः खद्योतैरिव पर्वतः ४९

---

र्व शाखा एकत्र करून सर्व बाजूंना उड्डाण करू लागले. याप्रमाणे मत्त टिट्टिभ पक्ष्यांनी युक्त असलेले प्रपुष्पित वृक्ष आपल्या प्रचंड वेगाने बरोबर नेत नेत निर्मल आकाशामध्ये हनुमानाने उड्डाण केले. हनुमानाच्या मांड्यांच्या वेगामुळे जमीन उखडून बाहेर निघालेले वृक्ष एक मुहूर्तपर्यंत, दूर प्रदेशाला निघालेल्या आपल्या बंधूंच्या मागोमाग ज्याप्रमाणे बांधव जात असतात, त्याप्रमाणे त्यांच्या मागोमाग गेले. अथवा राजाच्या मागोमाग ज्याप्रमाणे सैन्ये जातात, त्याप्रमाणे मांड्यांच्या वेगामुळे उपटून बाहेर आलेले साल व इतरही मोठमोठे वृक्ष त्या हनुमानाच्या मागोमाग चालते झाले ( ४१-४६ )

याप्रमाणे उत्कृष्ट रीतीने ज्यांच्या अग्रशाखा प्रफुल्लित झाल्या आहेत, असे असंख्य वृक्ष हनुमानाच्या बरोबर चालू लागले असता पर्वताकृति बनलेल्या त्या हनुमानाची मुद्रा आश्चर्यकारक दिसू लागली. जे काही जड जड वृक्ष होते, ते अखेर शेवटपर्यंत त्याचे बरोबर न जाता, इंद्राच्या भीतीमुळे समुद्रात बुडून जाणाऱ्या पर्वताप्रमाणे, जाता जाता वरुणालयरूप समुद्रात पडून बुडून गेले. कळ्या व किंचित उमललेली पुष्पे, तसेच पूर्णपणे विकास पावलेली पुष्पे यांनी व्याप्त

विमुक्तास्तस्य वेगेन मुक्त्वा पुष्पाणि ते द्रुमाः ।
व्यवशीर्यन्त सलिले निवृत्ताः सुहृदो यथा ५०
लघुत्वेनोपपन्नं तद्विचित्रं सागरेऽपतत् ।
द्रुमाणां विविधं पुष्पं कपिवायुसमीरितम् ५१
पुष्पौघेण सुगन्धेन नानावर्णेन वानरः ।
बभौ मेघ इवोद्यन्वै विद्युद्गणविभूषितः ५२
तस्य वेगसमुद्धूतैः पुष्पैस्तोयमदृश्यत ।
ताराभिरिव रामाभिरुदिताभिरिवाम्बरम् ५३
तस्याम्बरगतौ बाहू ददृशाते प्रसारितौ ।
पर्वताग्राद्विनिष्क्रान्तौ पञ्चास्याविव पन्नगौ ५४
पिबन्निव बभौ चापि सोर्मिजालं महार्णवम् ।
पिपासुरिव चाकाशं ददृशे स महाकपिः ५५

---

फ्लेला तो मेघतुल्य हनुमान्, काजव्यांनी व्याप्त झालेल्या पर्वतासारखा शोभू लागला आणि त्याच्या वेगाच्या तडाख्यातून प्रफुल्लित वृक्ष सुटल्यावर, मित्राला पोचविण्याकरिता बरोबर गेलेले इतर मित्र ज्याप्रमाणे मध्ये जलप्रवाह आला असता परत फिरतात त्याप्रमाणे, समुद्राचे उदक मध्यंतरी आल्याबरोबर आपली पुष्पें टाकून देऊन उदकामध्ये गडप झाले. वानराच्या वेगवायूने वृक्षांपासून सुटलेलीं नानाप्रकारचीं अद्भुत पुष्पें फारच हलकीं असल्यामुळे ती मात्र सागरावरच पडून राहिली. (४७—५१)

तो उड्डाण करणारा हनुमान् नाना प्रकारच्या सुगंधि पुष्पसमुदायामुळे विद्युद्गणविभूषित मेघाप्रमाणें दिसूं लागला आणि त्याच्या वेगामुळे वृक्षावरून सुटलेल्या पुष्पांनी आच्छादित झालेलें तें समुद्राचें उदक, उदय पावलेल्या रमणीय ताऱ्यांमुळे जसें आकाश शोभूं लागतें तसें शोभूं लागलें. हनुमानाने उड्डाण केल्यावर त्याचे आकाशामध्ये असलेले व बोटें पसरलेले हात पर्वतशिखरापासून निघालेल्या पंचमुखी नागाप्रमाणे दिसूं लागले. (५२–५४)

अन्तरिक्षामध्ये गेलेला तो महाकपि हनुमान् अधोमुख झाला असता तरंगसमुदायांनी भरलेला महासागरच पिऊन टाकण्यास उत्सुक झाल्यासारखा दिसे

तस्य विद्युत्प्रभाकारे वायुमार्गानुसारिणः।
नयने विप्रकाशेते पर्वतस्थाविवानलौ ५६
पिङ्गे पिङ्गाक्षमुख्यस्य बृहती परिमण्डले।
चक्षुषी संप्रकाशेते चन्द्रसूर्याविव स्थितौ ५७
मुखं नासिकया तस्य ताम्रया ताम्रमावभौ।
सन्ध्यया समभिस्पृष्टं यथा स्यात्सूर्यमण्डलम् ५८
लाङ्गूलं च समाविद्धं प्लवमानस्य शोभते।
अम्बरे वायुपुत्रस्य शक्रध्वज इवोच्छ्रितम् ५९
लाङ्गूलचक्रो हनुमाञ्शुक्लदंष्ट्रोऽनिलात्मजः।
व्यरोचत महाप्राज्ञः परिवेषीव भास्करः ६०
स्फिग्देशेनातिताम्रेण रराज स महाकपिः।
महता दारितेनेव गिरिर्गैरिकधातुना ६१
तस्य वानरसिंहस्य प्लवमानस्य सागरम्।

---

आणि ऊर्ध्वमुख झाला असता आकाशाच गट करण्याच्या बेतात असल्या सारखा भासे आकाशमार्गाने संचार करणाऱ्या त्या हनुमानाचे विजेप्रमाणे तेजस्वी असलेले नेत्र म्हणजे पर्वतावर लागलेले दोन वणवेच की काय, असे भासू लागले आसपास प्रभामंडलाने युक्त असलेले त्या कपिश्रेष्ठ हनुमानाचे पिंगट वर्णाचे प्रचंड डोळे आकाशात असलेले चंद्र-सूर्यच की काय, असे दिसू लागले सायंकालीन आकाशाने युक्त असलेले सूर्यमंडल ज्याप्रमाणे लाल दिसते, त्याप्रमाणे लाल नासिकेच्या योगाने त्याचे मुखही ताम्रवर्ण दिसू लागले वायुपुत्र हनुमान आकाशामध्ये उड्डाण करीत असताना अग्रभागी वाकडे करून उभारलेले त्याचे पुच्छ अंतरिक्षात उभारलेल्या इंद्रध्वजाप्रमाणे शोभू लागले पुच्छमंडलाने आणि शुभ्रवर्ण दाढांनी युक्त असलेला तो महाबुद्धिमान वायुपुत्र हनुमान् सूर्यासारखा तेजस्वी दिसू लागला खाणीतून काढलेल्या गैरिक धातूच्या विशाल शिलेने ज्याप्रमाणे, एखादा पर्वत दिसत असतो, त्याप्रमाणे अत्यंत ताम्रवर्ण असलेल्या ढुंगणाच्या योगाने तो महाकपि हनुमान् शोभू लागला, ( ५६–६१ )

कक्षान्तरगतो वायुर्जीमूत इव गर्जति ६२
खे यथा निपतत्युल्का उत्तरान्ताद्विनिःसृता ।
दृश्यते सानुबन्धा च तथा स कपिकुञ्जरः ६३
पतत्पतङ्गसंकाशो व्यायतः शुशुभे कपिः ।
प्रवृद्ध इव मातङ्गः कक्ष्यया वध्यमानया ६४
उपरिष्टाच्छरीरेण छायया चावगाढया ।
सागरे मारुताविष्टा नौरिवासीत्तदा कपिः ६५
यं यं देशं समुद्रस्य जगाम स महाकपिः ।
स तु तस्याङ्गवेगेन सोन्माद इव लक्ष्यते ६६
सागरस्योर्मिजालानामुरसा शैलवर्ष्मणा ।
अभिघ्नंस्तु महावेगः पुप्लुवे स महाकपिः ६७
कपिवातश्च बलवान्मेघवातश्च निर्गतः ।
सागरं भीमनिर्ह्रादं कम्पयामासतुर्भृशम् ६८

तो वानरश्रेष्ठ हनुमान समुद्र उल्लंघन करूं लागला, तेव्हा त्याच्या काखांमध्ये सापडलेला वायु मेघाप्रमाणे गर्जना करूं लागला. आकाशांत उत्तर दिशेकडून निघालेली व इतर लहान लहान उल्कांनी व्याप्त झालेली उल्का ज्याप्रमाणे पडता-पडता दृष्टीस पडते, त्याप्रमाणे तो वानर दिसूं लागला. पूर्ण वाढ झालेला गज मध्यभागीं दोरीने बांधल्यामुळे जसा शोभूं लागतो, तसा गमन करणारा सूर्यच की काय, असा तो दीर्घ कपि, कटिप्रदेशाला गुंडाळलेल्या वस्त्राच्या योगाने शोभूं लागला. शरीर ऊर्ध्वभागीं असल्यामुळे आणि अधोभागीं सागरामध्ये स्वत:चें प्रतिबिंब पडलें असल्यामुळे तो कपि हनुमान् त्या वेळीं वायूच्या तडाक्यांत सापडलेल्या नौकेप्रमाणें दिसूं लागला. समुद्रावरील ज्या ज्या प्रदेशावर तो महाकपि गेला, तो तो प्रदेश त्याच्या शरीरवेगाने प्रक्षुब्ध झाल्यासारखा दिसूं लागला. ( ६२—६६ )

तो अतिवेगवान् महाकपि आपल्या पर्वतप्राय वक्ष:स्थलाच्या योगाने समुद्रांतील लाटांना तोडीत पुढे जाऊं लागला. त्या कपीने आपल्या गतीने उत्पन्न केलेला प्रचंड वायु आणि मेघमंडलांतून बाहेर पडलेला वायु या उभयतांनी मिळून

तस्य सा शुशुभे छाया पतिता लवणाम्भसि ७५
शुशुभे स महातेजा महाकायो महाकपिः ।
वायुमार्गे निरालम्बे पक्षवानिव पर्वतः ७६
येनासौ याति बलवान्वेगेन कपिकुञ्जरः ।
तेन मार्गेण सहसा द्रोणीकृत इवार्णवः ७७
आपाते पक्षिसङ्घानां पक्षिराज इव व्रजन् ।
हनुमान्मेघजालानि प्रकर्षन्मारुतो यथा ७८
पाण्डुरारुणवर्णानि नीलमाञ्जिष्ठकानि च ।
कपिनाकृष्यमाणानि महाभ्राणि चकाशिरे ७९
प्रविशन्नभ्रजालानि निष्पतंश्च पुनः पुनः ।

वेगामुळे फारच मनोहर दिसत होती. वायुपुत्र हनुमान् आकाशांतून जाऊं लागला, त्या वेळीं त्याची समुद्रांत पडलेली आणि त्याच्या बरोबर धावत जाणारी त्याची ती छाया श्वेतवर्ण अभ्रांच्या मेघपंक्तीप्रमाणे शोभूं लागली. ( ७१-७० )

तो अत्यंत तेजस्वी व धिप्पाड महाकपि हनुमान् निराधार आकाशांतून चालला असतां, जणु एखादा पक्षयुक्त पर्वतच की काय, असा शोभा देऊं लागला. ज्या मार्गाने तो बलाढ्य कपिश्रेष्ठ हनुमान् जात होता, त्या मार्गाने तो समुद्र-मेघांना त्याचे घेरे वमत असल्याकारणानेच त्यापासून होणाऱ्या जल-स्रावामुळे एखाद्या कृत्रिम पर्जन्ययंत्रांतून * पडणाऱ्या जलधारांनीं युक्त झाल्या-सारखा दिसत असे. आकाशांतून, पक्षिगणांच्या मार्गाने पक्षिराज गरुडच जात आहे की काय, अशा रीतीने गमन करणारा तो हनुमान् वायूप्रमाणे आपल्या-बरोबर मेघसमुदायांनाहि ओढून नेऊं लागला. श्वेतवर्ण, अरुणवर्ण, नीलवर्ण आणि पाटलवर्ण अशीं मोठमोठीं अभ्रें हनुमान् ओढून नेऊं लागला व हीं वायूच्या योगाने आकृष्ट होत असल्यासारखीं दिसूं लागलीं. वारंवार मेघ

* राजेरजवाड्यांच्या बागांतून नानाप्रकारचीं क्रीडास्थानें केलेलीं असतात आणि या अनेक क्रीडास्थानांमध्ये, ज्यांत वरच्या बाजूला हजारें बारीक छिद्रें असलेल्या पाण्याच्या नळ्या नेऊन ठेवलेल्या असून उच्छेदन केलें तेव्हां कृत्रिम पर्जन्य पडतो असा देखावा करण्या-ची व्यवस्था केलेली असते, त्या यंत्राचा हा उल्लेख आहे

प्रच्छन्नश्च प्रकाशश्च चन्द्रमा इव दृश्यते ८०
प्लवमानं तु तं दृष्ट्वा प्लवगं त्वरितं तदा ।
ववृषुस्तत्र पुष्पाणि देवगन्धर्वदानवाः ८१
ततापन हि तं सूर्यः प्लवन्तं वानरेश्वरम् ।
सिषेवे च तदा वायू रामकार्यार्थसिद्धये । ८२
ऋषयस्तुष्टुवुश्चैनं प्लवमानं विहायसा ।
जगुश्च देवगन्धर्वाः प्रशंसन्तो वनौकसम् ८३
नागाश्च तुष्टुवुर्यक्षा रक्षांसि विविधानि च ।
प्रेक्ष्य सर्वे कपिवरं सहसा विगतक्लमम् ८४
तस्मिन्प्लवगशार्दूले प्लवमाने हनूमति ।
इक्ष्वाकुकुलमानार्थी चिन्तयामास सागरः ८५
साहाय्यं वानरेन्द्रस्य यदि नाहं हनूमतः ।
करिष्यामि भविष्यामि सर्ववाच्यो विवक्षताम् ८६

---

समुदायामध्ये प्रविष्ट होणारा व वारंवार त्यातून बाहेर पडणारा हनुमान् हा वरचेवर मेघांनी आच्छादित होणाऱ्या व वरचेवर त्यातून बाहेर पडणाऱ्या चन्द्राप्रमाणे दिसूं लागला. (७६–८०)

याप्रमाणे आकाशमार्गाने सत्वर उड्डाण करून जात असलेल्या त्या वानराला पाहून देव, गंधर्व, दानव यांनी त्या हनुमानावर पुष्पवृष्टि केली. आकाशमार्गाने गमन करणाऱ्या त्या वानराधिपतीला सूर्याने ताप दिला नाही आणि रामाचें कार्य सिद्धीस जावें याकरितां वायूनें हे श्रमपरिहार होण्याकरितां त्याचा सेवाच केली. आकाशमार्गानें उड्डाण करून जात असलेल्या त्या हनुमानाची ऋषि स्तुति करूं लागले आणि देव-गंधर्वही त्या वानराची प्रशंसा करण्याकरितां गायन करूं लागले. नाग, यक्ष आणि नाना प्रकारचे राक्षस हे सर्वही कपिश्रेष्ठ हनुमान् श्रमरहित झाला आहे, असें पाहून एकदम त्याची स्तुति करूं लागले. तो वानरश्रेष्ठ हनुमान् आकाशामध्ये उड्डाण करीत असतांना इक्ष्वाकु कुलाचा सत्कार करण्याची इच्छा धरणारा सागर आपल्याशीं विचार करूं लागला. (८१–८५)

" मी जर वानरराज हनुमानाला साहाय्य केलें नाहीं, तर उपहास म्हणून

अहमिक्ष्वाकुनाथेन मार्गेण विवर्धितः ।
इक्ष्वाकुसचिवश्चायं तमर्हत्यवसादितुम् ८७
तथा मया विधातव्यं विश्रमेत यथा कपिः ।
शेषं च मयि विश्रान्तः सुखी सोऽतितरिष्यति ८८
इति कृत्वा मतिं साध्वीं समुद्रश्छन्नमम्भसि ।
हिरण्यनाभं मैनाकमुवाच गिरिसत्तमम् ८९
त्वमिहासुरसङ्घानां देवराज्ञा महात्मना ।
पातालनिलयानां हि परिघः संनिवेशितः ९०
त्वमेषां ज्ञातवीर्याणां पुनरेवोत्पतिष्यताम् ।
पातालस्याप्रमेयस्य द्वारमावृत्य तिष्ठसि ९१
तिर्यगूर्ध्वमधश्चैव शक्तिस्ते शैल वर्धितुम् ।

प्रच्छन्नश्च प्रकाशश्च चन्द्रमा इव दृश्यते ८०
प्लवमानं तु तं दृष्ट्वा प्लवगं त्वरितं तदा ।
ववृषुस्तत्र पुष्पाणि देवगन्धर्वदानवाः ८१
तताप न हि तं सूर्यः प्लवन्तं वानरेश्वरम् ।
सिषेवे च तदा वायू रामकार्यार्थसिद्धये ८२
ऋषयस्तुष्टुवुश्चैनं प्लवमानं विहायसा ।
जगुश्च देवगन्धर्वाः प्रशंसन्तो वनौकसम् ८३
नागाश्च तुष्टुवुर्यक्षा रक्षांसि विविधानि च ।
प्रेक्ष्य सर्वे कपिवरं सहसा विगतक्लमम् ८४
तस्मिन्प्लवगशार्दूले प्लवमाने हनूमति ।
इक्ष्वाकुकुलमानार्थी चिन्तयामास सागरः ८५
साहाय्यं वानरेन्द्रस्य यदि नाहं हनूमतः ।
करिष्यामि भविष्यामि सर्ववाच्यो विवक्षताम् ८६

समुदायामध्ये प्रविष्ट होणारा व वारंवार त्यातून बाहेर पडणारा हनुमान् हा वरचेवर मेघांनी आच्छादित होणाऱ्या व वरचेवर त्यातून बाहेर पडणाऱ्या चंद्राप्रमाणे दिसू लागला." (७६–८०)

याप्रमाणे आकाशमार्गाने सत्वर उड्डाण करून जात असलेल्या त्या वानराला पाहून देव, गंधर्व, दानव यांनी त्या हनुमानावर पुष्पवृष्टि केली. आकाशमार्गाने गमन करणाऱ्या त्या वानराधिपतीला सूर्याने ताप दिला नाही आणि रामाचें कार्य सिद्धीस नेण्याकरिता वायूने हे श्रमपरिहार होण्याकरिता त्याची सेवाच केली. आकाशमार्गाने उड्डाण करून जात असलेल्या त्या हनुमानाची ऋषि स्तुति करू लागले आणि देव-गंधर्वही त्या वानराची प्रशंसा करण्याकरिता गायन करू लागले. नाग, यक्ष आणि नाना प्रकारचे राक्षस हे सर्वही कपिश्रेष्ठ हनुमान् श्रम राहून जात आहे असें पाहून एकदम त्याची स्तुति करू लागले. तो वानरश्रेष्ठ हनुमान् आकाशामधे उड्डाण करीत असतांना इक्ष्वाकु कुलाचा सत्कार करण्याची इच्छा धरणारा सागर आपल्या मनाशी विचार करू लागला. (८१–८०)

मी जर वानरराज हनुमानाला मदत केली नाहीं, तर वक्त्यांना म्हणून

अहमिक्ष्वाकुनाथेन सागरेण विवर्धितः।
इक्ष्वाकुसचिवश्चायं तथार्हत्यवसादितुम् ८७
तथा मया विधातव्यं विश्रमेत यथा कपिः।
शेषं च मयि विश्रान्तः सुखी सोऽतितरिष्यति ८८
इति कृत्वा मतिं साध्वीं समुद्रश्छन्नमम्भसि।
हिरण्यनाभं मैनाकमुवाच गिरिसत्तमम् ८९
त्वमिहासुरसङ्घानां देवराज्ञा महात्मना।
पातालनिलयानां हि परिघः संनिवेशितः ९०
त्वमेषां ज्ञातवीर्याणां पुनरेवोत्पतिष्यताम्।
पातालस्याप्रमेयस्य द्वारमावृत्य तिष्ठसि ९१
तिर्यगूर्ध्वमधश्चैव शक्तिस्ते शैल वर्धितुम्।
तस्मात्संचोदयामि त्वामुत्तिष्ठ गिरिसत्तम ९२
स एष कपिशार्दूलस्त्वामुपर्येति वीर्यवान्।

---

याणी आहे त्या सर्व प्राण्यांच्या निंदेस मी पात्र होईन. इक्ष्वाकुकुलाधिपति सगरपुत्राने मला वाढविले आहे आणि [illegible] इक्ष्वाकुवंशजालाच मदत करणारा आहे, याकरिताच हा थकून जाणें योग्य नाही. म्हणून या कपीला विश्रांति घेता येईल अशी काही तरी व्यवस्था मला केली पाहिजे. कारण, माझे ठिकाणी याने विश्रांति घेतली, तर शिल्लक राहिलेला मार्ग हा सहज आक्रमण करील." असा उत्कृष्ट विचार केल्यानंतर तो समुद्र आपल्या उदकाने आच्छादित होऊन राहिलेल्या सुवर्णमय पर्वतश्रेष्ठ मैनाकाला म्हणाला की, "महात्म्या देवराजाने तुला या ठिकाणीं पातालनिवासी असुरांचा निरोध करण्याकरिता अडसर म्हणून ठेवला आहे आणि त्याप्रमाणे देवराजाला ज्यांचें बल माहीत झालें आहे व, जे भिन्न भिन्न वर येण्याची इच्छा करीत असतात, त्या राक्षसांचें अतर्क्य असें जें पातालस्थान, त्याच्या द्वाराचा निरोध करून तूं राहिला आहेस. (८६–९१)

" हे पर्वता! यांना, ऊर्ध्वभागीं आणि अधोभागीं वृद्धिंगत होण्याचे तुझ्या अंगीं सामर्थ्य आहे म्हणून, हे पर्वतश्रेष्ठा! मी तुला सांगतों की, तूं वर ये म्हणजे हा कपिश्रेष्ठ वीर्यवान् हनुमान् तुझ्या प्रदेशावर येईल हा भयंकर कर्म करणारा

हनूमान्रामकार्यार्थी भीमकर्मा खमाप्लुतः ।
श्रमं च प्लवगेन्द्रस्य समीक्ष्योत्थातुमर्हसि ९३
हिरण्यगर्भो मैनाको निशम्य लवणाम्भसः ।
उत्पपात जलात्तूर्णं महाद्रुमलतावृतः ९४
स सागरजलं भित्त्वा बभूवात्युच्छ्रितस्तदा ।
यथा जलधरं भित्त्वा दीप्तरश्मिर्दिवाकरः ९५
स महात्मा मुहूर्तेन पर्वतः सलिलावृतः ।
दर्शयामास शृङ्गाणि सागरेण नियोजितः ९६
शातकुम्भमयैः शृङ्गैः सकिंनरमहोरगैः ।
आदित्योदयसंकाशैरालिखद्भिरिवाम्बरम् ९७
तस्य जाम्बूनदैः शृङ्गैः पर्वतस्य समुत्थितैः ।
आकाशं शस्त्रसंकाशमभवत्काञ्चनप्रभम् ९८
जातरूपमयैः शृङ्गैर्भ्राजमानैर्महाप्रभैः ।
आदित्यशतसंकाशः सोऽभवद्गिरिसत्तमः ९९

हनुमान् रामकार्य करण्याचा उद्देश मनात धरून आकाशामध्ये उड्डाण करून चालला आहे. यासाठी या वानरराजाच्या एकंदर श्रमाकडे लक्ष्य देऊन तू उठावेंस, हें बरें" ( ९३ )

हें समुद्राचें भाषण श्रवण केल्यावर मोठमोठ्या वृक्षांनी व लतांनी व्याप्त झालेला तो सुवर्णमय मैनाक पर्वत पाण्यांतून सत्वर वर आला आणि तो सागराचें उदर भेदून वर आलेला मैनाक पर्वत अतिशय उंच झाला, तेव्हां तो मेघाचें भेद करून बाहेर पडणाऱ्या तेजस्वी सूर्याप्रमाणें दिसूं लागला. ( ९४-९५ )

सारांश, सागराने आज्ञा केल्यानंतर उदकानें आच्छादित झालेल्या त्या मैनाकपर्वतानें एका मुहूर्तामध्ये आपलीं सर्व शिखरें प्रकट केलीं. ( ९६ )

तो मैनाकपर्वत सुवर्णमय शिखरांनी युक्त होता व तीं शिखरें उदयाचलाप्रमाणें गगनचुंबित होतीं आणि किंनर व महोरग हे त्यांचे ठिकाणीं वास्तव्य करीत होते. शस्त्राप्रमाणें श्यामवर्ण असलेलें आकाश त्या पर्वतापासून निघालेल्या सुवर्णमय शिखरांनी व्याप्त झाल्यामुळे सुवर्णासारखें तेजस्वी दिसूं लागलें आणि शेकडों

समुत्थितमसङ्गेन हनूमानग्रतः स्थितम् ।
मध्ये लवणतोयस्य विघ्नोऽयमिति निश्चितः १००
स तमुच्छ्रितमत्यर्थं महावेगो महाकपिः ।
उरसा पातयामास जीमूतमिव मारुतः १०१
स तदासादितस्तेन कपिना पर्वतोत्तमः ।
बुद्ध्वा तस्य हरेर्वेगं जहर्ष च ननाद च १०२
तमाकाशगतं वीरमाकाशे समुपस्थितः ।
प्रीतो हृष्टमना वाक्यमब्रवीत्पर्वतः कपिम् १०३
मानुषं धारयन् रूपमात्मनः शिखरे स्थितः ।
दुष्करं कृतवान्कर्म त्वमिदं वानरोत्तम १०४
निपत्य मम शृङ्गेषु सुखं विश्रम्य गम्यताम् ।
राघवस्य कुले जातैरुदधिः परिवर्धितः १०५
स त्वां रामहिते युक्तं प्रत्यर्चयति सागरः ।

---

लागलेल्या त्या महातेजस्वी सुवर्णमय शिखराच्या योगाने तो श्रेष्ठ पर्वतहि शेकडो सूर्यासारखा तेजस्वी दिसूं लागला (९७-९९)

याप्रमाणे एकाएकी आपल्यापुढें समुद्रामध्ये उद्भवलेल्या मैनाक पर्वताला पाहून, हें एक विघ्नच उत्पन्न झालें आहे, असा हनुमानाचा पक्का ग्रह झाला व म्हणूनच वायु ज्याप्रमाणे मेघाला उडवून लावतो, त्याप्रमाणे त्या अत्यंत वेगवान् महाकपीने समुद्रातून अतिशय वर आलेल्या त्या मैनाक पर्वताला आपल्या छातीचा तडाखा देऊन खाली पाडलें याप्रमाणे त्या कपीने पर्वतश्रेष्ठ मैनाकाला खाली पाडलें असता, त्या वानराचा वेग त्याला समजून आला तरी तो मैनाक-पर्वत हर्षयुक्त होऊन गर्जना करूं लागला, इतकेंच नव्हे, परंतु मनाला हर्ष वाटून प्रसन्न झालेला तो पर्वत वर आला आणि मनुष्यरूप धारण करून आपल्या शिखरावर स्थित झाला आणि अंतरिक्षामध्ये असलेल्या त्या वीर कपीला म्हणाला, " हे वानरश्रेष्ठा, तूं हे दुर्घट कर्म केलें आहेस; याकरितां आतां माझ्या शिखरावर तूं खुशाल उतरून विश्रांति घे आणि मग पुढें जा. रामाच्या कुला-मध्ये उत्पन्न झालेल्या सगरांनी समुद्राला वाढविलें आहे आणि म्हणून तो सागर

कृते च प्रतिकर्तव्यमेप धर्मः सनातनः १०६
सोऽयं तत्प्रतिकारार्थी त्वत्तः संमानमर्हति ।
त्वन्निमित्तमनेनाहं बहुमानात्प्रचोदितः १०७
योजनानां शतं चापि कपिरेप खमाप्लुतः ।
तव सानुपु विश्रान्तः शेपं प्रक्रमतामिति १०८
तिष्ठ त्वं हरिशार्दूल मयि विश्रम्य गम्यताम् ।
तदिदं गन्धवत्स्वादु कन्दमूलफलं बहु १०९
तदास्वाद्य हरिश्रेष्ठ विश्रान्तोऽथ गमिष्यसि ।
अस्माकमपि संबन्धः कपिमुख्य त्वयास्ति वै ११०
प्रख्यातस्त्रिपु लोकेपु महागुणपरिग्रहः १११
वेगवन्तः प्लवन्तो ये प्लवगा मारुतात्मज ।
तेपां मुख्यतमं मन्ये त्वामहं कपिकुञ्जर ११२

रामहिताविषयी उद्युक्त झालेल्या तुझा आदरसत्कार करीत आहे. कारण एखादाने आपल्यावर उपकार केला असता त्याच्यावर प्रत्युपकार करावा, हा सनातन धर्म आहे. ( १००–१०६ )

"वास्तव, त्या उपकाराकरिता प्रत्युपकाराची इच्छा करणाऱ्या समुद्राचा तुझ्याकडून मान राहणें योग्य आहे. ' शंभर योजनें उल्लंघून जाण्याचा उद्देश मनात धरून या कपीने आकाशामध्ये उड्डाण केलें आहे. म्हणून तुझ्या शिखरावर विश्रांति घेतल्यावर याने शिल्लक राहिलेला मार्ग आक्रमण करावा, ' म्हणून तुझ्याकरिता त्याने बहुमानाने मला विनंती केली आहे. तस्मात् हे वानरश्रेष्ठा, तूं जरा येथे स्वस्थ रहा आणि माझे ठिकाणी विश्रांति घेऊन मग पुढे जा. सारांश, ही सुगंधी व स्वादिष्ट असलेलीं अनेक प्रकारचीं मुळें, कंद व फळें खा व विश्रांति घेतल्यानंतर, हे वानरश्रेष्ठा, तूं पुढे जा. शिवाय, हे वानरश्रेष्ठ ! तुझ्याशीं आमचा संबंधही आहे. मोठमोठे गुण तुझे अंगीं असल्यामुळे तूं त्रैलोक्यामध्ये प्रख्यात आहेस. ( १०७–१११ )

"हे वायुपुत्रा, हे वानरश्रेष्ठा, उड्डाण करणारे जे काही वेगवान् वानर आहेत, त्यांमध्येही तूं श्रेष्ठ आहेस, असें मी समजतों. धर्माची अपेक्षा धरणाऱ्या विचारी

अतिथिः किल पूजार्हः प्राकृतोऽपि विजानता ।
धर्मं जिज्ञासमानेन किं पुनर्यादृशो भवान्　११३
त्वं हि देववरिष्ठस्य मारुतस्य महात्मनः ।
पुत्रस्तस्यैव वेगेन सदृशः कपिकुञ्जर　११४
पूजिते त्वयि धर्मज्ञे पूजां प्राप्नोति मारुतः ।
तस्मात्त्वं पूजनीयो मे शृणु चाप्यत्र कारणम्　११५
पूर्वं कृतयुगे तात पर्वताः पक्षिणोऽभवन् ।
तेऽपि जग्मुर्दिशः सर्वा गरुडा इव वेगिनः　११६
ततस्तेषु प्रयातेषु देवसङ्घाः सहर्षिभिः ।
भूतानि च भयं जग्मुस्तेषां पतनशङ्कया　११७
ततः क्रुद्धः सहस्राक्षः पर्वतानां शतक्रतुः ।
पक्षांश्चिच्छेद वज्रेण ततः शतसहस्रशः　११८
स मामुपगतः क्रुद्धो वज्रमुद्यम्य देवराट् ।
ततोऽहं सहसा क्षिप्तः श्वसनेन महात्मना　११९
अस्मिँल्लवणतोये च प्रक्षिप्तः प्लवगोत्तम ।

पुरपाला साधारण अतिथीही खरोखर पूज्य आहे, मग तुझ्यासारख्याची तर गोष्ट कशाला पाहिजे ? हे वानरश्रेष्ठा, तूं देवामध्ये वरिष्ठ असलेल्या महात्म्या वायूचा पुत्र असून, वेगामध्येही त्याची बरोबरी करणाराच आहेस आणि तुज धर्मवेत्त्या पुत्राची पूजा झाली असता त्या वायूचीही पूजा झाल्यासारखी होणार आहे. म्हणून तूं मला पूज्य आहेस. याविषयी आणखीहि एक कारण तूं ऐक. ( ११२—११५ )

हे हनुमाना, पूर्वी कृतयुगामध्ये पर्वत पक्षयुक्त होते आणि ते वेगवान् गरुडपक्ष्याप्रमाणे सर्व दिशांस उडत जात असत. एकदा ते उड्डाण करून चालले असतां ऋषि व देवगण आणि इतरही प्राणी याना त्यांच्या पडण्याची शंका येऊन भय उत्पन्न झाले. तेव्हा सहस्रनयन इंद्र रागावला आणि वज्राच्या योगाने त्याने पर्वताच्या पक्षाचे लक्षावधी तुकडे करून टाकिले. शेवटा तो क्रुद्ध झालेला इंद्र वज्र उगारून माझ्याकडेही आला असता महात्म्या वायूने मला एकाएकी आकाशात

गुप्तपक्षः समग्रश्च तव पित्राभिरक्षितः १२०
ततोऽहं मानयामि त्वां मान्योऽसि मम मारुते।
त्वया ममैष संबन्धः कपिमुख्य महागुणः १२१
अस्मिन्नेवंगते कार्ये सागरस्य ममैव च।
प्रीतिं प्रीतमनाः कर्तुं त्वमर्हसि महामते १२२
श्रमं मोक्षय पूजां च गृहाण हरिसत्तम।
प्रीतिं च मम मान्यस्य प्रीतोऽस्मि तव दर्शनात् १२३
एवमुक्तः कपिश्रेष्ठस्तं नगोत्तममब्रवीत्।
प्रीतोऽस्मि कृतमातिथ्यं मन्युरेषोऽपनीयताम् १२४
त्वरते कार्यकालो मे अहश्चाप्यतिवर्तते।
प्रतिज्ञा च मया दत्ता न स्थातव्यमिहान्तरा १२५
इत्युक्त्वा पाणिना शैलमालभ्य हरिपुंगवः।
जगामाकाशमाविश्य वीर्यवान्प्रहसन्निव १२६

उडवून दिलें आणि हे वानरश्रेष्ठा, या समुद्रामध्ये टाकलें. याच रीतीनें तुझ्या पित्यानें सर्वांग शरीर व पक्ष यांसहवर्तमान माझें रक्षण केलें. ( ११६–१२० )

" यामुळे मी तुला मान देत आहें आणि म्हणूनच, हे वायुपुत्रा, तूं मला मान्य, आहेस हे वानरश्रेष्ठा, तुझ्याशी हा माझा संबंध फारच महत्त्वाचा आहे एवंच-कीर्तीच, हे महाबुद्धिमान् हनुमंता, या प्रस्तुतकाळच्या कार्याविषयीं तूं प्रसन्न मनानें समुद्राचा व माझा मनोरथ परिपूर्ण कर हे वानरश्रेष्ठा, श्रम परिहार करून तूं या माझ्या सत्काराचा स्वीकार कर; मी तुझ्या दर्शनामुळे संतुष्ट झालों आहे आणि वयोमध्ये माझें म्हणणें मान्य करणेंच तुला योग्य आहे तूं माझा एवढा मनोरथ पूर्ण कर. " ( १२१–१२३ )

याप्रमाणें मैनाकपर्वतानें सांगितलें, तेव्हां वानरश्रेष्ठ त्या पर्वतश्रेष्ठाला म्हणाला " मी संतुष्ट झालों आहे आणि तूंहि माझा योग्य सत्कार केला आहेस परंतु माझ्या म्हणण्याप्रमाणें मला आतां वेळ मोठला येत नाहीं यासाठीं तूं राग धरूं नकोस मला कार्य करण्याला वेळ थोडाच आहे, दिवसही आतां चालला आहे आणि येथें मध्यंतरीं थांबायचें नाहीं, अशी मी प्रतिज्ञाहि केली आहे " ( १२४–१२५ )

स पर्वतसमुद्राभ्यां बहुमानादवेक्षितः ।
पूजितश्चोपपन्नाभिराशीर्भिरभिनन्दितः    १२७
अथोर्ध्वं दूरमाप्लुत्य हित्वा शैलमहार्णवौ ।
पितुः पन्थानमासाद्य जगाम विमलेऽम्बरे    १२८
भूयश्चोर्ध्वं गतिं प्राप्य गिरिं तमवलोकयन् ।
वायुसूनुर्निरालम्बो जगाम कपिकुञ्जरः    १२९
तद्द्वितीयं हनुमतो दृष्ट्वा कर्म सुदुष्करम् ।
प्रशशंसुः सुराः सर्वे सिद्धाश्च परमर्षयः    १३०
देवताश्चाभवन्हृष्टास्तत्रस्थास्तस्य कर्मणा ।
काञ्चनस्य सुनाभस्य सहस्राक्षश्च वासवः    १३१
उवाच वचनं धीमान्परितोषात्सगद्गदम् ।
सुनाभं पर्वतश्रेष्ठं स्वयमेव शचीपतिः    १३२
हिरण्यनाभ शैलेन्द्र परितुष्टोऽस्मि ते भृशम् ।

असें म्हणून त्या वानरश्रेष्ठ हनुमानाने पर्वताला हाताने स्पर्श केला आणि दुसऱ्यामारखें करीत करीत पुनरपि आकाशमार्गाचें अवलंबन करून तो वीर्यवान् पुढे चालता झाला पर्वत आणि समुद्र यानी याप्रमाणे बहुमानपूर्वक त्याला अवलोकन केलें, त्याचा सत्कार केला आणि योग्य आशीर्वादानी त्याचें अभिनंदनही केलें. नंतर पर्वत व महासागर हा सोडून त्या हनुमानाने उंच उड्डाण केलें. याप्रमाणे आपल्या पित्याच्या मार्गाचा अवलंब करून तो निर्मल आकाशामध्ये जाऊं लागला. नंतर पहिल्यापेक्षाही उंच उड्डाण करून, त्या पर्वताकडे पहात पहात तो निराधार वायुपुत्र वानरश्रेष्ठ चालता झाला. तेव्हा हनुमानाचें अत्यंत कठीण असें तें दुसरेंही कर्म पाहून सर्व देव, सिद्ध आणि महर्षि त्याची स्तुति करूं लागले. ( १२६—१३० )

उभागीं मनोहर असलेल्या त्या सुवर्णमय मैनाकपर्वताचें तें त्याचें वर येण्याचें कार्य पाहून सहस्रनयन इंद्रासह तेथे असलेले देवही संतुष्ट झाले नंतर बुद्धिमान् इंद्र उत्कृष्ट मध्यप्रदेशाने युक्त असलेल्या त्या पर्वतश्रेष्ठाला संतोषामुळे हास्यपूर्वक म्हणाला, " हे सुवर्णमय पर्वतराजा, मी तुझ्यावर अत्यंत संतुष्ट झालों आहे मी

अभयं ते प्रयच्छामि गच्छ सौम्य यथासुखम् १३३
साह्यं कृतं ते सुमहद्विश्रान्तस्य हनूमतः ।
क्रमतो योजनशतं निर्भयस्य भये सति १३४
रामस्यैव हितायैव याति दाशरथेः कपिः ।
सत्क्रियां कुर्वता शक्त्या तोषितोऽस्मि दृढं त्वया १३५
स तत्प्रहर्षमलभद्विपुलं पर्वतोत्तमः ।
देवतानां पतिं दृष्ट्वा परितुष्टं शतक्रतुम् १३६
स वै दत्तवरः शैलो बभूवावस्थितस्तदा ।
हनूमांश्च मुहूर्तेन व्यतिचक्राम सागरम् १३७
ततो देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः ।
अब्रुवन्सूर्यसंकाशां सुरसां नागमातरम् १३८
अयं वातात्मजः श्रीमान्प्लवते सागरोपरि ।
हनूमान्नाम तस्य त्वं मुहूर्तं विघ्नमाचर १३९
राक्षसं रूपमास्थाय सुघोरं पर्वतोपमम् ।

तुला अभय देतो. विनयसंपन्न तूं खुशाल पुढें जा. शंभर योजनेंपर्यंत आकाशमार्गानें जाण्यास उद्युक्त झालेला आणि जाता जाता थमलेला हनुमान निर्भय असतांनाही त्याला भीति उत्पन्न झाली असेल, असें समजून तूं त्याला फारच मोठें साहाय्य केलेंस, यामुळें मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें. दाशरथी रामाच्याच हिताकरितां हा कपि चालला आहे आणि याचा यथाशक्ति सत्कार करण्याम उद्युक्त झाल्यास म्हणून मलाही तूं अतिशय संतुष्ट केलें आहेस" (१३१-१३५)

देवराज इंद्र संतुष्ट झाला आहे, असें पाहून त्या पर्वतश्रेष्ठाला फारच हर्ष झाला. इंद्रानें " तुला अभय आहे, " असा वर दिल्यानंतर तो मैनाकपर्वत पूर्वीप्रमाणेच जलामध्यें आणि हनुमानही त्याच्याशीं बोलण्याकरितां क्षणभर थांबून सागराचें उल्लंघन करीत पुढें चालला. तदनंतर गंधर्वादि सर्व देव, सिद्ध आणि महर्षि तेजानें सूर्याप्रमाणें असलेल्या सुरसा नामक नागमातेला म्हणाले, " हा भव्य वायुपुत्र हनुमान् समुद्रावरून जात आहे, त्याला तूं क्षणभर विघ्न कर. सारांश, करालदंष्ट्र आणि पिंगटवर्ण नेत्र यांनी युक्त असें अत्यंत भयंकर पर्वतप्राय

दंष्ट्राकरालं पिङ्गाक्षं वक्त्रं कृत्वा नभःस्पृशम् १४०
बलमिच्छामहे ज्ञातुं भूयश्चास्य पराक्रमम् ।
त्वां विजेष्यत्युपायेन विषादं वा गमिष्यति १४१
एवमुक्ता तु सा देवी दैवतैरभिसत्कृता ।
समुद्रमध्ये सुरसा बिभ्रती राक्षसं वपुः १४२
विकृतं च विरूपं च सर्वस्य च भयावहम् ।
प्लवमानं हनूमन्तमावृत्येदमुवाच ह १४३
मम भक्ष्यः प्रदिष्टस्त्वमीश्वरैर्वानरर्षभ ।
अहं त्वां भक्षयिष्यामि प्रविशेदं ममाननम् १४४
वर एष पुरा दत्तो मम धात्रेति सत्वरा ।
व्यादाय वक्त्रं विपुलं स्थिता सा मारुतेः पुरः १४५
एवमुक्तः सुरसया प्रहृष्टवदनोऽब्रवीत् ।
रामो दाशरथिर्नाम प्रविष्टो दण्डकावनम् ।

---

राक्षसरूप धारण करून व आकाशाला स्पर्श करण्यासारखें मुख मोठें करून, तू याला विघ्न आण. ( १३६–१४० )

" आम्हाला याचें बल, विशेषतः याचा पराक्रम समजून घेण्याची फार इच्छा आहे, तेव्हां अशी काही युक्ति योजून हा तुला जिंकील किंवा तोच जेरीस येईल कीं काय तें आपण पाहूं. " याप्रमाणे देवांनी तिला विनंती केली असता, त्या सुरसा देवीने विकृत, विरूप आणि सर्वांना भयानक असें राक्षसरूप धारण केलें आणि आकाशमार्गाने जाणाऱ्या हनुमानाचा मार्ग आडवून धरून त्याला ती म्हणाली, " ईश्वराने तुजसारख्या वानरश्रेष्ठाला माझें भक्ष्य म्हणून योजना केली आहे. मी तुला भक्षण करणार, या माझ्या मुखामध्ये तूं प्रविष्ट हो, कारण जो तुझ्यासमोर येईल, तो तुझ्या मुखामध्ये प्रविष्ट होईल, असा विधात्याने मला पूर्वीच वर देऊन ठेविला आहे " असें म्हणत असतानाच आपलें विशाल मुख पसरून, ती *सुरसा राक्षसी मरुत्र त्या वायुपुत्राच्या पुढे उभी राहिली* ( १४१–१४५ )

परंतु, सुरसेने त्याच्याशीं असें भाषण केलें, तरी हनुमान् प्रसन्न मुद्रेने तिला म्हणाला, " रामनामक दशरथपुत्र, हा त्याचा भ्राता लक्ष्मण आणि त्याची भार्या

लक्ष्मणेन सह भ्रात्रा वैदेह्या चापि भार्यया १४६
अस्य कार्यविपक्तस्य बद्धवैरस्य राक्षसैः ।
तस्य सीता हृता भार्या रावणेन यशस्विनी १४७
तस्याः सकाशं दूतोऽहं गमिष्ये रामशासनात् ।
कर्तुमर्हसि रामस्य साह्यं विषयवासिनि १४८
अथवा मैथिलीं दृष्ट्वा रामं चाक्लिष्टकारिणम् ।
आगमिष्यामि ते वक्त्रं सत्यं प्रतिशृणोमि ते १४९
एवमुक्ता हनुमता सुरसा कामरूपिणी ।
अब्रवीन्नातिवर्तेन्मां कश्चिदेष वरो मम १५०
तं प्रयान्तं समुद्वीक्ष्य सुरसा वाक्यमब्रवीत् ।
बलं जिज्ञासमाना सा नागमाता हनूमतः १५१
निविश्य वदनं मेऽद्य गन्तव्यं वानरोत्तम ।
वर एष पुरा दत्तो मम धात्रेति सत्वरा १५२

विदेहराजकन्या सीता--यासह दण्डकारण्यामध्ये प्रविष्ट झाला, त्या वेळीं राक्षसांशीं वैर धरून राहिलेला तो राम मायावी मृगाचा वध करण्याविषयीं तयार झाला, तेव्हां त्याची यशस्विनी भार्या सीता रावणानें हरण करून नेली. तिच्याकडे रामाच्या आज्ञेवरून मी त्याचा दूत म्हणून जात आहें तस्मात् हे रामप्रदेशवासिनी, रामाच्या कार्याला मदत करणें, हेंच तुला योग्य आहे, पण माझी तुला सुटका करावयाची नसेल, तर सीतेला आणि उदार कृत्यें करणाऱ्या रामाला पाहून येऊन मी तुझ्या मुखात शिरण्यास परत येईन, हें मी तुला खरोखर प्रतिज्ञेवर सांगून ठेवितों." याप्रमाणें हनुमानानें विनंती केली असतां इच्छेनुरूप हवें तें रूप धारण करणारी ती सुरसा त्याला म्हणाली, "माझ्या तावडींतून सुटून कोणीही जाणार नाहीं, हा तर मला वर मिळालेला आहे." ( १४६–१५० )

असें सुरसा सांगत असतांनाही, जेव्हां हनुमान तसाच पुढें जाऊं लागला तेव्हां हनुमानाचें बल तरी किती आहे, हें पाहण्याची इच्छा धरून, ती नागमाता सुरसा त्याच्या तोंडाकडे पाहून म्हणाली, "हे वानरश्रेष्ठा, आतां माझ्या मुखांत प्रवेश कर व नंतर तूं जा, कारण विधात्यानें मला असा वर पूर्वींच दिलेला

व्यादाय विपुलं वक्त्रं स्थिता सा मारुतेः पुरः।
एवमुक्तः सुरसया क्रुद्धो वानरपुंगवः १५३
अब्रवीत्कुरु वै वक्त्रं येन मां विषहिष्यसि।
इत्युक्त्वा सुरसां क्रुद्धो दशयोजनमायताम् १५४
दशयोजनविस्तारो हनूमानभवत्तदा।
चकार सुरसाप्यास्यं विंशद्योजनमायतम् १५५
तद् दृष्ट्वा व्यादितं त्वास्यं वायुपुत्रः स बुद्धिमान्।
दीर्घजिह्वं सुरसया सुभीमं नरकोपमम् १५६
स संक्षिप्यात्मनः कायं जीमूत इव मारुतिः।
तस्मिन्मुहूर्ते हनुमान्बभूवाङ्गुष्ठमात्रकः १५७
सोऽभिपद्याथ तद्वक्त्रं निष्पत्य च महाबलः
अन्तरिक्षे स्थितः श्रीमानिदं वचनमब्रवीत् १५८
प्रविष्टोऽस्मि हि ते वक्त्रं दाक्षायणि नमोऽस्तु ते।
गमिष्ये यत्र वैदेही सत्यश्चासीद्वरस्तव १५९

---

आहे." असें त्याला मागताक्षणीं ती सुरसा आपलें प्रचंड मुख पसरून मारुतीपुढें उभी राहिली; परंतु सुरसा त्याला हें सांगत असतांच तो वानरश्रेष्ठ हनुमान् क्रुद्ध होऊन, तिला म्हणाला, "तर मग ज्या मुखानें तूं माझें गमन सहन करशील, तें आपलें मुख एवढें हवें तेवढें मोठें कर." तो हनुमान् क्रुद्ध होऊन दहा योजनें लांब असलेल्या त्या सुरसेला असें म्हणाला आणि स्वतःही दहा योजनें लांब झाला, परंतु सुरसेनें जेव्हां आपलें मुख वीस योजनें मोठें केलें, तेव्हां दीर्घ जिव्हेनें युक्त, अत्यंत भयंकर आणि नरकाच्याच उपमेला योग्य असें तें त्या सुरसेनें पसरलेलें मुख पाहिलें, तेव्हां त्या बुद्धिमान् वायुपुत्र मारुतीनें आपलें स्वतःचें शरीर अतिशय लहान केलें. इतकें की तो हनुमान् तत्क्षणीं अंगठ्याएवढाच झाला. अशा रीतीनें तो महाबलाढ्य व भव्य हनुमान् तिच्या मुखांत प्रविष्ट झाला. तसाच पुनरपि बाहेर पडला व नंतर अंतरिक्षामध्यें उभा राहून म्हणाला, "हे दाक्षायणि, नमो नमः! तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी तुझ्या मुखामध्यें प्रविष्ट झालों होतों,

तं दृष्ट्वा वदनान्मुक्तं चन्द्रं राहुमुखादिव ।
अब्रवीत्सुरसा देवी स्वेन रूपेण वानरम् १६०
अर्थसिद्ध्यै हरिश्रेष्ठ गच्छ सौम्य यथासुखम् ।
समानय च वैदेहीं राघवेण महात्मना १६१
तत्तृतीयं हनुमतो दृष्ट्वा कर्म सुदुष्करम् ।
साधु साध्विति भूतानि प्रशशंसुस्तदा हरिम् १६२
स सागरमनाधृष्यमभ्येत्य वरुणालयम् ।
जगामाकाशमाविश्य वेगेन गरुडोपमः १६३
सेविते वारिधाराभिः पतगैश्च निषेविते ।
चरिते कैशिकाचार्यैरैरावतनिषेविते १६४
सिंहकुञ्जरशार्दूलपतगोरगवाहनैः ।
विमानैः संपतद्भिश्च विमलैः समलंकृते । १६५
वज्राशनिसमस्पर्शैः पावकैरिव शोभिते ।
कृतपुण्यैर्महाभागैः स्वर्गजिद्भिरधिष्ठिते १६६

आता मी जिकडे विदेहराजकन्या सीता आहे, तिकडे जात आहे. तुला मिळालेला वर खरा झाला." ( १५१-१६० )

याप्रमाणे राहुमुखातून चंद्राप्रमाणे, आपल्या मुखातून पार पडलेल्या त्या वानराला अवलोकन केल्यावर ती सुरसादेवी आपलें नेहमीचें रूप धारण करून, त्याला म्हणाली, "हे वानरश्रेष्ठा, स्वकार्यसिद्धीकरितां तूं आतां सुखाला वाटेल तिकडे जा आणि, हे विनयसंपन्न हनुमाना, महात्म्या रामाला सीता प्राप्त करून दे." असें हनुमानाचें अत्यंत कठीण असें हें तिसरें कार्य आढळून आल्यावर "शाबास, शाबास !" म्हणून त्या वानराची सर्व प्राण्यांनी प्रशंसा केली. याप्रमाणे वरुणाचें निवासस्थान अशा दुस्तर सागरापाशी आल्यानंतर, तो गरुडतुल्य हनुमान आकाशामध्ये वेगाने उड्डाण करून जाऊं लागला ( १६०--१६३ )

जलधारा, पक्षी, संगीताचार्य, गंधर्व आणि ऐरावत यांनी युक्त, सिंह, गज, व्याघ्र, पक्षी आणि उरग हीं वाहनें ज्यांना लाविलेलीं आहेत, अशा दाहीदिशांनी चालणाऱ्या निर्मल विमानांनी भूषित, वज्र व विद्युत् यांच्या आघाताप्रमाणें

वहता हव्यमत्यन्तं सेविते चित्रभानुना ।
ग्रहनक्षत्रचन्द्रार्कतारागणविभूषिते १६७
महर्षिगणगन्धर्वनागयक्षसमाकुले ।
विविक्ते विमले विश्वे विश्वावसुनिषेविते । १६८
देवराजगजाक्रान्ते चन्द्रसूर्यपथे शिवे ।
विताने जीवलोकस्य विमले ब्रह्मनिर्मिते १६९
बहुशः सेविते वीरैर्विद्याधरगणैर्वृते ।
जगाम वायुमार्गे च गरुत्मानिव मारुतिः १७०
हनुमान्मेघजालानि प्रकर्षन्मारुतो यथा १७१
कालागुरुसवर्णानि रक्तपीतसितानि च ।
कपिना कृष्यमाणानि महाभ्राणि चकाशिरे १७२
प्रविशन्नभ्रजालानि निष्पतंश्च पुनः पुनः ।
प्रावृषीन्दुरिवाभाति निष्पतन्प्रविशंस्तथा १७३

---

ज्याचा स्पर्श भयंकर आहे, अशा अप्सरांनी शोभित, पुण्यवान् आणि महाभाग्यवान् अशा स्वर्ग जिंकिलेल्या लोकांनी अधिष्ठित, देवाकडे एकसारखे हव्य नेणाऱ्या अग्नीने आश्रित, ग्रह, नक्षत्रें, चंद्र, सूर्य आणि तारागण यांनी विभूषित, महर्षिगण, गंधर्व, नाग आणि यक्ष यांनी व्यापलेले, अलग, निर्मल, विश्वाला आश्रयभूत, विश्वावसुनामक गंधर्वराजाने सेवित, देवराजाच्या गजानी व्याप्त, मंगलप्रद चंद्रसूर्यांचा मार्ग जीवलोकावर घातलेली ब्रह्मनिर्मित निर्मल चांदणी, वीरांनी वारंवार सेवित आणि विद्याधरगणांनी व्याप्त अशा वायुमार्गरूप आकाशातून तो वायुपुत्र हनुमान् वायूप्रमाणे मेघसमुदाय आकर्षण करीत गरुडाप्रमाणे जाऊ लागला (१६४–१७१)

रक्तवर्ण, श्वेतवर्ण पीतवर्ण आणि कृष्णागुरुतुल्यवर्ण अशीं मोठमोठीं अभ्रें वायुपुत्र हनुमानाच्या मागोमाग त्याच्या वेगामुळे जातांना झळकूं लागलीं. पुन्हा पुन्हा मेघजालामध्ये प्रवेश करीत असतांना त्यांतून फिरून फिरून बाहेर पडत असतांना, तो हनुमान् पर्जन्यकाळीं मेघपटलांत वारंवार प्रविष्ट होणाऱ्या व पुनरपि त्यांतून बाहेर पडणाऱ्या चंद्राप्रमाणे शोभत होता व सर्व ठिकाणाहून दृष्टीस पडणारा तो

प्रदृश्यमानः सर्वत्र हनूमान्मारुतात्मजः ।
भेजेऽम्बरं निरालम्बं पक्षयुक्त इवाद्रिराट् १७४
प्लवमानं तु तं दृष्ट्वा सिंहिका नाम राक्षसी ।
मनसा चिन्तयामास प्रवृद्धा कामरूपिणी १७५
अद्य दीर्घस्य कालस्य भविष्याम्यहमाशिता ।
इदं मम महासत्त्वं चिरस्य वशमागतम् १७६
इति संचिन्त्य मनसा च्छायामस्य समाक्षिपत् ।
छायायां गृह्यमाणायां चिन्तयामास वानरः १७७
समाक्षिप्तोऽस्मि सहसा पङ्गूकृतपराक्रमः ।
प्रतिलोमेन वातेन महानौरिव सागरे १७८
तिर्यगूर्ध्वमधश्चैव वीक्षमाणस्ततः कपिः ।
ददर्श स महासत्त्वमुत्थितं लवणाम्भसि १७९
तद् दृष्ट्वा चिन्तयामास मारुतिर्विकृताननाम् ।
कपिराज्ञा यथाख्यातं सत्त्वमद्भुतदर्शनम् १८०

वायुपुत्र हनुमान् पंख असलेला जणु पर्वतराजच आहे, असा लोकांना भासत होता. तो निराधार आकाशाचेंच अवलंबन करून राहिला आकाशातून उड्डाण करणाऱ्या त्या हनुमानाला पाहिल्यावर इच्छित रूप धारण करणारी सिंहिकानामक अति वृद्ध राक्षसी मनामध्ये विचार करूं लागली की, " बराच काल लोटल्यानंतर, आज आपणाला पोटभर भोजन मिळणार आहे, कारण, पुष्कळ दिवसांनी हा मोठा प्राणी माझ्या तावडींत सापडला आहे." ( १७२–१७६ )

असा मनामध्ये विचार करून त्या सिंहिकाराक्षसीने त्या हनुमानाची छाया पकडली छाया ओढली जाऊ लागली, तेव्हा हनुमान् मनामध्ये विचार करूं लागला " मला एकाएकीं ओढ लागली असून, माझा पराक्रम एकदम थांबलेला आहे व यामुळे सागरामध्ये उलट दिशेच्या वाऱ्याने ज्याप्रमाणें नौकेची स्थिति होते, त्याप्रमाणे माझी स्थिति झाली आहे. ' असा विचार करून तो कपि चाचरला आणि खालीवर पाहूं लागला, तेव्हा समुद्रामध्ये वर आलेला असा एक मोठा प्राणी त्याच्या दृष्टीस पडला तेव्हा कराल वदनाने युक्त असलेली राक्षसी

छायाग्राहि महावीर्यं तदिदं नात्र संशयः ।
स तां बुध्वाऽर्थतत्त्वेन सिंहिकां मतिमान्कपिः १८१
व्यवर्धत महाकायः प्रावृषीव बलाहकः ।
तस्य सा कायमुद्वीक्ष्य वर्धमानं महाकपेः १८२
वक्त्रं प्रसारयामास पातालाम्बरसंनिभम् ।
घनराजीव गर्जन्ती वानरं समभिद्रवत् १८३
स ददर्श ततस्तस्या विकृतं सुमहन्मुखम् ।
कायमात्रं च मेधावी मर्माणि च महाकपिः १८४
स तस्या विवृते वक्त्रे वज्रसंहननः कपिः ।
संक्षिप्य मुहुरात्मानं निपपात महाकपिः १८५
आस्ये तस्या निमज्जन्तं ददृशुः सिद्धचारणाः ।
ग्रस्यमानं यथा चन्द्रं पूर्णं पर्वणि राहुणा १८६

---

आटळल्यावर मारुति मनात म्हणाला, " अद्भुत आकाराचे, महाबलवान् आणि स्वत-च्या छायेनेही वस्तु ग्रहण करण्यास समर्थ, असा जो प्राणी वानरराजाने मला सांगितला होता, तो हाचे असावा, यात संशय नाही यांप्रमाणे छायाकर्षणा-चा अनुभव आल्यामुळे, त्या बुद्धिमान् हनुमंताने त्या सिंहिकेला ओळखले आणि पर्जन्यकाली वृद्धिंगत होणाऱ्या मेघाप्रमाणे प्रचंड शरिराने युक्त असलेला तो कपि हनुमान अधिकच वृद्धिंगत होऊं लागला. तेव्हा वृद्धिंगत होणारे त्या महाकपीचें शरीर अवलोकन करून त्या सिंहिकेने पाताल आणि आकाश या दोहोमधील भागाप्रमाणे असलेलें आपलें मुख उघडले आणि मेघपंक्तीप्रमाणे गर्जना करीत करीत ती त्या वानराकडे धावली ( १७७–१८३ )

याप्रमाणे ती हनुमानाच्या अंगावर धावून गेली तिचे ते अकाळविकाळ व अजस्र मुख पाहून तिचा नखशिखांत देह आणि तिची मर्मस्थानें हीं त्या बुद्धिमान् महाकपीने निरखून पाहिलीं. नंतर आपला देह अतिशयच संकुचित करून त्या वज्रतुल्य व बळकट महाकपि हनुमानाने तिच्या अकाळविकाळ मुखामध्ये उडी घातली. याप्रमाणे तिच्या मुखामध्ये तो कपि बुडून जाऊं लागला, तेव्हा पौर्णिमेचे दिवशीं राहूने ग्रस्त होत असलेल्या चंद्राप्रमाणे सिद्ध-चारणांनी त्याला पाहिलें.

ततस्तस्या नखैस्तीक्ष्णैर्मर्माण्युत्कृत्य वानरः ।
उत्पपाताथ वेगेन मनःसंपातविक्रमः १८७
तां तु दिष्ट्या च धृत्या च दाक्षिण्येन निपात्य सः ।
कपिप्रवीरो वेगेन ववृधे पुनरात्मवान् १८८
हृतहृत्सा हनुमता पपात विधुराम्भसि ।
स्वयंभुवैव हनुमान्सृष्टस्तस्या निपातने १८९
तां हतां वानरेणाशु पतितां वीक्ष्य सिंहिकाम् ।
भूतान्याकाशचारीणि तमूचुः प्लवगोत्तमम् १९०
भीममद्य कृतं कर्म महत्सत्त्वं त्वया हतम् ।
साधयार्थमभिप्रेतमरिष्टं प्लवतां वर १९१
यस्य त्वेतानि चत्वारि वानरेन्द्र यथा तव ।
धृतिर्दृष्टिर्मतिर्दाक्ष्यं स कर्मसु न सीदति १९२
स तैः संपूजितः पूज्यः प्रतिपन्नप्रयोजनैः ।

---

तिच्या मुखामध्ये प्रवेश केल्यानंतर, आपल्या गतीने मनाच्या उड्डाणाशी बरोबरी करणारा तो वानर तीक्ष्ण नखांनी तिच्या मर्मस्थानांचे लचके काढून, अत्यंत वेगाने बाहेर पडला. ( १८४–१८७ )

याप्रमाणें सुदैव, धैर्य आणि प्रसंगावधान यांच्या योगाने त्या राक्षसीचा वध करून तो जितेंद्रिय कपिश्रेष्ठ पुनरपि वेगावेगाने ऊर्ध्वगत झाला. हनुमानाने जिचें हृदयच काढून नेलें आहे, अशी ती सिंहिकाराक्षसी समुद्रामध्ये त्याच्या हातूनच मरण पावली, कारण तिचा वध करण्याकरिताच ब्रह्मदेवाने हनुमानाला उत्पन्न केलें होतें. वानराने मारलेली आणि म्हणूनच एकाएकी मरून पडलेली ती सिंहिका पाहून आकाशामध्ये संचार करणारे प्राणी त्या वानरश्रेष्ठाला म्हणाले, ‘ हे उड्डाण करणाऱ्यांमध्ये श्रेष्ठ हनुमाना, तू आज या मोठ्या राक्षसीचा वध केलास, हें एक प्रचंडच कृत्य केलेंस आता तू आपला मनोरथ निर्विघ्नपणें सिद्धीस ने हे वानराधिपते, धैर्य, प्रसंगावधान, मति आणि दक्षता हे चार गुण तुझ्याप्रमाणे ज्याचे ठिकाणीं असतात, तो प्राप्त कार्यामध्ये कधींही अडचणीत पडत नाहीं. ” ( १८८–१९२ )

जगामाकाशमाविश्य पन्नगाशनवत्कपिः १९३
प्राप्तभूयिष्ठपारस्तु सर्वतः परिलोकयन् ।
योजनानां शतस्यान्ते वनराजीं ददर्श सः १९४
ददर्श च पतन्नेव विविधद्रुमभूषितम् ।
द्वीपं शाखामृगश्रेष्ठो मलयोपवनानि च, १९५
सागरं सागरानूपान्सागरानूपजान्द्रुमान् ।
सागरस्य च पत्नीनां मुखान्यपि विलोकयत् १९६
स महामेघसंकाशं समीक्ष्यात्मानमात्मवान् ।
निरुन्धन्तमिवाकाशं चकार मतिमान्मतिम् १९७
कायवृद्धिं प्रवेगं च मम दृष्ट्वैव राक्षसाः ।
मयि कौतूहलं कुर्युरिति मेने महामतिः १९८
ततः शरीरं संक्षिप्य तन्महीधरसंनिभम् ।
पुनः प्रकृतिमापेदे वीतमोह इवात्मवान् १९९

याप्रमाणे त्या प्रशंसनीच मारुतीची त्याने हातीं घेतलेल्या कार्याला अनुमोदन देऊन, त्यानी प्रशंसा केली. तो कपि हनुमान्, गरुडाप्रमाणे आकाशमार्गाचेंच अवलंबन करून, पुढे चालला. जवळजवळ पलीकडील तीराला पोचल्यावर, त्याने चोहोंकडे दृष्टि टाकली, तेव्हा त्याने शंभर योजनाचे शेवटीं एक वनपंक्ति पाहिली. आकाशामध्ये उड्डाण करीत असतानाच त्या वानरश्रेष्ठाने नाना प्रकारच्या वृक्षांनी भूषित, असें एक बेट आणि मलय पर्वतावरील उपवनें पाहिलीं. तसेंच नगर, समुद्रतीरावरील प्रदेश, त्या प्रदेशावरील वृक्ष आणि नद्यांचीं मुखें, हींही त्यानें पाहिलीं. तदनंतर मोठ्या मेघासारखें अर्थात् जणु आकाशाच व्याप्त करणारें, असें आपलें विशाल शरीर अवलोकन करून, तो जितेंद्रिय बुद्धिमान् हनुमान् मनामध्ये विचार करूं लागला की, "माझी शरीरवृद्धि आणि वेग पाहिल्याबरोबर राक्षस आश्चर्यचकित होऊन मला पहाण्यास उत्सुक होतील," असें त्या महा-विचारी हनुमानाला वाटलें. तेव्हा वासनेच्या तावडींत सांपडल्यामुळे आलेला मोह नाहीसा झाल्यावर जीवन्मुक्त योगी ज्याप्रमाणे जीव-ब्रह्मैक्यानुभवरूप स्वभावाचें अवलंबन करतो, त्याप्रमाणे हनुमानाने ते आपलें, पर्वतप्राय शरीर अगदी

तद्रूपमतिसंक्षिप्य हनूमान्प्रकृतौ स्थितः ।
त्रीन्क्रमानिव विक्रम्य बलिवीर्यहरो हरिः २००
स चारुनानाविधरूपधारी परं समासाद्य समुद्रतीरम् ।
परैरशक्यं प्रतिपन्नरूपः समीक्षितात्मा समवेक्षितार्थः २०१
ततः स लम्बस्य गिरेः समृद्धे विचित्रकूटे निपपात कूटे ।
सकेतकोद्दालकनारिकेले महाभ्रकूटप्रतिमो महात्मा २०२
ततस्तु संप्राप्य समुद्रतीरं समीक्ष्य लङ्कां गिरिवर्यमूर्ध्नि ।
कपिस्तु तस्मिन्निपपात पर्वते विधूय रूपं व्यथयन्मृगद्विजान् २०३
स सागरं दानवपन्नगायुतं बलेन विक्रम्य महोर्मिमालिनम् ।
निपत्य तीरे च महोदधेस्तदा ददर्श लङ्काममरावतीमिव २०४

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

[ २०४ ]

संकुचित करून आपले पूर्ववत् स्वाभाविक शरीर धारण केले ( १९३–१९९ )

बलराजाचे बल हरण करणाऱ्या श्रीहरीने ज्याप्रमाणे तीन पावले टाकिल्यावर, वृद्धिगत केलेले शरीर जसे संकुचित केले, तसे हनुमानानेही ते आपले विशाल रूप अतिशय संकुचित करून वानररूप धारण केले. इतरांना जाऊन पोचण्यास अशक्य, अशा त्या समुद्राच्या परतीराला गेल्यानंतर, आपले वृद्धिगत झालेले अति प्रचंड शरीर अवलोकन करून व हाती घेतलेल्या कार्याचा विचार करून, नाना प्रकारचे मनोहर रूप धारण करण्यास समर्थ असलेल्या त्या हनुमानाने आपले नेहमीचे वानररूप धारण केले व मोठ्या मेघाप्रमाणे असलेला तो महात्मा हनुमान् केवडे, भोकरी आणि नारळी हे वृक्ष व इतर लहान लहान विचित्र शिखरे असलेल्या लंब या नावाचे त्रिकूटाचलाच्या समृद्ध शिखरावर उतरला. तात्पर्य, समुद्रतीराला जाऊन पोचल्यानंतर, त्या श्रेष्ठ पर्वताच्या शिखरावर असलेल्या लंका पाहून घेऊन व आपले अति प्रचंड रूप सोडून देऊन, तो कपि पशुपक्ष्यांना त्रास देत त्या पर्वतावर येऊन उतरला. दानव आणि पन्नग असलेल्या व मोठमोठ्या लाटांनी भरून गेलेल्या सागराचे त्याने पराक्रमाने उल्लंघन करून पर्वतशिखरावर उतरल्यावर, महासागराच्या किनारी अमरावती-

द्वितीयः सर्गः ।

स सागरमनाधृष्यमतिक्रम्य महाबलः ।
त्रिकूटस्य तटे लङ्कां स्थितः स्वस्थो ददर्श ह १
ततः पादपमुक्तेन पुष्पवर्षेण वीर्यवान् ।
अभिवृष्टस्ततस्तत्र बभौ पुष्पमयो हरिः २
योजनानां शतं श्रीमांस्तीर्त्वाप्युत्तमविक्रमः ।
अनिःश्वसन्कपिस्तत्र न ग्लानिमधिगच्छति ३
शतान्यहं योजनानां क्रमेयं सुबहून्यपि ।
किं पुनः सागरस्यान्तं संख्यातं शतयोजनम् ४
स तु वीर्यवतां श्रेष्ठः प्लवतामपि चोत्तमः ।
जगाम वेगवाँल्लङ्कां लङ्घयित्वा महोदधिम् ५
शाद्वलानि च नीलानि गन्धवन्ति वनानि च ।

---

प्रमाणे असलेली लंका नगरी त्याने अवलोकन केली. (२००-२०४)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांपैकी पहिला सर्ग समाप्त झाला ॥ १ ॥

दुस्तर सागराचें उल्लंघन करून हनुमान् त्रिकूटाचलपर्वताच्या शिखरावर जाऊन स्वस्थ बसला आणि त्याने लंका अवलोकन केली. तदनंतर वृक्षांपासून निघालेल्या पुष्पवृष्टीचा हनुमानावर सर्व बाजूंनी वर्षाव झाला आणि त्यामुळे त्या ठिकाणीं तो बलवान् कपि पुष्पमयच बनून गेला. तो महापराक्रमी भव्य हनुमान् एकदम शंभर योजनें समुद्र उल्लंघून जरी गेला होता, तरी त्याला यत्किंचित् मुळीच आलेला नव्हता आणि म्हणूनच पूर्वापेक्षा अधिक जोराने त्याचा श्वासोच्छ्वासमही चालू नव्हता. इतकेंच नव्हे, तर " अशा योजनांचीं मी अशीं पुष्कळ शतकें उल्लंघन करून जाण्यास समर्थ आहे; मग या परिमित शंभर योजनेंच असलेल्या समुद्राच्या पैलतीराची कथा ती काय ?" असाही विचार त्याच्या मनामध्यें चाललाच होता. असो. वीर्यवानांमध्यें श्रेष्ठ आणि उड्डाण करणाऱ्यांमध्येंही वरिष्ठ असा तो महावेगवान वानर महासागराचें उल्लंघन केल्यानंतर, पर्वतशिखरावर उतरून लंकेकडे वळला. (१-५)

मधुमन्ति च मध्येन जगाम नगवन्ति च ६
शैलांश्च तरुसंच्छन्नान्वनराजीश्च पुष्पिताः ।
अभिचक्राम तेजस्वी हनूमान्प्लवगर्षभः ७
स तस्मिन्नचले तिष्ठन्वनान्युपवनानि च ।
स नगाग्रे स्थितां लङ्कां ददर्श पवनात्मजः ८
सरलान्कर्णिकारांश्च खर्जूरांश्च सुपुष्पितान् ।
प्रियालान्मुचुलिन्दांश्च कुटजान्केतकानपि ९
प्रियङ्गून्गन्धपूर्णांश्च नीपान्सप्तच्छदांस्तथा ।
असनान्कोविदारांश्च करवीरांश्च पुष्पितान् १०
पुष्पभारनिबद्धांश्च तथा मुकुलितानपि ।
पादपान्विहगाकीर्णान्पवनाधूतमस्तकान् ११
हंसकारण्डवाकीर्णा वापीः पद्मोत्पलावृताः ।
आक्रीडान्विविधान्रम्यान्विविधांश्च जलाशयान् १२
संततान्विविधैर्वृक्षैः सर्वर्तुफलपुष्पितैः ।
उद्यानानि च रम्याणि ददर्श कपिकुञ्जरः १३

---

कोमल तृण असलेले नीलवर्णाचे प्रदेश आणि मध, सुगंध व वृक्ष असलेलीं अनेक वनें पहात पहात मध्यमार्गाने तो जाऊं लागला. तो तेजस्वी वानरश्रेष्ठ हनुमान् वृक्षांनी व्यापून टाकलेले पर्वत आणि प्रफुल्लित झालेल्या वनराजी ओलांडून जाऊं लागला. प्रथमतः त्या त्रिकूटाचलपर्वतावर तो वायुपुत्र बसला व त्याने वनें, उपवनें आणि पर्वतशिखरावर असलेली लंका ही पाहून घेतली. तात्पर्य, सुरु, प्रफुल्लित पांगारे, खजूर, चार, ईशालिश, कुडे, केवडे, वाघांटी, सुगंधयुक्त कळंब, सातवण, असाणा, कांचन, प्रफुल्लित कण्हेर आणि त्याचप्रमाणे पुष्पभारांनी कळ्यांनी भरलेले, पक्ष्यांनी गजबजलेले आणि वायूमुळे चंचल अग्रांनी युक्त झालेले इतरही वृक्ष तसेच, हंस व कारंडव पक्ष्यांनी आणि नाना प्रकारचीं कमलें असलेल्या वापी, नाना प्रकारचे रमणीय क्रीडापर्वत, सर्व ऋतूंमध्ये पुष्पांनी व फळांनी युक्त असलेल्या नाना प्रकारच्या वृक्षांनी गजबजून टाकलेले अनेक प्रकारचे जलाशय व मनोहर उद्यानें त्या वानरश्रेष्ठ हनुमानाने

समासाद्य च लक्ष्मीवाँल्लङ्कां रावणपालिताम् ।
परिखाभिः सपद्माभिः सोत्पलाभिरलंकृताम् १४
सीतापहरणात्तेन रावणेन सुरक्षिताम् ।
समन्ताद्विचरद्भिश्च राक्षसैरुग्रधन्विभिः १५
काञ्चनेनावृतां रम्यां प्राकारेण महापुरीम् ।
गृहैश्च गिरिसंकाशैः शारदाम्बुदसंनिभैः १६
पाण्डुराभिः प्रतोलीभिरुच्चाभिरभिसंवृताम् ।
अट्टालकशताकीर्णां पताकाध्वजशोभिताम् १७
तोरणैः काञ्चनैर्दिव्यैर्लतापङ्क्तिविराजितैः ।
ददर्श हनुमाँल्लङ्कां देवो देवपुरीमिव १८
गिरिमूर्ध्नि स्थितां लङ्कां पाण्डुरैर्भवनैः शुभैः ।
ददर्श स कपिः श्रीमान्पुरीमाकाशगामिव १९
पालितां राक्षसेन्द्रेण निर्मितां विश्वकर्मणा ।

---

अवलोकन केली. ( ६—१३ )

नंतर रावणाने जिचें पालन केलें आहे, अशा लंकेसमीप तो भव्य हनुमान् जाऊन पोचला. ती लंका अनेक प्रकारच्या कमलांनी भरलेल्या खंदकांनी भूषित झालेली होती. या लंकेमध्येच सीतेला धरून आणून ठेविलें असल्यामुळे, त्या रावणानें लंकेसभोवती सतत संचार करणाऱ्या प्रचंड धनुर्धारी राक्षसांच्या योगानें तिचें संरक्षण केलें होतें. सुवर्णप्राकारानें ती महानगरी रम्य लंका व्याप्त झालेली होती आणि प्रचंड अशा शरदृतूंतील मेघाप्रमाणे दिसणाऱ्या पर्वतप्राय गृहांनी ती युक्त होती. तिच्यांत मोठमोठे शुभ्रवर्ण रस्ते होते, तसेंच ती शेंकडो बुरुजांनी गजबजून गेलेली होती. सर्वत्र पताका आणि ध्वज यांच्या योगानें ती सुशोभित झालेली होती आणि लतासमूहांनी भूषित केलेल्या सुवर्णमय दिव्य तोरणांनी ती शृंगारलेली होती. अशा प्रकारची ती लंका, इंद्र जसा अमरावती नगरी अवलोकन करतो, तशी हनुमानानें अवलोकन केली. शुभ्रवर्ण शुभ गृहांनी भरून गेलेली आणि पर्वताच्या माथ्यावर असलेली ती भव्य लंका आकाशांतील नगरीप्रमाणें हनुमानानें अवलोकन केली. ( १४–१९ )

प्लवमानामिवाकाशे ददर्श हनुमान्कपिः २०
वप्रप्राकारजघनां विपुलाम्बुनाम्बराम् ।
शतघ्नीशूलकेशान्तामट्टालकवतंसकाम् २१
मनसेव कृतां लङ्कां निर्मितां विश्वकर्मणा ।
द्वारमुत्तरमासाद्य चिन्तयामास वानरः २२
कैलासनिलयप्रख्यमालिखन्तमिवाम्बरम् ।
ध्रियमाणमिवाकाशमुच्छ्रितैर्भवनोत्तमैः २३
संपूर्णां राक्षसैर्घोरैर्गुहामाशीविषैरिव ।
तस्याश्च महतीं गुप्तिं सागरं च निरीक्ष्य सः ।
रावणं च रिपुं घोरं चिन्तयामास वानरः २४
आगत्यापीह हरयो भविष्यन्ति निरर्थकाः ।
न हि युद्धेन वै लङ्का शक्या जेतुं सुरैरपि २५
इमां त्वविषमां लङ्कां दुर्गां रावणपालिताम् ।

विश्वकर्म्याने निर्माण केलेला आणि राक्षसाधिपति रावणाने संरक्षण केलेला ती लंका जणु आकाशामध्ये उडतच आहे की काय, असें त्या हनुमान् वानराने पाहिलें किल्ले व तट हा जिचा कटिप्रदेश आहे सागर आणि वनें ही जिचीं वस्त्रे आहेत, शतघ्नी व शूल हे जिचे केश आहेत आणि मोठमोठे वाडे हीं जिचीं कर्ण-भूषणें आहेत, अशी ती विश्वकर्म्याने, जशी काही मनाच्याच योगाने आपल्या स्वकल्पनेने निर्माण केलेली लंका पाहिल्यावर हनुमान् वानर तिच्या उत्तरद्वाराशी गेला आणि विचार करू लागला की, कैलासस्थानाप्रमाणे उंच असलेलें तें उत्तरद्वार जसें काही गगनचुंबित होतें आणि उंच उंच असलेल्या उत्कृष्ट गृहांच्या योगाने जसें काही आकाशालाच धारण करून राहिल्यासारखें दिसत होतें असो सर्पांनी भरून गेलेल्या गुहेप्रमाणे, घोर राक्षसांनी भरून गेलेली ती लंका नगरी, तिचा तो बळेकोट बंदोबस्त, तिच्या भोंवतीं असलेला सागर आणि भयंकर शत्रु रावण, इतकीं लक्ष्यांत आणून हनुमान् आपल्याशींच विचार करूं लागला तो म्हणाला, " वानर जरी येथे आले तरी त्यांचा काहीच उपयोग होणार नाहीं कारण युद्ध करून लंका जिंकण्याचा प्रयत्न देवांनाही शक्य नाहीं पर्वत वगैरे सपाट

'प्राप्यापि सुमहाबाहुः किं करिष्यति राघवः　२६
अवकाशो न सान्त्वस्य राक्षसेष्वभिगम्यते ।
न दानस्य न भेदस्य नैव युद्धस्य दृश्यते　२७
चतुर्णामेव हि गतिर्वानराणां तरस्विनाम् ।
वालिपुत्रस्य नीलस्य मम राज्ञश्च धीमतः　२८
यावज्जानामि वैदेहीं यदि जीवति वा न वा ।
तत्रैव चिन्तयिष्यामि दृष्ट्वा तां जनकात्मजाम्　२९
ततः स चिन्तयामास मुहूर्तं कपिकुञ्जरः ।
गिरेः शृङ्गे स्थितस्तस्मिन् रामस्याभ्युदयं ततः　३०
अनेन रूपेण मया न शक्या रक्षसां पुरी ।
प्रवेष्टुं राक्षसैर्गुप्ता क्रूरैर्बलसमन्वितैः　३१
महौजसो महावीर्या बलवन्तश्च राक्षसाः ।
वञ्चनीया मया सर्वे जानकीं परिमार्गता　३२

प्रदेशावर असलेल्या व रावणाकडून संरक्षण होत असलेल्या दुर्गम लंकेमध्ये येऊन अत्यंत महापराक्रमी राम तरी काय करणार ? ( २०-२६ )

"राक्षसांचे ठिकाणीं साम, दाम व भेद यांपैकीं कशाचाच उपयोग होणार नाही आणि त्यांच्याशीं युद्ध करूनही कांहीं उपयोग होईलसें दिसत नाही. वालिपुत्र अंगद, नील, मी व बुद्धिवान् राजा सुग्रीव, या चार बलाढ्य वानरांचीच काय ती गति येथे होण्यासारखी आहे. ( २७-२८ )

"सर्वप्रथम विदेहराजकन्या सीता जिवंत आहे किंवा नाही, याचा शोध केला पाहिजे. त्या जनककन्येला पाहिल्यावर मग तेथेच मला जें काय पुढील विचार करावयाचा तो मी करीन." अशा प्रकारचे विचार मनांत येऊन त्या पर्वताच्या शिखरावर बसलेल्या त्या कपिश्रेष्ठ हनुमानानें रामाच्या अभ्युदयासंबंधानें सुमारें एक मुहूर्तपर्यंत विचार केला. त्याला वाटलें, "सांप्रतच्या रूपानें राक्षसांच्या नगरींमध्ये माझा प्रवेश होणें शक्य नाहीं; कारण बलाढ्य व क्रूर राक्षसांनी तिचें रक्षण केलेलें आहे. महातेजस्वी, महावीर्यवान् आणि बलाढ्य असे जे हे राक्षस आहेत, त्या सर्वांना फसवूनच, मला सीतेचा शोध लाविला पाहिजे. चक्षुरिंद्रियाला

लक्ष्यालक्ष्येण रूपेण रात्रौ लङ्कापुरी मया।
प्राप्तकालं प्रवेष्टुं मे कृत्यं साधयितुं महत् ३३
तां पुरीं तादृशीं दृष्ट्वा दुराधर्षां सुरासुरैः।
हनूमांश्चिन्तयामास विनिःश्वस्य मुहुर्मुहुः ३४
केनोपायेन पश्येयं मैथिलीं जनकात्मजाम्।
अदृष्टो राक्षसेन्द्रेण रावणेन दुरात्मना ३५
न विनश्येत्कथं कार्यं रामस्य विदितात्मनः।
एकामेकस्तु पश्येयं रहिते जनकात्मजाम् ३६
भूताश्चार्था विनश्यन्ति देशकालविरोधिताः।
विक्लवं दूतमासाद्य तमः सूर्योदये यथा ३७
अर्थानर्थान्तरे बुद्धिर्निश्चितापि न शोभते।
घातयन्तीह कार्याणि दूताः पण्डितमानिनः ३८
न विनश्येत्कथं कार्यं वैक्लव्यं न कथं भवेत्।
लङ्घनं च समुद्रस्य कथं नु न भवेद्वृथा ३९

अगोचर आणि कर्मामुळे तर्क्य, असें रूप धारण करून रात्रीचे वेळीं हें हातीं घेतलेलें मोठें कृत्य सिद्धीस नेण्याकरितां लंकानगरीमध्यें प्रवेश करणें मला उचित दिसतें." असा विचार केल्यानंतर, देवदैत्यानाही जिंकण्यावर हल्ला करतां येणें शक्य नाहीं, अशा प्रकारची ती लंकानगरी पाहून आणि वारंवार दीर्घ सुस्कारे टाकून हनुमान् पुनः विचार करूं लागला. "दुरात्म्या राक्षसाधिपति रावणाच्या स्वतः दृष्टीस न पडतां जनककन्या सीता कोणत्या उपायानें माझ्या दृष्टीस पडेल? उदार अन्तःकरणानें या रामाचें कार्य कोठेंहि न बिघडतां एकट्या सीतेशींच माझ्या एकट्याची कशी भेट होईल? सूर्योदय ज्याप्रमाणें अंधकाराचा नाश करतो, त्याप्रमाणें अयोग्य दूताची निवड केल्यामुळें, देश व काल विरुद्ध झाल्यामुळें जवळ जवळ सिद्धीस गेलेलीं हीं कार्यें नाहींशीं होत असतात. कार्याकार्याविषयीं स्वामीनें मंत्र्यासहवर्तमान जरी एकदां विचार निश्चित केला असला, तरी अयोग्य दूताशीं गांठ पडल्यावर, त्या निर्णयाची कांहींएक निष्पत्ति होत नाहीं; कारण शहाणपणाच्या घमेंडींत असणारे दूत स्वामिकार्यांचा घात

मयि दृष्टे तु रक्षोभी रामस्य विदितात्मनः ।
भवेद्व्यर्थमिदं कार्यं रावणानर्थमिच्छतः　　४०
न हि शक्यं कचित्स्थातुमविज्ञातेन राक्षसैः ।
अपि राक्षसरूपेण किमुतान्येन केनचित्　　४१
वायुरप्यत्र नाज्ञातश्चरेदिति मतिर्मम ।
नह्यत्राविदितं किंचिद्रक्षसां भीमकर्मणाम्　　४२
इहाहं यदि तिष्ठामि स्वेन रूपेण संवृतः ।
विनाशमुपयास्यामि भर्तुरर्थश्च हास्यति　　४३
तदहं स्वेन रूपेण रजन्यां ह्रस्वतां गतः ।
लङ्कामभिपतिष्यामि राघवस्यार्थसिद्धये　　४४
रावणस्य पुरीं रात्रौ प्रविश्य सुदुरासदाम् ।
प्रविश्य भवनं सर्वं द्रक्ष्यामि जनकात्मजाम्　　४५
इति निश्चित्य हनुमान्सूर्यस्यास्तमयं कपिः ।

---

करतात. तेव्हा आपण काय केलें असता कार्यनाश होणार नाही, कसें वागलें असतां बुद्धिभ्रंश होणार नाही आणि कोणता उपाय योजिला असता, मी केलेलें हें समुद्राच्या उल्लंघनाचें कार्य व्यर्थ जाणार नाही बरें ? मी त्या राक्षसांच्या दृष्टीस पडलों, तर रावणाच्या नाशाची इच्छा करणाऱ्या उदारहृदयी रामाचें सर्व कार्य व्यर्थ जाईल. ( २९-४० )

" राक्षसांना न समजतां राक्षसरूपानेही मला कोठे राहतां येणें शक्य नाही; मग दुसरें रूप घेऊन मला राहतां येण्याची गोष्टच नको. कोणाला समजून न येतां, वायूलाही या ठिकाणीं प्रवेश करता येत नाही, असें मला वाटतें; कारण भयंकर कर्म करणाऱ्या राक्षसांना अज्ञात असें कांहींच नाही. मी स्वतःच्याच स्वाभाविक रूपानें दिवसा जर येथे राहीन, तर माझा नाश होईल, तसा स्वामिकार्याचाही विनाश होईल. तस्मात्, लहान रूप धारण करून मी स्वतःच्याच रूपानें रामाचें कार्य सिद्धीस नेण्याकरिता रात्रीं लंकेमध्ये जाईन. जिच्यामध्ये प्रवेश होणें अत्यंत दुर्घट आहे, अशा त्या रावणाच्या नगरीमध्ये रात्रीं प्रवेश करून, आंतील सर्व घरांमध्ये मी जाईन आणि जनककन्या सीता पाहीन. " ( ४१-४५ )

आचकाङ्क्षे तदा वीरो वैदेह्या दर्शनोत्सुकः ४६
सूर्ये चास्तं गते रात्रौ देहं संक्षिप्य मारुतिः ।
वृषदंशकमात्रोऽथ बभूवाद्भुतदर्शनः ४७
प्रदोषकाले हनुमांस्तूर्णमुत्पत्य वीर्यवान् ।
प्रविवेश पुरीं रम्यां प्रविभक्तमहापथाम् ४८
प्रासादमालाविततां स्तम्भैः काञ्चनसंनिभैः ।
शातकुम्भनिभैर्जालैर्गन्धर्वनगरोपमाम् ४९
सप्तभौमाष्टभौमैश्च स ददर्श महापुरीम् ५०
स्थलैः स्फाटिकसंकीर्णैः कार्तस्वरविभूषितैः ।
तैस्तैः शुशुभिरे तानि भवनान्यत्र रक्षसाम् ५१
काञ्चनानि विचित्राणि तोरणानि च रक्षसाम् ।
लङ्कामुद्योतयामासुः सर्वतः समलंकृताम् ५२
अचिन्त्यामद्भुताकारां दृष्ट्वा लङ्कां महाकपिः ।

---

याप्रमाणे निश्चय ठरवून वैदेहीच्या दर्शनाविषयी उत्सुक झालेला तो वीर हनुमान् वानर सूर्यास्ताची वाट पाहूं लागला. नंतर सूर्यास्त झाल्यावर वायुपुत्र हनुमानाने आपला देह अगदी सङ्कुचित केला. विचित्र रूप धारण करणारा तो हनुमान अगदी मांजराएवढा झाला. रात्र पडल्यावर त्याने सत्वर उडी मारून प्रशस्त व मोठे मार्ग असलेल्या त्या रम्य नगरीत प्रवेश केला. सौधमय वाड्यांच्या रांगांनी ती नगरी लांबलचक झालेली होती आणि सुवर्णतुल्य स्तंभांनी व सुवर्णसमान जाळ्यांनी ती गंधर्वनगरासारखी दिसत होती. अशा प्रकारची सात-सात, आठ-आठ मजली हवेल्यांनी युक्त असलेली ती प्रचंड नगरी, त्या हनुमानाने अवलोकन केली. ( ४६-५० )

सुवर्णभूषित आणि स्फटिकांनी व्याप्त अशा अनेक प्रकारच्या स्थलांमुळे त्या लंकेतील राक्षसांची घरें सुशोभित झालेलीं होतीं. इतकेंच नव्हे, तर राक्षसांच्या घरांचे द्वारांसमीप जीं सुवर्णमय अद्भुत तोरणें होतीं, त्यांनी तर सर्व बाजूंनी भूषित असलेल्या त्या लंकेला प्रभामयच करून सोडिलेलें होतें. अशा प्रकारें विचित्र आकाराने युक्त असलेली ती अतर्क्य लंका अवलोकन करून, संतोषयु

आसीद्विषण्णो हृष्टश्च वैदेह्या दर्शनोत्सुकः ५३
स पाण्डुराविद्धविमानमालिनीं महार्हजाम्बूनदजालतोरणाम् ।
यशस्विनीं रावणबाहुपालितां क्षपाचरैर्भीमबलैः सुपालिताम् ५४
चन्द्रोऽपि साचिव्यमिवास्य कुर्वंस्तारागणैर्मध्यगतो विराजन् ।
ज्योत्स्नावितानेन वितत्य लोकानुत्तिष्ठतेऽनेकसहस्ररश्मिः ५५
शङ्खप्रभं क्षीरमृणालवर्णमुद्गच्छमानं व्यवभासमानम् ।
ददर्श चन्द्रं स कपिप्रवीरः पोप्लूयमानं सरसीव हंसम् ५६

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे द्वितीयः सर्गः ॥२॥

[२६०]

---

दर्शनाकरिता उत्सुक झालेला तो हनुमान् खिन्न झाला व तसाच आनंदित झाला. अशा अवाढव्य नगरीमध्ये सीतेचा शोध कसा लागणार, असें मनात येऊन तो खिन्न झाला आणि इतकी अद्भुत नगरी दृष्टीस पडल्यामुळे तो आनंदितही झाला. ( ५१–५३ )

जिकडे तिकडे सफेती दिल्यामुळे शुभ्र आणि एकमेकांशी खेटून राहिलेल्या सात–सात मजली वाड्यांच्या रांगा ज्या नगरीमध्ये आहेत, उत्तम प्रकारच्या सुवर्णजालांनी व तोरणांनी जी नगरी सुशोभित आहे आणि रावणाच्या बाहुबलाने सुरक्षित असूनही, भयंकर सामर्थ्ययुक्त राक्षसांनीही जिचे विशेष रक्षण केलेलें आहे, त्या प्रख्यात नगरीमध्ये हनुमानाने प्रवेश केला. इतक्यांत हनुमानाला सहाय्य करण्याकरिताच का काय, हजारो किरणांनी युक्त असलेला आणि स्वतः तारागणाचे मध्यभागीं असून, त्या तारागणांच्या योगाने शोभायमान असलेला चंद्रही, चंद्रिकारूप छताच्या योगाने लोकांना व्यापून वर येऊं लागला. सारांश, शंखासारखी ज्याची प्रभा आहे, दुग्ध अथवा कमलतंतु याप्रमाणे ज्याचा वर्ण आहे आणि सरोवरांत पोहणाऱ्या हंसाप्रमाणे जो भासत आहे, असा चंद्र त्या वानरवीर हनुमानाने अवलोकन केला. ( ५४–५६ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकाडांपैकी दुसरा सर्ग समाप्त झाला. ॥ २ ॥

तृतीयः सर्गः ।

स लम्बशिखरे लम्बे लम्बतोयदसंनिभे ।
सत्त्वमास्थाय मेधावी हनुमान्मारुतात्मजः १
निशि लङ्कां महासत्त्वो विवेश कपिकुञ्जरः ।
रम्यकाननतोयाढ्यां पुरीं रावणपालिताम् २
शारदाम्बुधरप्रख्यैर्भवनैरुपशोभिताम् ।
सागरोपमनिर्घोषां सागरानिलसेविताम् ३
सुपुष्टबलसंपुष्टां यथैव विटपावतीम् ।
चारुतोरणनिर्यूहां पाण्डुरद्वारतोरणाम् ४
भुजगाचरितां गुप्तां शुभां भोगवतीमिव ।
तां सविद्युद्घनाकीर्णां ज्योतिर्गणनिषेविताम् ५
चण्डमारुतनिर्ह्रादां यथा चाप्यमरावतीम् ।
शातकुम्भेन महता प्राकारेणाभिसंवृताम् ६
किङ्किणीजालघोषाभिः पताकाभिरलंकृताम् ।
आसाद्य सहसा हृष्टः प्राकारमभिपेदिवान् ७

उंच उंच शिखरांनी युक्त आणि म्हणूनच लांबट असलेल्या मेघाप्रमाणे दिसणाऱ्या त्या लंबनामक पर्वतावर धैर्य धरून राहिलेल्या बुद्धिमान् व महाबलाढ्य कपिश्रेष्ठ हनुमानाने रात्री लंकेमध्ये प्रवेश केला. ती लंका रावणाने रक्षिलेली असून, रमणीय वने व उदक यांनी तिच्यामध्ये समृद्ध होती. शरदृतूतील मेघाप्रमाणे असलेल्या गृहामुळे तिला शोभा आलेली होती, सागराप्रमाणे तिच्यामध्ये सारखा घोष चाललेला होता. समुद्रावरील वायु तिच्यामध्ये वहात होता. अलकानगरीप्रमाणे उत्तम रीतीने पोषण केलेल्या सैन्याने तिचे रक्षण केलेले होते; मुख्य मुख्य द्वारातून सुन्दर मत्त गज ठेवलेले होते, शुभ्रवर्णाचे द्वारांनी व तोरणांनी ती युक्त होती, सर्पांनी व्याप्त झालेल्या भोगवती नगरीप्रमाणे ती शुभ नगरी सुरक्षित होती, विद्युल्लतेने युक्त असलेल्या मेघांनी ती गजबजलेली होती, तारागणांनी ती युक्त होती. ( १–५ )

प्रचंड वायूचा शब्द तिच्यामध्ये सुरू होता. सुवर्णमय प्रचंड प्राकाराने अमरावती नगरीप्रमाणे ती परिवेष्टित होती आणि लहान लहान घंटांचा घोष ज्यांमध्ये

विस्मयाविष्टहृदयः पुरीमालोक्य सर्वतः ।
जाम्बूनदमयैर्द्वारैर्वैदूर्यकृतवेदिकैः ८
मणिस्फटिकमुक्ताभिर्मणिकुट्टिमभूषितैः ।
तप्तहाटकनिर्यूहै राजतामलपाण्डुरैः ९
वैदूर्यकृतसोपानैः स्फाटिकान्तरपांसुभिः ।
चारुसंजवनोपेतैः खमिवोत्पतितैः शुभैः १०
क्रौञ्चबर्हिणसंघुष्टै राजहंसनिषेवितैः ।
तूर्याभरणनिर्घोषैः सर्वतः परिनादिताम् ११
वस्वोकसारप्रतिमां समीक्ष्य नगरीं ततः
खमिवोत्पतितां लङ्कां जहर्ष हनुमान्कपिः १२
तां समीक्ष्य पुरीं लङ्कां राक्षसाधिपतेः शुभाम् ।
अनुत्तमामृद्धिमतीं चिन्तयामास वीर्यवान् १३

आहे, अशा पताकांनी ती भूषित झालेली होती. अशा प्रकारच्या लंकेसमीप जाता-क्षणीं आनंदित झालेला तो हनुमान्, एकदम तिच्या प्राकारावर ( तिच्याभोवतीं असलेल्या तटावर ) जाऊन बसला आणि सर्व बाजूंनी ती नगरी पाहिल्याबरोबर तो अंतःकरणामध्ये चकित झाला. वैडूर्य रत्नाच्या वेदिका ज्यामध्ये बांधलेल्या आहेत, अशीं सुवर्णमय द्वारें त्या नगरीला होतीं. हिरे, स्फटिक आणि मोत्यें त्यांना लाविलेलीं होतीं, रत्नखचित फरशांनीं तीं भूषित झालेलीं होतीं, उत्कृष्ट सुवर्णाचे गज त्यांतून बसविलेले होते. त्यांचे वरचे भाग रौप्यमय असल्यामुळे ते निर्मल व शुभ्र होते. ( ६-९ )

वैडूर्यरत्नांच्या जिन्यांनीं ती युक्त होती, त्यांतील मध्यभाग धूलिरहित असून, स्फटिकांनीं तयार केलेला होता आणि मनोहर सभास्थानांनीं युक्त, क्रौंच व मयूर-पक्षी यांनी नादित व राजहंसांनीं आश्रित, अशा आकाशामध्ये उडून गेलेल्याच कीं काय शुभ गृहांनीं ती भूषित झालेली होती. असो. ती नगरी नृत्यगीतसंबंधी वाद्यें व भूषणें यांच्या घोषामुळे सर्व बाजूंनी नादित झालेली आणि म्हणूनच अलकापुरीप्रमाणे असलेली ती लंकानगरी आकाशामध्ये उड्डाण करूनच राहिली आहे कीं काय, अशी पाहून हनुमंताला हर्ष झाला. धनधान्यांनी समृद्ध आणि

नेयमन्येन नगरी शक्या धर्षयितुं बलात्।
रक्षिता रावणबलैरुद्यतायुधपाणिभिः १४
कुमुदाङ्गदयोर्वापि सुषेणस्य महाकपेः।
प्रसिद्धेयं भवेद्भूमिर्मैन्दद्विविदयोरपि १५
विवस्वतस्तनूजस्य हरेश्च कुशपर्वणः।
ऋक्षस्य कपिमुख्यस्य मम चैव गतिर्भवेत् १६
समीक्ष्य च महाबाहो राघवस्य पराक्रमम्।
लक्ष्मणस्य च विक्रान्तमभवत्प्रीतिमान्कपिः १७
तां रत्नवसनोपेतां गोष्ठागारावतंसिकाम्।
यन्त्रागारस्तनीमृद्धां प्रमदामिव भूषिताम् १८
तां नष्टतिमिरां दीपैर्भास्वरैश्च महाग्रहैः।
नगरीं राक्षसेन्द्रस्य स ददर्श महाकपिः १९
अथ सा हरिशार्दूलं प्रविशन्तं महाकपिम्।

---

अनुपम अशी ती राक्षसाधिपति रावणाची शुभ लंका नगरी पाहून, तो बलशाली हनुमान् असा विचार करूं लागला ( १०–१३ )

तो म्हणाला, “ सुसज्ज आयुधें हातामध्ये सदैव तयार ठेवणारे रावणसैन्य हिचें रक्षण करीत आहे, अशा या लंकानगरीवर दुसऱ्याकडून एकाएकी हल्ला होणें शक्य नाहीं. कुमुद, अंगद, महाकपि सुषेण, मैंद आणि द्विविद यांचा फार तर मोठ्या कष्टाने या नगरीमध्ये प्रवेश होईल, पण विशेष आयास न पडता दर्भांच्या पर्वाप्रमाणे ज्याचे केस आहेत, असा जो सूर्यपुत्र कपिश्रेष्ठ वानर त्याची आणि माझी मात्र या नगरीमध्ये गति होणारी आहे. ” ( १४–१६ )

याप्रमाणे विचार केल्यानंतर महापराक्रमी रामाचा व लक्ष्मणाचा पराक्रम हनुमानाच्या मनामध्ये आला व तो आनंदित झाला. रत्नखचित प्राकाररूप वस्त्रांनी युक्त, गोठे व गृहें या कर्णभूषणांनी संपन्न आणि तोफा ठेवण्याचे बुरुज या स्तनांनी युक्त असलेली तरुण स्त्रीच की काय अशी वाटणारी ती राक्षसाधिपति रावणाची उज्ज्वल महाग्रहांनी व दीपांनी अंधकाररहित झालेली नगरी, वानरश्रेष्ठ हनुमानाने पाहिली. तदनंतर वानरश्रेष्ठ वायुपुत्र हनुमान् नगरांत प्रवेश करूं

नगरी स्वेन रूपेण ददर्श पवनात्मजम् २०
सा तं हरिवरं दृष्ट्वा लङ्का रावणपालिता ।
स्वयमेवोत्थिता तत्र विकृताननदर्शना २१
पुरस्तात्तस्य वीरस्य वायुसूनोरतिष्ठत ।
मुञ्चमाना महानादमब्रवीत्पवनात्मजम् २२
कस्त्वं केन च कार्येण इह प्राप्तो वनालय ।
कथयस्वेह यत्तत्त्वं यावत्प्राणा धरन्ति ते २३
न शक्यं खल्वियं लङ्का प्रवेष्टुं वानर त्वया ।
रक्षिता रावणबलैरभिगुप्ता समन्ततः २४
अथ तामब्रवीद्वीरो हनुमानग्रतः स्थिताम् ।
कथयिष्यामि तत्तत्त्वं यन्मां त्वं परिपृच्छसे २५
का त्वं विरूपनयना पुरद्वारेऽवतिष्ठसे ।
किमर्थं चापि मां क्रोधान्निर्भर्त्सयसि दारुणे २६
हनुमद्वचनं श्रुत्वा लङ्का सा कामरूपिणी ।

---

लागला असता, स्वत चे म्हणजे अधिष्ठात्री देवतेचें रूप धारण करून त्या नगरीने त्याची भेट घेतली. सारांश, त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला पाहून ती रावणरक्षित अशी लंका स्वत च उठली आणि अक्राळविक्राळ मुद्रा धारण करून त्या वीर वायुपुत्र हनुमानाच्या पुढे येऊन उभी राहिली. इतकेंच नव्हे तर प्रचंड गर्जना करीत ती त्या वायुपुत्राला म्हणाली. ( १५–२२ )

" हे वनचरा, तूं कोण आणि कोणत्या कार्याकरिता येथे आला आहेस ? हे मला तूं जिवंत आहेस, तोंच काय ते खरें खरें सांग. हे वानरा, सर्व बाजूंनी रावणाचें सैन्य रक्षण करीत आहे, अशा लंकेमध्ये तुझा प्रवेश होणें खरोखरच शक्य नाही " यानंतर समोर उभ्या राहिलेल्या त्या लंकादेवतेला वीर हनुमान म्हणाला, " तूं जें मला विचारीत आहेस, तें मी काय तें खरें खरें तुला सांगेन, परंतु हे क्रूरे, विरूपनयने, तू या नगरीच्या द्वाराशी उभी राहिली आहेस, ती तू कोण ? आणि कशाकरिता तूं रागाने माझी निर्भर्त्सना करीत आहेस ? हे आधी मला कळूं दे " ( २३–२६ )

उवाच वचनं क्रुद्धा परुषं पवनात्मजम् २७
अहं राक्षसराजस्य रावणस्य महात्मनः ।
आज्ञाप्रतीक्षा दुर्धर्षा रक्षामि नगरीमिमाम् २८
न शक्यं मामवज्ञाय प्रवेष्टुं नगरीमिमाम् ।
अद्य प्राणैः परित्यक्तः स्वप्स्यसे निहतो मया २९
अहं हि नगरी लङ्का स्वयमेव प्लवंगम ।
सर्वतः परिरक्षामि अतस्ते कथितं मया ३०
लङ्काया वचनं श्रुत्वा हनूमान्मारुतात्मजः ।
यत्नवान्स हरिश्रेष्ठः स्थितः शैल इवापरः ३१
स तां स्त्रीरूपविकृतां दृष्ट्वा वानरपुंगवः ।
आबभाषेऽथ मेधावी सत्त्ववान्प्लवगर्षभः ३२
द्रक्ष्यामि नगरीं लङ्कां साट्टप्राकारतोरणाम् ।
इत्यर्थमिह संप्राप्तः परं कौतूहलं हि मे ३३
वनान्युपवनानीह लङ्कायाः काननानि च ।

हें हनुमानाचें भाषण श्रवण केल्यावर ती इच्छेप्रमाणें रूप धारण करणारी लंका क्रुद्ध झाली आणि कठोर शब्दांनी त्या वायुपुत्राला म्हणाली, "मी स्वतः अजिंक्य असून, महात्म्या राक्षसाधिपति रावणाच्या आज्ञेचें परिपालन करणारी आहे आणि त्याच्याच आज्ञेनें या नगरीचें मी रक्षण करीत आहे. म्हणून माझी अवज्ञा करून या नगरीमध्यें तुला प्रवेश करतां येणें शक्य नाहीं. आज तुझा माझ्या हातून वध होईल आणि तूं येथें गतप्राण होऊन निद्रा करशील. हे वानरा, मी स्वतःच लंकानगरी आहें आणि सर्व बाजूंनी मी स्वतः आपलें रक्षण करीत आहें; म्हणूनच हें मी तुला सांगून ठेवीत आहे." ( २७–३० )

लंकादेवतेचें हें भाषण ऐकून, तो वायुपुत्र वानरश्रेष्ठ हनुमान् तिचा पराजय करण्याविषयीं उत्सुक झाला आणि दुसरा पर्वतच कीं काय, अशा रीतीनें तो तेथें अचल होऊन राहिला. नंतर अत्यंत विकाळ स्त्रीरूप धारण केलेल्या त्या लंकादेवतेकडे पाहून, तो धैर्यवान् वानरश्रेष्ठ व वानराधिपति विचारी हनुमान् म्हणाला. "सुन्दरि, नटलेली वेशी यांनी युक्त असलेली लंकानगरी पाहण्यासाठीं मी येथें आलों

सर्वतो गृहमुख्यानि द्रष्टुमागमनं हि मे ३४
तस्य तद्वचनं श्रुत्वा लङ्का सा कामरूपिणी ।
भूय एव पुनर्वाक्यं बभाषे परुषाक्षरम् ३५
मामनिर्जित्य दुर्बुद्धे राक्षसेश्वरपालिताम् ।
न शक्यं ह्यद्य ते द्रष्टुं पुरीयं वानराधम ३६
ततः स हरिशार्दूलस्तामुवाच निशाचरीम् ।
दृष्ट्वा पुरीमिमां भद्रे पुनर्यास्ये यथागतम् ३७
ततः कृत्वा महानादं सा वै लङ्का भयंकरम् ।
तलेन वानरश्रेष्ठं ताडयामास वेगिता ३८
ततः स हरिशार्दूलो लङ्कया ताडितो भृशम् ।
ननाद सुमहानादं वीर्यवान्मारुतात्मजः ३९
ततः संवर्तयामास वामहस्तस्य सोऽङ्गुलीः ।
मुष्टिनाभिजघानैनां हनुमान्क्रोधमूर्छितः ४०
स्त्री चेति मन्यमानेन नातिक्रोधः स्वयं कृतः ।

---

आहे आणि ती पाहण्याची मला फार उत्कंठा आहे सारांश, या लंकेमध्ये असलेली वनें, उपवनें, अरण्यें आणि मोठमोठी गृहें पाहण्यासाठीच मी आलो आहें." (३१-३४)

हें त्या हनुमानाचें भाषण श्रवण केल्यावर ती स्वतःचे इच्छेनुरूप रूप धारण करणारी लंकादेवी पुनरपि कठोर शब्दांनी त्याला म्हणाली, "हे दुर्बुद्धे, हे वानराधमा, मला जिंकल्यावाचून राक्षसाधिपति रावण जिचे संरक्षण करीत आहे, ती ही लंकानगरी तुझ्या दृष्टीस पडणें शक्य नाही." यावर तो वानरश्रेष्ठ हनुमान त्या निशाचरीला म्हणाला, "हे भद्रे, मी थापला ही नगरी पाहून आल्या मार्गानें निमूटपणें परत जाईन." असें हनुमानानें सांगितल्यानंतर त्या लंकेने भयंकर गर्जना केली आणि वेगानें त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला तिने एक चपराक लगावली. याप्रमाणें लंकेने त्याला अतिशय जोरानें मारलें, तेव्हा त्या बलवान् वानरश्रेष्ठ वायुपुत्र हनुमानानें फारच मोठी गर्जना केली नंतर क्रोधयुक्त झालेल्या त्या हनुमानानें डाव्या हाताची मूठ वळून, त्या मुष्टीच्या योगानें "ही

सा तु तेन प्रहारेण विह्वलाङ्गी निशाचरी ।
पपात सहसा भूमौ विकृताननदर्शना ४१
ततस्तु हनुमान्वीरस्तां दृष्ट्वा विनिपातिताम्।
कृपां चकार तेजस्वी मन्यमानः स्त्रियं च ताम् ४२
ततो वै भृशमुद्विग्ना लङ्का सा गद्गदाक्षरम्।
उवाचागर्वितं वाक्यं हनुमन्तं प्लवंगमम् ४३
प्रसीद सुमहाबाहो त्रायस्व हरिसत्तम ।
समये सौम्य तिष्ठन्ति सत्त्ववन्तो महाबलाः ४४
अहं तु नगरी लङ्का स्वयमेव प्लवंगम ।
निर्जिताऽहं त्वया वीर विक्रमेण महाबल ४५
इदं च तथ्यं शृणु मे ब्रुवन्त्या वै हरीश्वर ।
स्वयं स्वयम्भुवा दत्तं वरदानं यथा मम ४६
यदा त्वां वानरः कश्चिद्विक्रमाद्वशमानयेत् ।
तदा त्वया हि विज्ञेयं रक्षसां भयमागतम् ४७

त्री आहे," असे समजून विशेष जोर न आणिता तिला एक तडाका दिला परंतु त्या प्रहाराच्या तडाख्यानेच ती आक्राळविक्राळ मुद्रेची राक्षसी विव्हळ झाली आणि एकदम भूमीवर पडली (३५-४१)

तेव्हा आपण या मुष्टिप्रहाराने भूमीवर पडलेल्या त्या लंकेला पाहून व ती स्त्री आहे, असें मनात घेऊन, त्या तेजस्वी वीर हनुमानाच्या अन्तःकरणामध्ये दया उत्पन्न झाली ॥ इतक्यात उद्विग्न झालेली ती लंका गर्व सोडून देऊन स्फुदत स्फुदत त्या हनुमान् वानराला म्हणाली, "हे अत्यंत महापराक्रमी वानरश्रेष्ठ प्रसन्न हो आणि माझे रक्षण कर हे सौम्या, सत्त्वशील असलेले महाबलाढ्य पुरुष शास्त्रमर्यादेला अनुसरून चालत असतात हे महाबलाढ्य वीर वानरा मी स्वतः लंकानगरी असून तू माझा पराजय केलेला आहेस (४२-४५)

'हे वानराधिपते, हें सत्य मी तुला सांगत आहें, ते तू ऐकून घे 'स्वपराक्रमाने जेव्हा कोणी वानर तुझा पराजय करील, तेव्हा राक्षसांना भय प्राप्त झालें आहे असें तू समज ' म्हणून स्वतः ब्रह्मदेवाने मला वरदान दिले होते तो ब्रह्मदेवाने

स हि मे समयः सौम्य प्राप्तोऽद्य तव दर्शनात् ।
स्वयंभूविहितः सत्यो न तस्यास्ति व्यतिक्रमः　　४८
सीतानिमित्तं राज्ञस्तु रावणस्य दुरात्मनः ।
रक्षसां चैव सर्वेषां विनाशः समुपागतः　　४९
तत्प्रविश्य हरिश्रेष्ठ पुरीं रावणपालिताम् ।
विधत्स्व सर्वकार्याणि यानि यानीह वाञ्छसि　　५०
प्रविश्य शापोपहतां हरीश्वरः पुरीं शुभां राक्षसमुख्यपालिताम् ।
यदृच्छया त्वं जनकात्मजां सतीं विमार्ग सर्वत्र गतो यथासुखम् ५१

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे तृतीयः सर्गः ॥३॥ [२११]

चतुर्थः सर्गः ।

स निर्जित्य पुरीं लङ्कां श्रेष्ठां तां कामरूपिणीम् ।
विक्रमेण महातेजा हनूमान्कपिसत्तमः
अद्वारेण महाबाहुः प्राकारमवपुप्लुवे ।
निशि लङ्कां महासत्त्वो विवेश कपिकुञ्जरः

---

ठरविलेला समय समय, हे सौम्या, आज तुझ्या भेटीमुळे प्राप्त झाला आहे त्याचे उल्लंघन होणे शक्य नाही म.राक्ष, सीतेच्या निमित्ताने दुरात्म्या रावणराजाचा आणि त्याजबरोबर सर्वही राक्षसांचा विनाशकाल आला आहे. म्हणून वानरश्रेष्ठ, तू या रावणरक्षित नगरीमध्ये प्रवेश कर आणि जी जी कामे या नगरीमध्ये राहून तुला उरकून घेण्याची तुझी इच्छा असेल, ती सर्व तू उरकून घे. तात्पर्य, हे वानराधिपति मुख्य मुख्य राक्षसांनी संरक्षण केलेल्या, परंतु शापग्रस्त झालेल्या या शुभ नगरीमध्ये प्रवेश कर आणि हवा तिकडे जाऊन साध्वी जनककन्येला तू आपल्या इच्छेप्रमाणे सुखाने शोधून काढ (४८-५१)

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणमंजक आदिकाव्यातील सुंदरकांडापैकी तिसरा सर्ग समाप्त झाला. ॥ ३ ॥

स्वतःचे इच्छेप्रमाणे हवे ते रूप धारण करणाऱ्या त्या श्रेष्ठ लंकानगरीला स्वपराक्रमाने जिंकल्यानंतर तो महातेजस्वी, महा धैर्यवान व महा वीर्यवान् वानराधिपति कपिश्रेष्ठ हनुमान् रात्री अन्य मार्गाने प्राकारावर उडी मारून गेला

प्रविश्य नगरीं लङ्कां कपिराजहितंकरः ।
चक्रेऽथ पादं सव्यं च शत्रूणां स [illegible] मूर्धनि ३
प्रविष्टः सत्त्वसंपन्नो निशायां मारुतात्मजः ।
स महापथमास्थाय मुक्तपुष्पविराजितम् ४
ततस्तु तां पुरीं लङ्कां रम्यामभिययौ कपिः ।
हसितोत्कृष्टनिनदैस्तूर्यघोषपुरस्कृतैः ५
वज्राङ्कुशनिकाशैश्च वज्रजालविभूषितैः ।
गृहमेघैः पुरी रम्या बभासे द्यौरिवाम्बुदैः ६
प्रजज्वाल तदा लङ्का रक्षोगणगृहैः शुभैः ।
सिताभ्रसदृशैश्चित्रैः पद्मस्वस्तिकसंस्थितैः ७
वर्धमानगृहैश्चापि सर्वतः सुविभूषितैः ।

---

आणि त्याने लंकेमध्ये रुक्त चा प्रवेश केला याप्रमाणे लंकानगरीमध्ये जरी त्याने प्रवेश केला, तरी वानरराज सुग्रीवाचे हित करणाऱ्या त्या हनुमानाने प्रथमतः डावाः पाय लंकेमध्ये ठेवला, कारण या रीतीने ठेवलेला तो वामपाद शत्रूंच्या मस्तकींच ठेवल्यासारखा होता रात्री तो धैर्यवान् वायुपुत्र हनुमान् लंकेमध्ये प्रविष्ट झाल्यानंतर वर ओथरलेल्या पुष्पांनी सुशोभित झालेल्या राजमार्गानेच पुढे चालला ( १-४ )

नृत्यसंगीतविषयक वाद्यांच्या ध्वनींनी मिश्र [illegible] लेल्या, हास्याच्या उत्कृष्ट ध्वनींनी युक्त असलेल्या रम्य रमणीय लंका नगरीमध्ये तो हनुमान् वानर शिरला, तेव्हा मेघामुळे ज्याप्रमाणे आकाश रम्य दिसते, त्याप्रमाण वज्र, अंकुश इत्यादि आयुधांची चिन्हें ज्यांत काढलेली आहेत आणि रत्नखचित खिडक्यांनी जी विभूषित

---

* प्रयाणकाले स्वगृहप्रवेशे विवाहकालेऽपि च दक्षिणाङ्घ्रिम् ।
कृत्वाग्रतः शत्रुपुरप्रवेशे वामं निदध्याच्चरणं नृपालयम् ॥

प्रयाणसमयीं, स्वगृहीं प्रवेश करतेवेळी आणि विवाहार्थ गमन करतेवेळीं उजवा पाय पुढे टाकून जावे, परंतु राजवाड्यांत अथवा शत्रूंच्या नगरामध्ये प्रवेश करतेवेळी डावा पाय प्रथम पुढे टाकावा

तां चित्रमाल्याभरणां कपिराजहितंकरः ८
राघवार्थे चरञ्छ्रीमान्ददर्श च ननन्द च ।
भवनाद्भवनं गच्छन्ददर्श कपिकुञ्जरः ९
विविधाकृतिरूपाणि भवनानि ततस्ततः ।
शुश्राव रुचिरं गीतं त्रिस्थानस्वरभूषितम् १०
स्त्रीणां मदनविद्धानां दिवि चाप्सरसामिव ।
शुश्राव काञ्चीनिनदं नूपुराणां च निःस्वनम् , ११
सोपाननिनदांश्चापि भवनेषु महात्मनाम् ।
आस्फोटितनिनादांश्च क्ष्वेडितांश्च ततस्ततः १२
शुश्राव जपतां तत्र मन्त्रान् रक्षोगृहेषु वै ।
स्वाध्यायनिरतांश्चैव यातुधानान्ददर्श सः १३

---

झालेली आहेत, अशा गृहांमुळे ती नगरी त्याला रमणीय भासूं लागली. कमलाचा व स्वस्तिकाचा आकार ज्यांना दिलेला आहे, अशा शुभ्र मेघासारखीं चित्रविचित्र व शुभ राक्षसगणाच्या गृहांना आणि सर्व बाजूंनी अत्यंत विभूषित अशा वर्धमानसंज्ञक आकाराने युक्त असलेल्या गृहांनी ती नगरी झळकत होती व रामकार्याकरितां संचार करणाऱ्या व वानर राजसुग्रीवाचें हित करणाऱ्या भव्य वानराने चित्रविचित्र पुष्पभूषणांनी युक्त असलेली ती नगरी अवलोकन करून, तिचें अभिनंदनही केलें. नंतर या घरांतून त्या घरावर जातां जातां कपिश्रेष्ठ हनुमानानें नाना प्रकारच्या आकृतींचीं घरें ठिकठिकाणीं अवलोकन केलीं आणि मंद्र, मध्य व तार या तीन स्वरांनी भूषित असलेलें मनोहर गायनही त्यानें श्रवण केलें ( ५--१० )

स्वर्गांतील अप्सरांच जशा काय, अशा दिसत असलेल्या व मदनानें विद्ध झालेल्या स्त्रियांच्या तोरड्यांचा व कमरपट्ट्याचा शब्द त्याच्या कानावर येऊं लागला, जिन्यांच्या पायऱ्यांवरून खालीं घसरत जाणाऱ्या भूषणाचे ध्वनि, मोठमोठ्या लोकांच्या घरांत चाललेली टाळ्यांची गर्जना आणि ठिकठिकाणीं होत असलेले सिंहनाद त्याच्या कानावर येऊं लागले. राक्षसांच्या गृहामध्ये अध्ययन करीत असलेल्यांचे मंत्र त्याला ऐकूं येऊं लागले आणि वेदाध्ययनाविषयीं

रावणस्तवसंयुक्तान्गर्जतो राक्षसानपि।
राजमार्गं समावृत्य स्थितं रक्षोगणं महत् १४
ददर्श मध्यमे गुल्मे राक्षसस्य चरान्बहून्।
दीक्षिताञ्जटिलान्मुण्डान्गोजिनाम्बरवाससः १५
दर्भमुष्टिप्रहरणानग्निकुण्डायुधांस्तथा।
कूटमुद्गरपाणींश्च दण्डायुधधरानपि १६
एकाक्षानेकवर्णांश्च चलदेकपयोधरान्।
करालान्भुग्नवक्त्रांश्च विकटान्वामनांस्तथा १७
धन्विनः खड्गिनश्चैव शतघ्नीमुसलायुधान्।
परिघोत्तमहस्तांश्च विचित्रकवचोज्ज्वलान् १८
नातिस्थूलान्नातिकृशान्नातिदीर्घातिह्रस्वकान्।
नातिगौरान्नातिकृष्णान्नातिकुब्जान्न वामनान् १९
विरूपान्बहुरूपांश्च सुरूपांश्च सुवर्चसः।

रत असलेले राक्षसही त्याच्या दृष्टीस पडू लागले मोठमोठ्याने गर्जना करून रावणाची प्रशंसा करणारे राक्षसही त्याच्या अवलोकनात आले राजमार्ग प्राप्त करून राहिलेलें प्रचंड राक्षस-सैन्य त्याच्या दृष्टीस पडले ( ११–१४ )

मधल्या चौकामध्ये राक्षसाचे अनेक हेरही, काही जटा धारण करून तर काही दीक्षा घेऊन, काही मस्तके मुंडन आणि काही गोचर्म व कृष्णाजिन परिधान करून संचार करीत असताना त्याने पाहिले [काही दर्भमुष्टिरूप आयुधे हातीं घेतलेले, काही एकवर्ण, काही स्फुरण पावणाऱ्या एका स्तनाना युक्त,] काही दिसण्यात आक्राळविक्राळ, काही फाटकी वस्त्रे नेसलेले, काही भयंकर अवयवांना युक्त असलेले, काही खुजे, काही धनुर्धारी, काही खड्ग हातात घेतलेले, काही पटुका व मुसळे अशा प्रकारची आयुधें धारण करणारे, काही परिघसंज्ञक उत्तम आयुध हातात घेतलेले काही चित्रविचित्र कवचांनी झळकत असलेले, काही विशेष स्थूल नसलेले, काही विशेष कृश नसलेले, काही विशेष उंच नसलेले, काही विशेष ठेंगणे नसलेले, काही विशेष गौरवर्ण नसलेले, काही विशेष कृष्णवर्ण नसलेले काही विशेष कुबडे नसलेले, काही कुरूप, काही अनेक

ध्वजिनः पताकिनश्चैव ददर्श विविधायुधान् २०
शक्तिवृक्षायुधांश्चैव पट्टिशाशनिधारिणः।
क्षेपणीपाशहस्तांश्च ददर्श स महाकपिः २१
स्रग्विणस्त्वनुलिप्तांश्च वराभरणभूषितान्।
नानावेषसमायुक्तान्यथास्वैरचरान्बहून् २२
तीक्ष्णशूलधरांश्चैव वज्रिणश्च महाबलान्।
शतसाहस्रमव्यग्रमारक्षं मध्यमं कपिः २३
रक्षोधिपतिनिर्दिष्टं ददर्शान्तःपुराग्रतः।
स तदा तद्गृहं दृष्ट्वा महाहाटकतोरणम् २४
राक्षसेन्द्रस्य विख्यातमद्रिमूर्ध्नि प्रतिष्ठितम्।
पुण्डरीकावतंसाभिः परिखाभिः समावृतम् २५
प्राकारावृतमत्यन्तं ददर्श स महाकपिः।
त्रिविष्टपनिभं दिव्यं दिव्यनादविनादितम् २६

---

रूपें धारण केलेले, काही मुख्य, काही चांगले तेजस्वी, काही ध्वज घेतलेले, काही पताका घेतलेले आणि काही नाना प्रकारचीं आयुधें धारण केलेले राक्षस त्यानें अवलोकन केले. ( १५-२० )

शक्ति आणि वृक्ष हीं आयुधें, पट्टे, वज्र, गोफणी आणि पाश हातामध्ये धारण केलेले राक्षस त्या महाकपि हनुमानानें अवलोकन केले. तसेंच माला धारण केलेले, अंगाला उटि लावलेले, उत्कृष्ट उत्कृष्ट अलंकारांनी भूषित झालेले, नाना प्रकारचे वेष घेतलेले, इच्छेप्रमाणें संचार करणारे आणि तीक्ष्ण शूल व वज्र धारण करणारे असेही अनेक महाबलाढ्य राक्षस त्यानें पाहिले. रावणाच्या अंतःपुराजवळ त्या राक्षसाधिपतीच्या हुकुमानें मोठ्या दक्षतेनें मधल्या चौकाचें रक्षण करणारें एक लक्ष सैन्य त्यानें पाहिलें व हें स्थान अवलोकन केल्यानंतर उत्कृष्ट सुवर्णमय तोरणांनी युक्त आणि पर्वताच्या माथ्यावर असलेले, राक्षसाधिपति रावणाचें प्रख्यात गृह त्यानें पाहिलें. तें श्वेतकमलांनी भूषित झालेल्या खंदकांनी व कोटांनी अगदीं परिवेष्टित झालेलें आहे, असें त्या महाकपि हनुमानाला दिसलें. ( २१-२६ )

वाजिहेषितसंघुष्टमद्भुतैश्च हयैस्तथा ।
रथैर्यानैर्विमानैश्च तथा हयगजैः शुभैः २७
वारणैश्च चतुर्दन्तैः श्वेताभ्रनिचयोपमैः ।
भूषितं रुचिरद्वारं मत्तैश्च मृगपक्षिभिः । २८
रक्षितं सुमहावीर्यैर्यातुधानैः सहस्रशः ।
राक्षसाधिपतेर्गुप्तमाविवेश गृहं कपिः २९
स हेमजाम्बूनदचक्रवालं महार्हमुक्तामणिभूषितान्तम् ।
परार्ध्यकालागुरुचन्दनार्हं स रावणान्तःपुरमाविवेश ३०
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चतुर्थः सर्गः ॥४॥[३४१]

पञ्चमः सर्गः ।

ततः स मध्यंगतमंशुमन्तं ज्योत्स्नावितानं मुहुरुद्वमन्तम् ।
ददर्श धीमान्भुवि भानुमन्तं गोष्ठे वृषं मत्तमिव भ्रमन्तम् १

तदनंतर स्वर्गतुल्य, दिव्य, दिव्य ध्वनींनी नादित झालेलें घोड्यांच्या खेंकाळण्यानी नादयुक्त असलेलें, अद्भुत, अश्व, रथ, दुसरीही वाहनें, विमानें, अश्वाएवढाले शुभ गज, शुभ्र मेघसमुदायाप्रमाणे दिसत असलेले व शृंगारलेले चौदंती हत्ती व मत्त पशुपक्षी यांनी भरलेले, मनोहर द्वारांनी युक्त व अत्यंत वीर्यवान् असलेल्या हजारो राक्षसांनी रक्षण केलेलें असें जे त्या राक्षसाधिपतीचें सुरक्षित गृह, त्यांत हनुमान् वानराने प्रवेश केला. या गृहामध्यें प्रवेश केल्यानंतर तो वानर रावणाच्या अंतःपुरामध्येंही गेला. त्या अंतःपुराभोंवती हेम व जांबूनद या दोन प्रकारच्या सुवर्णांचा एक तट बांधलेला होता, त्याचा वरचा भाग मोठमोठ्या मूल्यवान् मोत्यांनी व हिऱ्यांनी भूषित केलेला होता आणि कृष्णागुरु व चंदन यांनी त्याचें पूजन केलें होतें. ( २६–३० )

याप्रमाणे महामुनिवाल्मिकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांपैकी चवथा सर्ग समाप्त झाला. ॥ ४ ॥

तदनंतर तारागणाच्या व आकाशाच्या मध्यभागी आलेला, एकसारखें चंद्रिका प्रकट करणारा आणि सूर्यामुळे प्रकाशयुक्त किरणांनी संपन्न असलेला चंद्र, गोठ्यामध्यें इच्छेनुरूप फिरणाऱ्या मत्त वृषभाप्रमाणे भ्रमण करताना त्या

लोकस्य पापानि विनाशयन्तं महोदधिं चापि समेधयन्तम्।
भूतानि सर्वाणि विराजयन्तं ददर्श शीतांशुमथाभियान्तम् २
या भाति लक्ष्मीर्भुवि मन्दरस्था यथा प्रदोषेषु च सागरस्था।
तथैव तोयेषु च पुष्करस्था रराज सा चारुनिशाकरस्था ३
हंसो यथा राजतपञ्जरस्थः सिंहो यथा मन्दरकन्दरस्थः।
वीरो यथा गर्वितकुञ्जरस्थश्चन्द्रोऽपि बभ्राज तथाम्बरस्थः ४
स्थितः ककुद्मानिव तीक्ष्णशृङ्गो महाचलः श्वेत इवोर्ध्वशृङ्गः।
हस्तीव जाम्बूनदबद्धशृङ्गो विभाति चन्द्रः परिपूर्णशृङ्गः ५
विनष्टशीताम्बुतुषारपङ्को महाग्रहग्राहविनष्टपङ्कः।
प्रकाशलक्ष्म्याश्रयनिर्मलाङ्को रराज चन्द्रो भगवाञ्छशाङ्कः ६
शिलातलं प्राप्य यथा मृगेन्द्रो महारणं प्राप्य यथा गजेन्द्रः।

---

विचारी हनुमानाने अवलोकन केला. सारांश; लोकांच्या मानसिक दुःखाचा नाश करणारा, महासागराला वृद्धिंगत करणारा आणि सर्व भूतांना प्रकाशित करणारा चंद्र आकाशाचे मध्यभागीं येत असलेला त्याने पाहिला. भूमीवर मंदर-पर्वताचे ठिकाणीं जी शोभा दिसते, रात्रीं सागराचे ठिकाणीं जी दृष्टीस पडते आणि त्याचप्रमाणे उदकामध्ये कमलाचे ठिकाणीं जी शोभा अवलोकनांत येते, ती मनोहर शोभा चंद्राचे ठिकाणीं दिसूं लागली. रुप्याच्या पिंजऱ्यामध्ये असलेला हंस जसा सुंदर दिसतो, मंदरपर्वताच्या गुहेंत राहिलेला सिंह जसा दिसतो आणि मदमत्त गजावर आरूढ झालेला वीर जसा चमकतो, तसा आकाशांत असलेला चंद्र शोभिवंत दिसूं लागला. तीक्ष्ण शृंगांनी युक्त असलेला मोठा वशिंडाचा बैल, उन्नत शिखरांनी युक्त असलेला पांढराशुभ्र महापर्वत अथवा दंतांना सुवर्णभूषणें घातलेला हत्ती जसा शोभतो, तसा परिपूर्ण व कलंकरूप हरिणशृंगांनी युक्त असलेला चंद्र शोभूं लागला. (१-५)

सारांश, शीतोदकबिंदुरूप पंक म्हणजे धुकें ज्यांत नाहीं, अशा निर्मल आकाशामध्ये प्राप्त झालेला भगवान् चंद्र फारच शोभूं लागला; कारण सूर्याच्या किरणसंक्रमणाने त्याने पृथ्वीवरील अंधकाररूपी पंक नाहींसा केला होता आणि प्रकाशसंपत्ति अभ्यासमुळे त्याच्यावरील कृष्णचिन्ह स्पष्ट चमकत होतें. गुहेच्या

राज्यं समासाद्य यथा नरेन्द्रस्तथा प्रकाशो विरराज चन्द्रः ७
प्रकाशचन्द्रोदयनष्टदोषः प्रवृद्धरक्षः पिशिताशदोषः ।
रामाभिरामेरितचित्तदोषः स्वर्गप्रकाशो भगवान्प्रदोषः ८
तन्त्रीस्वराः कर्णसुखाः प्रवृत्ताः स्वपन्ति नार्यः पतिभिः सुवृत्ताः ।
नक्तंचराश्चापि तथा प्रवृत्ता विहर्तुमत्यद्भुतरौद्रवृत्ताः ९
मत्तप्रमत्तानि समाकुलानि रथाश्वभद्रासनसंकुलानि ।
वीरश्रिया चापि समाकुलानि ददर्श धीमान्स कपिः कुलानि १०
परस्परं चाधिकमाक्षिपन्ति भुजांश्च पीनानधिविक्षिपन्ति ।
मत्तप्रलापानधिविक्षिपन्ति मत्तानि चान्योन्यमधिक्षिपन्ति ११
रक्षांसि वक्षांसि च विक्षिपन्ति गात्राणि कान्तासु च विक्षिपन्ति ।

---

बाहेरील शिलातलावरील सिंह जसा शोभू लागतो, विस्तीर्ण रणभूमीमध्ये उभा असलेला गजेंद्र जसा दिसतो आणि विस्तीर्ण राज्यावर असलेला नरेंद्र जसा चमकू लागतो, तसा सूर्यप्रकाश प्राप्त झालेला चंद्र झळकू लागला. प्रकाशयुक्त चंद्र वर असल्यामुळे गृहातीलही अंधकार ज्याने नाहीसा केला आहे, राक्षसांचे मांसभक्षणरूप दोष ज्याने वृद्धिंगत केले आहेत आणि विलासिनी स्त्रियांच्या मनातील प्रेमविषयक किल्बिष ज्याने नाहीसे केले आहे, असा सुखसाधनभूत पूज्य रात्रिसमय फारच मनोहर दिसू लागला ( ५-८ )

श्रवणेंद्रियाला सुखावह असे तंतुवाद्यांचे ध्वनि सुरू झाले, स्त्रिया पतींशी अगदी संमीलित होऊन निद्रा घेऊ लागल्या आणि अत्यंत आश्चर्यकारक व भयंकर वर्तन करणारे निशाचरही विहार करण्यास प्रवृत्त झाले. ऐश्वर्याने व मद्यपानाने मत्त झालेले लोक ज्यामध्ये आहेत, रथ, अश्व व चांगल्या चांगल्या बैठकी यांनी जीं गजबजून गेलेलीं आहेत, लोकांची ज्यांत अतिशय गर्दी झालेली आहे आणि वीरश्रीने जीं भरून गेलेलीं आहेत, अशीं राक्षसांचीं गृहें त्या बुद्धिमान् हनुमानाच्या दृष्टीस पडूं लागलीं. मत्त झालेले राक्षस एकमेकांशीं जोरजोराने उत्तरें-प्रत्युत्तरें करूं लागले, आपले लठ्ठ लठ्ठ दंड एकमेकांसमोर थोपटूं लागले, उन्मत्त भाषणें करूं लागले आणि एकमेकांची निर्भर्त्सनाही करूं लागले. राक्षस एकमेकांच्या वक्षःस्थलावर प्रहार करूं लागले, हस्तादि अवयव

रूपाणि चित्राणि च विक्षिपन्ति दृढानि चापानि च विक्षिपन्ति १२
ददर्श कान्ताश्च समालभन्त्यस्तथापरास्तत्र पुनः स्वपन्त्यः ।
सुरूपवक्त्राश्च तथा हसन्त्यः क्रुद्धाः पराश्चापि विनिःश्वसन्त्यः १३
महागजैश्चापि तथा नदद्भिः सुपूजितैश्चापि तथा सुसद्भिः ।
रराज वीरैश्च विनिःश्वसद्भिर्ह्रदा भुजंगैरिव निःश्वसद्भिः १४
बुद्धिप्रधानान्रुचिराभिधानान्संश्रद्दधानाञ्जगतः प्रधानान् ।
नानाविधानान्रुचिराभिधानान्ददर्श तस्यां पुरि यातुधानान् १५
ननन्द दृष्ट्वा स च तान्सुरूपान्नानागुणानात्मगुणानुरूपान् ।
विद्योतमानान्स च तान्सुरूपान्ददर्श कांश्चिच्च पुनर्विरूपान् १६
ततो वरार्हाः सुविशुद्धभावास्तेषां स्त्रियास्तत्र महानुभावाः ।
प्रियेषु पानेषु च सक्तभावा ददर्श तारा इव सुस्वभावाः १७

स्त्रियावर टाकूं लागले, चित्रविचित्र रूपें धारण करूं लागले आणि प्रचंड धनुष्यें आकर्षण करूं लागले. कांही राक्षस-स्त्रिया अंगाला उटया लावूं लागल्या, स्वप्नाने व चेहऱ्याने सुंदर असलेल्या कांही स्त्रिया हसूं लागल्या आणि कांही क्रुद्ध होऊन सुस्कारे टाकूं लागल्या आहेत, असें त्या हनुमानास दिसून आलें. फुस्कारे टाकीत असलेल्या सर्पांच्या योगाने ज्याप्रमाणे सरोवरें शोभूं लागतात, त्याप्रमाणे सुससुसणाऱ्या वीरांच्या योगाने, गर्जना करणाऱ्या महावीरांच्या योगाने आणि अत्यंत पूज्य अशा बिभीषणप्रभृति महासज्जनांच्या योगाने ती लंकानगरी शोभूं लागली. ( ९-१४ )

त्या लंकानगरीमध्ये बुद्धि हा ज्यामध्ये मुख्य गुण आहे, ज्यांचें भाषण मनोहर आहे, जे श्रद्धाळू आहेत आणि जगतामध्ये जे मुख्य आहेत, असे नाना प्रकारचीं रूपें व मनोहर नावें धारण करणारे राक्षस हनुमानाने पाहिले. आपल्या अंगांत असलेला जो सामर्थ्यगुण त्याला अनुरूप म्हणजे आपणासारखे समर्थ, बहुगुणसंपन्न व सुस्वरूप असे राक्षस अवलोकन करून हनुमानाला आनंद झाला आणि कांही राक्षस जरी विरूप होते, तरी ते तेजस्वी असल्यामुळे त्याला ते सुस्वरूपच भासूं लागले. ( १५-१६ )

तदनंतर उत्कृष्ट अलंकार वगैरे धारण करण्यास योग्य, नेत्रकटाक्षादि शुद्ध

स्त्रियो ज्वलन्तीस्त्रपयोपगूढा निशीथकाले रमणोपगूढाः ।
ददर्श काश्चित्प्रमदोपगूढा यथा विहङ्गा विहगोपगूढाः ॥ १८
अन्याः पुनर्हर्म्यतलोपविष्टास्तत्र प्रियाङ्के सुसुखोपविष्टाः ।
भर्तुः परा धर्मपरा निविष्टा ददर्श धीमान्मदनोपविष्टाः ॥ १९
अप्रावृताः काञ्चनराजिवर्णाः काश्चित्परार्ध्यास्तपनीयवर्णाः ।
पुनश्च काश्चिच्छशलक्ष्मवर्णाः कान्तप्रहीणा रुचिराङ्गवर्णाः ॥ २०
ततः प्रियान्प्राप्य मनोभिरामान्सुप्रीतियुक्ताः सुमनोऽभिरामाः ।
गृहेषु हृष्टाः परमाभिरामा हरिप्रवीरः स ददर्श रामाः ॥ २१
चन्द्रप्रकाशाश्च हि वक्त्रमाला वक्राः सुपक्ष्माश्च सुनेत्रमालाः ।
विभूषणानां च ददर्श मालाः शतह्रदानामिव चारुमालाः ॥ २२

---

हावभावानी युक्त, अंतःकरणाने उदार, नक्षत्राप्रमाणे सुस्वरूप आणि प्रियकराचे ठिकाणी व मद्याचे ठिकाणी आसक्त, अशा त्या राक्षसांच्या स्त्रियाही त्याने पाहिल्या. स्वरूपाने अगदी जशा काही झळकत असलेल्या, लज्जायुक्त पक्षी ज्याप्रमाणे पक्षिणींना आलिंगन देतात, त्याप्रमाणे पतींनी गाढ आलिंगन दिलेल्या आणि हर्षित झालेल्या अशाही काही स्त्रिया मध्यरात्रीचे सुमारास त्याला दिसल्या. आपआपल्या वाड्यांच्या गच्चीवरून बसलेल्या, इतकेंच नव्हे परंतु, पतींना अतिशय आवडत असल्यामुळे त्यांच्या अंकावर अत्यंत सुखाने बसलेल्या, भर्तृसेवारूप धर्माचरणामध्ये तत्पर आणि मदनाने व्याकुल झालेल्या अशा दुसऱ्याही काही विवाहित स्त्रिया त्या बुद्धिमान् हनुमानाने तेथे पाहिल्या. काही स्त्रिया वरचें अंग उघडें टाकलेल्या, काही स्त्रिया सुवर्णरेषेप्रमाणे तेजस्वी व सडपातळ असलेल्या, काही स्वरूपाने उत्तम असलेल्या, काही सुवर्णासारख्या कांतिमान् असलेल्या, काही चंद्रासारख्या आल्हादकारक वर्णाच्या, काही प्रियकराचा वियोग झालेल्या आणि काही मनोहर देहकांतीने युक्त असलेल्या स्त्रिया हनुमानाने अवलोकन केल्या. तदनंतर अगदी मनाप्रमाणे सुंदर पति मिळाल्यामुळे अत्यंत प्रीतियुक्त होऊन आपापल्या पतींशी रममाण होणाऱ्या, पुष्पामुळे रमणीय दिसूं लागलेल्या, घरामध्ये आनंदात असलेल्या आणि आपआपल्या पतींना अत्यंत मनोहर वाटणाऱ्या, अशाही काही स्त्रिया त्या कपिश्रेष्ठ हनुमानाने पाहिल्या. चंद्रा-

नत्वेव सीतां परमाभिजातां पथि स्थिते राजकुले प्रजाताम् ।
लतां प्रफुल्लामिव साधुजातां ददर्श तन्वीं मनसाभिजाताम् २३
सनातने वर्त्मनि संनिविष्टां रामेक्षणीं तां मदनाभिविष्टाम् ।
भर्तुर्मनःश्रीमदनुप्रविष्टां स्त्रीभ्यः पराभ्यश्च सदाविशिष्टाम् २४
उष्णार्दितां सानुसृतास्रकण्ठीं पुरा वरार्होत्तमनिष्ककण्ठीम् ।
सुजातपक्ष्मामभिरक्तकण्ठीं वने प्रवृत्तामिव नीलकण्ठीम् २५
अव्यक्तरेखामिव चन्द्रलेखां पांसुप्रदिग्धामिव हेमरेखाम् ।
क्षतप्ररूढामिव बाणरेखां वायुप्रभुग्नामिव हेमरेखाम् २६
सीतामपश्यन्मनुजेश्वरस्य रामस्य पत्नीं वदतां वरस्य ।
बभूव दुःखोपहतश्चिरस्य प्लवंगमो मन्द इवाचिरस्य २७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चमः सर्गः ॥५॥ [३६८]

---

सारख्या तेजस्वी मुखपंक्ति, उत्कृष्ट पापण्यांनी युक्त असलेल्या, मनोहर नेत्रांच्या चक्र पंक्ति आणि विद्युल्लतांच्या मनोहर समुदायाप्रमाणे चमकत असलेल्या भूषणांच्या माला त्या हनुमानाने अवलोकन केल्या ( १७–२२ )

पण विधात्याने मनाच्याच योगाने उत्पन्न केलेली, कुलीन, धर्ममार्गाने चालणाऱ्या राजकुलामध्ये उत्पन्न झालेली आणि चांगल्या ठिकाणी वाढलेल्या प्रफुल्लित वेलीप्रमाणे शोभत असलेली, कृशोदरी सीता त्याच्या दृष्टीस पडली नाही सनातन पातिव्रत्यधर्माने चालणारी, रामाचे चिंतन करणारी, रामविषयक कामवासनेने युक्त असलेली, भर्त्याच्या उदार मनामध्ये शिरून राहिलेली, उत्कृष्ट स्त्रियांपेक्षाही नेहमी अधिक असलेली, वियोगतापाने पीडित झालेली, अश्रूंनी कंठ दाटून आलेली, पूर्वी रामचंद्रासमीप असताना उत्कृष्ट भूषणांना पात्र आणि म्हणूनच उत्तम अलंकारांनी भरलेल्या कंठाने युक्त असलेली, मनोहर पापण्या व मधुर स्वर यांनी युक्त असून मयूरीप्रमाणे वनामध्ये वास्तव्य करण्यास प्रवृत्त झालेली, पतीचा वियोग झाला असल्यामुळे अभ्राने अस्पष्ट झालेल्या चंद्रलेखेप्रमाणे दिसत असलेली, धुळीने भरलेल्या सुवर्णरेषेप्रमाणे भासत असलेली, बाणापासून क्षत पडल्यामुळे उद्विग्न झालेल्या व्रणाप्रमाणे रामाला दुःखदायक झालेली आणि वायूच्या योगाने लवलेली सुवर्णरेषाच की काय, अशी दृष्टोत्पत्तीस येऊं लागलेली, वक्त्यांमध्ये श्रेष्ठ व प्रजा-

षष्ठः सर्गः ।

स निकामं विमानेषु विचरन्कामरूपधृक् ।
विचचार कपिर्लङ्कां लाघवेन समन्वितः १
आससाद च लक्ष्मीवान्राक्षसेन्द्रनिवेशनम् ।
प्राकारेणार्कवर्णेन भास्वरेणाभिसंवृतम् २
रक्षितं राक्षसैर्भीमैः सिंहैरिव महद्वनम् ।
समीक्षमाणो भवनं चकाशे कपिकुञ्जरः ३
रूप्यकोपहितैश्चित्रैस्तोरणैर्हेमभूषणैः ।
विचित्राभिश्च कक्ष्याभिर्द्वारैश्च रुचिरावृतम् ४
गजास्थितैर्महामात्रैः शूरैश्च विगतश्रमैः ।
उपस्थितमसंहार्यैर्हयैः स्यन्दनयायिभिः ५
सिंहव्याघ्रतनुत्राणैर्दान्तकाञ्चनराजतैः ।
घोषवद्भिर्विचित्रैश्च सदा विचरितं रथैः ६

धिपति रामाची पत्नी सीता जेव्हा पुष्कळच वेळ शोध करूनही दृष्टीस पडेना, तेव्हा हनुमान् वानर दुःखाकुल होऊन एकाएकी जसा काही मंद झाल्यासारखा दिसूं लागला. ( २३–२७ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यातील सुंदरकांडांतील पांचवा सर्ग समाप्त झाला ॥ ५ ॥

मनाप्रमाणे हवें तें रूप धारण करणारा तो चलाख हनुमान् मोकळेपणानें सात सात मजली हवेल्या हिंडत हिंडत सर्व लंकानगरी फिरला. हिंडतां हिंडतां तो भव्य हनुमान् सूर्यासारख्या तेजस्वी आणि म्हणूनच उज्ज्वल अशा प्राकारानें परिवेष्टित असलेल्या राक्षसाधिपति रावणाच्या गृहासमीप गेला आणि सिंहांनी रक्षण केलेल्या महावनाप्रमाणे भयंकर राक्षसांनी रक्षण केलेलें तें गृह अवलोकन करता करता पुनरपि तो कपिश्रेष्ठ हनुमान् सीतेचा शोधन काढण्याची हालचाल करूं लागला. ( १–३ )

रुप्याने मढविलेल्या व सुवर्णाने भूषित अद्भुत तोरणांनी, आश्चर्यकारक चौकांनी आणि मनोहर द्वारांनी तें गृह युक्त होतें. गजारूढ झालेले महात, कधीही थकवा न देणारे, शूर आणि अप्रतिहत गतीनें युक्त असलेले रथवाहक अश्व त्या गृहा-

बहुरत्नसमाकीर्णं परार्ध्यासनभूषितम् ।
महारथसमावापं महारथमहासनम् ७
दृश्यैश्च परमोदारैस्तैस्तैश्च मृगपक्षिभिः ।
विविधैर्बहुसाहस्रैः परिपूर्णं समन्ततः ८
विनीतैरन्तपालैश्च रक्षोभिश्च सुरक्षितम् ।
मुख्याभिश्च वरस्त्रीभिः परिपूर्णं समन्ततः ९
मुदितप्रमदारत्नं राक्षसेन्द्रनिवेशनम् ।
वराभरणसंह्रादैः समुद्रस्वननिःस्वनम् १०
तद्राजगुणसंपन्नं मुख्यैश्च वरचन्दनैः ।
महाजनसमाकीर्णं सिंहैरिव महद्वनम् ११
भेरीमृदङ्गाभिरुतं शङ्खघोषविनादितम् ।
नित्यार्चितं पर्वसु तं पूजितं राक्षसैः सदा १२

समीप होते, सिंह व व्याघ्र यांच्या चर्मांनी आच्छादित, घंटांच्या योगानें घोषयुक्त आणि हस्तिदंती सोन्याचीं व रुप्याचीं चित्रें धारण करणारे नाना प्रकारचे रथ एकसारखे तेथून दिसत होते. असंख्य रत्नांनी तें गृह व्याप्त झालेलें होतें, उत्कृष्ट आसनांनी तें भूषित झालें होतें, मोठे मोठे रथखाने त्याच्याभोंवती बांधिलेले होते आणि महारथी तेथें सर्वदा वास्तव्य करीत होते. प्रेक्षणीय व अत्यंत सुंदर अशा नाना प्रकारच्या हजारों पशुपक्ष्यांच्या योगानें तें सर्व बाजूंनी भरलेलें होतें. सरहद्दींचें रक्षण करणाऱ्या विनयशील राक्षसांनी तें सुरक्षित होतें आणि मुख्य मुख्य उत्कृष्ट स्त्रियांनी तें सर्व बाजूंनी गजबजून गेलेलें होतें (८–९)

तें राक्षसाधिपति रावणाचें गृह उत्कृष्ट भूषणांच्या ध्वनीमुळें समुद्रासारखी गर्जनाच करीत आहे कीं काय, असें भासत होतें आणि त्यांतील स्त्रीरत्नें आनंदित झालेलीं होतीं. छत्रचामरादि मुख्य मुख्य राजचिन्हांनी आणि मुख्य मुख्य उत्कृष्ट चंदनांनी तें संपन्न झालें होतें आणि सिंहांनी व्याप्त झालेल्या महावनाप्रमाणें तें महाजनांनी व्याप्त झालेलें होतें. तेथें नौबती झडत होत्या, मृदंगाची थाप एकसारखी सुरू होती, शंखाचा घोष दुमदुमून राहिलेला होता, पर्वदिवशीं यज्ञ करितां त्यांत होमद्रव्य तयार करण्यांत येत असे, नेहमीं त्याचें अर्चन होत

समुद्रमिव गम्भीरं समुद्रसमनिःस्वनम्।
महात्मनो महद्वेश्म महारत्नपरिच्छदम् १३
महारत्नसमाकीर्णं ददर्श स महाकपिः।
विराजमानं वपुषा गजाश्वरथसंकुलम् १४
लङ्काभरणमित्येव सोऽमन्यत महाकपिः।
चचार हनुमांस्तत्र रावणस्य समीपतः १५
गृहाद्गृहं राक्षसानामुद्यानानि च सर्वशः।
वीक्षमाणोऽप्यसंत्रस्तः प्रासादांश्च चचार सः। १६
अवप्लुत्य महावेगः प्रहस्तस्य निवेशनम्।
ततोऽन्यत्पुप्लुवे वेश्म महापार्श्वस्य वीर्यवान् १७
अथ मेघप्रतीकाशं कुम्भकर्णनिवेशनम्।
विभीषणस्य च तथा पुप्लुवे स महाकपिः १८
महोदरस्य च तथा विरूपाक्षस्य चैव हि।

असें आणि राक्षस त्याची सर्वदा पूजा करीत असत. ( १०-१२ )

महात्म्या रावणाच्या त्या प्रचंड गृहामध्ये मोठ्या मोठ्या रत्नांचें सामान भरलेलें होतें आणि समुद्राप्रमाणे तें गंभीर दिसत होतें. तसेंच समुद्राप्रमाणे त्यांत ध्वनीही चालू होता. अशा प्रकारचे गज, अश्व व रथ यांनी भरून गेलेलें, आकार नेहमीं शोभिवन्त असलेलें आणि मोठ्या मोठ्या रत्नांनी भरून समृद्ध झालेलें तें गृह त्या महाकपि हनुमानानें अवलोकन केलें असतां, हें लंकेचें भूषणच आहे, असें त्या महाकपीला वाटलें आणि तो हनुमान् रावणाच्या त्या घराजवळून संचार करूं लागला. ( १०-१५ )

नंतर या घरावरून त्या घरावर त्या रीतीनें राक्षसांचे वाडे, घरें आणि बागा, हें सर्व पाहण्याकरितां तो हनुमान् निर्भयपणें लंकेमध्यें संचार करूं लागला. प्रथमतः त्या महावेगवान हनुमानानें प्रहस्तनामक राक्षसाच्या घरावर उडी मारली आणि नंतर त्या वीर्यवान हनुमानानें महापार्श्वनामक राक्षसाच्या घरावर उड्डाण केलें. नंतर कुंभकर्णाच्या मेघतुल्य घरावर उडी मारून नंतर त्या महाकपीनें बिभीषणाच्या घरावर उड्डाण केलें. तसेंच महोदर, विरूपाक्ष, विद्युज्जिह्व व

विद्युज्जिह्वस्य भवनं विद्युन्मालेस्तथैव च १९
वज्रदंष्ट्रस्य च तथा पुप्लुवे स महाकपिः ।
शुकस्य च महावेगः सारणस्य च धीमतः २०
तथा चेन्द्रजितो वेश्म जगाम हरियूथपः।
जम्बुमालेः सुमालेश्च जगाम हरिसत्तमः २१
रश्मिकेतोश्च भवनं सूर्यशत्रोस्तथैव च ।
वज्रकायस्य च तथा पुप्लुवे स महाकपिः २२
धूम्राक्षस्याथ संपातेर्भवनं मारुतात्मजः।
विद्युद्रूपस्य भीमस्य घनस्य विघनस्य च २३
शुकनाभस्य चक्रस्य शठस्य कपटस्य च ।
ह्रस्वकर्णस्य दंष्ट्रस्य लोमशस्य च रक्षसः २४
युद्धोन्मत्तस्य मत्तस्य ध्वजग्रीवस्य सादिनः ।
विद्युज्जिह्वद्विजिह्वानां तथा हस्तिमुखस्य च २५
करालस्य विशालस्य शोणिताक्षस्य चैव हि ।
प्लवमानः क्रमेणैव हनुमान्मारुतात्मजः २६

---

विद्युन्माली याच्या घरावर उड्या टाकीत टाकीत तो महावेगवान् महाकपि गेवटीं वज्रदंष्ट्र, शुक व बुद्धिमान सारण यांच्याही घरावरून उड्या टाकीत चालला. ( १९-२० )

त्याचप्रमाणे तो वानरसेनाधिपति हनुमान् इंद्रजिताच्या घरावर गेला आणि नंतर जंबुमाली व सुमाली यांच्याही घरावर त्या वानरश्रेष्ठाने उड्डाण केलें. त्याचप्रमाणे तो महाकपि रश्मिकेतु, सूर्यशत्रु आणि वज्रकाय यांच्या घरावर उड्या टाकून गेल्यानंतर धूम्राक्ष, संपाति, विद्युद्रूप, भीम, घन, विघन यांच्याही घरावर त्या वायुपुत्राने उड्डाण केलें आणि नंतर शुकनाभ, चक्र, शठ, कपट, ह्रस्वकर्ण, दंष्ट्र, लोमशराक्षस, युद्धोन्मत्त, मत्त, ध्वजग्रीव, सादी, विद्युज्जिह्व द्विजिह्व, हस्तिमुख, कराल, विशाल आणि शोणिताक्ष यांच्याही घरावर तो वायुपुत्र हनुमान् क्रमाक्रमाने उड्डाण करीत करीत गेला. ( २१-२६ )

तेषु तेषु महार्हेषु भवनेषु महायशाः ।
तेषामृद्धिमतामृद्धिं ददर्श स महाकपिः २७
सर्वेषां समतिक्रम्य भवनानि समन्ततः ।
आससादाथ लक्ष्मीवान् राक्षसेन्द्रनिवेशनम् २८
रावणस्योपशायिन्यो ददर्श हरिसत्तमः ।
विचरन्हरिशार्दूलो राक्षसीर्विकृतेक्षणाः २९
शूलमुद्गरहस्ताश्च शक्तितोमरधारिणः ।
ददर्श विविधान्गुल्मांस्तस्य रक्षःपतेर्गृहे ३०
राक्षसांश्च महाकायान्नानाप्रहरणोद्यतान् ।
रक्तान्श्वेतान्सितांश्चापि हरींश्चापि महाजवान् ३१
कुलीनान्रूपसंपन्नान्गजान्परगजारुजान् ।
शिक्षितान्गजशिक्षायामैरावतसमान्युधि ३२
निहन्तॄन्परसैन्यानां गृहे तस्मिन्ददर्श सः ।
क्षरतश्च यथा मेघान्स्रवतश्च यथा गिरीन् ३३

त्या त्या मोठ्या मूल्यवान् घरावर गेल्यानंतर त्या महायशस्वी महाकपीने त्या समृद्ध राक्षसांची संपत्ति अवलोकन केली आणि याप्रमाणे वरकड सर्व राक्षसांची घरें सर्व बाजूंनी हिंडल्यानंतर तो तेजःपुंज हनुमान् राक्षसाधिपति रावणाच्या घराकडे आला. नंतर संचार करता करता वानरराज व वानरश्रेष्ठ हनुमानाने विकृत मुद्रांनी युक्त अशा राक्षसी स्त्रिया रावणाचे शयनस्थान रक्षण करीत असलेल्या अवलोकन केल्या आणि त्याचप्रमाणे त्या राक्षसाधिपतीच्या गृहामध्ये शूल, मुद्गर, शक्ति व तोमर हीं आयुधें धारण करणारे नाना प्रकारचे दुसरेही राक्षसांचे समुदाय त्याने पाहिले. ( २७—३० )

तदनंतर आयुधें तयार ठेवून, सज्ज असलेले मोठमोठे विशाल राक्षस, आरक्तवर्ण, श्वेतवर्ण व पाण्डुरवर्ण अशा रंगाचे महावेगवान् अश्व आणि कुलीन, रूपवान्, गजशिक्षेमध्ये शिकविलेले, युद्धामध्ये ऐरावताची बरोबरी करणारे, शत्रू-कडील गजांचा नाश करणारे शत्रुसैन्याचा घात करणारे, मदस्राव चालला असल्यामुळे वर्षाव करणाऱ्या मेघाप्रमाणे अथवा जलप्रपातांनी युक्त असलेल्या

मेघस्तनितनिर्घोषान्दुर्धर्षान्समरे परैः ।
सहस्रं वाहिनीस्तत्र जाम्बूनदपरिष्कृताः  ३४
हेमजालैरविच्छिन्नास्तरुणादित्यसंनिभाः ।
ददर्श राक्षसेन्द्रस्य रावणस्य निवेशने  ३५
शिबिका विविधाकाराः स कपिर्मारुतात्मजः  ३६
लतागृहाणि चित्राणि चित्रशालागृहाणि च ।
क्रीडागृहाणि चान्यानि दारुपर्वतकानि च  ३७
कामस्य गृहकं रम्यं दिवागृहकमेव च ।
ददर्श राक्षसेन्द्रस्य रावणस्य निवेशने  ३८
स मन्दरसमप्रख्यं मयूरस्थानसंकुलम् ।
ध्वजयष्टिभिराकीर्णं ददर्श भवनोत्तमम्  ३९
अनन्तरत्ननिचयं निधिजालं समन्ततः ।
धीरनिष्ठितकर्माङ्गं गृहं भूतपतेरिव  ४०

---

पर्वताप्रमाणे भासणारे, मेघाप्रमाणे गर्जना करणारे व समरांगणामध्ये शत्रूंना जिंकण्यास अशक्य असे गज त्या गृहामध्ये त्याने अवलोकन केले त्याचप्रमाणे सुवर्णाचे अलंकार घातलेल्या हजार सेना त्याने तेथे अवलोकन केल्या. (३१-३४)

सुवर्णालंकाराच्या समुदायांनी गजबजून गेलेल्या आणि बालसूर्याप्रमाणे उज्ज्वल दिसत असलेल्या नाना प्रकारच्या पालख्या राक्षसाधिपति रावणाच्या गृहामध्ये त्या वायुपुत्र कपीने अवलोकन केल्या. त्याचप्रमाणे चित्रे काढलेले दिवाणखाने ज्यात आहेत अशा गृहें, अद्भुत लतागृहें, क्रीडास्थाने, क्रीडेकरिता लाकडाचे तयार केलेले पर्वत, रम्य असे रतिगृह आणि दिवसा विहार करण्याचे स्थल, त्या राक्षसाधिपति रावणाच्या निवासस्थानामध्ये त्याने अवलोकन केले. सारांश, मंदरपर्वतसम न, मयूरपक्ष्यांच्या निवासस्थानांनी गजबजलेलें, ध्वजदंडांनी तसेंच अनंत रत्नांच्या समुदायांनी भरलेलें, सभोंवती द्रव्यभांडाराचा समूहच की काय, असें भासणारे आणि पुण्यवानांना आचरलेल्या तपश्चर्येचें फलच की काय, असें अनुभवाला येणारें व कुबेराच्या गृहाची बरोबरी करणारें, तें उत्कृष्ट गृह हनुमानाने पाहिलें. ( ३५–४० )

अर्चिभिश्चापि रत्नानां तेजसा रावणस्य च।
विरराज च तद्वेश्म रश्मिवानिव रश्मिभिः ४१
जाम्बूनदमयान्येव शयनान्यासनानि च।
भाजनानि च शुभ्राणि ददर्श हरियूथपः ४२
मध्वासवकृतक्लेदं मणिभाजनसंकुलम्।
मनोरममसंबाधं कुबेरभवनं यथा ४३
नूपुराणां च घोषेण काञ्चीनां निःस्वनेन च।
मृदङ्गतलनिर्घोषैर्घोषवद्भिर्विनादितम् ४४
प्रासादसंघातयुतं स्त्रीरत्नशतसंकुलम्।
सुव्यूढकक्ष्यं हनुमान्प्रविवेश महागृहम् ४५

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षष्ठः सर्गः ॥६॥ [८१३]

सप्तमः सर्गः।

स वेश्मजालं बलवान्ददर्श व्यासक्तवैदूर्यसुवर्णजालम्।
यथा महत्प्रावृषि मेघजालं विद्युत्पिनद्धं सविहंगजालम् १

रत्नांचा प्रभाव व रावणाचें तेज यांच्या योगानें तें गृह, किरणांच्या योगानें शोभणाऱ्या सूर्याप्रमाणे शोभूं लागलें त्याच्या, आसनें आणि स्वच्छ पात्रें हीं सर्व सुवर्णमयच असल्याचें त्या वानरसेनाधिपतीस तेथें दिसून आलें आणि दोवरी मध व आसव यांच्या योगानें ओलें, रत्नपात्रांनी गजबजलेलें, कुबेराच्या गृहाप्रमाणे विस्तीर्ण व मनोहर तीरस्त्रांचा ध्वनि चमरपट्ट्यांचा शब्द आणि मृदंगावर झडत असलेल्या थापांचा नाद यांच्या योगानें व इतरही घोषयुक्त वाद्यांच्या योगानें नादित तें प्रचंड गृह प्रासादसमूहांनी युक्त, शेकडों उत्कृष्ट स्त्रियांनी भरून गेलेलें आणि विस्तीर्ण चौकांनी युक्त होतें, त्यामध्यें हनुमानानें प्रवेश केला (४१-४५)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणमंतर्गत आदिकाव्यांतील सुंदरकांडपैकी सहावा सर्ग समाप्त झाला ॥ ६ ॥

वैदूर्यरत्नांचीं सुवर्णाच्या गिलकच्या दृष्टात बसविलेल्या हेत्या आणि पक्ष्यांचे समुदाय त्या गृहसमुदाय दिसत होते पर्जन्यकाळांत विद्युल्लतेनें परिवेष्टित आणि पक्ष्यांनी युक्त असलेल्या प्रचंड मेघपटलाप्रमाणे तें सर्व गृहें त्या बलवान्‌ वानरानें अव-

निवेशनानां विविधाश्च शालाः प्रधानशङ्खायुधचापशालाः ।
मनोहराश्चापि पुनर्विशाला ददर्श वेश्माद्रिषु चन्द्रशालाः २
गृहाणि नानावसुराजितानि देवासुरैश्चापि सुपूजितानि ।
सर्वैश्च दोषैः परिवर्जितानि कपिर्ददर्श स्वबलार्जितानि ३
तानि प्रयत्नाभिसमाहितानि मयेन साक्षादिव निर्मितानि ।
महीतले सर्वगुणोत्तराणि ददर्श लङ्काधिपतेर्गृहाणि ४
ततो ददर्शोच्छ्रितमेघरूपं मनोहरं काञ्चनचारुरूपम् ।
रक्षोधिपस्यात्मबलानुरूपं गृहोत्तमं ह्यप्रतिरूपरूपम् ५
महीतले स्वर्गमिव प्रकीर्णं श्रिया ज्वलन्तं बहुरत्नकीर्णम् ।
नाना तरूणां कुसुमावकीर्णं गिरेरिवाग्रं रजसावकीर्णम् ६
नारीप्रवेकैरिव दीप्यमानं तडिद्भिरम्भोधरमर्च्यमानम् ।
हंसप्रवेकैरिव वाह्यमानं श्रिया युतं खे सुकृतं विमानम् ७

---

लोकन केली. उत्कृष्ट शंख, आयुधें व धनुष्यें यांच्या योगानें नाना प्रकारच्या गृहपंक्ति शोभत होत्या आणि त्याचप्रमाणें पर्वततुल्य उंच उंच घरांवर असलेल्या मनोहर व विशाल गच्च्या त्यानें अवलोकन केल्या. नाना प्रकारच्या संपत्तीनी चमकत असलेलीं, देवसुरांनाही पूजनीय वाटणारीं, कोणत्याही प्रकारचा दोष नसलेलीं आणि रावणानें स्वतःच्या बलानें संपादलेलीं गृहें त्या वानरानें अवलोकन केलीं. लंकाधिपति रावणाचीं जीं गृहें हनुमानानें अवलोकन केलीं, त्यांची रचना अनेक परिश्रमपूर्वक सुयोग्य रीतीनें केलेली होती, प्रत्यक्ष मयासुरानेच निर्माण केलेलीं आहेत कीं काय, अशीं तीं अद्भुत दिसत होतीं आणि या भूतलावरील सर्व गुणांनी तीं संपन्न होतीं. ( १-४ )

तदनंतर मेघाप्रमाणें उंच, सुवर्णाप्रमाणें उज्ज्वल, मनोहर, अप्रतिम, मुख्य गृहांमध्येंही उत्कृष्ट व आपल्या सामर्थ्याला अनुरूप असें एक त्या राक्षसाधिपति रावणाचें गृह त्यानें अवलोकन केलें. वैभवानें शोभणारें अनेक प्रकारच्या रत्नांनी समृद्ध, अनेक वृक्षांच्या पुष्पांनीं भरलेलें आणि पुष्पपरागांनी व्याप्त झालेल्या पर्वत-शिखराप्रमाणें दिसत असलेलें तें गृह भूतलावर पडलेला स्वर्गच कीं काय, असें भासत होतें. तें वैभवसंपन्न गृह स्त्रीरत्नांमुळें देदीप्यमान दिसत होतें. विद्युल्लतांनी

यथा नगाग्रं बहुधातुचित्रं यथा नभश्च ग्रहचन्द्रचित्रम् ।
ददर्श युक्तीकृतचारमेघचित्रं विमानं बहुरत्नचित्रम् ८
महीकृता पर्वतराजिपूर्णा शैलाः कृता वृक्षवितानपूर्णाः ।
वृक्षाः कृताः पुष्पवितानपूर्णाः पुष्पं कृतं केसरपत्रपूर्णम् ९
कृतानि वेश्मानि च पाण्डुराणि तथा सुपुष्पा अपि पुष्करिण्यः ।
पुनश्च पद्मानि सकेसराणि वनानि चित्राणि सरोवराणि १०
पुष्पाह्वयं नाम विराजमानं रत्नप्रभाभिश्च विघूर्णमानम् ।
वेश्मोत्तमानामपि चोच्चमानं महाकपिस्तत्र महाविमानम् ११
कृताश्च वैडूर्यमया विहङ्गा रूप्यप्रवालैश्च तथा विहङ्गाः ।
चित्राश्च नानावसुभिर्भुजङ्गा जात्यानुरूपास्तुरगाः शुभाङ्गाः १२
प्रवालजाम्बूनदपुष्पपक्षाः सलीलमावर्जितजिह्मपक्षाः ।

---

शोभत असलेल्या मेघाप्रमाणे अथवा श्रेष्ठ हंसपक्षी असलेल्या आकाशातील उत्कृष्ट विमानाप्रमाणे, दिसत होते ( ५—७ )

नंतर अनेक धातूंनी चित्रविचित्र झालेल्या पर्वतशिखराप्रमाणे, अथवा ग्रह व चंद्र यांनी सुशोभित झालेल्या आकाशाप्रमाणे, किंवा अनेक वर्णांनी युक्त व मनोहर मेघाप्रमाणे, आश्चर्यकारक असलेले बहुतररत्नखचित पुष्पक विमान त्याने पाहिलें. त्या नगरींतील भूमि पर्वतपंक्तीने भरून काढलेली होती. आंतील रत्नमय पर्वत तशाच प्रकारच्या वृक्षसमुदायांनी भरलेले होते, ते वृक्ष पुष्पसमूहांनी गजबजून गेलेले होते आणि ती पुष्पेही पराग व पाकळ्या यांनी भरून काढलेली होतीं, आंतील गृहें शुभ्रवर्ण केलेलीं होती, पुष्करिणी उत्कृष्ट पुष्पांनी भरून गेलेल्या होत्या, त्यांतील कमलें केसरांनी भरलेलीं होतीं आणि अद्भुत वनें व सरोवरही त्यामध्ये होतीं. असो ( ८—१० )

हनुमानाने पुष्पक नांवाचें तें मोठें उज्ज्वल विमान पाहिलें, तें रत्नप्रभामुळे झळकत होतें आणि उत्कृष्ट गृहांनाही मागें टाकणारें होतें. त्या विमानांत वैडूर्य रत्नांचे, रुप्याचे आणि पोवळ्याचे पक्षी केलेले होते. नाना प्रकारच्या द्रव्यांचे, नाना प्रकारचे भुजंग बनविलेले होते आणि दिरण्यांत जातीप्रमाणेंच असे शुभ अवयव असलेले अश्वही त्यांत करून बनविलेले होते. पोंवळें व सुवर्ण यांचीं

कामस्य साक्षादिव भान्ति पक्षा कृता विहङ्गाः सुमुखाः सुपक्षाः १३
नियुज्यमानाश्च गजाः सुहस्ताः सकेसराश्चोत्पलपत्रहस्ताः ।
बभूव देवी च कृता सुहस्ता लक्ष्मीस्तथा पद्मिनिपद्महस्ता　१४
इतीव तद्गृहमभिगम्य शोभनं सविस्मयो नगमिव चारुकन्दरम् ।
पुनश्च तत्परमसुगन्धि सुन्दरं हिमात्यये नगमिव चारुकन्दरम् १५
ततः स तां कपिरभिपत्य पूजितां चरन्पुरीं दशमुखबाहुपालिताम् ।
अदृश्य तां जनकसुतां सुपूजितां सुदुःखितां पतिगुणवेगनिर्जिताम् ॥
ततस्तदा बहुविधभावितात्मनः कृतात्मनो जनकसुतां सुवर्त्मनः ।
अपश्यतोऽभवदतिदुःखितं मनः सचक्षुषः प्रविचरतो महात्मनः १७
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे सप्तमः सर्गः ॥७॥ [४३०]

---

पुढे ज्यांच्या पक्षांमध्ये आहेत, लीलेने ज्यांनी आपले वक्र पंख संकुचित केलेले आहेत आणि ज्यांचे पंख उत्कृष्ट असून, कामोद्दीपक असल्यामुळे मदनाचे प्रत्यक्ष पंखच की काय, असे भासत आहेत, अशा प्रकारचे उत्कृष्ट चंचूंनी युक्त असलेले पक्षी तेथे केलेले होते. लक्ष्मीच्या अभिषेकाकडे ज्यांची योजना झालेली आहे, असे कमलकेसरांनी व उत्कृष्ट शुंडांनी युक्त असलेले व कमलपत्रे शुंडेस ये घेतलेले गज त्या विमानामध्ये होते. तसेच आपल्या उत्कृष्ट हातामध्ये जिने कमलें धारण केलेलीं आहेत, अशी लक्ष्मीदेवीही तेथे बनविलेल्या कमलयुक्त सरोवरामध्ये तयार केलेली होती. याप्रमाणे मनोहर गुहांनी युक्त असलेला अत्यंत सुगंधी सुंदर वृक्षच की काय, अशा त्या सुशोभित गृहासमीप जाऊन हनुमान् विस्मित झाला. ( ११—१५ )

तदनंतर रावणाने आपल्या बाहुबलाने रक्षण केलेल्या त्या मान्य नगरीमध्ये उड्या टाकीत टाकीत तो हनुमान् संचार करूं लागला. पतीच्या गुणांचे एकसारखें स्मरण होत असल्यामुळे क्षुब्ध, अत्यंत दुःखित व अत्यंत मान्य अशी जनककन्या सीता जेव्हा त्याच्या दृष्टीस पडेना, तेव्हा तो दुःखित झाला. तदनंतर नाना प्रकारांनी ज्याचें अंतःकरण संस्कृत झालेलें आहे आणि ज्याच्या मनाला चांगलें वळण लागलेलें आहे, असा तो सन्मार्गवर्ती महात्मा हनुमान् लक्ष लावून संचार करीत असतांनाही जनककन्या सीता जेव्हा त्याच्या दृष्टीस पडेना, तेव्हा

## अष्टमः सर्गः ।

स तस्य मध्ये भवनस्य संस्थितो महद्विमानं मणिरत्नचित्रितम् ।
प्रतप्तजाम्बूनदजालकृत्रिमं ददर्श धीमान्पवनात्मजः कपिः १
तदप्रमेयप्रतिकारकृत्रिमं कृतं स्वयं साध्विति विश्वकर्मणा ।
दिवं गते वायुपथे प्रतिष्ठितं व्यराजतादित्यपथस्य लक्ष्म तत् २
न तत्र किंचिन्न कृतं प्रयत्नतो न तत्र किंचिन्न महार्घरत्नवत् ।
न ते विशेषा नियताः सुरेष्वपि न तत्र किंचिन्न महाविशेषवत् ३
तपःसमाधानपराक्रमार्जितं मनःसमाधानविचारचारिणम् ।
अनेकसंस्थानविशेषनिर्मितं ततस्ततस्तुल्यविशेषनिर्मितम् ४
मनः समाधाय तु शीघ्रगामिनं दुरासदं मारुततुल्यगामिनम् ।
महात्मनां पुण्यकृतां महर्द्धिनां यशस्विनामग्र्यमुदामिवालयम् ५

---

त्याच्या मनाला अतिशय दुःख झालें. ( १६–१७ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकी सातवा सर्ग समाप्त झाला. ॥ ७ ॥

तो बुद्धिमान् वायुपुत्र हनुमान् त्या रावणाच्या गृहासमीप बसला असतां, त्या गृहामध्ये एक मोठें विमान त्याचे दृष्टीस पडलें. तें विमान उत्कृष्ट रत्नांनी व्याप्त होतें आणि उत्कृष्ट सुवर्णाच्या खिडक्या त्यांत केलेल्या होत्या अप्रतिम चित्रांनी तें सुशोभित केलेलें, विश्वकर्म्याने स्वतः निर्माण केलेलें आणि आकाशगामी वायुमार्गामध्ये लटकत असलेलें तें विमान सूर्याच्या मार्गाचें चिन्हच होऊन राहिलेलें होतें प्रयत्नपूर्वक न केलेलें, अमूल्य रत्नें नसलेलें आणि उत्कृष्ट गुण ज्यांत नाहींत, असें त्यांत काहींएक नव्हतें व त्यांत ज्या ज्या विशेष गोष्टी होत्या, त्यांचा देवांचे ठिकाणींसुद्धां अभावच होता तप आणि समाधि यांच्या सामर्थ्यावर तें विमान रावणाने संपादन केलेलें होतें, तें विमान आंत बसणाऱ्याच्या मनास ज्या भागांत फिरावयाचें असेल, त्या भागांत संचार करण्यास समर्थ असें होतें. त्यांत नाना प्रकारच्या रचना केलेल्या होत्या आणि दिव्य विमानामध्ये असावयाच्या त्या सर्व काहीं विशेष गोष्टी त्यामध्ये बनविलेल्या होत्या यजमानाच्या इच्छेप्रमाणे शीघ्र गमन करणारें होतें; तें पापी जनांना प्राप्त होणें सर्वस्वी अशक्य होतें,

**विशेषमालम्ब्य विशेषसंस्थितं विचित्रकूटं बहुकूटमण्डितम् ।**
**मनोभिरामं शरदिन्दुनिर्मलं विचित्रकूटं शिखरं गिरेर्यथा** ६
**वहन्ति यत्कुण्डलशोभितानना महाशना व्योमचरा निशाचराः ।**
**विवृत्तविध्वस्तविशाललोचना महाजवा भूतगणाः सहस्रशः** ७
**वसन्तपुष्पोत्करचारुदर्शनं वसन्तमासादपि चारुदर्शनम् ।**
**स पुष्पकं तत्र विमानमुत्तमं ददर्श तद्वानरवीरसत्तमः** ८

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डेऽष्टमः सर्गः ॥८॥ [ ८३८ ]

नवमः सर्गः ।

**तस्यालयवरिष्ठस्य मध्ये विमलमायतम् ।**
**ददर्श भवनश्रेष्ठं हनुमान्मारुतात्मजः** १

फिरण्याचे गतीमध्ये तें वायूच्या बरोबरीचें होतें आणि महात्मे, अत्यंत संपन्न, कीर्तिमान् व अत्यंत सुखी अशा पुण्यवान् लोकानाच ते मिळणारें असें होतें. ( १–५ )

तें विमान विशिष्ट गतीनें युक्त असें होतें. आकाशरूप विशेष प्रदेशामध्ये तें ठेवलेलें होतें, चित्रविचित्र वस्तूंच्या समुदायाचें ते एक भांडारच होतें, नाना प्रकारच्या शिखरांनी ते भूषित केलेलें होतें, पाहणाऱ्याचें मन ते रमविणारें होतें, शरदृतूंतील चंद्राप्रमाणे ते निर्मल होतें आणि आश्चर्यकारक वस्तूंनी भरलेलें पर्वताचें शिखरच की काय असे ते भासत होतें. कुंडलांच्या योगानें ज्यांचीं मुखें सुशोभित झालेलीं आहेत आणि ज्यांची पापणीही हालत नाही, असे विशाल व तारवटलेले डोळे असणारे बहुभक्षक, महावेगवान्, आकाशगामी व निशाचर असे हजारो भूतगण त्याचें वाहक होते असा त्या वानरवीरांमध्ये श्रेष्ठ असलेल्या हनुमानानें अशा प्रकारचें ते उत्कृष्ट पुष्पक विमान तेथें पाहिलें. तें वसंतऋतूंतील शोभेपेक्षाही त्रिगुणित मनोहर होतें आणि वसंतऋतूंतील पुष्पसमुदायाच्या योगानें त्याची आकृति तर फारच सुंदर झालेली होती ( ६–८ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडांतील आठवा सर्ग समाप्त झाला. ॥ ८ ॥

लंकेच्या मध्यभागीं असलेलें आणि गृहसमुदायांनी व्यापून टाकलेलें, तें

अर्धयोजनविस्तीर्णमायतं योजनं महत् ।
भवनं राक्षसेन्द्रस्य बहुप्रासादसंकुलम् २
मार्गमाणस्तु वैदेहीं सीतामायतलोचनाम् ।
सर्वतः परिचक्राम हनूमानरिसूदनः ३
उत्तमं राक्षसावासं हनूमानवलोकयन् ।
आससादाथ लक्ष्मीवान् राक्षसेन्द्रनिवेशनम् ४
चतुर्विषाणैर्द्विरदैस्त्रिविषाणैस्तथैव च ।
परिक्षिप्तमसंबाधं रक्ष्यमाणमुदायुधैः ५
राक्षसीभिश्च पत्नीभी रावणस्य निवेशनम् ।
आहृताभिश्च विक्रम्य राजकन्याभिरावृतम् ६
तन्नक्रमकराकीर्णं तिमिंगिलझषाकुलम् ।
वायुवेगसमाधूतं पन्नगैरिव सागरम् ७
या हि वैश्रवणे लक्ष्मीर्या चन्द्रे हरिवाहने ।
सा रावणगृहे रम्या नित्यमेवानपायिनी ८

मोठें गह होतें त्यामध्ये निर्मल आणि विस्तीर्ण असें एक उत्कृष्ट गृह वायुपुत्र हनुमानाने पाहिलें ते गह राक्षसाधिपति रावणाचें असून, तें सभोवतालच्या अनेक राजवाड्यानी घेरलेलें होतें. त्या प्रचंड गहाची रुंदी अर्धे योजन असून लांबी एक योजन होती दीर्घ नेत्रानी युक्त असलेली विदेहराजकन्या सीता शोधण्याकरिता शत्रुनाशक हनुमान् जेव्हा चोहोंकडे फिरला, तेव्हा फिरता फिरता राक्षसाचेंच ज्यामध्ये वास्तव्य आहे, अशीं उत्तम उत्तम घरें तो हनुमान् पहात चालला व शेवटी राक्षसाधिपति रावणाचे तें घर त्या भव्य हनुमानाला आढळलें ( १-४ )

चार, तीन व दोन दात असलेले गज जरी तेथे पुष्कळ होते, तथापि त्या घरात खेचाखेच झालेली नव्हती आणि हातामध्ये आयुधें सज्ज ठेवून, राक्षस त्याचें रक्षण करीत होते तें रावणाचें गह राक्षसजातीय भार्या आणि त्याने पराक्रमाने जिंकून आणलेल्या राजकन्या, यानी भरलेले होतें सारांश नक्र, मकर, तिमिंगिल व इतरही मत्स्य व्यापून टाकलेल्या, वायुवेगाने प्रक्षुब्ध झालेल्या आणि

या च राज्ञः कुबेरस्य यमस्य वरुणस्य च ।
नादृशी तद्विशिष्टा वा ऋद्धी रक्षोगृहेष्विह ९
तस्य हर्म्यस्य मध्यस्थवेश्म चान्यत्सुनिर्मितम् ।
बहुनिर्यूहसंयुक्तं ददर्श पवनात्मजः १०
ब्रह्मणोऽर्थे कृतं दिव्यं दिवि यद्विश्वकर्मणा ।
विमानं पुष्पकं नाम सर्वरत्नविभूषितम् ११
परेण तपसा लेभे यत्कुबेरः पितामहात् ।
कुबेरमोजसा जित्वा लेभे तद्राक्षसेश्वरः १२
ईहामृगसमायुक्तैः कार्तस्वरहिरण्मयैः ।
सुकृतं राजितं स्तम्भैः प्रदीप्तमिव च श्रिया १३
मेरुमन्दरसंकाशैरुल्लिखद्भिरिवाम्बरम् ।
कूटागारैः शुभागारैः सर्वतः समलंकृतम् १४

भुजंगयुक्त अशा सागराप्रमाणे तें गृह दिसत होतें. कुबेर, चंद्र आणि गरुड, यांचे ठिकाणीं जी रमणीयता आहे, ती मनोहर शोभा कधींही व कांहींही नष्ट न होतां रावणाच्या घरीं नित्य दिसत होती आणि लंकेंतील राक्षसांच्या घरांतील संपत्ति राजा कुबेर, यम आणि वरुण यांच्या संपत्तीप्रमाणे किंबहुना जास्तच होती. ( ७—९ )

त्या गृहाचे मध्यभागा उत्कृष्ट रीतीनें तयार केलेलें आणि अनेक मत्त गजांनी युक्त असलेलें विमान वायुपुत्र हनुमानानें पाहिलें. तें पुष्पक नावाचें विमान सर्व रत्नांनी भूषित झालेलें होतें व हेंच दिव्य विमान पूर्वी विश्वकर्म्यानें स्वर्गामध्ये ब्रह्मदेवाकरितां तयार केलेलें होतें. तें विमान ब्रह्मदेवापासून कुबेराला पराकाष्टेच्या तपश्चर्येनंतर मिळालेलें होतें; परंतु राक्षसाधिपति रावणानें तर तें स्वपराक्रमानें कुबेराला जिंकूनच प्राप्त करून घेतलेलें होतें. लांडगे ज्यावर खोदलेले आहेत, अशा सोन्यारुप्यांच्या उत्कृष्ट स्तंभांनी तें विमान झळकत होतें व कांतीनें जसें काहीं पेटलेलें असल्याप्रमाणेच होतें. मेरुमंदरतुल्य गगनचुंबित अद्भुत गृहांनीं आणि शुभ अशा विहार गृहांनी तें विमान सर्व बाजूंनी अलंकृत केलेलें होतें. ( १०—१४ )

ज्वलनार्कप्रतीकाशैः सुकृतं विश्वकर्मणा ।
हेमसोपानयुक्तं च चारुप्रवरवेदिकम् १५
जालवातायनैर्युक्तं काञ्चनैः स्फाटिकैरपि ।
इन्द्रनीलमहानीलमणिप्रवरवेदिकम् १६
विद्रुमेण विचित्रेण मणिभिश्च महाधनैः ।
निस्तुलाभिश्च मुक्ताभिस्तलेनाभिविराजितम् १७
चन्दनेन च रक्तेन तपनीयनिभेन च ।
सुपुण्यगन्धिना युक्तमादित्यतरुणोपमम् ॥
विमानं पुष्पकं दिव्यमारुरोह महाकपिः १८
तत्रस्थः सर्वतो गन्धं पानभक्ष्यान्नसंभवम् ।
दिव्यं संमूर्च्छितं जिघ्रन्रूपवन्तमिवानिलम् १९
स गन्धस्तं महासत्त्वं बन्धुर्बन्धुमिवोत्तमम् ।
इत एहीत्युवाचेव तत्र यत्र स रावणः २०

विश्वकर्म्याने उत्तम रीतीने तयार केलेल्या त्या विमानाला सूर्य व अग्नि यांच्याप्रमाणे तेजस्वी अशा सुवर्णमय व स्फटिकमय जाळ्या व खिडक्या होत्या, सोन्याचे जिने केलेले होते, सुंदर आणि उत्कृष्ट अशा बसावयाच्या जागा त्यात तयार केलेल्या होत्या आणि इंद्रनील, महानील व इतरही उंच रत्नें यांच्याहि जागा त्यात बनविलेल्या होत्या नाना प्रकारची पोवळीं, महामूल्यवान् रत्नें व निरुपम मोत्यें यांनी तयार केलेल्या फरशीने तर तें विमान सुशोभित होतें. आरक्तवर्ण आणि सुवर्णवर्ण अशा अत्यंत सुगंधी चंदनानें तें विमान युक्त व बालसूर्याप्रमाणे तेजस्वी होतें अशा प्रकारच्या दिव्य पुष्पक-विमानामध्ये तो महाकपि हनुमान् आरूढ झाला व याप्रमाणे त्या विमानात जाऊन बसलेला तो हनुमान् पान, भक्ष्य व अन्न यांचा दिव्य व मूर्तिमंत वायूच आहे, अशा रीतीने सर्व प्रदेश व्यापून राहिलेला गंध सर्व बाजूंनी घेऊ लागला ज्याप्रमाणे एखादा बंधु दुसऱ्या आपल्या श्रेष्ठ बंधूला हाक मारीत असतो, त्याप्रमाणे तो गंध त्या महावीर्यवान् हनुमानाला इकडे ये, म्हणून जिकडे रावण होता तिकडे, जसा काही हाकच मारू लागला; कारण त्या दिव्य सुगंधामुळे

ततस्तां प्रस्थितः शालां ददर्श महतीं शिवाम् ।
रावणस्य महाकान्तां कान्तामिव वरस्त्रियम् २१
मणिसोपानविकृतां हेमजालविराजिताम् ।
स्फाटिकैरावृततलां दन्तान्तरितरूपिकाम् २२
मुक्तावज्रप्रवालैश्च रूप्यचामीकरैरपि ।
विभूषितां मणिस्तम्भैः सुबहुस्तम्भभूषिताम् २३
समैर्ऋजुभिरत्युच्चैः समन्तात्सुविभूषितैः ।
स्तम्भैः पक्षैरिवात्युच्चैर्दिवं संप्रस्थितामिव २४
महत्या कुथयास्तीर्णां पृथिवीलक्षणाङ्कया ।
पृथिवीमिव विस्तीर्णां सराष्ट्रगृहशालिनीम् २५
नादितां मत्तविहगैर्दिव्यगन्धाधिवासिताम् ।
परार्ध्यास्तरणोपेतां रक्षोधिपनिषेविताम् २६

---

रावणाचें शयनगृह येथेच कोठेतरी असावें अशी हनुमानाला अटकळ करता आली. ( १५-२० )

नंतर हनुमान् तेथून निघाला, तेव्हा एखाद्या उत्कृष्ट स्त्रीप्रमाणे प्रिय असलेल्या, अत्यंत रमणीय व विशाल अशा त्या रावणाच्या कल्याणकारक दिवाणखान्याकडे त्याचें लक्ष गेलें. त्या दिवाणखान्याला रत्नांचे जिने विशेष कुशलतेने केलेले होते, सुवर्णजालामुळे त्याला शोभा आलेली होती; स्फटिकांनी त्यांतील भूमि मढविलेली होती; मधूनमधून हस्तिदंत, मोत्यें, हिरे, पोवळीं, रौप्य व सुवर्ण यांची चित्रें बसविलेलीं होतीं; रत्नस्तंभांनी तो भूषित असून, इतरही पुष्कळ स्तंभांनी त्याला शोभा आणली होती. एकसारखे सरळ, अतिशय उंच आणि सर्व बाजूंनी शोभा देणारे स्तंभ त्या दिवाणखान्यास असल्यामुळे, अतिशय उंच पक्षांच्या योगाने तो स्वर्गलोकीं जाण्यासच निघाला आहे की काय, असा भास होता. ( २१-२४ )

पृथ्वीवरील वस्तूंच्या रूपांचें चिन्ह असलेला असा एक प्रशस्त गालिचा त्या पृथ्वीसारखेंच राष्ट्रें व गृहें असणाऱ्या विस्तीर्ण दिवाणखान्यात पसरलेला होता. मत्त पक्ष्यांनी तो गजबजलेला होता; दिव्य गंधांचा त्यांत

धूम्रामगरुधूपेन विमलां हंसपाण्डुराम् ।
पत्रपुष्पोपहारेण कल्माषीमिव सुप्रभाम् २७
मनसो मोदजननीं वर्णस्यापि प्रसाधिनीम् ।
तां शोकनाशनीं दिव्यां श्रियः संजननीमिव २८
इन्द्रियाणीन्द्रियार्थैस्तु पञ्चपञ्चभिरुत्तमैः ।
तर्पयामास मातेव तदा रावणपालिता २९
स्वर्गोऽयं देवलोकोऽयमिन्द्रस्यापि पुरी भवेत् ।
सिद्धिर्वेयं परा हि स्यादित्यमन्यत मारुतिः ३०
प्रध्यायत इवापश्यत्प्रदीपांस्तत्र काञ्चनान् ।
धूर्तानिव महाधूर्तैर्देवनेन पराजितान् ३१
दीपानां च प्रकाशेन तेजसा रावणस्य च ।
अर्चिर्भिर्भूषणानां च प्रदीप्तेत्यभ्यमन्यत ३२

---

तिकडेतिकडे घमघमाट सुटलेला होता, मोठ्यामोठ्या मूल्यवान् बैठकी त्यात घातलेल्या होत्या, राक्षसाधिपति रावण त्यात होता वस्तुत हंसपक्ष्याप्रमाणे शुभ्र व निर्मल असूनही कृष्णागुरूचा धूप जळत असल्यामुळे तो धूम्रवर्ण बनलेला होता आणि पत्रं व पुष्पं यांची तेथे समृद्धि असल्यामुळे वसिष्ठाच्या चित्रविचित्रवर्ण गाईप्रमाणे त्याची कांति उत्कृष्ट झालेली होती तेथे आत असणाऱ्याच्या देहाची कांति उत्कृष्ट करून त्याच्या मनाला आनंद देणारा, त्याचा शोक नाहीसा करणारा आणि वैभवाची दिव्य खाणच अशा भासणारा तो दिवाणखाना होता ( २६-२८ )

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या उत्कृष्ट पाच विषयांच्या योगाने हनुमानाची पाचही ज्ञानेंद्रिये त्या रावणरक्षित दिवाणखान्याने मातेप्रमाणे तृप्त केली असता ' हा का स्वर्गलोक आहे की देवलोक आहे ? किंवा इंद्राची अमरावती नगरी आहे ? अथवा ही काही पराकाष्ठेची गंधर्वमाया आहे ? " असं मारुतीला वाटू लागलें तदनंतर तेथे असलेले सुवर्णदीप हे अट्टल जुगाऱ्यांनी जुगारात जिंकल्यामुळे विचार करीत बसलेल्या जुगाऱ्याप्रमाणे त्याला दिसले ( २९-३१ )

दीपांचा प्रकाश, रावणाचे तेज व भूषणांच्या प्रभा यांच्या योगाने तो दिवाण-

ततोऽपश्यत्कुथासीनं नानावर्णाम्बरस्रजम् ।
सहस्रं वरनारीणां नानावेषविभूषितम् ३३
परिवृत्तेऽर्धरात्रे तु पाननिद्रावशंगतम् ।
क्रीडित्वोपरतं रात्रौ प्रसुप्तं बलवत्तदा ३४
तत्प्रसुप्तं विरुरुचे निःशब्दान्तरभूषितम् ।
निःशब्दहंसभ्रमरं यथा पद्मवनं महत् ३५
तासां संवृतदान्तानि मीलिताक्षाणि मारुतिः ।
अपश्यत्पद्मगन्धीनि वदनानि सुयोषिताम् ३६
प्रबुद्धानीव पद्मानि तासां भूत्वा क्षपाक्षये ।
पुनः संवृतपत्राणि रात्राविव बभुस्तदा ३७
इमानि मुखपद्मानि नियतं मत्तषट्पदाः ।
अम्बुजानीव फुल्लानि प्रार्थयन्ति पुनः पुनः ३८
इति वामन्यत श्रीमानुपपत्त्या महाकपिः ।

---

त्याना त्याला जसा काही पेटलेलाच भास् लागला नंतर अनेक रंगाची वस्त्रे व माला धारण करून नाना प्रकारचे वेष व भूषणे धारण केलेल्या हजार उत्कृष्ट स्त्रिया गालिच्यांवर निजलेल्या त्याच्या दृष्टीस पडल्या. मध्यरात्रीचा समय झालेला होता व मद्यपान आणि निद्रा याच्या आधीन झालेल्या त्या स्त्रिया रात्री क्रीडा करून दमूनभागून फारच गाढ झोपलेल्या होत्या. त्या हजार स्त्रियाना गाढ झोप लागली असल्यामुळे त्यांच्या नूपुरप्रभृति भूषणाचा ध्वनि अगदी बंद पडलेला होता आणि यामुळे तो स्त्रीसमुदाय शब्दरहित हंस व भ्रमर असलेल्या एखाद्या प्रचंड पद्मवनाप्रमाणे शोभत होता (२१-२५)

मारुतीने पाहिलेल्या त्या सुन्दर स्त्रियाचे मुखास कमलाचा गंध येत होता; काहीच्या मुखावरील नेत्र अर्धवट मिटलेले असून, त्याना ग्लानी आल्यासारख्या दिसत होती आणि काही मुखावरील नेत्र पूर्णपणे मिटलेले होते. त्या स्त्रियांची मुखे रात्र उजाडल्यावर कमलाप्रमाणे विकसित होऊन पुनरपि रात्र पडली असता पाकळ्या मिटलेल्या कमलाप्रमाणे मिटत होती. प्रफुल्लित कमलाची ज्याप्रमाणे मत्त भ्रमर वारंवार इच्छा करीत असतात, त्याप्रमाणे ते एकसारखे या मुखकमल-

मेने हि गुणतस्तानि समानि सलिलोद्भवैः ३९
सा तस्य शुशुभे शाला ताभिः स्त्रीभिर्विराजिता ।
शारदीव प्रसन्ना द्यौस्ताराभिरभिशोभिता ४०
स च ताभिः परिवृतः शुशुभे राक्षसाधिपः ।
यथा ह्युडुपतिः श्रीमांस्ताराभिरिव संवृतः ४१
याश्च्यवन्तेऽम्बरात्ताराः पुण्यशेषसमावृताः ।
इमास्ताः संगताः कृत्स्ना इति मेने हरिस्तदा ४२
ताराणामिव सुव्यक्तं महतीनां शुभार्चिषाम् ।
प्रभावर्णप्रसादाश्च विरेजुस्तत्र योषिताम् ४३
व्यावृत्तकचपीनस्रक्प्रकीर्णवरभूषणाः ।
पानव्यायामकालेषु निद्रोपहतचेतसः ४४
व्यावृत्ततिलकाः काश्चित्काश्चिदुद्भ्रान्तनूपुराः

---

ची इच्छा करीत आहेत, असेंही त्या अन्य महाकमलांना कमलाशी त्यांचे साम्य दिसून आल्यामुळे वाटूं लागलें आणि गुणामध्येंही तीं कमलाचीच बरोबरी करणारीं आहेत, असें त्या हनुमानाचें मत झालें ( ३६–३९ ).

असो शरदृतूमध्ये निर्मल झालेलें नभोमंडल ज्याप्रमाणे तारागणांनी सुशोभित दिसतें, त्याप्रमाणे त्या रावणाचें तें शय्यागृह त्या स्त्रियांमुळे सुशोभित झालेलें होतें. नक्षत्राधिपति श्रीमान् चंद्र ताऱ्यांच्या समूहांत जसा शोभतो, तसा तो राक्षसाधिपति रावण त्या स्त्रियांनी परिवेष्टित झाला असल्यामुळे शोभूं लागला. ज्या तारा आकाशांतून खाली पडतात, त्या पडतांना काही पुण्याचा शिल्लक असल्यामुळें येथें सर्व एकत्र जमलेल्या आहेत, असें त्या वानराला वाटलें. कारण, त्या ठिकाणीं असलेल्या स्त्रियांची देहकांति, सौंदर्य आणि उज्ज्वलता हीं उत्कृष्ट कांति असलेल्या मोठ्या ताराप्रमाणे होतीं, हें फारच स्पष्ट रीतीनें कळत होतें. ( ४०–४३ )

पान आणि गायनादि क्रीडा चालल्या असतांना, निद्रेने घेरून टाकलेल्या त्या स्त्रियांचे केश आणि मोठमोठ्या माळा इकडेतिकडे उडवल्या गेल्या होत्या, तसेंच त्यांच्या अंगावरील उत्तमोत्तम भूषणेंहि अस्ताव्यस्त झालेलें होतीं काहीं सुंदर

पार्श्वे गलितहाराश्च काश्चित्परमयोषितः ४५
मुक्ताहारवृताश्चान्याः काश्चित्प्रस्रस्तवाससः ।
व्याविद्धरशनादामाः किशोर्य इव वाहिताः ४६
अकुण्डलधराश्चान्या विच्छिन्नमृदितस्रजः ।
गजेन्द्रमृदिताः फुल्ला लता इव महावने ४७
चन्द्रांशुकिरणाभाश्च हाराः कासांचिदुद्गताः ।
हंसा इव बभुः सुप्ताः स्तनमध्येषु योषिताम् ४८
अपरासां च वैदूर्याः कादम्बा इव पक्षिणः ।
हेमसूत्राणि चान्यासां चक्रवाका इवाभवन् ४९
हंसकारण्डवोपेताश्चक्रवाकोपशोभिताः ।
आपगा इव ता रेजुर्जघनैः पुलिनैरिव ५०
किङ्किणीजालसंकाशास्ता हेमविपुलाम्बुजा ।

---

स्त्रियांचे तिलक नाहीसे झाले होते, काहींच्या पायातील तोरड्या गळून गेलेल्या होत्या आणि काहींच्या कंठातील हारही बाजूला पडले होते काहींच्या गळ्यातील मोत्यांचे हार तुटलेले होते; काहींची वस्त्रे सुटलेली होती आणि कमरपट्टे अस्ताव्यस्त झाले असल्यामुळे काही स्त्रिया, भार वाहून थकलेल्या घोड्याप्रमाणे अस्ताव्यस्त लोळत पडल्यासारख्या दिसत होत्या काहींची कुंडले जाग्यावर नव्हती, काहींच्या माळा चुरगळून तुटून गेलेल्या होत्या आणि यामुळे त्या स्त्रिया गजेंद्रांनी तुडविलेल्या महावनातील प्रफुल्लित लताप्रमाणे दिसत होत्या. चंद्राच्या लहानमोठ्या किरणाप्रमाणे ज्यांचे तेज आहे, असे काही स्त्रियांचे वर आलेले मोत्यांचे हार त्या स्त्रियांच्या स्तनामध्ये निद्रिस्थ झालेल्या हंसाप्रमाणे शोभू लागले ( ४३-४८ )

दुसऱ्या स्त्रियांच्या वैदूर्यरत्नमाला स्तनांच्या मध्यभागी आल्या असल्यामुळे बदकाप्रमाणे दिसत होत्या आणि इतर स्त्रियांच्या कंठातील सोन्याचे पदर चक्रवाक पक्ष्यांप्रमाणे दिसत होते. हंस, कारंडव आणि चक्रवाक या पक्ष्यांनी सुशोभित झालेल्या नद्या ज्याप्रमाणे वाळवंटामुळे शोभत असतात, त्याप्रमाणे त्या स्त्रिया कटिप्रदेशामुळे चमकत होत्या घुंगुराप्रमाणे ज्यांचे डोळे मिटलेले आहेत, अशा

भावग्राहा यशस्तीराः सुप्ता नद्य इवाबभुः ५१
मृदुष्वङ्गेषु कासांचित्कुचाग्रेषु च संस्थिताः
बभूवुर्भूषणानीव शुभा भूषणराजयः ५२
अंशुकान्ताश्च कासांचिन्मुखमारुतकम्पिताः ।
उपर्युपरि वक्त्राणां व्याधूयन्ते पुनः पुनः ५३
ताः पताका इवोद्धूताः पत्नीनां रुचिरप्रभाः ।
नानावर्णसुवर्णानां वक्त्रमूलेषु रेजिरे ५४
ववल्गुश्चात्र कासांचित्कुण्डलानि शुभार्चिषाम् ।
सुखमारुतसंस्पर्शैर्मन्दं मन्दं च योषिताम् ५५
शर्करासवगन्धः स प्रकृत्या सुरभिः सुखः ।
तासां वदननिःश्वासः सिषेवे रावणं तदा ५६
रावणाननशङ्काश्च काश्चिद्रावणयोषितः
मुखानि च सपत्नीनामुपाजिघ्रन् पुनः पुनः ५७

---

त्या स्त्रिया, निद्रिस्त झालेल्या नद्याच आहेत की काय, अशा दिसत होत्या; कारण सुवर्णभूषणरूपी असंख्य कमलांनी, स्त्रीविषयक सुरतक्रीडारूपी मकरांनी आणि कीर्तिरूप तीरांनी त्या युक्त होत्या. काही स्त्रियांच्या कोमल अवयवांचे ठिकाणी आणि काहींच्या स्तनाग्रांचे ठिकाणी गडबडीमध्ये उठलेले भूषणांचे ओरखडेही उत्कृष्ट भूषणाप्रमाणेच शोभूं लागले. काहींच्या वस्त्रांचे पदर मुखातील वायूने कंपित होत असल्यामुळे वरचेवर मुखाच्या वर वर उडत राहिलेले होते. यामुळे रावणाच्या स्त्रियांच्या मुखासमीप नाना प्रकारच्या सुवर्णतंतूंनी बनविलेल्या वस्त्रांच्या उत्कृष्ट तेजस्वी पताकाच फडफडत आहेत की काय, असे ते वस्त्रांचे पदर शोभूं लागले. उत्कृष्ट कांतीने युक्त असलेल्या काही स्त्रियांची कुंडले मुखवायूच्या संपर्कामुळे हलूं लागून, हळूहळू वाजूं लागली. त्यांच्या मुखातून बाहेर पडणारा निःश्वास शर्करासवाच्या गंधाने युक्त असून स्वभावतःच सुगंधी व सुखावह होता आणि तो रावणाची सेवा करीत होता. सारांश, त्यांच्या मुखापासून निघालेला सुगंधी व सुखावह वायु रावणाकडे जात होता ( ४९–५६ )

मद्यपानाचा मद आणि निद्रा यांच्या अमलामुळे काही रावणस्त्रिया आपल्या

अत्यर्थं सक्तमनसो रावणे ता वरस्त्रियः ।
अस्वतन्त्राः सपत्नीनां प्रियमेवाचरंस्तदा ॥ ५८
बाहू उपनिधायान्याः पारिहार्यविभूषिताः ।
अंशुकानि च रम्याणि प्रमदास्तत्र शिश्यिरे ॥ ५९
अन्या वक्षसि चान्यस्यास्तस्याः काचित्पुनर्भुजम् ।
अपरा त्वङ्कमन्यस्यास्तस्याश्चाप्यपरा कुचौ ॥ ६०
ऊरुपार्श्वकटीपृष्ठमन्योन्यस्य समाश्रिताः ।
परस्परनिविष्टाङ्ग्यो मदस्नेहवशानुगाः ॥ ६१
अन्योन्यस्याङ्गसंस्पर्शात्प्रीयमाणाः सुमध्यमाः ।
एकीकृतभुजाः सर्वाः सुषुपुस्तत्र योषितः ॥ ६२

---

सवतीचे मुख हीं रावणाचेंच मुख आहेत, असें समजून वारंवार त्या मुखाचा वास घेऊं लागल्या, तरी रावणाचे ठिकाणीं मन अतिशय आसक्त झाल्यामुळें परस्वाधीन बनलेल्या त्या उत्कृष्ट स्त्रियाही सवतींना आपल्या मुखाचा वास घेतल्यामुळें त्यांच्यावर क्रुद्ध न होतां त्या आपल्या सवतींचें प्रियच करूं लागल्या कारण त्यांही निद्रा व मद्यपानाचा मद यामुळें रावणच आपल्या मुखाचा वास घेत आहे, असें समजून, उलट त्या सवतीच्या मुखाचा वास घेऊं लागल्या व त्या सवती ही रावणच आपल्या मुखाचा वास घेत आहे, असें समजूं लागल्या. गोठ, तोडे अशा तऱ्हेचे अलंकार धारण केलेल्या दुसऱ्या कांहीं तरुण स्त्रिया उशाला हात घेऊन तेथें निजल्या होत्या आणि कांहीं उशाखालीं वस्त्र घेऊन निजल्या होत्या. एक दुसरीच्या वक्षस्थलावर शयन करीत आहे, तिचा हात उशाशीं घेऊन दुसरीच कोणी निजली आहे, एक दुसरीच्या मांडीवर डोकें ठेवून झोप घेत आहे आणि तिच्याही स्तनावर पडून दुसरी शयन करीत आहे, अशा रीतीनें एक-मेकांच्या मांड्यावर, बरगड्यावर, कमरेवर आणि पाठीवर मस्तक ठेवून पडलेल्या त्या स्त्रिया मद व रावणासंबंधीं प्रेम यांच्या अधीन झाल्या असून एक-मेकींच्या अंगावर पडल्या होत्या (५७-६१)

एकमेकींच्या अंगसंगामुळें आनंदित होणाऱ्या त्या सर्वही अत्यंत सुंदर स्त्रिया हातांनीं एकमेकांना आलिंगन देऊन तेथें शयन करीत होत्या. एकमेकांच्या हस्त-

अन्योन्यभुजसूत्रेण स्त्रीमालाग्रथिता हि सा ।
मालेव ग्रथिता सूत्रे शुशुभे मत्तषट्पदा ६३
लतानां माधवे मासि फुल्लानां वायुसेवनात् ।
अन्योन्यमालाग्रथितं संसक्तकुसुमोच्चयम् ६४
प्रतिवेष्टितसुस्कन्धमन्योन्यभ्रमराकुलम् ।
आसीद्वनमिवोद्धूतं स्त्रीवनं रावणस्य तत् ६५
उचितेष्वपि सुव्यक्तं न तासां योषितां तदा ।
विवेकः शक्यमाधातुं भूषणाङ्गाम्बरस्रजाम् ६६
रावणे सुखसंविष्टे ताः स्त्रियो विविधप्रभाः ।
ज्वलन्तः काञ्चना दीपाः प्रेक्षन्तोऽनिमिषा इव ६७
राजर्षिविप्रदैत्यानां गन्धर्वाणां च योषितः ।

हय दोऱ्यानी ग्रथित झालेली ती स्त्रियांची माला, सूत्रामध्ये ग्रथित केलेली पुष्प-माला मत्त भ्रमरांनी युक्त झाली असता जशी शोभते, तशी शोभूं लागली. रावणाच्या स्त्रियांचा तो समुदाय, वैशाखमासामध्ये वायूच्या लहरींमुळे प्रफुल्लित झालेल्या लतांच्या वनाप्रमाणे दिसत होता, कारण एकमेकींचा संबंध झाला असल्यामुळे माळी ज्याप्रमाणे माळा गुंफितो, त्याप्रमाणे त्या स्त्रियांची एक मालाच गुंफिल्या-सारखी दिसत होती, त्यांच्या अंगावरील भूषणसमुदाय हे त्या वनातील परस्पर संलग्न झालेल्या पुष्पराशींप्रमाणे दिसत होते, वक्षभाच्या स्कंधासारखी त्यांनी आपल्या भुजांनीं आलिंगन दिले असल्यामुळे वृक्षाला वेष्टन करून राहिलेल्या लतांप्रमाणे त्या शोभत होत्या आणि एकमेकींचे केशपाश वगैरे एकमेकींवर पडले असल्यामुळे त्या भ्रमरांनी भरून गेलेल्या लतांप्रमाणे भासत होत्या. ( ६२-६० )

त्या स्त्रियांनी भूषणें वगैरे जरी प्रथम योग्य ठिकाणीं चांगल्या रीतीनें व्यवस्थित घातलेली होती, तरी त्या निद्रावश झाल्यामुळे, भूषणें, अवयव आणि माला हिच्या कोणत्या आणि तिच्या कोणत्या, हें स्पष्टपणें ठरविणें अशक्य झालें होतें रावण सुखानें निजला असताना त्या दिवाणखान्यामध्ये जळत असलेले सुवर्ण-दीप, हे डोळ्यांचें पातें न लववितां त्या नाना प्रकारच्या अंगकांती असलेल्या स्त्रियांकडे पहात बसलेले शाही पुरुषच आहेत का काय, असें भासू लागले, राजर्षि,

रक्षसां चाभवन्कन्यास्तस्य कामवशंगताः ६८
युद्धकामेन ताः सर्वा रावणेन हृताः स्त्रियः ।
समदा मदनेनैव मोहिताः काश्चिदागताः ६९
न तत्र काश्चित्प्रमदाः प्रसह्य वीर्योपपन्नेन गुणेन लब्धाः ।
न चान्यकामापि न चान्यपूर्वा विना वरार्हां जनकात्मजां तु ७०
न चाकुलीना न च हीनरूपा नादक्षिणा नानुपचारयुक्ता ।
भार्याभवत्तस्य न हीनसत्त्वा न चापि कान्तस्य न कामनीया ७१
बभूव बुद्धिस्तु हरीश्वरस्य यदीदृशी राघवधर्मपत्नी ।
इमा महाराक्षसराजभार्याः सुजातमस्येति हि साधुबुद्धेः ७२

---

विप्र, दैत्य, गंधर्व आणि राक्षस यांच्या कन्या मदनाधीन होऊन त्या रावणाच्या भार्या झालेल्या होत्या. युद्धाची इच्छा धरणाऱ्या रावणाने त्यांपैकी पुष्कळ स्त्रिया युद्धामध्ये हरण करून आणलेल्या होत्या आणि कांही तरुण स्त्रिया मदनानेच मोहित झाल्यामुळे आपोआपच त्याच्याकडे आलेल्या होत्या. सारांश, रावण जरी सामर्थ्यवान् होता तरी त्यांतील तरुण स्त्रिया त्याने बलात्काराने आणलेल्या नसून, ऐश्वर्यादि गुण त्याचे अंगीं असल्यामुळे त्याला आपोआपच प्राप्त झालेल्या होत्या. प्रथमतः दुसऱ्याने पाणिग्रहण केलेली अशी एकही स्त्री त्यांमध्ये नव्हती श्रेष्ठ रामालाच योग्य अशा जनककन्या सीतेवाचून दुसऱ्या पुरुषाची इच्छा करणारीही स्त्री तेथे दुसरी कोणी नव्हती. सारांश, तेथे असलेल्या स्त्रिया रावणाचे ठिकाणींच आसक्त होत्या आणि फक्त एक जनककन्या सीतेचें मन मात्र बिलकुल त्याच्यावर नसून, रामाचेच ठिकाणीं आसक्त झालेलें होतें. ( ६६–७० )

त्या स्त्रियांमध्ये कुलीन नसलेली, कुरूप, दुःशील, उत्तम भूषणें-वस्त्रें वगैरे नसलेली, हलक्या मनाची आणि वल्लभाला अप्रिय अशी एकही स्त्री त्या रावणाची भार्या नव्हती. त्या स्त्रिया अवलोकन केल्यानंतर सद्बुद्धि वानराधिपति हनुमानाच्याही मनात असें आलें की, प्रथम “ प्रचंड राक्षसराज रावणाच्या या भार्या आहेत. तेव्हा यांच्याप्रमाणे जर राघवाची धर्मपत्नी झाली असेल, म्हणजे तिलाही जर यांच्याचप्रमाणे रावणाचा उपभोग घडला असेल, तर मात्र या रावणाचा कार्यभागच झाला म्हणावयाचा; कारण, रावणाने आपल्या पत्नींचा

पुनश्च सोऽचिन्तयदात्तरूपो ध्रुवं विशिष्टा गुणतो हि सीता ।
अथायमस्यां कृतवान्महात्मा लङ्केश्वरः कष्टमनार्यकर्म ७३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

दशमः सर्गः [५११]

तत्र दिव्योपमं मुख्यं स्फाटिकं रत्नभूषितम् ।
अवेक्षमाणो हनुमान् ददर्श शयनासनम् १
दान्तकाञ्चनचित्राङ्गैर्वैदूर्यैश्च वरासनैः ।
महार्हास्तरणोपेतैरुपपन्नं महाधनैः २
तस्य चैकतमे देशे दिव्यमालोपशोभितम् ।
ददर्श पाण्डुरं छत्रं ताराधिपतिसंनिभम् ३

उपभोग घेतला, असें रामाला कळल्यावर, तो ता मेला आहे, असं समजेल व सिच्याविषयी उदासीन राहील आणि तसें झालं असता अर्थातच रावणाचा वध त्याच्या हातून होणार नाही परंतु, लगेच ' लंकाधिपति महात्म्या रावणानें मायिक रूप धारण करून जरी सीतेचा अपहार करण्याचें निंद्य, अनार्य कर्म केलें आहे, तरी गुणानी सीता इतर स्त्रियांपेक्षा नि संशय अधिक आहे आणि म्हणूनच रावणाचा तिला उपभोग घडण्याचा संभव नाही, " असेंही त्यानं आपल्या मनामध्ये निश्चित ठरवलें ( ७१—७३ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदर काण्डापैकी नववा सर्ग समाप्त झाला ॥ ९ ॥

त्या दिवाणखान्यामध्ये हनुमान् इकडेतिकडे पहात होता, तों एक दिव्यस्थान तुल्य असा पलंग ठेवण्याचा उत्कृष्ट चबुतरा त्याच्या दृष्टीस पडला तो चबुतरा स्फटिकाचा असून रत्नांनी भूषित केलेला होता. त्या चबुत यावर स्त्रियांचे मोठेमोठे मूल्यवान पलंग ठेविलेले होते त्या पलंगाचे अवयव हस्तीदंता व सुवर्णाचे व चित्रयुक्त केलेले असून, वैडूर्यप्रभृति रत्नं जडलेला मोठामोठा मूल्यवान् आस्तरणेंही त्यांच्यावर घातलेली होतीं त्या चबुतऱ्यावर एका बाजूला दिव्य मालांनी सुशोभित आणि चंद्रासारखं आल्हादकारक श्वेतवर्ण छत्र हनुमानानें अवलोकन केलें ( १-३ )

जातरूपपरिक्षिप्तं चित्रभानोः समप्रभम् ।
अशोकमालाविततं ददर्श परमासनम् ३
वालव्यजनहस्ताभिर्वीज्यमानं समन्ततः ।
गन्धैश्च विविधैर्जुष्टं वरधूपेन धूपितम् ५
परमास्तरणास्तीर्णमाविकाजिनसंवृतम् ।
दामभिर्वरमाल्यानां समन्तादुपशोभितम् ६
तस्मिञ्जीमूतसंकाशं प्रदीप्तोज्ज्वलकुण्डलम् ।
लोहिताक्षं महाबाहुं महारजतवाससम् ७
लोहितेनानुलिप्ताङ्गं चन्दनेन सुगन्धिना ।
संध्यारक्तमिवाकाशे तोयदं सतडिद्गुणम् ८
वृतमाभरणैर्दिव्यैः सुरूपं कामरूपिणम् ।
सवृक्षवनगुल्माढ्यं प्रसुप्तमिव मन्दरम् . ९

---

नंतर त्याच चतुतऱ्यावर एके ठिकाणी एक उत्कृष्ट पलंग त्याच्या दृष्टीस पडला. तो सुवर्णानें मढविलेला होता. त्याची प्रभा अग्नीप्रमाणे होती आणि अशोकपुष्पाच्या मालानी तो युक्त होता. हातामध्ये चवऱ्या घेऊन स्त्रिया त्या पलंगासभोवती वारीत उभ्या राहिल्या होत्या; नाना प्रकारच्या सुगंधानी तो पलंग युक्त होता आणि उत्कृष्ट प्रकारच्या धूपानी तो सुगंधित केलेला होता. उत्कृष्ट आस्तरणें त्यावर पसरलेली होतीं; लोकरीची वस्त्रें आणि अजिनें हीही त्यावर होतीं आणि उत्कृष्ट पुष्पाच्या मालानी तो सर्व बाजूंनी सुशोभित केलेला होता. अशा त्या पलंगावर शयन करीत असलेला रावण त्यानें पाहिला. तो मेघासारखा दिसत होता, त्यानें देदीप्यमान् व उज्ज्वल कुंडलें धारण केलेलीं होतीं, त्याचे नेत्र आरक्तवर्ण होते; बाहु दीर्घ होते, जरीचा वस्त्रें त्यानें परिधान केलेलीं असल्यामुळे आणि आरक्तवर्ण सुगंधी चंदन त्याच्या अंगाला लावलेला असल्यामुळे विद्युल्लतेसह असलेल्या आकाशातील संध्याकाळच्या आरक्तवर्ण मेघाप्रमाणे तो दिसत होता, तो इच्छा असेल, तें रूप धारण करणारा व सौंदर्यसंपन्न असून, शरीर दिव्य भूषणानी व्याप्त असल्यामुळे, वृक्षसमुदाय आणि झुडपें यानी भरून गेलेला मंदरपर्वतच गाढ निद्रिस्थ झाला आहे की काय, असा दिसत होता.

क्रीडित्वोपरतं रात्रौ वराभरणभूषितम् ।
प्रियं राक्षसकन्यानां राक्षसानां सुखावहम् १०
पीत्वाप्युपरतं चापि ददर्श स महाकपिः ।
भास्वरे शयने वीरं प्रसुप्तं राक्षसाधिपम् ११
निःश्वसन्तं यथा नागं रावणं वानरोत्तमः ।
आसाद्य परमोद्विग्नः सोऽपासर्पत्सुभीतवत् १२
अथारोहणमासाद्य वेदिकान्तरमाश्रितः ।
क्षीबं राक्षसशार्दूलं प्रेक्षते स महाकपिः १३
शुशुभे राक्षसेन्द्रस्य स्वपतः शयनं शुभम् ।
गन्धहस्तिनि संविष्टे यथा प्रस्रवणं महत् १४
काञ्चनाङ्गदसंनद्धौ ददर्श स महात्मनः ।
विक्षिप्तौ राक्षसेन्द्रस्य भुजाविन्द्रध्वजोपमौ १५
ऐरावतविषाणाग्रैरापीडनकृतव्रणौ ।

उत्कृष्ट भूषणांनी तो भूषित झालेला असून, सुरतक्रीडा करून थांत झालेला होता, राक्षसकन्यांना तो प्रिय असून राक्षसांनाही सुखावह होता आणि मद्यपान करून व सुरतक्रीडा करून तो पडला होता. अशा स्थितींत महाकपि हनुमानानें त्याला पाहिलें, परंतु उज्ज्वल पलंगावर निजलेल्या आणि भुजंगाप्रमाणें निःश्वास टाकीत असलेल्या त्या वीर राक्षसाधिपति रावणासमीप गेल्यानंतर तो वानरश्रेष्ठ हनुमान् अत्यंत उद्विग्न झाला व अतिशय भयभीत झाल्याप्रमाणें तो एकदम दूर झाला. ( ४–१२ )

नंतर तो एका जिन्यावर चढला व तेथें एका मधल्या पायरीवर असून, तो महाकपि हनुमान् मस्त होऊन पडलेल्या राक्षसश्रेष्ठ रावणाकडे पाहूं लागला. मत्त गज नेहमीं ज्याच्या सांनिध्यात असतो, अशा प्रचंड जलप्रवाहाप्रमाणें तें राक्षसाधिपति रावणाचें शुभ शयनस्थान शोभत होतें. त्या महात्म्या राक्षसाधिपति रावणाचे पसरलेले हात इंद्रध्वजतुल्य असून त्यावर सुवर्णाचीं बाहुभूषणें असल्याचें हनुमानानें पाहिलें. त्या हातांवर युद्धामध्ये ऐरावत गजानें दंताग्रानें पाडलेल्या क्षताच्या खुणा दिसत होत्या. इंद्राच्या वज्रामुळें त्यांच्या पुष्ट स्कंधावर

वज्रोल्लिखितपीनांसौ विष्णुचक्रपरिक्षतौ १६
पीनौ समसुजातांसौ संगतौ बलसंयुतौ ।
सुलक्षणनखाङ्गुष्ठौ स्वङ्गुलीयकलक्षितौ १७
संहतौ परिघाकारौ वृत्तौ करिकरोपमौ ।
विक्षिप्तौ शयने शुभ्रे पञ्चशीर्षाविवोरगौ १८
शशक्षतजकल्पेन सुशीतेन सुगन्धिना ।
चन्दनेन परार्ध्येन स्वनुलिप्तौ स्वलंकृतौ १९
उत्तमस्त्रीविमृदितौ गन्धोत्तमनिषेवितौ ।
यक्षपन्नगगन्धर्वदेवदानवराविणौ २०
ददर्श स कपिस्तस्य बाहू शयनसंस्थितौ ।
मन्दरस्यान्तरे सुप्तौ महाही रुषिताविव २१
ताभ्यां स परिपूर्णाभ्यामुभाभ्यां राक्षसेश्वरः ।

ओरखडे उठलेले होते; विष्णूच्या सुदर्शन चक्रामुळे पडलेल्या क्षतांच्याही खुणा त्यांच्यावर होत्या. ते बाहु मुळचेच परिपुष्ट असून, त्यावरील स्कंध सारखे व उत्कृष्ट होते; त्या बाहूंमध्ये बल होतें व त्यांचे स्नायूही तसेच बळकट होते; त्यांची नखें व आगठे यावर सुलक्षणें होतीं, उत्कृष्ट उत्कृष्ट आंगठ्या त्याने हातात घातलेल्या होत्या. आच्छादित असलेल्या त्या बाहूंचा आकार अडसराप्रमाणे असून ते गजशुंडेप्रमाणे वर्तुलाकार होते, व म्हणून शुभ्र शय्येवर पसरलेले ते बाहू पंचमुखी नागाप्रमाणे दिसत होते. सशाच्या रक्ताप्रमाणे अत्यंत लाल, अतिशयच गार आणि फारच सुगंधी अशा महामूल्यवान् चंदनाची उटी त्यांना लाविलेली असून, त्यावर उत्तम प्रकारचे अलंकार घातलेले होते. उत्तमोत्तम स्त्रियांनी त्या बाहूंना आलिंगन दिलेलें होतें. उत्तमोत्तम सुगंध त्याना लाविलेले होते आणि यक्ष, पन्नग, गंधर्व देव व दानव यांच्यामध्ये ते भय उत्पन्न करणारे होते. ( १२-२० )

अशा प्रकारचे त्या रावणाच्या शय्येवर असलेले बाहु मंदरपर्वताच्या गुहेमध्ये अंगाला उटी लावून निद्रिस्थ झालेल्या महासर्पाप्रमाणे त्या कपीने अवलोकन केले. त्या सर्व गुणानी परिपूर्ण असलेल्या दोन्ही बाहूंमुळे तो पर्वततुल्य

शुशुभेऽचलसंकाशः शृङ्गाभ्यामिव मन्दरः २२
चूतपुंनागसुरभिर्बकुलोत्तमसंयुतः ।
मृष्टान्नरससंयुक्तः पानगन्धपुरःसरः २३
तस्य राक्षसराजस्य निश्चक्राम महामुखात् ।
शयानस्य विनिःश्वासः पूरयन्निव तद्गृहम् २४
मुक्तामणिविचित्रेण काञ्चनेन विराजता ।
मुकुटेनापवृत्तेन कुण्डलोज्ज्वलिताननम् २५
रक्तचन्दनदिग्धेन तथा हारेण शोभिना ।
पीनायतविशालेन वक्षसाभिविराजता २६
पाण्डुरेणापविद्धेन क्षौमेण क्षतजेक्षणम् ।
महार्हेण सुसंवीतं पीतेनोत्तरवाससा २७
माषराशिप्रतीकाशं निःश्वसन्तं भुजङ्गवत् ।
गाङ्गे महति तोयान्ते प्रसुप्तमिव कुञ्जरम् २८

निष्पाप राक्षसाधिपति रावण शिखरामुळे मंदरपर्वत ज्याप्रमाणे शोभतो, तद्वत् शोभूं लागला. आम्रगंधाप्रमाणे आणि उडीदाच्या वासाप्रमाणे त्याच्या शरिराला सुवास येत होता, उत्कृष्ट बकुलपुष्पाप्रमाणे त्याचा श्वास सुगंधित होता आणि षड्रसांनी युक्त असलेल्या उत्तम अन्नाचा व मद्याचा गंध त्याचे ठिकाणी येत होता (२१—२३)

त्या झोप घेत असलेल्या राक्षसाधिपति रावणाच्या प्रचंड मुखातून निघालेला घोरण्याच्या निःश्वास जणु काही तें अंतःपुर भरूनच टाकीत होता. अनेक प्रकारचीं मोतीं व रत्नें अडकल्याने चित्रविचित्र बनलेला व रावणास गाढ झोप लागली असल्यामुळे अस्ताव्यस्त पडलेला, त्याचा तो सुवर्णाचा मुकुट तेथे चमकत होता. पुष्ट, रुंद आणि विशाल अशा त्याच्या वक्ष स्थलास रक्तचंदन चोपडलेलें असून, ते उत्कृष्ट हाराने चांगलें शोभत होतें. आरक्तवर्ण नेत्रांनीं शोभत असलेल्या त्या रावणाने नेसलेलें शुभ्र वस्त्र अस्ताव्यस्त झालेलें होतें आणि अत्यंत मोलाच्या पालवर्ण उत्तरीय वस्त्राने त्याचे शरीर गुरफटून गेलेलें होतें. उडदाच्या राशीप्रमाणे असलेला आणि भुजंगासारखा फुस्फुस् आवाज करीत शय्येवर पडलेला तो रावण

चतुर्भिः काञ्चनैर्दीपैर्दीप्यमानं चतुर्दिशम् ।
प्रकाशीकृतसर्वाङ्गं मेघं विद्युद्गणैरिव २९
पादमूलगताश्चापि ददर्श सुमहात्मनः ।
पत्नीः स प्रियभार्यस्य तस्य रक्षःपतेर्गृहे ३०
शशिप्रकाशवदना वरकुण्डलभूषणाः ।
अम्लानमाल्याभरणा ददर्श हरियूथपः ३१
नृत्यवादित्रकुशला राक्षसेन्द्रभुजाङ्कगाः ।
वराभरणधारिण्यो निषण्णा ददर्श कपिः ३२
वज्रवैडूर्यगर्भाणि श्रवणान्तेषु योषिताम् ।
ददर्श तापनीयानि कुण्डलान्यङ्गदानि च ३३
तासां चन्द्रोपमैर्वक्त्रैः शुभैर्ललितकुण्डलैः ।
विराजते विमानं तन्नभस्तारागणैरिव ३४

गंगेच्या अगाध उदकांत झोपलेल्या गजाप्रमाणे शोभत होता. ( २४–२८ )

चारी दिशेस ठेविलेल्या चार सुवर्णदीपांचा प्रकाश त्याच्यावर पडत असल्या-मुळें तो रावण विद्युल्लतांच्या समुदायांनी सर्व भाग प्रकाशित झालेल्या मेघाप्रमाणे दिसत होता. आपल्या भार्या ज्याला प्रिय आहेत आणि ज्याचें शरीर फारच धिप्पाड आहे, अशा त्या रावणाच्या पायाशी त्याच्या भार्या होत्या, त्या हनुमानाने पाहिल्या. त्याचप्रमाणे त्या राक्षसाधिपतीच्या प्रासादांत चंद्राप्रमाणे तेजस्वी मुखाच्या, श्रेष्ठ कुंडलें व भूषणें धारण केलेल्या व कधींही न कोमेजणारीं पुष्प-भूषणें घातलेल्या देवकन्या त्या वानरसेनाधिपति हनुमानास दिसल्या. नृत्य आणि वाद्यें यामध्ये निपुण आणि उत्कृष्ट अलंकार घातलेल्या रावणाच्या प्रिय स्त्रिया रावणाच्या हातांवर आणि मांड्यावर शयन करीत पडलेल्या हनुमानें अवलोकन केल्या. ( २९—३२ )

हिरे आणि वैडूर्यमणि ज्यांत बसविलेले आहेत, अशीं स्त्रियांचीं सुवर्णकुंडलें आणि रावणाच्या हातांतील बाहुभूषणें हीं दोन्हीं स्त्रियांच्या कानापाशीच आहेत, असें हनुमानाने पाहिलें. त्यांच्या चंद्रतुल्य मुखांनी आणि अद्भुत शुभ कुंडलांनी तें मंचक तारागणांनी शोभिवंत दिसणाऱ्या आकाशाप्रमाणे चमकत होता. रावणाच्या

मद्व्यायामखिन्नास्ता राक्षसेन्द्रस्य योषितः ।
तेषु तेष्ववकाशेषु प्रसुप्तास्तनुमध्यमाः ३५
अङ्गहारैस्तथैवान्या कोमलैर्नृत्यशालिनी ।
विन्यस्तशुभसर्वाङ्गी प्रसुप्ता वरवर्णिनी ३६
काचिद्वीणां परिष्वज्य प्रसुप्ता संप्रकाशते ।
महानदीप्रकीर्णेव नलिनी पोतमाश्रिता ३७
अन्या कक्षगतेनैव मड्डुकेनासितेक्षणा ।
प्रसुप्ता भामिनी भाति बालपुत्रेव वत्सला ३८
पटहं चारुसर्वाङ्गी न्यस्य शेते शुभस्तनी ।
चिरस्य रमणं लब्ध्वा परिष्वज्येव कामिनी ३९
काचिद्वीणां परिष्वज्य सुप्ता कमललोचना ।
वरं प्रियतमं गृह्य सकामेव हि कामिनी ४०
विपञ्चीं परिगृह्यान्या नियता नृत्यशालिनी ।

कृशोदरी स्त्रिया सुरतक्रीडादि व्यायामानुळे श्रमून जाऊन ठिकठिकाणीं निद्रिस्थ पडल्या होत्या. ब्रह्मदेवाने जिचे सर्व अवयव उत्कृष्ट रीतीने रचलेले होते, अशी एक नृत्य करण्यांत कुशल, असलेली उत्कृष्ट स्त्री मनोहर नृत्याचे हावभाव करतां करताच झोपी गेलेली होती, दर दुसरी हातामध्ये वीणा घेऊन तशीच झोपी गेलेली, एक स्त्री महानदीमध्ये जिचीं पुष्पें व पानें अस्ताव्यस्त पडलीं आहेत, अशी कमलिनीच तेथे नावेचा आधार घेऊन राहिली आहे कीं काय, अशी दिसत होती. काखेमध्ये मड्डुकवाद्य जसेंच्या तसेंच असून झोपी गेलेली दुसरी एक कृष्णनयना स्त्री ही आपलें लहान मूल कुशीत घेऊन निजलेल्या पुत्रवत्सल स्त्रीप्रमाणे भासत होती. ( ३६—३८ )

जिचे सर्व अवयव मनोहर असून, स्तन उत्कृष्ट आहेत, अशी एक स्त्री, पुष्कळ दिवसांनी गाठ पडल्यामुळे प्रियकराला गाढ आलिंगन देऊन शयन करणाऱ्या कामिनीप्रमाणे डमऱ्यालाच कवटाळून शयन करीत होती. विषयोपभोगाची तीव्र इच्छा झालेली कामिनी स्त्री ज्याप्रमाणे आपल्या अत्यंत प्रिय वल्लभाला कवटाळून झोपी जाते, त्याप्रमाणे कोणी एक कमललोचना स्त्री वीणा कवटाळूनच झोपी

निद्रावशमनुप्राप्ता सहकान्तेव भामिनी ४१
अन्या कनकसंकाशैर्मृदुपीनैर्मनोरमैः ।
मृदङ्गं परिविद्ध्याङ्गैः प्रसुप्ता मत्तलोचना ४२
भुजपाशान्तरस्थेन कक्षगेन कृशोदरी ।
पणवेन सहानिन्द्या सुप्ता मदकृतश्रमा ४३
डिण्डिमं परिगृह्यान्या तथैवासक्तडिण्डिमा ।
प्रसुप्ता तरुणं वत्समुपगुह्येव भामिनी ४४
काचिदाडम्बरं नारी भुजसंभोगपीडितम् ।
कृत्वा कमलपत्राक्षी प्रसुप्ता मदमोहिता ४५
कलशीमपविद्ध्यान्या प्रसुप्ता भाति भामिनी ।
वसन्ते पुष्पशबला मालेव परिमार्जिता ४६
पाणिभ्यां च कुचौ काचित्सुवर्णकलशोपमौ ।

---

गेली होती. एखादी स्त्री आपल्या वल्लभासह ज्या रीतीने शयन करीत पडलेली असते, त्याप्रमाणे दुसरी एक नृत्यामध्ये निष्णात असलेली व वर्तनाने शुद्ध असलेली स्त्री आपल्या शेजारीं सतार घेऊन शयन करात होती. सुवर्णाप्रमाणे उज्ज्वल, मृदु आणि पुष्ट अशा अवयवांची व मदामुळे डोळे धुंद झालेले आहेत अशी दुसरी एक स्त्री मृदंगाला पोटाशी कवटाळून निद्रा घेत होती. जिच्या स्वरूपाला नाव ठेवण्यास कोठेही जागा नाही व जिचें उदर कृश आहे, अशी एक मदनमत्त झालेली स्त्री काखेमध्ये असलेलें पणव वाद्य दोन्ही हातांनी कवटाळून धरून झोप घेत होती. पाठीशी एक डिंडिम वाद्य बांधून व दुसरें एक डिंडिम वाद्य पुढे कवटाळून धरून जी एक स्त्री शयन करीत होती, ती पाठीशी तरुण पतीला घेऊन व पुढे लहान मूल घेऊन निद्रा घेतें असलेल्या स्त्रीप्रमाणे दिसत होती. ( ३९—४४ )

कमलपत्राप्रमाणे जिचे नेत्र विशाल आहेत अशी एक मदमोहित झालेली स्त्री आडंबर वाद्याला बाहूंनी घट्ट आलिंगन देऊन निजलेली होती. दुसरी एक स्त्री जलपात्र झोपेमध्ये अंगावर सांडले गेलें, तरी तशीच तेथे शयन करीत पडली होती, ती वसंतऋतूमध्ये टवटवी येण्याकरिता पाणी शिंपडून ठेवलेल्या चित्रविचित्र

उपगुह्यापरा सुप्ता निद्राबलमुपागता ४७
अन्या कमलपत्राक्षी पूर्णेन्दुसदृशानना ।
अन्यामालिङ्ग्य सुश्रोणी निद्रावशमुपागता ४८
आतोद्यानि विचित्राणि परिष्वज्य वरस्त्रियः ।
निपीड्य च कुचैः सुप्ताः कामिन्यः कामुकानिव ४९
तासामेकान्तविन्यस्ते शयानां शयने शुभे ।
ददर्श रूपसंपन्नामथ तां स कपिः स्त्रियम् ५०
मुक्तामणिसमायुक्तैर्भूषणैः सुविभूषिताम् ।
विभूषयन्तीमिव च स्वश्रिया भवनोत्तमम् ५१
गौरीं कनकवर्णाभामिष्टामन्तःपुरेश्वरीम् ।
कपिर्मन्दोदरीं तत्र शयानां चारुरूपिणीम् ५२
स तां दृष्ट्वा महाबाहुर्भूषितां मारुतात्मजः ।
तर्कयामास सीतेति रूपयौवनसंपदा ।

पुष्पाच्या मालेप्रमाणे दिसत होती. निद्रेच्या आहारी गेलेली दुसरी एक स्त्री सुवर्णकलशासारखे असणारे आपले स्तन आपल्याच हातानी घट्ट धरून शयन करीत होती. पूर्ण चंद्राप्रमाणे आल्हादकारक मुख व कमलपत्राप्रमाणे विशाल नेत्र यानी युक्त असलेली, निद्रेने घेरलेली व एक स्त्री शेजारी निजलेल्या दुसऱ्याच एका स्त्रीला कवटाळून झोपली होती. आपल्या स्तनानी आपल्या कामुक पतींना दृढ आलिंगन देऊन, कामुक स्त्रिया ज्याप्रमाणे निद्रा घेत असतात, त्याप्रमाणे नाना प्रकारची वाद्यें कवटाळून धरून उत्कृष्ट उत्कृष्ट स्त्रिया तेथे निद्रा घेत होत्या. (४५-४९)

नंतर या शय्यापासून बाजूस दुसरीकडे पसरलेल्या एका शुभ शय्येवर शयन करीत असलेली एक रूपवती व मुग्ध स्त्री त्या हनुमानाने पाहिली. मोत्यें आणि रत्नें यांच्या भूषणानी उत्कृष्ट रीतीने अलंकृत झालेली व आपल्या अंगकांतीने त्या उत्कृष्ट गृहाला शोभा आणीत असलेली, सुवर्णाप्रमाणे उज्ज्वल, गौरवर्ण, पतीला प्रिय, अन्तःपुराची मालकीण, रूपाने सुंदर व अलंकारानी भूषित होऊन झोपी गेलेली ती मंदोदरी अवलोकन करताक्षणीं तिचें रूप व यौवन या-

हर्षेण महता युक्तो ननन्द हरियूथपः ५३
आस्फोटयामास चुचुम्ब पुच्छं ननन्द चिक्रीड जगौ जगाम ।
स्तम्भानरोहन्निपपात भूमौ निदर्शयन्स्वां प्रकृतिं कपीनाम् ५४

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे दशमः सर्गः ॥१०॥

एकादशः सर्गः ।    [ ५:५ ]

अवधूय च तां बुद्धिं बभूवावस्थितस्तदा ।
जगाम चापरां चिन्तां सीतां प्रति महाकपिः १
न रामेण वियुक्ता सा स्वप्तुमर्हति भामिनी ।
न भोक्तुं नाप्यलंकर्तुं न पानमुपसेवितुम् २
नान्यं नरमुपस्थातुं सुराणामपि चेश्वरम् ।
नहि रामसमः कश्चिद्विद्यते त्रिदशेष्वपि ३

---

वरून त्या महापराक्रमी वायुपुत्र हनुमानानें "ही सीता असावी," असा तर्क केला आणि त्यामुळें त्या वानरसेनाधिपति हनुमानाला मोठा हर्ष होऊन तो मनामध्ये प्रसन्नही झाला. सारांश, वानराच्या जातीस योग्य अशा आपल्या जातिस्वभावास अनुसरून तो हनुमान् आपलें पुच्छ आपटूं लागला, त्याचें चुंबन घेऊं लागला, मनामध्ये आनंदित होऊन नाचूं लागला, गाऊं लागला, इकडेतिकडे धावाधाव करूं लागला आणि खांबावर चढून फिरून जमिनीवर उड्याही मारूं लागला (५०-५४)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं दहावा सर्ग समाप्त झाला ॥ १० ॥

यानंतर तो महाकपि हनुमान् तो विचार सोडून देऊन, स्वस्थ राहिला आणि सीतेसंबंधानें त्याचे मनास ये दुसरीच एक शंका आली. " रामाचा वियोग झाला असल्यामुळें त्या सीतेस गाढ झोंप लागणें शक्य नाहीं व भोग्य वस्तूंचा उपभोग घेणें, अलंकार धारण करणें आणि मद्यपानाचें सेवन करणें, याही गोष्टी तिच्या हातून घडणें शक्य नाहींत शिवाय, देवाधिपति जरी असला तरी रामावांचून दुसऱ्या पुरुषाचें अवलंबन तिच्या हातून कधींही होणार नाहीं, कारण, देवांमध्येंही रामाची बरोबरी करणारा कोणी नाहीं " ( १-३ )

अन्येयमिति निश्चित्य भूयस्तत्र चचार सः ।
पानभूमौ हरिश्रेष्ठः सीतासंदर्शनोत्सुकः ४
क्रीडितेनापराः क्लान्ता गीतेन च तथापराः
नृत्येन चापराः क्लान्ताः पानविप्रहतास्तथा ५
मुरजेषु मृदङ्गेषु चेलिकासु च संस्थिताः ।
तथास्तरणमुख्येषु संविष्टाश्चापराः स्त्रियः ६
अङ्गनानां सहस्रेण भूषितेन विभूषणैः ।
रूपसंलापशीलेन युक्तगीतार्थभाषिणा ७
देशकालाभियुक्तेन युक्तवाक्याभिधायिना ।
रताधिकेन संयुक्तां ददर्श हरियूथपः ८
अन्यत्रापि वरस्त्रीणां रूपसंलापशायिनाम् ।
सहस्रं युवतीनां तु प्रसुप्तं स ददर्श ह ९

असा विचार मनात आणून, "ही कोणीतरी दुसरीच स्त्री असावी," असें त्याने निश्चित ठरवलें आणि सीतेच्या दर्शनाकरिता आतुर झालेला तो वानरश्रेष्ठ हनुमान् पुनरपि त्या पानभूमीवर इकडेतिकडे संचार करूं लागला. तेव्हा काहीं स्त्रिया सोंगट्यावगैरे खेळून, काही गाऊन आणि काही नृत्य करून श्रमल्यामुळे आणि काही मद्यपानाच्या धुंदीमुळे निद्रिस्थ झालेल्या आहेत, असें त्याने पाहिलें आणि त्याचप्रमाणे मृदंग, मुरज व चेलिका ही वाद्यें वाजवीत वाजवीत बसल्या असतानाच झोंपी गेलेल्या स्त्रिया आणि तशाच दुसऱ्याही काही मोठ्या मोठ्या गालिचावर निद्रिस्थ झालेल्या स्त्रिया त्याने अवलोकन केल्या (४-६)

सारांश, झोंपेमध्येंहि एकमेकींच्या सौंदर्यासंबंधाने बोलत असून, योग्य रीतीने गायनाचा अर्थ बोलून दाखविणाऱ्या, स्थल व काल यांना अनुरूप असें योग्य भाषण करणाऱ्या, उत्कृष्ट रीतीने सुरतक्रीडा करणाऱ्या आणि अलंकारांनी भूषित झालेल्या हजार स्त्रिया त्या पानभूमीवर असऱ्याचें त्या वानरसेनाधिपति हनुमानाला दिसून आलें आणि त्याचप्रमाणे एकमेकांच्या सौंदर्याविषयी झोंपेमध्ये वादविवाद करणाऱ्या अशा दुसऱ्याही एक हजार श्रेष्ठ तरुण स्त्रिया झोंप घेत पड--

देशकालाभियुक्तं तु युक्तवाक्याभिधायि तत् ।
रताविरतसंसुप्तं ददर्श हरियूथपः १०
तासां मध्ये महाबाहुः शुशुभे राक्षसेश्वरः ।
गोष्ठे महति मुख्यानां गवां मध्ये यथा वृषः ११
स राक्षसेन्द्रः शुशुभे ताभिः परिवृतः स्वयम् ।
करेणुभिर्यथारण्ये परिकीर्णो महाद्विपः १२
सर्वकामैरुपेतां च पानभूमिं महात्मनः ।
ददर्श कपिशार्दूलस्तस्य रक्षःपतेर्गृहे १३
मृगाणां महिषाणां च वराहाणां च भागशः ।
तत्र न्यस्तानि मांसानि पानभूमौ ददर्श सः १४
रौक्मेषु च विशालेषु भाजनेष्वप्यभक्षितान् ।
ददर्श कपिशार्दूलो मयूरान्कुक्कुटांस्तथा १५
वराहवार्ध्राणसकान्दधिसौवर्चलायुतान् ।
शल्यान्मृगमयूरांश्च हनुमानन्ववैक्षत १६

---

केल्या त्याने दुसरीकडे अवलोकन केल्या. या ज्या स्त्रिया वानरसेनाधिपति हनुमानाने पाहिल्या, त्या स्थल व समय यांना उचित असें योग्य भाषण करणाऱ्या व सुरतक्रीडेनंतर गाढ झोप लागलेल्या आहेत, अशा त्याने अवलोकन केल्या. मोठ्या गोठ्यांत मोठमोठ्या गाईंच्या मध्यभागी शोभणाऱ्या बैलाप्रमाणे महापराक्रमी राक्षसाधिपति रावण त्या स्त्रियांमध्ये शोभत होता. सारांश हत्तिणींनी सभोंवार वेढून टाकलेला महागज ज्याप्रमाणे अरण्यामध्ये शोभतो, त्याप्रमाणे तो राक्षसाधिपति रावण स्वतः त्या स्त्रियांनी सभोंवार घेरलेला रावण शोभूं लागला. ( ७—१२ )

त्या राक्षसाधिपति महात्म्या रावणाच्या गृहामध्ये त्या वानरश्रेष्ठ हनुमानाने पाहिलेली पानभूमि सर्व भोग्य पदार्थांनी युक्त होती. मृग, महिष आणि वराह यांचीं मांसें त्या पानभूमीमध्ये वेगळीं वेगळीं ठेविलेलीं त्याला दिसलीं, त्याचप्रमाणे मोठमोठ्या सुवर्णपात्रामध्ये कोणीही न उष्टावितां ठेविलेले मयूर व कुक्कुट त्या वानरश्रेष्ठ हनुमानाने अवलोकन केले व तसेच सचळमार व दही

कृकलान्विविधांश्छागाञ्छशकानर्धभक्षितान् ।
महिषानेकशल्यांश्च च्छेदांश्च कृतनिष्ठितान् १७
लेह्यानुच्चावचान्पेयान्भोज्यान्युच्चावचानि च १८
तथाम्ललवणोत्तंसैर्विविधै रागखाण्डवैः ।
महानूपुरकेयूरैरपविद्धैर्महाधनैः
पानभाजनविक्षिप्तैः फलैश्च विविधैरपि । १९
कृतपुष्पोपहारा भूरधिकां पुष्यति श्रियम् २०

घालून तयार केलेले वराह, वाध्रीणस× शल्य, मृग आणि मयूर यांचें मांस हनुमानाने तेथे पाहिलें सरट, नाना प्रकारचे बोकड, अर्धवट खाल्लेले ससे, महिष आणि शिजवून तयार केलेले एकशल्य व छेद या नावाचे मांसे, आणि बरेवाईट लेह्य, पेय व भोज्य पदार्थ त्याने तेथे अवलोकन केले ( १३-१८ )

जिव्हाजाड्य नाहींसे करणारा लवणरस व आम्लरस ज्यामध्ये आहेत, असे नाना प्रकारचे ॐरागखाडव, अस्ताव्यस्त पडलेल्या भारी किंमतीच्या मोठ्या मोठ्या तोरड्या व बाहुभूषणें आणि पानपात्रांतून पडलेलीं नाना प्रकारचीं फुलें यांच्या योगाने त्या पुष्पाची आरास केलेल्या भूमीला अधिकच शोभा आलेली होती

---

× कृष्णग्रीवो रक्तशिराः श्वेतपक्षो विहङ्गमः ।
स वै वाध्रीणसः प्रोक्तः ॥ ( विष्णुधर्म )
त्रिःपिबं त्विन्द्रियक्षीणं श्वेतं वृद्धप्रजापतिम् ।
वार्ध्रीणसं च त प्राहुर्याज्ञिकाः श्राद्धकर्मणि ॥

त्रि पिब म्हणजे मुख व दोन्ही कान पाणी पितांना ज्याचे पाण्याला लागतात तो

ॐ सितामध्वादिमधुरो द्राक्षादाडिमजो रसः ।
विरलश्चेत्कृतो रागः सान्द्रश्चेत्खाण्डव स्मृतः ॥

खडीसाखर, मध वगैरे पदार्थ घालून मधुर केलेला द्राक्षे व डाळिंबें यांचा रस पातळ असल्यास त्याला राग असे म्हणतात आणि घट्ट असल्यास त्याला खाडव असे म्हणतात.

तत्र तत्र च विन्यस्तैः सुश्लिष्टशयनासनैः ।
पानभूमिर्विना वह्निं प्रदीप्तेवोपलक्ष्यते २१
बहुप्रकारैर्विविधैर्वरसंस्कारसंस्कृतैः ।
मांसैः कुशलसंयुक्तैः पानभूमिगतैः पृथक् २२
दिव्याः प्रसन्ना विविधाः सुराः कृतसुरा अपि ।
शर्करासवमाध्वीकाः पुष्पासवफलासवाः २३
वासचूर्णैश्च विविधैर्मृष्टास्तैस्तैः पृथक्पृथक् ।
संतता शुशुभे भूमिर्माल्यैश्च बहुसंस्थितैः २४
हिरण्मयैश्च कलशैर्भाजनैः स्फाटिकैरपि ।
जाम्बूनदमयैश्चान्यैः करकैरभिसंवृता २५
राजतेषु च कुम्भेषु जाम्बूनदमयेषु च ।
पानश्रेष्ठां तथा भूमिं कपिस्तत्र ददर्श ह २६
सोऽपश्यच्छातकुम्भानि सीधोर्मणिमयानि च ।
तानि तानि च पूर्णानि भाजनानि महाकपिः २७

---

उत्तम प्रकारें तयार केलेल्या शय्या व आसनें ठिकठिकाणीं ठेवलेली असल्यामुळे ती पानभूमि अग्नीवाचूनच प्रदीप्त झाल्याप्रमाणें दिसत होती. नाना प्रकारचे पदार्थ ज्यात मिश्र केलेले आहेत आणि उत्तम प्रकारचे मसाले घालून जे तयार केलेले आहेत, अशीं निष्णात आचाऱ्यांनी शिजविलेलीं मांसें त्या पानभूमीमध्ये वेगळा वेगळा ठेवलेलीं होतीं. नाना प्रकारच्या दिव्य व स्वच्छ सुरा, तयार केलेल्या सुरा आणि साखरेपासून, मधापासून, पुष्पापासून व फलापासून तयार केलेलीं आसवें त्या ठिकाणीं ठेविलेलीं होतीं (१९–२३)

नाना प्रकारचीं द्रव्यें घालून तयार केलेले व वेगवेगळे ठेवलेले अनेक प्रकारचे स्वच्छ अंगनें आणि नाना प्रकारच्या आकृतींनी युक्त असलेलीं पुष्पें यांच्या योगानें ती भूमि व्याप्त झाल्यामुळे शोभत होती. सुवर्णकलश, स्फटिकपात्रें आणि दुसरेही सुवर्णाचे कमण्डलु हीं त्या पानभूमीवर सर्वत्र ठेवलेलीं होतीं. सोन्याच्या व रुप्याच्या कुंभांतून प्रतिबिंबित झालेली आणि पेयद्रव्यांच्या योगानें उत्कृष्ट झालेली ती भूमि हनुमान् वानरानें अवलोकन केली. नाना प्रकारच्या आकाराचीं सोन्याचे,

क्वचिदर्धावशेषाणि क्वचित्पीतान्यशेषतः ।
क्वचिन्नैव प्रपीतानि पानानि स ददर्श ह २८
क्वचिद्भक्ष्यांश्च विविधान्क्वचित्पानं विभागतः ।
क्वचिदर्धावशेषाणि पश्यन्वै विचचार ह २९
शयनान्यत्र नारीणां शून्यानि बहुधा पुनः ।
परस्परं समाश्लिष्य काश्चित्सुप्ता वराङ्गनाः ३०
काचिच्च वस्त्रमन्यस्य अपहृत्योपगुह्य च ।
उपगम्याबला सुप्ता निद्राबलपराजिता ३१
तासामुच्छ्वासवातेन वस्त्रं माल्यं च गात्रजम् ।
नात्यर्थं स्पन्दते चित्रं प्राप्य मन्दमिवानिलम् ३२
चन्दनस्य च शीतस्य सीधोर्मधुरसस्य च ।
विविधस्य च माल्यस्य पुष्पस्य विविधस्य च ॥ ३३
बहुधा मारुतस्तस्य गन्धं विविधमुद्वहन् ।
स्नानानां चन्दनानां च धूपानां चैव मूर्छितः ।

व हिऱ्याची मधपात्रें मधानें भरलेली असल्याचें, त्या महाकपि हनुमानानें तेथें पाहिलें. काही ठिकाणीं अर्धवट पिऊन ठेवलेली, काही ठिकाणीं सर्व पिऊन टाकलेली आणि काही ठिकाणीं मुळींच न पिता तशींच राहिलेलीं मधपात्रें त्यानें अवलोकन केलीं. आणि त्याचप्रमाणे काही ठिकाणीं नाना प्रकारचे खाण्याचे पदार्थ, काही ठिकाणीं वेगळी वेगळी ठेवलेली पेय द्रव्यें व काही ठिकाणी अर्धवट पिऊन टाकलेलीं पेयें पहात पहात तो संचार करूं लागला ( २४-२९ )

याठिकाणीं स्त्रियांच्या पुष्कळ शय्या मोकळ्याच पडलेल्या होत्या. काही श्रेष्ठ श्रेष्ठ स्त्रिया एकमेकींला कवटाळून निजल्या होत्या. निद्रेनें घेरून टाकल्यामुळें कोणी एक स्त्री दुसरीचेंच वस्त्र हिसकावून घेऊन व तें पांघरून तिच्या अंगावर जाऊन निजलेली होती. वाऱ्याची मंदमंद झुळुक लागत आहे की काय, अशा रीतानें त्या स्त्रियांच्या शरीरावरील वस्त्रें व चित्रविचित्र पुष्पें त्यांच्या स्वतःच्या श्वासोच्छ्वासानेंच किंचित् हलत होतीं. शीत चंदन, मद्य, मध, नाना प्रकारच्या माळा आणि नाना प्रकारचीं पुष्पें यांचा अनेक प्रकारचा सुवास ठिकठिकाणीं अनेक मार्गांनीं

प्रववौ सुरभिर्गन्धो विमाने पुष्पके तदा ३४
श्यामावदातास्तत्रान्याः काश्चित्कृष्णा वराङ्गनाः।
काश्चित्काञ्चनवर्णाङ्ग्यः प्रमदा राक्षसालये ३५
तासां निद्रावशत्वाच्च मदनेन विमूर्छितम्।
पद्मिनीनां प्रसुप्तानां रूपमासीद्यथैव हि ३६
एवं सर्वमशेषेण रावणान्तःपुरं कपिः।
ददर्श स महातेजा न ददर्श च जानकीम् ३७
निरीक्षमाणश्च ततस्ताः स्त्रियः स महाकपिः।
जगाम महतीं शङ्कां धर्मसाध्वसशङ्कितः ३८
परदारावरोधस्य प्रसुप्तस्य निरीक्षणम्।
इदं खलु ममात्यर्थं धर्मलोपं करिष्यति ३९
न हि मे परदाराणां दृष्टिर्विषयवर्तिनी।
अयं चात्र मया दृष्टः परदारपरिग्रहः ४०

नेऊन पोचविणारा वायु तेथे वहात होता आणि यामुळे पुष्पक विमानामध्ये वासाला योग्य अशा चंदनाचा व धूपाचा सुगंध व्याप्त होऊन राहिलेला होता (३०—३४)

त्या राक्षसांच्या निवासस्थानामध्ये काही स्त्रिया श्यामवर्ण होत्या, काही गौरवर्ण होत्या, काही उत्कृष्ट स्त्रिया कृष्णवर्ण होत्या आणि काही तरुण स्त्रियांची कांति सुवर्णाप्रमाणे होती मदनाधीन झालेल्या त्या स्त्रियांचें रूप त्या पूर्ण निद्रावश असल्यामुळे गाढ निद्रा लागलेल्या कमलिनींचें रूप जसें दिसत, तसें दिसू लागलें. (३५—३६)

या प्रकार रावणाचे अन्तःपुर त्या महातेजस्वी हनुमान् कपीने अगदी पूर्णपणें सर्व अवलोकन केलें, परंतु, जनककन्या सीता तेथे त्याच्या कोठेच दृष्टीस पडली नाही याप्रमाणे तो महाकपि हनुमान् त्या स्त्रियांकडे पाहू लागला असता धर्मविषयी भयभीत होऊन त्याला मोठीच शंका आली व तो मनामध्ये म्हणाला, धर्माने वागणाऱ्या व कुलीन अशा परस्त्रिया निद्रिस्त असलेल्या मी पाहिल्या त्यांना पाहण्याने खरोखर माझा अतिशय धर्मलोप होईल तसेंच आज

तस्य प्रादुरभूच्चिन्ता पुनरन्या मनस्विनः ।
निश्चितैकान्तचित्तस्य कार्यनिश्चयदर्शिनी ४१
कामं दृष्टा मया सर्वा विश्वस्ता रावणस्त्रियः ।
न तु मे मनसा किंचिद्वैकृत्यमुपपद्यते ४२
मनो हि हेतुः सर्वेषामिन्द्रियाणां प्रवर्तने ।
शुभाशुभास्ववस्थासु तच्च मे सुव्यवस्थितम् ४३
नान्यत्र हि मया शक्या वैदेही परिमार्गितुम् ।
स्त्रियो हि स्त्रीषु दृश्यन्ते सदा संपरिमार्गणे ४४
यस्य सत्त्वस्य या योनिस्तस्यां तत्परिमार्गते ।
न शक्यं प्रमदा नष्टा मृगीषु परिमार्गितुम् ४५
तदिदं मार्गितं तावच्छुद्धेन मनसा मया ।
रावणान्तःपुरं सर्वं दृश्यते न च जानकी ४६

---

माझ्या दृष्टीस दुसऱ्या परस्त्रियाच पडल्या आहेत, असेंहि नसून परस्त्रियांचा स्वीकार करणारा हा अति पापी रावणही येथे माझ्या दृष्टीस पडला आहे " असा विचार त्याचे मनामध्ये येत आहे, तों संदेहरहित सिद्धांत समजण्याकडे ज्याच्या चित्ताची प्रवृत्ति आहे, अशा त्या हनुमानाच्या मनामध्ये पुनः दुसराच एक विचार आला आणि अशा सारासार विचार करणाऱ्या त्याच्या मनाची बऱ्यावाईटाविषयी खात्री झाली ( ३७-४१ )

तो मनात म्हणाला, " निःशंकपणें पडलेल्या या सर्व रावणस्त्रिया मी इच्छा तशा पाहिल्या खऱ्या, परंतु, या पाहण्यामुळे माझ्या मनामध्ये काहीएक विकार उत्पन्न झालेला नाही बऱ्यावाईट स्थितीमध्ये कोणत्याही इंद्रियाची प्रवृत्ति होण्यास मन हेच कारणीभूत होत असतें आणि तें माझे मन तर अगदी निश्चल आहे स्त्रीसमुदायाशिवाय दुस या ठिकाणी मला विदेहराजकन्येचा शोध लागणें शक्य नाही, कारण स्त्री शोधण्याचा प्रसंग आला, तर स्त्रियांचेच ठिकाणीं स्त्रिया आटळून येत असतात ज्या प्राण्याची जी जाति असेल, त्याच जातीचा आश्रय करून तो प्राणी रहात असतो तस्मात्, नाहीशा झालेल्या स्त्रीचा शोध हरिणामध्ये लागणें शक्य नाही. म्हणून शुद्ध मनाने मी हें रावणाचें

देवगन्धर्वकन्याश्च नागकन्याश्च वीर्यवान् ।
अवेक्षमाणो हनुमान्नैवापश्यत जानकीम्　　४७
तामपश्यन्कपिस्तत्र पश्यंश्चान्या वरस्त्रियः ।
अपक्रम्य तदा वीरः प्रस्थातुमुपचक्रमे　　४८
स भूयः सर्वतः श्रीमान्मारुतिर्यत्नमाश्रितः ।
आपानभूमिमुत्सृज्य तां विचेतुं प्रचक्रमे　　४९

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे एकादशः सर्गः ॥ ११ ॥

द्वादशः सर्गः ।　　[ ६१४ ]

स तस्य मध्ये भवनस्य संस्थितो लतागृहांश्चित्रगृहान्निशागृहान् ।
जगाम सीतां प्रतिदर्शनोत्सुको न चैव तां पश्यति चारुदर्शनाम् १
स चिन्तयामास ततो महाकपिः प्रियामपश्यन्रघुनन्दनस्य ताम् ।
ध्रुवं न सीता ध्रियते यथा न मे विचिन्वतो दर्शनमेति मैथिली २

---

अन्तःपुर सर्व धुंडाळून काढलें, परंतु येथें जनककन्या कोठेंही दृष्टीस पडत नाही. ( ४२-४६ )

सारांश, तो वीर्यवान् हनुमान् सीतेला शोधून पाहूं लागला, तेव्हा देवकन्या, गंधर्वकन्या आणि नागकन्या त्याच्या पाहण्यात आल्या; परंतु जनककन्या सीता त्याच्या आढळण्यात आलीच नाही. याप्रमाणे इतर उत्कृष्ट स्त्रिया अवलोकनात येऊन, सीता जेव्हा तेथें त्याच्या दृष्टी पडेना, तेव्हा तो वीर तो पानभूमि सोडून दुसरीकडे जावयास निघाला. तात्पर्य, सर्व बाजूंनी मोठ्या यत्नानें ते स्थान पाहिल्यानंतर ती पानभूमि सोडून देऊन, पुनरपि तो हनुमान् सीतेचा दुसरीकडे शोध करूं लागला ( ४७-४९ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांतील अकरावा सर्ग समाप्त झाला. ॥ ११ ॥

त्या रावणाच्या गृहामध्ये असलेला हनुमान् सीतेला पाहण्याविषयीं अत्यंत उत्कंठित झाला होता. यानंतर राजा त्यामध्ये वसती करण्यात येते, अशा एका आश्चर्यकारक लतागृहामध्ये तो गेला, परंतु मनोहर मुद्रा असलेली ती सीता त्याच्या दृष्टीस पडली नाही. याप्रमाणे रघुनंदन रामाची ती प्रिया जेव्हा त्याच्या

सा राक्षसानां प्रवरेण बाला स्वशीलसंरक्षणतत्परा सती ।
अनेन नूनं प्रति दुष्टकर्मणा हता भवेदार्यपथे परे स्थिता ३
विरूपरूपा विकृता विवर्चसो महानना दीर्घविरूपदर्शनाः ।
समीक्ष्य ता राक्षसराजयोषितो भयाद्विनष्टा जनकेश्वरात्मजा ४
सीतामदृष्ट्वा ह्यनवाप्य पौरुषं विहृत्य कालं सह वानरैश्चिरम् ।
न मेऽस्ति सुग्रीवसमीपगा गतिः सुतीक्ष्णदण्डो बलवांश्च वानरः ५
दृष्टमन्तःपुरं सर्वं दृष्टा रावणयोषितः ।
न सीता दृश्यते साध्वी वृथा जातो मम श्रमः ६
किं नु मां वानराः सर्वे गतं वक्ष्यन्ति संगताः ।
गत्वा तत्र त्वया वीर किं कृतं तद्वदस्व नः ७
अदृष्ट्वा किं प्रवक्ष्यामि तामहं जनकात्मजाम् ।

दृष्टीस पडेना, तेव्हां तो महाकपि हनुमान् मन मध्ये म्हणाला, "ज्या अर्थी मिथिल-राजकन्या सीता मी इतक्या प्रयासाने शोधीत असतानाही माझ्या दृष्टी पडत नाही, त्या अर्थी ती निःसंशय जिवंतच नसावी. उत्कृष्ट पतिव्रतामार्गाचें अवलंबन करणारी आणि स्वतःच्या शीलाचें रक्षण करण्याविषयीं दक्ष असलेली ती साध्वी बाला त्या दुष्ट कर्म करणाऱ्या राक्षसश्रेष्ठ रावणानें खात्रीनें मारून टाकली असावी. किंवा कुरूप चेहऱ्याच्या, अकाळविकाळ, निस्तेज आणि प्रचंड मुख व दीर्घ आणि विरूप नेत्र असलेल्या त्या राक्षसराज रावणाच्या स्त्रिया पाहूनच ती जनककन्या भीतीनेंही मृत्यु पावली असेल. समुद्राचें उल्लंघन करून येण्याचा जो पराक्रम मी केला, तो सीतेचें दर्शन न झाल्यामुळे निष्फल झाला आहे व वानरांसह हिंडल्यामुळे परत जाण्याची ठरलेली मुदत टळूनही बरेच दिवस झाले आहेत. तेव्हा आता सुग्रीवाकडे मला जाता येणार नाही; कारण, तो वानर बलाढ्य असून त्याची शिक्षाही फारच कडक आहे. ( १–५ )

" मी सर्व अन्तःपुर धुंडाळलें आणि सर्व राक्षसस्त्रियाही पाहिल्या, तथापि साध्वी सीता दृष्टीस पडत नाही. यामुळे, माझे श्रम व्यर्थ झाले आहेत. मी तेथे गेल्यावर सर्व वानर एकत्र जुळून मला विचारतील, " हे वीरा, तूं तेथे जाऊन काय केलेंस ? हे आम्हाला सांग ! " परंतु ती जनककन्या सीता जर माझ्या

ध्रुवं प्रायमुपासिष्ये कालस्य व्यतिवर्तने । ८
किं वा वक्ष्यति वृद्धश्च जाम्बवानङ्गदश्च सः
गतं पारं समुद्रस्य वानराश्च समागताः ९
अनिर्वेदः श्रियो मूलमनिर्वेदः परं सुखम् ।
भूयस्तत्र विचेष्यामि न यत्र विचयः कृतः १०
अनिर्वेदो हि सततं सर्वार्थेषु प्रवर्तकः ।
करोति सफलं जन्तोः कर्म यच्च करोति सः ११
तस्मादनिर्वेदकरं यत्नं चेष्टेऽहमुत्तमम् ।
अदृष्टांश्च विचेष्यामि देशान्रावणपालितान् १२
आपानशाला विचितास्तथा पुष्पगृहाणि च ।
चित्रशालाश्च विचिता भूयः क्रीडागृहाणि च । १३
निष्कुटान्तररथ्याश्च विमानानि च सर्वशः ।
इति संचिन्त्य भूयोऽपि विचेतुमुपचक्रमे १४

---

सुग्रीस पडलाच नाही, तर मी तरी त्यांना सांगणार काय ? सारांश, विनाकारण मुदत टळून गेल्यामुळे मला आता नि संशय अन्नपाण्याचा त्याग करूनच प्राण सोडला पाहिजे. एवढा मोठा समुद्र मी उल्लंघला, परंतु तेथें परत गेल्यावर एकत्र जुळलेले वानर मला काय म्हणतील ? तो वृद्ध जांबवान् काय म्हणेल ? आणि तो अंगद तरी काय म्हणेल ? ( ६-९ )

" असो ! आपण हताश होणेंही उपयोगी नाही. मनात उत्साह बाळगणें, हेंच ऐश्वर्याचें मूळ आहे आणि अंगात उत्साह असणें, हेच उत्कृष्ट सुखाचें कारण आहे म्हणून ज्या ठिकाणीं मी अजून शोध केलेला नाही, तेथें तिला पुनरपि मी शोधून पाहीन. कोणतीही गोष्ट करण्याकडे प्रवृत्ति होण्याला, उत्साह हेंच एक नेहमीचें कारण आहे आणि प्राणी जें काही कर्म करीत असतो, तेंही उत्साहामुळेच सफल होत असतें. म्हणून मोठ्या उत्साहाने प्रयत्न करून, मी रावणाच्या रक्षण-खालचे जे प्रदेश मी अजून अवलोकन केलेले नाहीत, ते पाहून, मी सीता शोधून काढीन. मी सर्व पानशाला शोधल्या, पुष्पगृहें पाहिलीं, चित्रशाला हुडकल्या आणि क्रीडागृहेंही अवलोकन केलीं. इतकेंच नव्हे तर सर्व गृहांतील आराम-

भूमीगृहांश्चैत्यगृहान्गृहातिगृहकानपि ।
उत्पतन्निपतंश्चापि तिष्ठन्गच्छन्पुनः क्वचित् १५
अपवृण्वंश्च द्वाराणि कपाटान्यवघट्टयन् ।
प्रविशन्निष्पतंश्चापि प्रपतन्नुत्पतन्निव १६
सर्वमप्यवकाशं स विचचार महाकपिः १७
चतुरङ्गुलमात्रोऽपि नावकाशः स विद्यते ।
रावणान्तःपुरे तस्मिन्यं कपिर्न जगाम सः १८
प्राकारान्तरवीथ्यश्च वेदिकाश्चैत्यसंश्रयाः ।
श्वभ्राश्च पुष्करिण्यश्च सर्वं तेनावलोकितम् १९
राक्षस्यो विविधाकारा विरूपा विकृतास्तथा ।
दृष्टा हनुमता तत्र न तु सा जनकात्मजा २०
रूपेणाप्रतिमा लोके परा विद्याधरस्त्रियः ।
दृष्टा हनुमता तत्र न तु राघवनन्दिनी २१

रथानाचे मार्ग व पुष्पकादि विमानेंही सर्व प्रकारें धुंडाळून पाहिली." असा विचार करुन, तो पुन सीतेचा शोध करण्यास तयार झाला. ( १०—१४ )

तळघरें, चिरेबंदी वाडे आणि स्वैर क्रीडा करण्याकरिता घर सोडून जवळच तयार केलेली दुसरी घरें यावर उंच उंच उड्या मारून, पुनरपि खाली येऊन, उभा राहून, कोठें कोठें पुन्हा पुन्हा जाऊन, दारें उघडून, खिडक्या लावून, आत शिरून, बाहेर पडून, उड्या टाकून व उड्या मारून सर्व प्रदेशावर त्या महाकपि हनुमानानें संचार केला. जेथें तो हनुमान् गेलेला नाही, अशी रावणाच्या अन्तःपुरातील तर चार बोटेंसुद्धा जागा शिल्लक राहिली नाही. किल्ल्यांतले मार्ग, मोठमोठ्या वृक्षाचे पार, खंदक आणि पुष्करणी हें सर्व काही त्यानें अवलोकन केलें. कुरूप आणि अक्राळविक्राळ अशा नाना प्रकारचा रूपें असलेल्या राक्षसी त्यानें पाहिल्या, परंतु त्या ठिकाणीं ती जनककन्या सीता त्या हनुमानाच्या नेत्रेंही दृष्टीस पडली नाही. ( १५–२० )

रूपानें सर्व जगतामध्ये अप्रतिम अशा विद्याधराच्या उत्कृष्ट स्त्रिया हनुमानाच्या पाहण्यांत आल्या, परंतु, रघुवंशज रामाला आनंद देणारी ती सीता

नागकन्या वरारोहाः पूर्णचन्द्रनिभाननाः ।
दृष्टा हनुमता तत्र न तु सा जनकात्मजा　२२
प्रमथ्य राक्षसेन्द्रेण नागकन्या बलाद्धृताः ।
दृष्टा हनुमता तत्र न सा जनकनन्दिनी　२३
सोऽपश्यंस्तां महाबाहुः पश्यंश्चान्या वरस्त्रियः ।
विषसाद महाबाहुर्हनूमान्मारुतात्मजः　२४
उद्योगं वानरेन्द्राणां प्लवनं सागरस्य च ।
व्यर्थं वीक्ष्यानिलसुतश्चिन्तां पुनरुपागतः　२५
अवतीर्य विमानाच्च हनूमान्मारुतात्मजः ।
चिन्तामुपजगामाथ शोकोपहतचेतनः　२६

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे द्वादशः सर्गः ॥१२॥[६४०]

त्रयोदशः सर्गः ।

विमानात्तु स संक्रम्य प्राकारं हरियूथपः ।

---

त्याला आढळली नाही. उत्कृष्ट कटिप्रदेशाची आणि पूर्णचंद्राप्रमाणे आल्हाददारक मुखें असलेल्या नागकन्या तेथे हनुमानाच्या दृष्टीस पडल्या, परंतु ती जनककन्या त्याच्या दृष्टोत्पत्तीस आली नाही. त्याचप्रमाणे राक्षसाधिपति रावणाने नागांना जिंकून बलात्काराने हरण करून आणलेल्या दुसऱ्या नागकन्याही त्या हनुमानाच्या अवलोकनात आल्या; परंतु ती जनककन्या सीता त्याला आढळली नाही. याप्रमाणे त्या आजानुबाहु महापराक्रमी वायुपुत्र हनुमानाला उत्कृष्ट सुंदर स्त्रिया दिसत असूनही, जेव्हा सीता त्याच्या दृष्टीस पडेना, तेव्हा तो खिन्न झाला आणि वानराधिपतींचा उद्योग व त्याचें सागराचें उल्लंघन हें व्यर्थ झाल्या-चें पाहून, तो वायुपुत्र पुनरपि चिंताक्रांत झाला. सारांश पुनरपि विमानामध्ये, चढून उतरल्यावर त्या वायुपुत्र हनुमानाचें मन शोकग्रस्त झालें आणि तो सीतेच्या शोधाबद्दल पुनः चिंता करूं लागला. ( २१–२६ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदर-काडांपैकी बारावा सर्ग समाप्त झाला. ॥ १२ ॥ •

तो वेगवान् वानरसेनाधिपति हनुमान् विमानावरून तटावर गेला, तेव्हा मेघा-

हनूमान्वेगवानासीद्यथा विद्युद्घनान्तरे १
संपरिक्रम्य हनुमान्रावणस्य निवेशनान् ।
अदृष्ट्वा जानकीं सीतामब्रवीद्वचनं कपिः २
भूयिष्ठं लोलिता लङ्का रामस्य चरता प्रियम् ।
न हि पश्यामि वैदेहीं सीतां सर्वाङ्गशोभनाम् ३
पल्वलानि तटाकानि सरांसि सरितस्तथा ।
नद्योऽनूपवनान्ताश्च दुर्गाश्च धरणीधराः ॥
लोलिता वसुधा सर्वा न च पश्यामि जानकीम् ४
इह संपातिना सीता रावणस्य निवेशने ।
आख्याता गृध्रराजेन न च सा दृश्यते तु किम् ५
किं तु सीताऽथ वैदेही मैथिली जनकात्मजा ।
उपतिष्ठेत विवशा रावणेन हृता बलात् ६

मध्ये असलेल्या विद्युल्लतेप्रमाणे शोभूं लागला, परंतु, रावणाचीं गृहें हिंडूनही जेव्हा जनककन्या सीता हनुमानाच्या दृष्टीस पडेना, तेव्हा तो कपि आपल्याशी म्हणाला, " रामाचें कल्याण करण्याकरिता मी बहुतेक लंका धुंडाळून काढली; परंतु, सर्व उत्कृष्ट अवयवांनी युक्त असलेली ती विदेहराजकन्या सीता कोठेंच माझ्या दृष्टीस पडेना तळीं, तडाग, सरोवरें, ओढे, नद्या, नदीतीरावरील वनें आणि दुर्गम पर्वत अशी सर्व पृथ्वी मी धुंडाळून काढली; परंतु, जनककन्या सीता माझ्या दृष्टीस पडली नाही. गृध्रराज संपातीनें सीता येथें रावणाच्या गृहामध्यें नेली, म्हणून सांगितलें आहे परंतु ती कोठेंच दृष्टीस पडत नाही, हें काय ? ( १–५ )

" मिथिलाधिपति जनक–राजाची कन्या वैदेही सीता अनाथ असतांना जरी रावणानें बलात्कारानें पकडून नेली, तरी ती त्याला वश होऊन राहील, हें तर असंभवनीयच आहे. मला वाटतें, सीतेला घेऊन तो राक्षस आकाशमार्गानें जलद गतीनें जाऊं लागला असतांना, रामबाणाचें त्याला भय वाटल्यामुळें, त्याच्या हातांतून ती कोठेंतरी मार्गामध्येंच पडली असावी, अथवा सिद्धांनीं आचरलेल्या आकाशमार्गानें रावण सीतेला हरण करून नेत असतांना, सागरा-

क्षिप्रमुत्पततो मन्ये सीतामादाय रक्षसः ।
बिभ्यतो रामबाणानामन्तरा पतिता भवेत् ७
अथवा ह्रियमाणायाः पथि सिद्धनिषेविते ।
मन्ये पतितमार्याया हृदयं प्रेक्ष्य सागरम् ८
रावणस्योरुवेगेन भुजाभ्यां पीडितेन च ।
तया मन्ये विशालाक्ष्या त्यक्तं जीवितमार्यया ९
उपर्युपरि सा नूनं सागरं क्रमतस्तदा ।
विचेष्टमाना पतिता समुद्रे जनकात्मजा १०
आहो क्षुद्रेण चानेन रक्षन्ती शीलमात्मनः ।
अबन्धुर्भक्षिता सीता रावणेन तपस्विनी ११
अथवा राक्षसेन्द्रस्य पत्नीभिरसितेक्षणा ।
अदुष्टा दुष्टभावाभिर्भक्षिता सा भविष्यति १२
अथवा निहिता मन्ये रावणस्य निवेशने ।
भृशं लालप्यते बाला पञ्जरस्थेव सारिका १३
जनकस्य कुले जाता रामपत्नी सुमध्यमा ।

---

रूडे पाहून त्या साध्वीने प्राण सोडला असावा, असें मला वाटतें. रावणाच्या मांड्याचा वेग आणि त्याच्या हाताचें घट्ट धरणें, यांच्या योगानें मला वाटतें त्या विशाल नेत्रानी युक्त असलेल्या साध्वीला मृत्यु झाला असावा. रावण समुद्राचें उल्लंघन करून जात असताना त्याच्या हातून सुटण्याकरिता तडफडत असलेली ती जनकन्या सीता खरोखर समुद्रात पडली तरी असेल, किंवा आपलें शील रक्षण करणारी ती बिचारी अनाथ सीता या क्षुद्र रावणानें कदाचित् खाऊनही टाकली असेल अथवा ज्यांचा हेतु दुष्ट आहे, अशा त्या राक्षसाधिपतीच्या भार्यांनीच त्या कृष्णनयना सुशील सीतेचा कदाचित् नाश केला असेल. अथवा पिंजऱ्यात ठेवलेला सारिका ज्याप्रमाणे स्वतःशीं एकसारखी भाषण करीत असते, त्याप्रमाणे रावणाच्याच गृहामध्ये कोठेतरी अज्ञात ठिकाणीं ठेवलेली दीन बाला सीता एकसारखें ‘ राम, राम ’ म्हणत आपला कंठशोष करून घेत असेल कमलपत्राप्रमाणे विशाल नेत्रांची ती सुंदरी त्या अर्थी जनकाच्या कुलामध्ये

कथमुत्पलपत्राक्षी रावणस्य वशं व्रजेत् १४
विनष्टा वा प्रणष्टा वा मृता वा जनकात्मजा ।
रामस्य प्रियभार्यस्य न निवेदयितुं क्षमम् १५
निवेद्यमाने दोषः स्याद्दोषः स्यादनिवेदने ।
कथं नु खलु कर्तव्यं विषमं प्रतिभाति मे १६
अस्मिन्नेवंगते कार्ये प्राप्तकालं क्षमं च किम् ।
भवेदिति मतिं भूयो हनुमान्प्रविचारयन् १७
यदि सीतामदृष्ट्वाऽहं वानरेन्द्रपुरीमितः ।
गमिष्यामि ततः को मे पुरुषार्थो भविष्यति १८
ममेदं लङ्घनं व्यर्थं सागरस्य भविष्यति ।
प्रवेशश्चैव लङ्कायां राक्षसानां च दर्शनम् १९
किं वा वक्ष्यति सुग्रीवो हरयो वापि संगताः ।
किष्किन्धामनुसंप्राप्तं तौ वा दशरथात्मजौ २०

उत्पन्न झालेली आहे आणि रामाची पत्नी आहे, त्याअर्थी ती रावणाला कोठून वश होणार ? ( ६—१४ )

'ज्याला भार्या प्रिय आहे, त्या रामाला "जनककन्या सीता कोठे आहे,याचा पत्ता लागत नाही. म्हणून ती नाहीशी झाली आहे किंवा ती मृत झाली आहे,' असें निवेदन करणेंही योग्य नाही. खरें खरें वर्तमान सांगितलें, तर त्यांतही दोष आहे आणि खरें निवेदन न केलें, तरीही दोष आहे ! तेव्हा आता करावें कसें ? मला तर हा मोठा विकट प्रसंग दिसत आहे, म्हणून आपण हातीं घेतलेल्या कार्याची अशा प्रकारें स्थिति झाली आहे. तेव्हा सांप्रतच्या या विकट परिस्थितींत काळाला योग्य असें काय केलें तर चांगलें होईल," याविषयीं हनुमान पुनरपि विचार करूं लागला. ( १५-१७ )

तो म्हणाला, " सीतेला अवलोकन न करता मी जर येथून वानरराज सुग्रीवाच्या नगरीमध्ये गेलों, तर माझा त्या जाण्यामध्ये पुरुषार्थ तो काय ? मी एवढा सागर उल्लंघन केला, लंकेमध्ये प्रवेश केला आणि हे येथील राक्षस पाहिले, हा सारा खटाटोप व्यर्थ होईल. मी किष्किंधानगरीमध्ये गेल्यावर एकत्र जम-

गत्वा तु यदि काकुत्स्थं वक्ष्यामि परुषं वचः ।
न दृष्टेति मया सीता ततस्त्यक्ष्यति जीवितम् २१
परुषं दारुणं तीक्ष्णं क्रूरमिन्द्रियतापनम् ।
सीतानिमित्तं दुर्वाक्यं श्रुत्वा स न भविष्यति २२
तं तु कृच्छ्रगतं दृष्ट्वा पञ्चत्वगतमानसम् ।
भृशानुरक्तो मेधावी न भविष्यति लक्ष्मणः २३
विनष्टौ भ्रातरौ श्रुत्वा भरतोऽपि मरिष्यति ।
भरतं च मृतं दृष्ट्वा शत्रुघ्नो न भविष्यति २४
पुत्रान्मृतान्समीक्ष्याथ न भविष्यन्ति मातरः ।
कौसल्या च सुमित्रा च कैकेयी च न संशयः २५
कृतज्ञः सत्यसंधश्च सुग्रीवः प्लवगाधिपः ।
रामं तथागतं दृष्ट्वा ततस्त्यक्ष्यति जीवितम् २६
दुर्मना व्यथिता दीना निरानन्दा तपस्विनी ।
पीडिता भर्तृशोकेन रुमा त्यक्ष्यति जीवितम् २७

---

लेले वानर, सुग्रीव अथवा ते दशरथपुत्र रामलक्ष्मण मला काय म्हणतील ? ककुत्स्थकुलोत्पन्न रामाकडे जाऊन "सीता माझ्या दृष्टीस पडली नाहीं," असे कठोर शब्द जर मी त्याच्यापाशीं उच्चारले, तर तो प्राण सोडील. कठोर, भयंकर, उग्र आणि इंद्रियांना संताप देणारें असें सीतेसंबंधीं दुर्भाषण ऐकल्यावर तो प्राण ठेवणार नाहीं विपन्नावस्थेंत सांपडून मृत्यु पावलेल्या त्या रामाला पाहिल्यानंतर त्याचेवर अत्यंत प्रेम करणारा बिचारी लक्ष्मणही प्राण सोडील. आपले बंधु नाहींसे झाल्याचें ऐकून भरतही मरून जाईल आणि भरत मेल्याचें पाहून शत्रुघ्नही जीव ठेवणार नाहीं हे सारे पुत्र मृत झाल्याचें ऐकताच कौसल्या, सुमित्रा व कैकेयी या त्यांच्या माताहि निःसंशय प्राणत्याग करतील. (१८–२५)

रामाची अशी वाईट अवस्था झाल्याचें पाहून कृतज्ञ व सत्यवचनी वानरराज सुग्रीव प्राण देईल आणि त्याच्या नंतर खिन्न, क्षुब्ध, दीन, दुःखित आणि पतिशोकाने व्याप्त झालेली बिचारी रुमाही आपल्या जीविताचा त्याग करील आणि वालीच्या मृत्यूचें अत्यंत दुःख होऊन, शोकानें अगदीं जर्जर झालेली तारा

वालिजेन तु दुःखेन पीडिता शोककर्शिता ।
पञ्चत्वमागता राज्ञी तारापि न भविष्यति, २८
मातापित्रोर्विनाशेन सुग्रीवव्यसनेन च ।
कुमारोऽप्यङ्गदस्तस्माद्विजहिष्यति जीवितम् २९
भर्तृजेन तु दुःखेन अभिभूता वनौकसः ।
शिरांस्यभिहनिष्यन्ति तलैर्मुष्टिभिरेव च ३०
सान्त्वेनानुप्रदानेन मानेन च यशस्विना ।
लालिताः कपिनाथेन प्राणांस्त्यक्ष्यन्ति वानराः ३१
न वनेषु न शैलेषु न निरोधेषु वा पुनः ।
क्रीडामनुभविष्यन्ति समेत्य कपिकुञ्जराः ३२
सपुत्रदाराः सामात्या भर्तृव्यसनपीडिताः ।
शैलाग्रेभ्यः पतिष्यन्ति समेषु विषमेषु च ३३
विषमुद्बन्धनं वापि प्रवेशं ज्वलनस्य वा ।
उपवासमथो शस्त्रं प्रचरिष्यन्ति वानराः ३४
घोरमारोदनं मन्ये गते मयि भविष्यति ।

मरणाच्या दारीं बसलेली राजपत्नी ताराही इहलोक सोडून जाईल. मातापितरांच्या नाश आणि सुग्रीवाचा मृत्यु यामुळे कुमार अंगदही आपल्या जीविताचा त्याग करील. राजाच्या मृत्यूमुळे उत्पन्न झालेल्या दुःखाने वानरही दुःखी होतील आणि हातांनी व मुठींनी आपआपली डोकीं बडवून घेऊं लागतील. सौम्य भाषण करून, देणग्या देऊन आणि मानमान्यता राखून वानराधिपति यशस्वी सुग्रीवाने ज्यांचे लाड पुरविले आहेत, असे वानर प्राणत्याग करतील. वनें, पर्वत, अथवा गुप्त स्थलें यामध्ये एकत्र जमून श्रेष्ठ श्रेष्ठ वानर पुनरपि क्रीडा करताना दृष्टीस पडणार नाहीत; कारण सर्वश्रेष्ठ वानरराजाच्या मरणामुळे पुत्र, स्त्रिया व अमात्य यांसह ते दुःखातुर होतील आणि पर्वतशिखरावरून सपाट अथवा विषम प्रदेशावर उड्या घेतील. सारांश, वानर विषप्राशन करतील, गळ्याला फास लावून घेतील, अग्नीमध्ये उड्या घालतील, उपवास करून प्राण सोडतील अथवा शस्त्राने आपलीं नरडीं तोडून टाकतील. ( २६-३४ )

इक्ष्वाकुकुलनाशश्च नाशश्चैव वनौकसाम् ३५
सोऽहं नैव गमिष्यामि किष्किन्धां नगरीमितः ।
न हि शक्ष्याम्यहं द्रष्टुं सुग्रीवं मैथिलीं विना ३६
मय्यगच्छति चेहस्थे धर्मात्मानौ महारथौ ।
आशया तौ धरिष्येते वानराश्च तरस्विनः ३७
हस्तादानो मुखादानो नियतो वृक्षमूलिकः ।
वानप्रस्थो भविष्यामि ह्यदृष्ट्वा जनकात्मजाम् ३८
सागरानूपजे देशे बहुमूलफलोदके ।
चितिं कृत्वा प्रवेक्ष्यामि समिद्धमरणीसुतम् ३९
उपविष्टस्य वा सम्यग्लिङ्गिनं साधयिष्यतः ।
शरीरं भक्षयिष्यन्ति वायसाः श्वापदानि च ४०
इदमप्यृषिभिर्दृष्टं निर्याणमिति मे मतिः ।
सम्यगापः प्रवेक्ष्यामि न चेत्पश्यामि जानकीम् ४१

"तात्पर्य. मी तसे परत गेलों, तर इक्ष्वाकुकुलाचा नाश आणि वनराचा घात होऊन घोर अनर्थ होईल. म्हणून, मी येथून किष्किंधानगरीला परत जाणारच नाही आणि सीता दृष्टीस पडल्यावाचून सुग्रीवाला तोंड दाखविणें मला योग्य नाही. मी तिकडे न जाता येथेच राहिलों, म्हणजे ते धर्मात्मे महारथी रामलक्ष्मण आणि वेगवान् वानर आशेने जीव धरून राहतील. याकरितां जनककन्या जर दृष्टीस पडली नाही, तर वृक्षमूलावर राहून मी आपला दृढचित्त वानप्रस्थ बनून राहीन आणि जितेंद्रिय राहून हातात अथवा मुखात येऊन पडलेल्या फलादिकांवर आपली उपजीविका करीत राहीन अथवा फळें, मुळें व उदक यांची जेथे समृद्धि आहे, अशा एखाद्या समुद्रतीरासमीप असलेल्या प्रदेशावर चिता रचून प्रज्वलित झालेल्या अग्निमध्ये मी प्रवेश करीन किंवा प्रायोपवेशनाचा संकल्प करून प्राणत्याग करण्याकरिता मी बसलों असें पाहून पक्षी व श्वापदें माझें शरीर खाऊन टाकतील. अथवा हाही एक मरणाचा उपाय ऋषींना अभिमत आहे असें मला वाटतें. सारांश, जनककन्या जर माझ्या दृष्टीस पडली नाही तर मी स्वस्थ मनाने उदकामध्ये उडी घालीन. (३५—४१)

सुजातमूला सुभगा कीर्तिमाला यशस्विनी।
प्रभग्ना चिररात्राय मम सीतामपश्यतः ४२
तापसो वा भविष्यामि नियतो वृक्षमूलिकः।
नेतः प्रतिगमिष्यामि तामदृष्ट्वाऽसितेक्षणाम् ४३
यदि तु प्रतिगच्छामि सीतामनधिगम्य ताम्।
अङ्गदः सहितः सर्वैर्वानरैर्न भविष्यति ४४
विनाशे बहवो दोषा जीवन्प्राप्नोति भद्रकम्।
तस्मात्प्राणान्धरिष्यामि ध्रुवो जीवति संगमः ४५
एवं बहुविधं दुःखं मनसा धारयन्बहु।
नाध्यगच्छत्तदा पारं शोकस्य कपिकुञ्जरः ४६
ततो विक्रममासाद्य धैर्यवान्कपिकुञ्जरः ४७
रावणं वा वधिष्यामि दशग्रीवं महाबलम्।
काममस्तु हृता सीता प्रत्याचीर्णं भविष्यति ४८
अथ वैनं समुत्क्षिप्य उपर्युपरि सागरम्।

"सीता जर मी शोधून काढली नाही, तर अक्षय, उत्कृष्ट आणि चोहोंकडे गाजलेली माझी कीर्तिपरंपरा कायमचीच नाहीशी होणार आहे अथवा जितेंद्रिय राहून व वृक्षमूलाचा आश्रय करून मी येथे तपस्वीच बनून राहीन कृष्णवर्ण नेत्रांनी युक्त असलेली ती सीता जर दृष्टीस पडली नाही, तर मी येथून परत जाणार नाही त्या सीतेचा शोध न लागताच मी जर येथून परत जाईन, तर सर्व वानरांसह अंगद प्राणत्याग करील, छे! प्राणत्याग करण्यामध्ये पुष्कळच दोष आहेत पुरुष जिवंत राहिला तर त्याचें कधीतरी कल्याण होतेंच, यासाठी मी प्राण धारण करून राहीन, कारण पुरुष कायम राहिल्यास त्याला इष्ट असलेली गोष्ट कधीतरी निःसंशय प्राप्त होतच असते" (४२-४५)

याप्रमाणे नाना प्रकारचे दुःखद विचार मनामध्ये आणीत असलेल्या त्या वानरश्रेष्ठ हनुमानास शोकसागरातून विचारांतून बाहेर पडता येईना तथापि तो धैर्यवान् वानरश्रेष्ठ तसेंच धैर्य धरून आपल्याशींच म्हणाला, "चिंता नाही, सीतेचें हरण झालं आहे ना? खुशाल होऊ दे! मी महाबलाढ्य दशानन रावणाचाच वध

रामायोपहरिष्यामि पशुं पशुपतेरिव ४९
इति चिन्तासमापन्नः सीतामनधिगम्य ताम्।
ध्यानशोकपरीतात्मा चिन्तयामास वानरः ५०
यावत्सीतां न पश्यामि रामपत्नीं यशस्विनीम्।
तावदेतां पुरीं लङ्कां विचिनोमि पुनःपुनः ५१
संपातिवचनाच्चापि रामं यद्यानयाम्यहम्।
अपश्यन्राघवो भार्यां निर्दहेत्सर्ववानरान् ५२
इहैव नियताहारो वत्स्यामि नियतेन्द्रियः।
न मत्कृते विनश्येयुः सर्वे ते नरवानराः ५३
अशोकवनिका चापि महतीयं महाद्रुमा।
इमामधिगमिष्यामि न हीयं विचिता मया। ५४
वसून्रुद्रांस्तथादित्यानश्विनौ मरुतोऽपि च।
नमस्कृत्वा गमिष्यामि रक्षसां शोकवर्धनः ५५

---

करीन, म्हणजे सीतेबद्दल सूड तरी उगवल्यासारखे होईल; अथवा या रावणाला समुद्रावरून फेरून देईन व पशुपतीकडे ज्याप्रमाणे पशु नेतात, त्याप्रमाणे मी त्याला रामाकडे घेऊन जाईन." (४६-४९)

याप्रमाणे सीतेचा शोध न लागल्यामुळे चिंताक्रांत झालेला तो वानर पुनरपि काळजी व दुःख यांनी मन अस्वस्थ झाल्यामुळे पुनः मनांत चिंता करूं लागला. "यशस्विनी रामपत्नी सीतेचा शोध लागेपर्यंत मी ही लंकानगरी वारंवार शोधीन. सीता तेथे खास आहे, या संपातीच्या वचनावर विश्वास ठेवून मी जर रामाला येथे घेऊन आलो आणि त्याची भार्या जर त्याच्या दृष्टीस पडली नाही, तर तो सर्व वानरांना जाळून टाकील. म्हणून मी येथेच नियमित आहारावर इंद्रियसंयमन करून राहीन. तेथे परत गेल्यावर माझ्याकरता त्या सर्व वानरांचा नाश होणें योग्य नाही. (५०-५३)

मोठे मोठे वृक्ष असलेलें हें प्रचंड अशोकवन मला दिसतें आहे हें मी अद्यापि शोधलेलें नाही. वसु, रुद्र, आदित्य, अश्विनीकुमार आणि मरुद्गण यांना नमस्कार करून मी राक्षसांचा शोक उद्दिपित करणारा, अशोकवनांत जाईन आणि

जित्वा तु राक्षसान्देवीमिक्ष्वाकुकुलनन्दिनीम् ।
संप्रदास्यामि रामाय सिद्धीमिव तपस्विने ५६
स मुहूर्तमिव ध्यात्वा चिन्ताविग्रथितेन्द्रियः ।
उदतिष्ठन्महाबाहुर्हनूमान्मारुतात्मजः ५७
नमोऽस्तु रामाय सलक्ष्मणाय देव्यै च तस्यै जनकात्मजायै ।
नमोऽस्तु रुद्रेन्द्रयमानिलेभ्यो नमोऽस्तु चन्द्रार्कमरुद्गणेभ्यः
स तेभ्यस्तु नमस्कृत्वा सुग्रीवाय च मारुतिः ।
दिशः सर्वाः समालोक्य सोऽशोकवनिकां प्रति ५९
स गत्वा मनसा पूर्वमशोकवनिकां शुभाम् ।
उत्तरं चिन्तयामास वानरो मारुतात्मजः ६०
ध्रुवं तु रक्षोबहुला भविष्यति वनाकुला ।
अशोकवनिका पुण्या सर्वसंस्कारसंस्कृता ६१
रक्षिणश्चात्र विहिता नूनं रक्षन्ति पादपान् ।
भगवानपि विश्वात्मा नातिक्षोभं प्रवायति ६२
संक्षिप्तोऽयं मयात्मा च रामार्थे रावणस्य च ।

---

तपश्चर्येने प्रसन्न झालेल्या देवता ज्याप्रमाणे तपस्वी पुरुषाला तपाचे फल देत असतात, त्याप्रमाणे राक्षसांना जिंकून, इक्ष्वाकुकुलाला आनंद देणारी सीता मी रामाला अर्पण करीन " याप्रमाणे थोडा वेळ विचार करून, चिंतातुर झालेला तो महापराक्रमी वायुपुत्र हनुमान उठला आणि म्हणाला, " लक्ष्मणासह राम, ती देवी जनककन्या, रुद्र, इंद्र, यम, वायु, चंद्र, अग्नि आणि मरुद्गण यांना नमस्कार असो " याप्रमाणे त्या रामादिकांना व सुग्रीवाला नमस्कार करून व सभोवार सर्व दिशांकडे पाहून, तो मारुति अशोकवनात गेला (५४—५९)

प्रथमतः त्या शुभ अशोकवनात जाण्याचें ठरविल्यानंतर पुढे काय करावयाचें त्याविषयी तो वायुपुत्र वानर आपल्याशी विचार करू लागला. सर्व संस्कारांनी युक्त असें तें उत्कृष्ट अशोकवन खरोखर उपराक्षसांनी गजबजून गेलेलें आणि राक्षसांनी व्यापून टाकलेलें असेल. या वनाच्या रक्षणासाठी नेमलेले संरक्षक तेथील वृक्षांचें रक्षण करीत असतील आणि वायुदेवही येथे विशेष जोराने

सिद्धिं दिशन्तु मे सर्वे देवाः सर्षिगणास्त्विह ६३
ब्रह्मा स्वयंभूर्भगवान्देवाश्चैव तपस्विनः ।
सिद्धिमग्निश्च वायुश्च पुरुहूतश्च वज्रभृत् ६४
वरुणः पाशहस्तश्च सोमादित्यौ तथैव च ।
अश्विनौ च महात्मानौ मरुतः सर्व एव च ६५
सिद्धिं सर्वाणि भूतानि भूतानां चैव यः प्रभुः ।
दास्यन्ति मम ये चान्येऽप्यदृष्टाः पथि गोचराः ६६
तदुन्नसं पाण्डुरदन्तमव्रणं शुचिस्मितं पद्मपलाशलोचनम् ।
द्रक्ष्ये कदार्यावदनं कदा न्वहं प्रसन्नताराधिपतुल्यवर्चसम् ६७
क्षुद्रेण हीनेन नृशंसमूर्तिना सुदारुणालंकृतवेषधारिणा ।
बलाभिभूता ह्यबला तपस्विनी कथं नु मे दृष्टिपथेऽद्य सा भवेत् ६८
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रयोदशः सर्गः ॥ १३ ॥

चतुर्दशः सर्गः । [७०८]

स मुहूर्तमिव ध्यात्वा मनसा चाधिगम्य ताम् ।

वहात नाही. राम आणि रावण यांच्यासाठी मी हें आपलें शरीर संकुचित केलें आहे. तेव्हा या ठिकाणी ऋषिगणांसह सर्व देव माझा मनोरथ सिद्धीस नेवोत. त्याचप्रमाणे भगवान् स्वयंभु ब्रह्मदेव, तपस्वी, देव, अग्नि, वायु, वज्रपाणि इंद्र, हातामध्ये पाश धारण करणारा वरुण, चंद्र, सूर्य, महात्मे अश्विनीकुमार व सर्व मरुद्गण हे सर्व माझें प्रस्तुतचें कार्य सिद्धीस नेवोत. सर्व भूतें, भूताधिपति आणि माझ्या दृष्टीस न पडलेल्या अशा मार्गातील देवता या मला सिद्धि देतील. उन्नत नासिका, शुभ्र दंत, पवित्र हास्य, पद्मपत्रासारखे विशाल नेत्र आणि निर्मल चंद्रासारखी कांति, असलेल्या सार्वीचें (सीतेचें) मुख माझ्या केव्हा परं दृष्टीस पडेल? क्षुद्र, नीच, दुष्ट आणि अत्यंत भयंकर असूनही, विश्वसनीय वेष धारण करणाऱ्या रावणानें बलात्काराने हरण करून नेलेली ती बिचारी अबला आज कशी बरें माझ्या दृष्टीस पडेल? (६०-६८)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदर-कांडांतील तेरावा सर्ग समाप्त झाला ॥ १३ ॥

*

अवप्लुतो महातेजाः प्राकारं तस्य वेश्मनः १
स तु संहृष्टसर्वाङ्गः प्राकारस्थो महाकपिः।
पुष्पिताग्रान्वसन्तादौ ददर्श विविधान्द्रुमान् २
सालानशोकान्भव्यांश्च चम्पकांश्च सुपुष्पितान्।
उद्दालकान्नागवृक्षांश्चूतान्कपिमुखानपि ३
तथाम्रवणसंपन्नाँ लताशतसमन्वितान्।
ज्यामुक्त इव नाराचः पुप्लुवे वृक्षवाटिकाम् ४
स प्रविश्य विचित्रां तां विहगैरभिनादिताम्।
राजतैः काञ्चनैश्चैव पादपैः सर्वतो वृताम् ५
विहगैर्मृगसङ्घैश्च विचित्रां चित्रकाननाम्।
उदितादित्यसंकाशां ददर्श हनुमान्बली ६
वृतैर्नानाविधैर्वृक्षैः पुष्पोपगफलोपगैः।

सीतेच्या शोध लावण्याविषयी एक मुहूर्तपर्यंत विचार करून आणि मनानेच सीतेची भेट घेऊन, तो महातेजस्वी हनुमान् त्या रावणाच्या वाड्यावरून उडी मारून अशोकवनाभोंवती असलेल्या कोटावर जाऊन बसला. तो महाकपि कोटावर जाऊन बसला असता त्याच्या सर्वांगावर रोमांच उठले. तेथून त्याने वसंतऋतूचे आरंभी प्रफुल्लित झालेले नाना प्रकारचे वृक्ष, म्हणजे साल, भव्य अशोक, प्रफुल्लित चंपक, उद्दालक, नागकेसरवृक्ष आणि आकृतीने वानराच्या मुखासारखीं फळे धारण करणारे अशा तऱ्हेचे आम्रवृक्ष अवलोकन केले. नंतर शेकडों लता व आंबराया असलेल्या त्या बागेंत एखाद्या धनुष्याच्या दोरीपासून सुटलेल्या बाणाप्रमाणे त्याने उडी मारिली. (१-४)

*याप्रमाणे त्या अद्भुत अशोकवनामध्ये प्रवेश केल्यानंतर त्या बलवान् हनुमानाने* तें सर्व वन पाहून घेतले. तेथील पक्षिगण त्या आवाजानी वातावरण भरलेलें होतें. रौप्यवर्ण आणि सुवर्णवर्ण वृक्षानी ते सर्व बाजूनी भरून गेलेलें होतें, तें आश्चर्यकारक दिसत असून, अद्भुत वृक्षसमुदाय, पशुसमुदाय व पक्ष्यानी ते सर्वत्र व्यापलें गेलेलें होतें आणि उदय पावलेल्या सूर्याप्रमाणे ते अशोकवन प्रकाशित होतें. त्याचप्रमाणें पुष्पफलानी वाकलेले नाना प्रकारचे वृक्ष तेथे होते. तसेंच मत्त

कोकिलैर्भृङ्गराजैश्च मत्तैर्नित्यनिषेविताम् ७
प्रहृष्टमनुजां काले मृगपक्षिमदाकुलाम् ।
मत्तबर्हिणसंघुष्टां नानाद्विजगणायुताम् ८
मार्गमाणो वरारोहां राजपुत्रीमनिन्दिताम् ।
सुखप्रसुप्तान्विहगान्बोधयामास वानरः ९
उत्पतद्भिर्द्विजगणैः पक्षैर्वातैः समाहताः ।
अनेकवर्णा विविधा मुमुचुः पुष्पवृष्टयः १०
पुष्पावकीर्णः शुशुभे हनूमान्मारुतात्मजः ।
अशोकवनिकामध्ये यथा पुष्पमयो गिरिः ११
दिशः सर्वाभिधावन्तं वृक्षषण्डगतं कपिम् ।
दृष्ट्वा सर्वाणि भूतानि वसन्त इति मेनिरे १२
वृक्षेभ्यः पतितैः पुष्पैरवकीर्णा पृथग्विधैः ।
रराज वसुधा तत्र प्रमदेव विभूषिता १३

झालेले भृंग व कोकिळा त्यात नेहमी वास्तव्य करीत होत्या. त्यातील लोक सर्वदा आनंदित होते. मत्त झालेल्या मयूरांच्या आवाजांनी ते नादित झालेलें होते. नानाप्रकारच्या पक्ष्यांनी तें गजबजलेलें होतें आणि मदमत्त झालेल्या इतरही पशुपक्ष्यांनी त्या वनाचा सर्व भाग व्यापून टाकला होता. असो. तो वानर हनुमान् निष्पाप आणि सौंदर्यसंपन्न अशा त्या राजकन्येचा शोध करूं लागला, तेव्हां आतापर्यंत स्वस्थ निजलेल्या पक्ष्यांची त्याने झोप मोडिली आणि पक्ष्यांचे समाज इकडेतिकडे उडूं लागले, तेव्हां त्यांच्या पंखांच्या हालचालींनी वायु नादित झाला व त्यामुळें तेथील वृक्षाचीं नाना वर्णांचीं व गंधांचीं फुलें खाली पडून जणु पुष्पवृष्टि होऊं लागली. (५-१०)

तेव्हां पुष्पांचे ढिगार भरून गेलेला तो वायुपुत्र हनुमान् एखाद्या पुष्पमय पर्वताप्रमाणे त्या अशोकवनात शोभूं लागला. वनामध्ये येऊन, सर्व बाजूंस धावाधाव करूं लागलेल्या त्या कपीला पाहिल्यावर सर्व प्राण्यांना वनातील तो प्रत्यक्ष वसंत ऋतूच वानररूपाने आला असावा, असें वाटलें. मारुतीच्या धावाधावीमध्ये वृक्षापासून खाली पडलेल्या नाना प्रकारच्या पुष्पांनी भरून गेलेली तेथील भूमि

तरस्विना ते तरवस्तरसा बहु कम्पिताः ।
कुसुमानि विचित्राणि ससृजुः कपिना तदा १४
निर्धूतपत्रशिखराः शीर्णपुष्पफलद्रुमाः ।
निक्षिप्तवस्त्राभरणा धूर्ता इव पराजिताः १५
हनूमता वेगवता कम्पितास्ते नगोत्तमाः ।
पुष्पपत्रफलान्याशु मुमुचुः फलशालिनः १६
विहङ्गसङ्घैर्हीनास्ते स्कन्धमात्राश्रया द्रुमाः ।
बभूवुरगमाः सर्वे मारुतेन विनिर्धुताः १७
विधूतकेशी युवतिर्यथा मृदितवर्णका ।
निपीतशुभदन्तोष्ठी नखैर्दन्तैश्च विक्षता १८
तथा लाङ्गूलहस्तैस्तु चरणाभ्यां च मर्दिता ।
तथैवाशोकवनिका प्रभग्नवनपादपा १९

---

अलंकार घातलेल्या तरुण स्त्रीप्रमाणे चमकू लागलो तो बलाढ्य कपि संचार करूं लागला असता, त्याच्या हालचालींच्या वेगाने तेथील वृक्ष कंपित झाले व ते चित्रविचित्र पुष्पांचा वर्षाव करू लागले आणि शेंड्यांचीं पानें झडून जाऊन, पुष्पें व फलेंही ज्यांचीं झडून गेलेली आहेत, असे तेथील वृक्ष हे जुगारीमध्ये हरल्यामुळे वस्त्रें व भूषणें शरिरापासून बाजूस काढून ठेविलेल्या जुगाऱ्याप्रमाणे दिसूं लागले (११-१५)

तेथे फलांनी भरलेले उत्कृष्ट वृक्ष वेगवान् हनुमानाच्या गतीमुळे कंपित झाले व त्यांनी एकदम पुष्पांचा, पानांचा व फलांचा त्याग केला आणि वायुपुत्र हनुमानाने कंपित केलेल्या त्या सर्वही वृक्षांचा त्यावरील पक्षिगण नाहीसा झाल्यामुळे नुसतीं खोडेंच तेथे दिसू लागलीं जिच्या अंगाला लाविलेली उटी पुसून गेलेली आहे, जिचे दांत शुभ्र असून, जिच्या अधरोष्ठाचें पान केलेले आहे व सुरत क्रीडेच्या बहरांत जिला नखांनी व दातांनी क्षतें पडलेलीं आहेत, अशी केश अस्ताव्यस्त झालेली तरुण स्त्री ज्याप्रमाणे दिसत असते त्याप्रमाणे आतील वृक्ष हनुमन्ताचें पुच्छ, हस्त आणि पाद यांच्या आघातानें ती मोडून पडून, अशोकवनिका अगदी उदास व अस्ताव्यस्त दिसू लागली पर्जन्यकालामध्ये वायु आप-

महालतानां दामानि व्यधमत्तरसा कपिः ।
यथा प्रावृषि वेगेन मेघजालानि मारुतः २०
स तत्र मणिभूमीश्च राजतीश्च मनोरमाः ।
तथा काञ्चनभूमीश्च विचरन्ददृशे कपिः २१
वापीश्च विविधाकाराः पूर्णाः परमवारिणा ।
महार्हैर्मणिसोपानैरुपपन्नास्ततस्ततः २२
मुक्ताप्रवालसिकताः स्फाटिकान्तरकुट्टिमाः ।
काञ्चनैस्तरुभिश्चित्रैस्तीरजैरुपशोभिताः २३
बुद्धपद्मोत्पलवनाश्चक्रवाकोपशोभिताः ।
नत्यूहरुतसंघुष्टा हंससारसनादिताः २४
दीर्घाभिर्द्रुमयुक्ताभिः सरिद्भिश्च समन्ततः ।
अमृतोपमतोयाभिः शिवाभिरुपसंस्कृताः २५
लताशतैरवतताः संतानकुसुमावृताः ।
नानागुल्मावृतवनाः करवीरकृतान्तराः २६

---

त्या वेगाने ज्याप्रमाण अभ्रपटले इतस्तत उडवून देतो, त्याप्रमाणे मोठ्यामोठ्या लताचे मंडप वगैरे त्या कपीने आपल्या वेगाने उडवून दिले. (१९-२०)

त्या वनामध्ये संचार करता करता रौप्यमय, सुवर्णमय व रत्नमय असलेली अनेक मनोहर स्थलें त्या कपीस दिसलीं. त्याचप्रमाणे नाना प्रकारच्या आकृतीच्या उत्कृष्ट पाण्याने भरलेल्या आणि ठिकठिकाणी मोठ्या मोठ्या मूल्यवान् रत्नाच्या पायऱ्या असलेल्या वापींही त्याने अवलोकन केल्या. त्या वापीतील वाळू मोत्याची व पोवळ्याची होती, आतील फरशी स्फटिकाची होती व त्याचें तीरावरील चित्रविचित्र सुवर्णवृक्षांनी त्यांना शोभा आलेली होती त्यामध्ये नाना प्रकारचे कमलसमुदाय फुलून गेले होते. चक्रवाक पक्ष्यांनी त्यांना शोभा आणलेली होती. पाणकोंबडे, हंस व सारस पक्षी यांच्या ध्वनाने त्या वापी नादित झालेल्या होत्या. वृक्षयुक्त, दीर्घ आणि अमृततुल्य पाण्याने परिपूर्ण भरलेल्या अशा पवित्र नद्यांनी त्यांना चहूंबाजूंनी वेढून टाकले होते. शेकडो लता त्यावर पसरलेल्या होत्या. कल्पवृक्षाच्या पुष्पांनी त्या आच्छादलेल्या होत्या. नानाप्रकार-

ततोऽम्बुधरसंकाशं प्रवृद्धशिखरं गिरिम् ।
विचित्रकूटं कूटैश्च सर्वतः परिवारितम् २७
शिलागृहैरवततं नानावृक्षसमावृतम् ।
ददर्श कपिशार्दूलो रम्यं जगति पर्वतम् २८
ददर्श च नगात्तस्मान्नदीं निपतितां कपिः ।
अङ्कादिव समुत्पत्य प्रियस्य पतितां प्रियाम् २९
जलेन पतितां ग्रैश्च पादपैरुपशोभिताम् ।
वार्यमाणामिव क्रुद्धां प्रमदां प्रियबन्धुभिः ३०
पुनरावृत्ततोयां च ददर्श स महाकपिः ।
प्रसन्नामिव कान्तस्य कान्तां पुनरुपस्थिताम् ३१
तस्यादूरात्स पद्मिन्यो नानाद्विजगणायुताः ।
ददर्श कपिशार्दूलो हनूमान्मारुतात्मजः ३२

---

त्या आच्छादनानी त्यातील उदक आच्छादलेलें होतें आणि त्यात मधूनमधून रोवलींचीहि पुष्पे होतीं, ( २१–२६ )

यानंतर मोठमोठीं शिखरें असलेला असा विचित्रकूट पर्वत त्या वानरश्रेष्ठ हनुमानास तेथे दिसला. तो दिसण्यात मेघासारखा असून, त्याचे सर्व बाजूंनी शिखरें होतीं. त्याच्यावर जिकडेतिकडे शिलाचीं गृहें होतीं व नाना प्रकारच्या वृक्षांनी तो आच्छादिला गेला होता. तो पर्वत जगतामध्ये अत्यंत रम्य असा होता. आपल्या प्रियकरावर रागावून, एखादी स्त्री ज्याप्रमाणे त्या रागात भूमीवर जाऊन झोपते, त्याप्रमाणे दिसणारी व त्या पर्वतावरून निघालेली अशी एक नदी हनुमानानें तेथे पाहिली. दुसऱ्या एका नदीच्या काठच्या वृक्षाचे शेंडे पाण्यात जाऊन बुडलेले होते व ती नदी, एखादी तरुण स्त्री आपल्या पतीवर रागावून जात आहे व तिचे बाधव तिचें निवारण करीत आहेत, अशा तरुण स्त्रीप्रमाणे दिसत होती. त्या नदीचे पाण्यास वृक्षाचे शेंड्याची वगैरे आडकाठी नव्हती, यामुळे त्या नदीचें पाणी परत फिरल्याप्रमाणे झालें होतें. त्यामुळे प्रथमतः रागावून निघालेली, परंतु मागून प्रसन्न होऊन पतीचेजवळ आलेली स्त्री जशी दिसते, त्याप्रमाणे ती नदी त्या महाकपीस दिसली. ( २७–३१ )

कृत्रिमां दीर्घिकां चापि पूर्णां शीतेन वारिणा।
मणिप्रवरसोपानां मुक्तासिकतशोभिताम् ३३
विविधैर्मृगसङ्घैश्च विचित्रां चित्रकाननाम्।
प्रासादैः सुमहद्भिश्च निर्मितैर्विश्वकर्मणा ३४
काननैः कृत्रिमैश्चापि सर्वतः समलंकृताम्।
ये केचित्पादपास्तत्र पुष्पोपगफलोपगाः ३५
सच्छत्राः सवितर्दीकाः सर्वे सौवर्णवेदिकाः।
लताप्रतानैर्बहुभिः पर्णैश्च बहुभिर्वृताम् ३६
काञ्चनीं शिंशपामेकां ददर्श स महाकपिः।
वृतां हेममयीभिस्तु वेदिकाभिः समन्ततः ३७
सोऽपश्यद्भूमिभागांश्च नगप्रस्रवणानि च।
सुवर्णवृक्षानपरान्ददर्श शिखिसंनिभान् ३८
तेषां द्रुमाणां प्रभया मेरोरिव महाकपिः।

त्या पर्वतासमीपच नाना प्रकारच्या पक्ष्यांचे थवे असलेला सरोवरें त्या कपिश्रेष्ठ वायुपुत्र हनुमानास दिसलीं. त्याचप्रमाणे थंडगार जल परिपूर्ण भरून ठेवलेली अशी एक वापीही तेथे त्याने पाहिली. त्या वापीच्या पायऱ्या उत्कृष्ट रत्नांच्या केलेल्या होत्या व मोत्यांच्या वाळूने ती सुशोभित झालेली होती. तींतली नाना प्रकारचे पशूंचे समुदाय असल्यामुळे ती फार मोहक दिसत होती तिच्या चहू बाजूस चित्रविचित्र वनें होतीं आणि विश्वकर्म्याने निर्माण केलेल्या प्रचंड राजवाड्यांनी व कृत्रिम वनांनीही ती सर्व बाजूंनी अलंकृत झालेली होती तेथे जे काही वृक्ष होते, ते सर्व पुष्पांनी व फलांनी भरलेले होते. त्यांचा आकार छत्राप्रमाणे होता आणि त्या सर्वांनाही खाली मोठे मोठे रुप्याचे व नंतर त्यावर सोन्याचे असे पार बांधलेले होते, असंख्य वेलींनी व असंख्य पत्रांनी आच्छादित केलेला आणि सभोवती सुवर्णमय पारांनी वेढून टाकलेला असा एक सुवर्ण वर्णाचा शिंशपावृक्ष म्हणजे शिसवीचा वृक्ष त्या महाकपीने पाहिला व त्याचप्रमाणे तेथील भूप्रदेश, पर्वतावरील जलप्रवाह आणि अग्नीसारखे उज्ज्वल दिसणारे असे दुसरेही सुवर्णवृक्ष त्याने तेथे पाहिले. ( ३१-३८ )

अमन्यत तदा वीरः काञ्चनोऽस्मीति सर्वतः ३९
तान्काञ्चनान्वृक्षगणान्मारुतेन प्रकम्पितान् ।
किङ्किणीशतनिर्घोषान्दृष्ट्वा विस्मयमागमत् ४०
सुपुष्पिताग्रान्रुचिरांस्तरुणाङ्कुरपल्लवान् ।
तामारुह्य महावेगः शिंशपां पर्णसंवृताम् ४१
इतो द्रक्ष्यामि वैदेहीं रामदर्शनलालसाम् ।
इतश्चेतश्च दुःखार्तां संपतन्तीं यदृच्छया ४२
अशोकवनिका चेयं दृढं रम्या दुरात्मनः ।
चन्दनैश्चम्पकैश्चापि बकुलैश्च विभूषिता ४३
इयं च नलिनी रम्या द्विजसङ्घनिषेविता ।
इमां सा राजमहिषी नूनमेष्यति जानकी ४४
सा रामा राजमहिषी राघवस्य प्रिया सदा ।

मेरुपर्वताच्या प्रभेप्रमाणे असलेल्या त्या वृक्षाच्या प्रभेमुळे त्या वीर महाकपि हनुमानास आपले सर्व शरीर सर्वतोपरी सुवर्णमयच आहे, असे वाटू लागले स्वाभाविकपणेच फले याच लहान लहान घटा ज्यांना आहेत, असे सुवर्णाचे वृक्षसमुदाय वाऱ्याने हलत होते आणि म्हणूनच ते शेकडो घंटानादांनी युक्त झालेले आहेत, असे पाहून त्याला आश्चर्य वाटले; कारण सुवर्णमय वृक्षांचे समूह रम्य दिसत होते. त्यांचे शेंडे प्रफुल्लित होते व त्यांना कोमल अंकुर व पालवी फुटलेली होती. असो. सुवर्णपानांनी आच्छादिलेल्या त्या शोभायमान अशा शिसवीच्या वृक्षावर तो महावेगवान् हनुमान् चढला आणि मनामध्ये म्हणाला. ( ३९-४१ )

"रामदर्शनाविषयी आतुर झालेली व म्हणून अत्यंत दुःखामुळे संतप्त झालेली विदेहराजकन्या सीता कदाचित् या बाजूला स्वेच्छेने इकडेतिकडे हिंडत असेल व ती माझ्या दृष्टीस पडेल. त्या दुरात्म्या रावणाचें हें अशोकवन अत्यंत रम्य असून चंदन, चंपक व बकुल वृक्ष यांनी त्यास शोभा आणली आहे आणि त्यात पक्ष्यांचे समूहांनी आश्रय केलेले, असें हें रम्य सरोवरही आहे. म्हणून ती राजपत्नी जानकी निःसंशय या सरोवराकडे येईल. ( ३९-४४ )

वनसंचारकुशला ध्रुवमेष्यति जानकी ४५
अथवा मृगशावाक्षी वनस्यास्य विचक्षणा ।
वनमेष्यति साचेह रामचिन्तासुकर्शिता ४६
रामशोकाभिसंतप्ता सा देवी वामलोचना ।
वनवासरता नित्यमेष्यते वनचारिणी ४७
वनेचराणां सततं नूनं स्पृहयते पुरा ।
रामस्य दयिता भार्या जनकस्य सुता सती ४८
संध्याकालमनाः श्यामा ध्रुवमेष्यति जानकी ।
नदीं चेमां शुभजलां संध्यार्थे वरवर्णिनी ४९
तस्याश्चाप्यनुरूपेयमशोकवनिका शुभा ।
शुभायाः पार्थिवेन्द्रस्य पत्नी रामस्य संमता ५०
यदि जीवति सा देवी ताराधिपनिभानना ।
आगमिष्यति सावश्यमिमां शीतजलां नदीम् ५१

रामाला सर्व काल प्रिय असणारी परंतु सांप्रत त्याचा वियोग झालेला तो राजपत्नी जानकी इला वनामध्ये फिरण्याची सवय झाली असल्यामुळे ती निःसंशय मनानें इकडेही येईल. सारांश, हरणाच्या पाडसाप्रमाणे जिचे डोळे आहेत व जी रामाचा ध्यास लागून अत्यंत कृश झालेली आहे, अशी ती सीता आज या वनात शोध करण्यासाठीं कोणी आलें आहे कीं काय, हे पाहण्याच्या इच्छेनें तरी येथे येईल. सुंदर नेत्राची, रामाबरोबर वनवास स्वीकारण्यास तयार व रामाच्या शोकामुळे संतप्त झालेली ती सीतादेवी नित्य वनामध्ये संचार करीत असल्यामुळे नेहमीच इकडे येत असेल. ती जनकाची कन्या, साध्वी रामभार्या हिला पूर्वी नित्य वनांत संचार करणारे मृग वगैरे प्राणी नेहमी पाहण्याची हौस असेल. तसेंच संध्याकाळचें कांहीं कर्म करण्याचे मनात आणून त्याकरिता तरी ती श्रेष्ठ स्त्री जानकी या पवित्र पाणी असलेल्या नदीवर निःसंशय येईल, कारण नृपश्रेष्ठ रामाची जी प्रिय पत्नी तिला सर्वस्वी योग्य, अशी ही शुभ अशोकवनिका आहे. जिचें मुख चंद्राप्रमाणे आल्हादकारक आहे, ती सीतादेवी जर खरोखर जिवंत असेल, तर या शीत जलानें भरलेल्या नदीवर ती राजपत्नी

एवं तु गत्वा हनुमान्महात्मा प्रतीक्षमाणो मनुजेन्द्रपत्नीम् ।
अवेक्षमाणश्च ददर्श सर्वं सुपुष्पिते पर्णघने निलीनः ५२

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चतुर्दशः सर्गः ॥१४॥

पञ्चदश सर्गः । [७६०]

स वीक्षमाणस्तत्रस्थो मार्गमाणश्च मैथिलीम् ।
अवेक्षमाणश्च महीं सर्वां तामन्ववैक्षत १
संतानकलताभिश्च पादपैरुपशोभिताम् ।
दिव्यगन्धरसोपेतां सर्वतः समलंकृताम् २
तां स नन्दनसंकाशां मृगपक्षिभिरावृताम् ।
हर्म्यप्रासादसंबाधां कोकिलाकुलनिःस्वनाम् ३
काञ्चनोत्पलपद्माभिर्वापीभिरुपशोभिताम् ।
बह्वासनकुथोपेतां बहुभूमिगृहायुताम् ४

---

सात्रीने येणारच, असा विचार मनामध्ये करीत सीतेचा शोध करण्यासाठी अशोकवनात गेलेला श्रेष्ठ हनुमान्, तेथील एका दाट पानांनी व फुलांनी भरगच्च भरलेल्या शिंशपावृक्षात दडून बसला व तेथून तो सभोंवार पाहूं लागला, तेव्हा त्याला तेथील सर्व कांही दृष्टीस पडलें. ( ४५–५२ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडांतील चौदावा सर्ग समाप्त झाला ॥ १४ ॥

तो हनुमान् शिंशपावृक्षावर बसून इकडेतिकडे पाहून, सीतेला पाहण्याकरिता खाली पाहूं लागला, तेव्हा तेथील सर्व भूमि त्याने अवलोकन केली. तेथील वृक्षांवर कल्पलता असून, त्यामुळे त्या भूमीला शोभा आलेली होती, सर्वत्र दिव्य गंध आणि रस भरलेला असून, ती भूमी सर्व बाजूंनी शृंगारलेली होती, मृग आणि पक्षी यांनी ती गजबजून गेलेली असून, नंदनवनाप्रमाणे दिसत होती, कोकिलपक्ष्यांचे शब्द तेथील वातावरणात दुमदुमत होते व तेथे मोठमोठ्या इमारती व वाडे यांची खेचाखेच झाली होती; वापींचे भोंवती अनेक प्रकारचीं सुवर्णकमलें असून, त्यांनी तें वन सुशोभित झालेलें होतें अनेक प्रकारचीं आसनें तेथे बसावयासाठी घातलेलीं होतीं व तेथील गृहांना पुष्कळ मजले होते ती भूमि सर्व ऋतूंतील

सर्वर्तुकुसुमै रम्यैः फलवद्भिश्च पादपैः ।
पुष्पितानामशोकानां श्रिया सूर्योदयप्रभाम् ५
प्रदीप्तामिव तत्रस्थो मारुतिः समुदैक्षत ।
निष्पत्रशाखां विहगैः क्रियमाणामिवासकृत् ६
विनिष्पतद्भिः शतशश्चित्रैः पुष्पावतंसकैः ।
समूलपुष्परचितैरशोकैः शोकनाशनैः ७
पुष्पभारातिभारैश्च स्पृशद्भिरिव मेदिनीम् ।
कर्णिकारैः कुसुमितैः किंशुकैश्च सुपुष्पितैः ८
स देशः प्रभया तेषां प्रदीप्त इव सर्वतः ।
पुंनागाः सप्तपर्णाश्च चम्पकोद्दालकास्तथा ९
विवृद्धमूला बहवः शोभन्ते स्म सुपुष्पिताः ।
शातकुम्भनिभाः केचित्केचिदग्निशिखप्रभाः १०
नीलाञ्जननिभाः केचित्तत्राशोकाः सहस्रशः ।

मनोहर पुष्पांनी व प्रफुल्लित वृक्षांनी भरलेली असून प्रफुल्लित अशोकवृक्षाच्या कांतीमुळे तिची प्रभा सूर्यासारखी दिसत होती. ( १–५ )

या अशोकपुष्पाच्या योगाने ती भूमि प्रदीप्त झाल्यासारखी भासत होती. अशा प्रकारचें तें अशोकवन त्या शिशपावृक्षावर बसलेल्या मारुतीस दिसलें. त्यांतील वृक्ष त्यावर बसलेल्या पक्ष्यांमुळे वारंवार पानें व खांद्या यांनी रहित असे होत होते; कारण पुष्पें ज्यांना कर्णभूषणाप्रमाणे शोभा देत होती, असे शेंकडो प्रकारचे पक्षी वारंवार तेथील वृक्षावर येऊन बसत असत व त्यामुळे त्यांची पानें व शाखा आच्छादून जात असत. मुळें व पुष्पें यानी व्याप्त असलेले शोकनाशक अशोक-वृक्ष, पुष्पाचा ज्यांना अतिशय भार झालेला आहे आणि म्हणूनच भूमीला जे स्पर्श करीपर्यंत लवलेले आहेत, असे प्रफुल्लित कर्णिकारवृक्ष आणि प्रफुल्लित पालाश-वृक्ष यानी व्यापलेला तो प्रदेश, त्याच्या प्रभेमुळे सर्व बाजूंनी जसा काही पेटल्या-सारखाच दिसत होता. उंडणी, सातवण, चाफा आणि भोकरी अशा तऱ्हेचे खोल मुळें गेलेले पुष्कळ वृक्ष फुललेले त्या ठिकाणी शोभा देत होते; कांही सुवर्णासारखे उज्ज्वल, कांही अग्नीच्या ज्वालेसारखे देदीप्यमान आणि कांही काजळासारखे

नन्दनं विबुधोद्यानं चित्रं चैत्ररथं यथा ११
अतिवृत्तमिवाचिन्त्यं दिव्यं रम्यश्रिया युतम् ।
द्वितीयमिव चाकाशं पुष्पज्योतिर्गणायुतम् १२
पुष्परत्नशतैश्चित्रं पञ्चमं सागरं यथा ।
सर्वर्तुपुष्पैर्निचितं पादपैर्मधुगन्धिभिः १३
नानानिनादैरुद्यानं रम्यं मृगगणद्विजैः ।
अनेकगन्धप्रवहं पुण्यगन्धं मनोहरम् १४
शैलेन्द्रमिव गन्धाढ्यं द्वितीयं गन्धमादनम् ।
अशोकवनिकायां तु तस्यां वानरपुंगवः १५
स ददर्शाविदूरस्थं चैत्यप्रासादमूर्जितम् ।
मध्ये स्तम्भसहस्रेण स्थितं कैलासपाण्डुरम् १६
प्रवालकृतसोपानं तप्तकाञ्चनवेदिकम् ।
मुष्णन्तमिव चक्षूंषि द्योतमानमिव श्रिया १७

काळेभोर असे हजारो अशोकवृक्ष तेथे होते. अत्यंत रमणीय, दिव्य व कल्पनातीत असें एक उपवन त्या अशोकवनात हनुमानाच्या पाहण्यात आलें तें देवांचें नंदनवन कुबेराचें अद्भुत उपवन चैत्ररथ यांचेही मागें टाकणारें होतें. तेथील पुष्पें ताऱ्याप्रमाणे दिसत असल्यामुळे जणू दुसरें आकाशच की काय, असें दिसत होतें ( ६-१२ )

पुष्परूपी शेकडो रत्नें असलेलें तें अद्भुत वन, पाचवा सागरच का काय, असें भासत होतें. मधुर गंध आणि सर्व काल फुलणारीं पुष्पें असलेल्या वृक्षांनी तें उपवन अगदी खेचून भरलेलें होतें मृगसमुदाय व पक्षी यांच्या नाना प्रकारच्या ध्वनींनी तें उपवन अतिशय रम्य झालेलें होतें, अनेक प्रकारचे सुगंध त्यात पसरलेले होते, त्या उपवनात उत्कृष्ट गंध सुटलेले असून, तें अतिशय रमणीय होतें आणि सुगंधानी भरून गेले असल्यामुळे, तें वन म्हणजे दुसरा पर्वतराज गंधमादनच की काय, असें भासत होतें असो त्या अशोकवनिकेमध्ये त्या वानर-श्रेष्ठ हनुमानाने जवळच एक चिरेबंदी असा भव्य वाडा पाहिला त्याला हजारो खांब होते तो वाडा कैलासपर्वताप्रमाणे श्वेत वर्णाचा होता त्याचे जिने पोव-

निर्मलं प्रांशुभावत्वादुल्लिखन्तमिवाम्बरम् ।
ततो मलिनसंवीतां राक्षसीभिः समावृताम् १८
उपवासकृशां दीनां निःश्वसन्तीं पुनः पुनः ।
ददर्श शुक्लपक्षादौ चन्द्ररेखामिवामलाम् १९
मन्दप्रख्यायमानेन रूपेण रुचिरप्रभाम् ।
पिनद्धां धूमजालेन शिखामिव विभावसोः २०
पीतेनैकेन संवीतां क्लिष्टेनोत्तमवाससा ।
सपङ्कामनलंकारां विपद्मामिव पद्मिनीम् २१
पीडितां दुःखसंतप्तां परिक्षीणां तपस्विनीम् ।
ग्रहेणाङ्गारकेणेव पीडितामिव रोहिणीम् २२
अश्रुपूर्णमुखीं दीनां कृशामनशनेन च ।
शोकध्यानपरां दीनां नित्यं दुःखपरायणाम् २३

---

ज्याचे केलेले होते; शुद्ध सुवर्णाच्या जमिनी त्यात केलेल्या होत्या. आपल्या कांतीने झळकत असल्यामुळे तो पहणाराचे डोळे दिपवीत होता. आणि निर्मळ असून, तसाच उंच असल्यामुळे तो आकाश भेदून चालला आहे की काय, असा दिसत होता. तदनंतर सर्व बाजूंनी राक्षसांनी वेढलेली, मळलेले वस्त्र परिधान केलेली, उपवासाने कृश झाल्यामुळे शुद्ध पक्षाच्या आरंभी असणाऱ्या निर्मल चंद्रकलेप्रमाणे भासत असलेली आणि वारंवार दुःखाचे सुस्कारे टाकीत असलेली दीन सीता त्याच अंतरावर असलेल्या हनुमानाचे दृष्टीस पडली. धुराच्या लोटांनी व्यापलेल्या अग्नीची ज्वाला ज्याप्रमाणे तेजस्वी असूनही अगदी असून नसल्यासारखीच दिसत असते, त्याचप्रमाणे मनोहर अंगकांती असून रत्नाला मागे सारणारी ती सीता मारुतीला नीटशी ओळखता आली नाही. ( १३—२० )

ती एक उंची प्रकारचे पण जीर्ण वस्त्र नेसली असून, तिच्या अंगावर अलंकार नसल्यामुळे ती एखाद्या पंकयुक्त आणि कमलरहित कमलिनीप्रमाणे दिसत होती. त्यामुळे दुःखसंतप्त आणि अतिशय क्षीण झालेली ती बिचारी सीता मंगळ-नामक केतु या ग्रहाने पीडित झालेल्या रोहिणीप्रमाणे दिसत होती. तिचा चेहरा अश्रूंनी भरून गेलेला होता. ती दीनवाणी दिसत असून, उपवासामुळे कृश

प्रियं जनमपश्यन्तीं पश्यन्तीं राक्षसीगणम् ।
स्वगणेन मृगीं हीनां श्वगणेनावृतामिव २४
नीलनागाभया वेण्या जघनं गतयैकया ।
नीलया नीरदापाये वनराज्या महीमिव २५
सुखार्हां दुःखसंतप्तां व्यसनानामकोविदाम् ।
तां विलोक्य विशालाक्षीमधिकं मलिनां कृशाम् २६
तर्कयामास सीतेति कारणैरुपपादिभिः ।
ह्रियमाणा तदा तेन रक्षसा कामरूपिणा २७
यथारूपा हि दृष्टा सा तथारूपेयमङ्गना ।
पूर्णचन्द्राननां सुभ्रूं चारुवृत्तपयोधराम् २८
कुर्वतीं प्रभया देवीं सर्वा वितिमिरा दिशः ।
तां नीलकण्ठीं बिम्बोष्ठीं सुमध्यां सुप्रतिष्ठिताम् २९

झालेली होती, अनाथ झालेली ती सारखी सारखी शोक व कळशी करीत होती व एकसारखा अतिशय दुःख करीत होती. तिला पाहिजे असलेले आवडते असे कोणीच तिच्या दृष्टीस पडत नव्हतें. भोंवतालचा राक्षसस्त्रियांचा समुदायच काय तो दृष्टीस पडत असल्यामुळे मृगाच्या कळपातून चुकून कुत्र्यांचे टोळींत सापडलेल्या हरिणीप्रमाणे तिची स्थिति झाली होती आणि पाठीवरून कटिप्रदेशापर्यंत लोंबत असलेली तिची मागली वेणी नीलवर्ण नागाप्रमाणे दिसत असल्यामुळे ती पर्जन्यकाल संपल्यानंतर नीलवर्ण वनपंक्तीमुळे शोभणाऱ्या भूमीप्रमाणे शोभत होती. जगातील सुखोपभोग घेण्याची योग्यता असूनही ती दुःखसंतप्त, संकटाचा पूर्वी अनुभव नसलेली, विशाल नेत्रांनी आणि पूर्वापेक्षा फारच कृश व मलीन झालेली अशा स्थितीत पाहिल्यावर, हनुमानाने सशयित मनानेच "ही सीताच असावी," असा तर्क केला (२१–२७)

इच्छेप्रमाणे हवे ते रूप धारण करणारा तो रावण तिला घेऊन चालला असतांना ती ज्याप्रमाणे दृष्टीस पडली असेल, तशा प्रकारची ही स्त्री दिसत आहे, असा हनुमानाने तर्क केला. ती देवी उत्कृष्ट भिवया, पूर्ण चंद्राप्रमाणे मुख आणि सुंदर व वर्तुल स्तन यांनी युक्त असून, आपल्या तेजाने सर्व दिशा प्रकाशित करीत

सीतां पद्मपलाशाक्षीं मन्मथस्य रतिं यथा ।
इष्टां सर्वस्य जगतः पूर्णचन्द्रप्रभामिव ३०
भूमौ सुतनुमासीनां नियतामिव तापसीम् ।
निःश्वासबहुलां भीरुं भुजगेन्द्रवधूमिव, ३१
शोकजालेन महता विततेन न राजतीम् ।
संसक्तां धूमजालेन शिखामिव विभावसोः ३२
तां स्मृतीमिव संदिग्धामृद्धिं निपतितामिव ।
विहतामिव च श्रद्धामाशां प्रतिहतामिव ३३
सोपसर्गां यथा सिद्धिं बुद्धिं सकलुषामिव ।
अभूतेनापवादेन कीर्तिं निपतितामिव ३४
रामोपरोधव्यथितां रक्षोगणनिपीडिताम् ।
अबलां मृगशावाक्षीं वीक्षमाणां ततस्ततः ३५

---

होती. गळ्यांतील इंद्रनीलमण्यासारख्या अलंकारान्यः तेजाने तिचा कंठ नीलवर्ण दिसत होता; तिचे ओठ पिकलेल्या तोंडल्याप्रमाणे होते, तिच्या शरीराचा बांधाहि उत्कृष्ट होता. तिचे नेत्र कमलपत्राप्रमाणे विस्तीर्ण असून, मदनाच्या रतीप्रमाणे ती सीता सुंदर दिसत होती. पूर्ण चंद्राच्या तेजासारखी ती सर्व जगताला सुखकर होती. तिच्या शरिराची ठेवण सडपातळ असून, इंद्रियसंयमन केलेल्या तपस्विनीप्रमाणे ती भूमीवर बसली होती; नागराजाच्या पत्नीप्रमाणे ती भयभीत होऊन एकसारखे तोंडातून सुस्कारे टाकीत होती. मोठमोठ्या व चहूकडून पसरलेल्या अशा शोक-जालात सापडल्या कारणाने, ती धुराच्या लोटांत सापडलेल्या अग्नीच्या ज्वाले-प्रमाणे निस्तेज दिसत होती. अर्थाविषयी संदेह असलेली स्मृति, अन्यायाने हरण करून आणलेली संपत्ति, नास्तिक बुद्धीने झाणून पाडिलेली श्रद्धा, निष्फल झालेली आशा, विघ्नाने घेरून टाकलेली सिद्धि, रागद्वेषादिकांनी मलिन झालेली बुद्धि अथवा केवळ असत्याचे अवलंबन करून दिलेल्या दूषणाने झाणून पाड-लेली कीर्ति निष्प्रभ दिसावी, तशी ती दिसत होती. ( २७–३४ )

रामचा वियोग झाल्यामुळे ती दुःखित झालेली होती. जीवनातल्या राक्षस-गणांना तिला त्रासून सोडली होती. हरिणाच्या पाडसासारखे मनोहर डोळे

*वाष्पाम्बुपरिपूर्णेन कृष्णवक्राक्षिपक्ष्मणा ।*
*वदनेनाप्रसन्नेन निःश्वसन्तीं पुनः पुनः* ३६
*मलपङ्कधरां दीनां मण्डनार्हाममण्डिताम् ।*
*प्रभां नक्षत्रराजस्य कालमेघैरिवावृताम्* ३७
*तस्य संदिदिहे बुद्धिस्तथा सीतां निरीक्ष्य च ।*
*आम्नायानामयोगेन विद्यां प्रशिथिलामिव* ३८
*दुःखेन बुबुधे सीतां हनुमाननलंकृताम् ।*
*संस्कारेण यथा हीनां वाचमर्थान्तरं गताम्* ३९
*तां समीक्ष्य विशालाक्षीं राजपुत्रीमनिन्दिताम् ।*
*तर्कयामास सीतेति कारणैरुपपादयन्* ४०
*वैदेह्या यानि चाङ्गेषु तदा रामोऽन्वकीर्तयत् ।*
*तान्याभरणजालानि गात्रशोभीन्यलक्षयत्* ४१

---

असलेली ती अबला इकडेतिकडे पहात होती. डोळे अश्रूंनी परिपूर्ण भरलेले असून, ते काळेभोर व कुटिल पापण्यांनी युक्त होते व तिचा चेहरा अप्रसन्न असून, ती वारंवार सुस्कारे टाकीत होती. तिच्या अंगाला मळ व चिखल लागला असल्याकारणाने सर्व तऱ्हेचे शृंगार घालण्यास योग्य असूनही या वेळी ती शृंगाररहित असल्यामुळे, कृष्णवर्ण मेघांनी झाकून टाकलेल्या चंद्राच्या तेजाप्रमाणे ती दीन दिसत होती. अभ्यास नसल्यामुळे फारच शिथिल झालेली विद्या जशी अस्ताव्यस्त दिसते, त्याप्रमाणे त्या सीतेला अस्ताव्यस्त पाहून, आपण ऐकिलेली सीता हीच आहे किंवा काय, अशी मारुतीच्या मनात शंका आली; परंतु पदच्छेदादि संस्कार नसलेली आणि निरक्षेप अर्थाशिवाय अन्यार्थाची वाचक असलेली उक्ति ज्याप्रमाणे मोठ्या कष्टाने ध्यानात येते, त्याप्रमाणे अलंकार व नीटनेटकेपणा नसलेल्या त्या सीतेचा ओळख पटण्यास हनुमंताला फार कष्ट पडले. सारांश, विशाल नेत्र असलेल्या या निर्दोष राजकन्येला पाहिल्यावर, अनेक प्रमाणे विचारास घेऊन निश्चय करणाऱ्या हनुमानाने "हा सीताच असावी," असा शेवटी तर्क केला. (३५-४०)

विदेहराजकन्येच्या अंगावर जी भूषणे आहेत, असें रामाने त्याला सांगितलें होतें, तीच शरीराला शोभा देणारी भूषणें तिचे हनुमन्ताच्या दृष्टीस पडली, तेव्हा

सुकृतौ कर्णवेष्टौ च श्वदंष्ट्रौ च सुसंस्थितौ ।
मणिविद्रुमचित्राणि हस्तेष्वाभरणानि च ४२
श्यामानि चिरयुक्तत्वात्तथा संस्थानवन्ति च ।
तान्येवैतानि मन्येऽहं यानि रामोऽन्वकीर्तयत् ४३
तत्र यान्यवहीनानि तान्यहं नोपलक्षये ।
यान्यस्या नावहीनानि तानीमानि न संशयः ४४
पीतं कनकपट्टाभं स्रस्तं तद्वसनं शुभम् ।
उत्तरीयं नगासक्तं तदा दृष्टं प्लवङ्गमैः ४५
भूषणानि च मुख्यानि दृष्टानि धरणीतले ।
अनयैवापविद्धानि स्वनवन्ति महान्ति च ४६
इदं चिरगृहीतत्वाद्वसनं क्लिष्टवत्तरम् ।
तथाप्यनूनं तद्वर्णं तथा श्रीमद्यथेतरत् ४७

तो मनामध्ये म्हणाला, " उत्तम रीतीने तयार केलेलीं कुंडलें, चांगले डौलदार श्वाप आणि हिरे पोवळीं बसविल्यामुळे चित्रविचित्र दिसत असलेलीं हस्तभूषणें हे अलंकार फार दिवस साफसूफ केले नसल्यामुळे जरी काळे पडलेले आहेत, तरी त्यांचा आकार तसाच कायम असल्यामुळे, रामाने जीं भूषणें सांगितलीं, तींच हीं आहेत, असें मला वाटतें. रामाने सांगितलेल्या अलंकारांपैकीं जे मार्गामध्ये पडले, ते माझ्या दृष्टीस पडत नाहीत; परंतु, मार्गामध्ये सीतेच्या अंगावरून जीं भूषणें गळून पडलेलीं नाहीत, तीं हींच याविषयीं बिलकुल संशय नाहीं. ( सुवर्ण-तंतूंनी निर्माण केलेल्या ) जरीच्या वस्त्राप्रमाणे सीतेचें गळून पडलेलें पीतवर्ण व शुभ उत्तरीय वस्त्र वृक्षाला अडकलेलें असतां त्या वेळीं वानरांनी अवलोकन केलें होतें आणि त्याचप्रमाणे हिलाच रावण नेत असतांना वाटेत टाकलेलीं मोठीं-मोठीं ध्वनियुक्त उत्कृष्ट भूषणेंही भूतलावर पडलेलीं त्यांनी पाहिलीं होतीं. हिच्या अंगावर असलेलें वस्त्र धारण करून पुष्कळ दिवस झाले असल्यामुळे याची जरी फारच दुर्दशा झालेली आहे, तरी याचा वर्ण जवळ जवळ त्याच्याचसारखा असून, आम्हाला सापडलेल्या तिच्या दुसऱ्या वस्त्राप्रमाणेच हें दिसत आहे. ( ४२-४७ )

❀

इयं कनकवर्णाङ्गी रामस्य महिषी प्रिया ।
प्रणष्टापि सती यस्य मनसो न प्रणश्यति ४८
इयं सा यत्कृते रामश्चतुर्भिरिह तप्यते ।
कारुण्येनानृशंस्येन शोकेन मदनेन च ४९
स्त्री प्रणष्टेति कारुण्यादाश्रितेत्यानृशंस्यतः ।
पत्नी नष्टेति शोकेन प्रियेति मदनेन च ५०
तस्या देव्या यथा रूपमङ्गप्रत्यङ्गसौष्ठवम् ।
रामस्य च यथा रूपं तस्येयमसितेक्षणा ५१
अस्या देव्या मनस्तस्मिंस्तस्य चास्यां प्रतिष्ठितम् ।
तेनेयं स च धर्मात्मा मुहूर्तमपि जीवति ५२
दुष्करं कृतवान्रामो हीनो यदनया प्रभुः ।
धारयत्यात्मनो देहं न शोकेनावसीदति ५३

रोजच्या दृष्टीआड झाली असताही जी रामाच्या मनातून नाहीशी होत नाही तीच ही सुवर्णवर्णाची शरीरकांती असलेली रामाची आवडती पत्नी होय, जिच्यासाठी कारुण्य, आनृशंस्य, शोक आणि मदनबाधा या चोहोंनी राम अगदी जळत आहे, तीच ही सीता होय. तिला दुसऱ्याने दुःख दिले, म्हणून कारुण्याने तो तप्त झाला आहे. आपल्या आश्रयाला ती असूनही तिचें रक्षण आपले हातून झालें नाही, म्हणून आश्रिताचें संरक्षण करण्याचें कर्तव्य झालें नाही या विचाराने त्याला काही सुचेनासें झालें आहे, आपली धर्मपत्नी नाहीशी झाली, म्हणून शोकाने तो क्षुब्ध झाला आहे आणि आपली प्रियाच नाहीशी झाली, म्हणून पूर्वी तिच्यासह अनुभवलेल्या उपभोगाचें एकसारखें त्याला स्मरण होत असल्यामुळे, उत्पन्न झालेल्या मदनाच्या व्याधीने त्याला फारच ताप झालेला आहे. काळेभोर डोळे असलेली ही स्त्री त्या रामाचीच पत्नी असून, रामाचें व त्याच्या पत्नीचें रूप आणि लहानमोठ्या अवयवांचेंही सौंदर्य हीं अगदी एकसारखींच आहेत. या देवीचें मन त्याचे ठिकाणीं आसक्त झालेलें असून, त्याचेंही मन हिचे ठिकाणीं भिडून गेलेलें आहे आणि म्हणूनच त्याच्यावाचून ही व हिच्यावाचून तो धर्मात्मा क्षणभरही जिवंत राहणें शक्य नाही, हें मला दिसत आहे. हिचा वियोग झाला असूनही,

एवं सीतां तथा दृष्ट्वा हृष्टः पवनसंभवः ।
जगाम मनसा रामं प्रशशंस च तं प्रभुम् ५४

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चदशः सर्गः ॥१५॥

षोडशः सर्गः । [८३४]

प्रशस्य तु प्रशस्तव्यां सीतां तां हरिपुङ्गवः ।
गुणाभिरामं रामं च पुनश्चिन्तापरोऽभवत् १
स मुहूर्तमिव ध्यात्वा बाष्पपर्याकुलेक्षणः ।
सीतामाश्रित्य तेजस्वी हनूमान्विललाप ह २
मान्या गुरुविनीतस्य लक्ष्मणस्य गुरुप्रिया ।
यदि सीता हि दुःखार्ता कालो हि दुरतिक्रमः ३
रामस्य व्यवसायज्ञा लक्ष्मणस्य च धीमतः ।
नात्यर्थं क्षुभ्यते देवी गङ्गेव जलदागमे ४

---

शोक करीत मृत्युमुखीं न पडता रामाने आपला देह जिवंत ठेवला आहे, हे त्या प्रभूने जगातले एक दुर्घटच कर्म केलें आहे" याप्रमाणे सीतेला पाहताच वायुपुत्र हनुमान् आनंदित झाला आणि रामाचें स्मरण करून, त्या प्रभूची प्रशंसा करूं लागला. ( ४७-५४ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणमहाकाव्यांतील आदिकाव्यातील सुंदर-कांडापैकी पंधरावा सर्ग समाप्त झाला ॥ १५ ॥

सर्वांच्या प्रशंसेस सर्वथा योग्य असलेली ती सीता आणि गुणामुळे सुंदर असलेला राम याची स्तुति करून, तो वानरश्रेष्ठ हनुमान् प्राप्त परिस्थिति लक्षात घेताच पुनः चिंतातुर झाला. सीतेसंबंधाने क्षणभर विचार घेताक्षणाच त्या हनुमानाचे नेत्र अश्रूंनी भरून आले आणि तो स्वतः तेजस्वी असूनही तेथे विलाप करूं लागला. तो म्हणाला, " गुरुजनांनी सुशिक्षित केलेल्या लक्ष्मणाला गुरुपत्नी म्हणून मान्य असलेली सीता ही ज्याअर्थी दुःखाने अशी पीडित झाली आहे, त्या अर्थी कालाचें उल्लंघन होणें दुर्घट आहे, हींच गोष्ट खरी. राम आणि विचारी बुद्धीचा लक्ष्मण या दोघांचाही पराक्रम पूर्णपणें माहीत असल्यामुळे ही सीतादेवी पावसाळ्यातील पुरामुळे क्षुब्ध होणाऱ्या गंगेप्रमाणे बेताबातानेच क्षुब्ध

तुल्यशीलवयोवृत्तां तुल्याभिजनलक्षणाम् ।
राघवोऽर्हति वैदेहीं तं चेयमसितेक्षणा ५
तां दृष्ट्वा नवहेमाभां लोककान्तामिव श्रियम् ।
जगाम मनसा रामं वचनं चेदमब्रवीत् ६
अस्या हेतोर्विशालाक्ष्या हतो वाली महाबलः ।
रावणप्रतिमो वीर्ये कबन्धश्च निपातितः ७
विराधश्च हतः संख्ये राक्षसो भीमविक्रमः ।
वने रामेण विक्रम्य महेन्द्रेणेव शम्बरः ८
चतुर्दश सहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् ।
निहतानि जनस्थाने शरैरग्निशिखोपमैः ९
खरश्च निहतः संख्ये त्रिशिराश्च निपातितः ।
दूषणश्च महातेजा रामेण विदितात्मना १०
ऐश्वर्यं वानराणां च दुर्लभं वालिपालितम् ।
अस्या निमित्ते सुग्रीवः प्राप्तवाँल्लोकविश्रुतः ११

झाली आहे. शील, वय, आचरण, कुल व इतर शुभ लक्षणें या बाबतींत रामा-प्रमाणे असलेली ही विदेहराजकन्या रामालाच योग्य असून, तोही या कृष्ण नेत्राच्या सीतेला सर्वथा योग्य आहे" (१-५)

तदनंतर सर्व जगतातील सौंदर्यसंपन्न लक्ष्मीच की काय अशी दिसणारी व तप्त सुवर्णासारखी कांती असलेली सीता पाहून हनुमानाला पुन्हा रामाचें स्मरण झालें आणि तो म्हणाला, "विशाल नेत्रयुक्त असलेल्या या सीतेकरताच महा-बलाढ्य वालीचा आणि बलामध्यें रावणाची बरोबरी करणाऱ्या कबंधाचा वध झाला. इंद्राने ज्याप्रमाणे शंबरासुराचा वध केला, त्याप्रमाणे रामाने वनामध्यें अनेक पराक्रम करून, भयंकर पराक्रमी विराध राक्षसाचा समरांगणामध्ये हिच्या-करता वध केला. भयंकर पराक्रम करणारे चौदा हजार राक्षस जनस्थानामध्यें अग्निज्वालेसारख्या तीक्ष्ण बाणांनी रामाच्या हातून हिच्याकरताच मारले गेले. त्याचप्रमाणे आत्मज्ञानी रामाने युद्धामध्ये खर, महातेजस्वी दूषण आणि त्रिशिरा यांचा निःपात केला आणि जगविख्यात सुग्रीवलाही वालीने रक्षिलेलें वानरांचें

सागरश्च मयाक्रान्तः श्रीमान्नदनदीपतिः ।
अस्या हेतोर्विशालाक्ष्याः पुरी चेयं निरीक्षिता १२
यदि रामः समुद्रान्तां मेदिनीं परिवर्तयेत् ।
अस्याः कृते जगच्चापि युक्तमित्येव मे मतिः १३
राज्यं वा त्रिषु लोकेषु सीता वा जनकात्मजा ।
त्रैलोक्यराज्यं सकलं सीताया नाप्नुयात्कलाम् १४
इयं सा धर्मशीलस्य जनकस्य महात्मनः ।
सुता मैथिलराजस्य सीता भर्तृदृढव्रता १५
उत्थिता मेदिनीं भित्त्वा क्षेत्रे हलमुखक्षते ।
पद्मरेणुनिभैः कीर्णा शुभैः केदारपांसुभिः १६
विक्रान्तस्यार्यशीलस्य संयुगेष्वनिवर्तिनः ।
स्नुषा दशरथस्यैषा ज्येष्ठा राज्ञो यशस्विनी १७
धर्मज्ञस्य कृतज्ञस्य रामस्य विदितात्मनः ।
इयं सा दयिता भार्या राक्षसीवशमागता १८

---

दुर्लभ ऐश्वर्य प्राप्त होण्यास हीच कारणीभूत झाली. या विशालनयना सीतेकरितां मी मोठमोठे नद व नद्या यांचा अधिपति जो श्रीमान् सागर त्याचें उल्लंघन करून ही लंकानगरी अवलोकन केली. (८-१२)

रामानें हिच्याकरितां केवळ समुद्रपर्यंत पृथ्वीच नव्हे, परंतु सर्व ब्रह्मांड जरी उलथ-पालथ केलें, तरी तें योग्यच आहे, असें मला वाटतें. त्रैलोक्याचें आधिपत्य आणि जनककन्या सीता या दोहोंची जर तुलना करून पाहिली, तर त्रैलोक्याचें संपूर्ण राज्य सीतेच्या एका कलेलाही पुरणार नाहीं. मिथिलाधिपति महात्म्या धर्मशील जनकराजाची आणि पतिव्रता म्हणून प्रसिद्ध असलेली ही तीच ही, सीता, ही नांगराच्या फाळानें चिरलेल्या शेतामध्यें, कमल-परागतुल्य अशा भूमीच्या कणांनीं भरून गेलेली होती व ती भूमीचा भेद करून वर निघाली आणि पुढें पराक्रमी, सुशील आणि संग्रामामध्यें परत न फिरणाऱ्या दशरथराजाची ही यशस्विनी ज्येष्ठ स्नुषा झाली. सारांश, जगद्विख्यात, कृतज्ञ व धर्मज्ञ रामाची ती ही प्रिय भार्या सांप्रत राक्षसस्त्रियांच्या तावडींत सापडल

सर्वान्भोगान्परित्यज्य भर्तृस्नेहबलात्कृता ।
अचिन्तयित्वा कष्टानि प्रविष्टा निर्जनं वनम् १९
संतुष्टा फलमूलेन भर्तृशुश्रूषणापरा ।
या परां भजते प्रीतिं वनेऽपि भवने यथा २०
सेयं कनकवर्णाङ्गी नित्यं सुस्मितभाषिणी ।
सहते यातनामेतामनर्थानामभागिनी २१
इमां तु शीलसंपन्नां द्रष्टुमिच्छति राघवः ।
रावणेन प्रमथितां प्रपामिव पिपासितः २२
अस्या नूनं पुनर्लाभाद्राघवः प्रीतिमेष्यति ।
राजा राज्यपरिभ्रष्टः पुनः प्राप्येव मेदिनीम् २३
कामभोगैः परित्यक्तां हीना बन्धुजनेन च ।
धारयत्यात्मनो देहं तत्समागमकाङ्क्षिणी २४

आहे. ( १३—१८ )

भर्तृप्रेमाचें प्रबल उत्तेजन मिळाल्यामुळे पुढील दुःखाचा विचार न करतां सर्व भोग्य वस्तूंचा त्याग करून, ती रामाबरोबर निर्जन वनामध्ये आली. इतकेंच नव्हे तर, भर्त्याच्या शुश्रूषेंत नेहमी तत्पर राहिली. फलमूलावर संतुष्ट राहूं लागलेल्या या सीतेला वनामध्येही अगदीं आपल्या घरांत असल्याप्रमाणें आनंद वाटत होता, परंतु अशी ही सुवर्णासारख्या शरीरकांतीची व नेहमीं हास्यपूर्वक मधुर भाषण करणारी सीता वास्तविक संकटें भोगण्यास पात्र नसतानाही, सांप्रत येथील यातना सहन करीत आहे. रावणानें जरी हिला धरून नेलें आहे, तरी ही शीलसंपन्न असल्यामुळे, एखादा तहानेलेला पुरुष ज्याप्रमाणें पाणपोई पहाण्याची इच्छा करीत असतो, त्याप्रमाणें रघुवंशज राम हिच्या दर्शनाची इच्छा करीत आहे. ( १९—२२ )

राज्यापासून भ्रष्ट झालेल्या राजाला ज्याप्रमाणें पुनरपि पृथ्वीचें राज्य प्राप्त झाल्यावर आनंद होतो, त्याप्रमाणें रामाला ही सीता जर पुनः मिळाली, तर त्याला खरोखर आनंद होईल. सर्व प्रकारच्या भोग्य वस्तूंनी सोडलेली आणि बंधुजनांचाही वियोग झालेली ही सीता, आपल्या त्या रामाचा फिरून समागम होईल,

नैषा पश्यति राक्षस्यो नेमान्पुष्पफलद्रुमान् ।
एकस्थहृदया नूनं राममेवानुपश्यति २५
भर्ता नाम परं नार्याः शोभनं भूषणादपि ।
एषा हि रहिता तेन शोभनार्हा न शोभते २६
दुष्करं कुरुते रामो हीनो यदनया प्रभुः ।
धारयत्यात्मनो देहं न दुःखेनावसीदति २७
इमामसितकेशान्तां शतपत्रनिभेक्षणाम् ।
सुखार्हां दुःखितां ज्ञात्वा ममापि व्यथितं मनः २८
क्षितिक्षमा पुष्करसंनिभेक्षणा या रक्षिता राघवलक्ष्मणाभ्याम् ।
सा राक्षसीभिर्विकृतेक्षणाभिः संरक्ष्यते संप्रति वृक्षमूले २९
हिमहतनलिनीव नष्टशोभा व्यसनपरम्परया निपीड्यमाना ।
सहचररहितेव चक्रवाकी जनकसुता कृपणां दशां प्रपन्ना ३०

---

या आशेवर आपला देह धारण करीत आहे. येथल्या या राक्षसी आणि पुष्पफलांनी भरलेले हे वृक्ष हिच्या दृष्टीस पडत नाहीत; कारण, एका रामाकडेच हिचें चित्त लागलेलें आहे आणि त्यामुळे सर्व काळ खरोखर केवळ रामालाच ही पहात असते. सुवर्णादि अलंकारापेक्षाही भर्ता हेंच स्त्रियांचें उत्कृष्ट भूषण आहे आणि म्हणूनच भर्त्याचा वियोग झालेली ही सीता, भूषणें वापरून सुशोभित होण्यास पात्र असूनही तशी शोभत नाही. हिचा वियोग झाला असूनही, राम दुःखानें नष्ट न होतां आपला देह धारण करीत आहे, हे त्या प्रभूच्या हातून खरोखर मोठें दुर्घटच कर्म होत आहे कारण, सर्व केस काळेभोर असलेली आणि कमलपत्रासारख्या विशाल नेत्रांची ही सीता सदैव सुख भोगण्यालाच पात्र असूनही आता अशी दुःखित झाली आहे, असें समजल्यामुळे माझ्याही मनाला दुःख झालें आहे. ( २३–२८ )

पृथ्वीसारखी क्षमावृत्ति आणि कमलासारखे नेत्र असलेल्या ज्या सीतेचें रामलक्ष्मणांनी रक्षण केलें, तिचें रक्षण सांप्रत वृक्षाच्या मुळाशीं या अक्राळविक्राळ मुद्रा असलेल्या राक्षसस्त्रिया करीत आहेत. ( २९ )

थंडीचा कडाका पडल्यामुळे सौंदर्यहीन झालेल्या कमलिनीप्रमाणें आणि

अस्या हि पुष्पावनताग्रशाखाः शोकं दृढं वै जनयन्त्यशोकाः ।
हिमव्यपायेन च शीतरश्मिरभ्युत्थितो नैकसहस्ररश्मिः ३१
इत्येवमर्थं कपिरन्ववेक्ष्य सीतेयमित्येव तु जातबुद्धिः ।
संश्रित्य तस्मिन्निषसाद वृक्षे बली हरीणामृषभस्तरस्वी ३२

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षोडशः सर्गः ॥ १६ ॥

सप्तदशः सर्गः । [८४.]

ततः कुमुदखण्डाभो निर्मलं निर्मलोदयः ।
प्रजगाम नभश्चन्द्रो हंसो नीलमिवोदकम् १
साचिव्यमिव कुर्वन्स प्रभया निर्मलप्रभः ।
चन्द्रमा रश्मिभिः शीतैः सिषेवे पवनात्मजम् २
स ददर्श ततः सीतां पूर्णचन्द्रनिभाननाम् ।

---

पतीचा वियोग झालेल्या चन्दनवृक्षाप्रमाणे दुःखपरंपरेने पोळून गेलेल्या जनक कन्या सीतेचा सांप्रत फारच शोचनीय स्थिति झाली आहे. पुष्पांच्या योगाने ज्यांचे शेंडे अगदी वाकून गेले आहेत, असे हे अशोकवृक्ष आणि लंकेमध्ये थंडीचा अभाव असल्यामुळे अतिशय प्रकाशमान होऊन राहिलेला व हजारो किरणांनी प्रकाशत असलेला चंद्र हे हिला अतिशय दुःखच देत आहेत.' अशा प्रकारचा विचार मनामध्ये आणून त्या वानरश्रेष्ठ, महाबलाढ्य व वेगवान हनुमानाला "ही खात्रीने सीताच असावी" असे वाटले आणि याच विचाराच्या आधारावर तो त्या शिंशपावृक्षावर राहिला. (३०–३२)

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदर-काण्डापैकी सोळावा सर्ग समाप्त झाला ॥ १६ ॥

ज्याप्रमाणे हंसपक्षी निळ्या रंगाच्या पाण्यात शिरावा त्याप्रमाणे पांढरी शुभ्र वर्णी असलेला व श्वेत कमळाच्या गुच्छाप्रमाणे दिसत असलेला चंद्र निर्मळ आकाशामध्ये कांहीसा वर आला. त्याच्या शुभ्र तेजामुळे सीतेच्या शोधाला जणू काही मदतच करीत असलेला तो निर्मल चंद्र आपल्या शीत किरणांनी वायुपुत्र हनुमानाचा सेवा करू लागला. आकाशात चंद्र वर आल्यानंतर मारुतीने पूर्ण चंद्रासारख्या आल्हादकारक मुख असलेल्या सीतेला पाहिले, तेव्हा ओझ्यामुळे पाणी-

शोकभारैरिव न्यस्तां भारैर्नावमिवाम्भसि ३
दिदृक्षमाणो वैदेहीं हनुमान्मारुतात्मजः ।
स ददर्श विदूरस्था राक्षसीर्घोरदर्शनाः ४
एकाक्षीमेककर्णां च कर्णप्रावरणां तथा ।
अकर्णां शङ्कुकर्णां च मस्तकोच्छ्वासनासिकाम् ५
अतिकायोत्तमाङ्गीं च तनुदीर्घशिरोधराम् ।
ध्वस्तकेशीं तथाऽकेशीं केशकम्बलधारिणीम् ६
लम्बकर्णललाटां च लम्बोदरपयोधराम् ।
लम्बोष्ठीं चुबुकोष्ठीं च लम्बास्यां लम्बजानुकाम् ७
ह्रस्वां दीर्घां च कुब्जां च विकटां वामनां तथा ।
करालां भुग्नवक्त्रां च पिङ्गाक्षीं विकृताननाम् ८

---

मध्ये नाव बुडून जावी, त्याप्रमाणे रामवियोगाच्या शोकभारांनी ती सीता बुडूनच जात आहे, अशी त्याला दिसली. प्रथमतः त्या वनात गेल्यानंतर वायुपुत्र हनुमान् सीतेला शोधण्यासाठी इकडे तिकडे पाहूं लागला, तेव्हां भयंकर सुरेख्या राक्षसीच लांब थमलेल्या त्याच्या दृष्टीस पडल्या. ( १-४ )

हनुमानाने ज्या राक्षसी तेथे पाहिल्या, त्यांपैकी कोणाला एकच डोळा होता, तर कोणाला एकच कान होता. कोणाचे कान वस्त्राप्रमाणे पांघरता येतील, इतके लांब होते, तर कोणाला कान मुळीच नव्हते आणि कोणाचे तर शंकूप्रमाणे होते. त्याचप्रमाणे कोणाच्या नाकाचा भोकेंच वर असल्यामुळे त्यांचा श्वासोच्छ्वास वर मस्तकापर्यंतच चाललेला होता. कोणाचे मस्तक शरीराच्या मनानें फारच मोठें होतें, तर कोणाची मानच अगदी बारीक व लांब होती. कोणाचे केसच नाहींसे झाले होते, तर कोणाला मुळीच केस नव्हते आणि कोणी तर आपल्या केसामुळे काळी घोंगडीच पांघरून बसल्यासारखी दिसत होती. कोणाचे कान व कपाळ लांब होतें, तर कोणाचे उदर व स्तनच लांब होते. कोणाचा ओंठ खाली लोंबत होता, तर कोणाचा हनुवटीलाच जखडलेला होता, त्याचप्रमाणे एकाचें मुखच दीर्घ होतें, तर दुसरीचे गुडघेच लांब होते कोणी खुजी, तर कोणी टांगळी, कोणी कुबडी तर कोणी वाकडी; कोणी अगदीच ठेंगणी, तर

विकृताः पिङ्गलाः कालीः क्रोधनाः कलहप्रियाः ।
कालायसमहाशूलकूटमुद्गरधारिणीः ९
वराहमृगशार्दूलमहिषाजशिवामुखाः ।
गजोष्ट्रहयपादाश्च निखातशिरसोऽपराः १०
एकहस्तैकपादाश्च खरकर्ण्यश्वकर्णिकाः ।
गोकर्णीर्हस्तिकर्णीश्च हरिकर्णीस्तथापराः ११
अतिनासाश्च काश्चिच्च तिर्यङ्नासा अनासिकाः ।
गजसंनिभनासाश्च ललाटोच्छ्वासनासिकाः १२
हस्तिपादा महापादा गोपादाः पादचूलिकाः ।
अतिमात्रशिरोग्रीवा अतिमात्रकुचोदरीः १३
अतिमात्रास्यनेत्राश्च दीर्घजिह्वानखास्तथा ।

---

कोणी भयंकर धिप्पाड; कोणाचें बख वेडेंवाकडें तर कोणाचे डोळेच पिंगट वर्णाचे, आणि कोणाची तर मुद्राच अक्राळ-विक्राळ होती. त्याचप्रमाणे कोणाचे अवयव छिन्नभिन्न झालेले, तर कोणाचें सारें शरीरच पिंगट वर्णाचें आणि कोणी तर अगदीच काळ्या रंगाच्या; कोणी तामसी, तर कोणी कलहप्रिय आणि कोणी तर लोखंडाचे मोठेमोठे शूल, कूट व मुद्गर धारण करणाऱ्या होत्या. कोणा-राक्षसीचें तोंड डुकरासारखें, कोणाचें हरणासारखें, कोणाचें वाघासारखें, कोणाचें म्हशीसारखें, कोणाचें बोकडासारखें, कोणाचें कोल्ह्यासारखें होतें. कोणाचे पाय हत्तीसारखे, तर कोणाचे उंटासारखे आणि कोणाचे घोड्यासारखे होने. काहींचीं तोंडेंच कबंध राक्षसाप्रमाणे आत गेलेलीं होतीं. (५-१०)

काहींना एकेकच हात होता, तर काहींना एकेकच पाय होता. काहींचे कान गर्दभासारखे लांब, तर काहींचे अश्वाप्रमाणे आखूड, त्याचप्रमाणे काहींचे गाईसारखे तर काहींचे हत्तीसारखे आणि सिंहासारखे होते. काहींचे नाक फारच प्रचंड, तर काहींच्या श्वासोच्छ्वासच अडत असे. काही मुळीच नासिकाहीन, तर काहींचीं नाकें हत्तीच्या सोंडेप्रमाणे मोठीं मोठीं, आणि काहींचा तर कपाळा-वरच होतीं. काहींचे पाय हत्तीसारखे लठ्ठ, तर काहींचे फारच प्रचंड, काहींचे गाईसारखे, तर काहींचे शिखाकृति केसांनी युक्त होते काहींचें मस्तक व मान

अजामुखीर्हस्तिमुखीर्गोमुखीः सूकरीमुखीः १४
हयोष्ट्रखरवक्त्राश्च राक्षसीर्घोरदर्शनाः ।
शूलमुद्गरहस्ताश्च क्रोधनाः कलहप्रियाः ॥
करालधूम्रकेशिन्यो राक्षसीर्विकृताननाः १५
पिबन्ति सततं पानं सुरामांससदाप्रियाः ।
मांसशोणितदिग्धाङ्गीर्मांसशोणितभोजनाः १६
ता ददर्श कपिश्रेष्ठो रोमहर्षणदर्शनाः ।
स्कन्धवन्तमुपासीनाः परिवार्य वनस्पतिम् १७
तस्याधस्ताच्च तां देवीं राजपुत्रीमनिन्दिताम् ।
लक्षयामास लक्ष्मीवान्हनूमाञ्जनकात्मजाम् १८
निष्प्रभां शोकसंतप्तां मलसंकुलमूर्धजाम् ।

---

फारच प्रचंड, तर कांहींचे स्तन व उदर अतिच लांब; कांहींचे मुख व नेत्र फारच मोठे, तर कांहींच्या जिव्हा व मुखें फारच लांब. कांहींचें मुख शेळ्यासारखें, कांहींचें हत्तीसारखें, कांहींचें गाईसारखें, कांहींचें डुकरासारखें, कांहींचें घोड्यासारखें, कांहींचें उंटांसारखें आणि कांहींचें गर्दभांसारखें होतें. अशा प्रकारच्या भयंकर चेहऱ्याच्या, तामसी, कलहप्रिय, भीति उत्पन्न करणाऱ्या, धूम्रवर्ण केसाच्या आणि अक्राळविक्राळ मुद्रा धारण करणाऱ्या आणि दिसण्यांतही भयंकर असून, हातांमध्ये शूल व मुद्गल घेतलेल्या राक्षसी हनुमानास तेथे दिसल्या. ( ११-१५ )

त्यांचे दर्शनही अंगावर काटा आणणारें होतें. मांसानें व रक्तानें त्यांचें शरीर भरलेलें असून, त्यांना सुरा व मांस सर्वदा प्रिय असे. त्या सतत मद्यपान करणाऱ्या असून, मांस व रक्त हेंच त्यांचें खाद्य असे. अशा प्रकारच्या भयंकर राक्षसी एका मोठमोठ्या फांद्या असलेल्या वृक्षास सर्व बाजूंनी गराडा देऊन बसल्या आहेत, असें वानरश्रेष्ठ हनुमानाचे दृष्टोत्पत्तीस आलें. त्याच वृक्षाचे खालीं ती निर्दोष राजपुत्री जनककन्या सीतादेवीही त्या श्रीमान् हनुमानानें पाहिली. ( १६-१८ )

ती सीता शोकानें संतप्त झाली असल्यामुळें निस्तेज झाली होती. मळामुळें

क्षीणपुण्यां च्युतां भूमौ तारां निपतितामिव १९
चारित्रव्यपदेशाढ्यां भर्तृदर्शनदुर्गताम्।
भूषणैरुत्तमैर्हीनां भर्तृवात्सल्यभूषिताम् २०
राक्षसाधिपसंरुद्धां बन्धुभिश्च विनाकृताम्।
वियूथां सिंहसंरुद्धां बद्धां गजवधूमिव २१
चन्द्ररेखां पयोदान्ते शारदाभ्रैरिवावृताम्।
क्लिष्टरूपामसंस्पर्शादयुक्तामिव वल्लकीम् २२
स तां भर्तृहिते युक्तामयुक्तां रक्षसां वशे।
अशोकवनिकामध्ये शोकसागरमाप्लुताम् २३
ताभिः परिवृतां तत्र सग्रहामिव रोहिणीम्।
ददर्श हनुमांस्तत्र लतामकुसुमामिव २४
सा मलेन च दिग्धाङ्गी वपुषा चाप्यलंकृता।

---

तिच्या केसांची गुंतागुंत झाली होती, पुण्यक्षय झाल्यामुळे आकाशातून खाली भूमीवर पडलेल्या ताऱ्याप्रमाणे ती निष्प्रभ भासत होती, पातिव्रत्यधर्म पाळण्यात ती विख्यात असून, भर्त्याचे दर्शन तिला दुर्लभ झाले होते, उत्कृष्ट बाह्य अलंकार तिच्या शरीरावर नव्हते, तरी भर्तृप्रेमाच्या अलंकाराने ती भूषित झालेली होती. आपल्या बंधुजनापासून तिचा वियोग करून राक्षसाधिपति रावणाने तिला अटकेत ठेवलेली होती, त्यामुळे कळपातून चुकलेली व बांधून ठेवलेली हत्तीण सिंहाच्या अटकेत दिसावी, त्याप्रमाणे ती भासत होती. पर्जन्यकाल संपल्यावर शरदृतूतील मेघांनी झाकून टाकलेल्या चंद्रकलेप्रमाणे ती निस्तेज दिसत होती. तिची द्युति कमी झाली असून, भर्त्याचे स्पर्शसुख नसल्यामुळे, तारा पडलेल्या वीणेप्रमाणे तिची दीन अवस्था झालेली होती. भर्त्याच्या हिताविषयी नेहमी दक्ष व राक्षसांच्या अटकेत राहण्यास अयोग्य, शोकसागरात सर्वस्वी बुडालेली, अलंकाररहित असल्यामुळे पुष्परहित लतेप्रमाणे दिसत असलेली आणि त्या राक्षसस्त्रियांनी वेढलेली असल्यामुळे क्रूर ग्रहांनी घेरलेल्या रोहिणीप्रमाणे भासत असलेली ती सीता हनुमानाने त्या अशोकवनामध्ये अवलोकन केली (१९-२४)

मृणाली पङ्कदिग्धेव विभाति च न भाति च ॥ २५
मलिनेन तु वस्त्रेण परिक्लिष्टेन भामिनीम् ।
संवृतां मृगशावाक्षीं ददर्श हनुमान्कपिः ॥ २६
तां देवीं दीनवदनामदीनां भर्तृतेजसा ।
रक्षितां स्वेन शीलेन सीतामसितलोचनाम् ॥ २७
तां दृष्ट्वा हनुमान्सीतां मृगशावनिभेक्षणाम् ।
मृगकन्यामिव त्रस्तां वीक्षमाणां समन्ततः ॥ २८
दहन्तीमिव निःश्वासैर्वृक्षान्पल्लवधारिणः ।
संघातमिव शोकानां दुःखस्योर्मिमिवोत्थिताम् ॥ २९
तां क्षमां सुविभक्ताङ्गीं विनाभरणशोभिनीम् ।
प्रहर्षमतुलं लेभे मारुतिः प्रेक्ष्य मैथिलीम् ॥ ३०
हर्षजानि च सोऽश्रूणि तां दृष्ट्वा मदिरेक्षणाम् ।

मुमोच हनुमांस्तत्र नमश्चक्रे च राघवम् ३१

नमस्कृत्वाथ रामाय लक्ष्मणाय च वीर्यवान्।
सीतादर्शनसंहृष्टो हनुमान्संवृतोऽभवत् ३२

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे सप्तदशः सर्गः ॥ १७ ॥

अष्टादशः सर्गः । [ ८७८ ]

तथा विप्रेक्षमाणस्य वनं पुष्पितपादपम्।
विचिन्वतश्च वैदेहीं किंचिच्छेषा निशाभवत् १

षडङ्गवेदविदुषां क्रतुप्रवरयाजिनाम्।
शुश्राव ब्रह्मघोषान्स विरात्रे ब्रह्मरक्षसाम् २

अथ मङ्गलवादित्रैः शब्दैः श्रोत्रमनोहरैः।
प्राबुध्यत महाबाहुर्दशग्रीवो महाबलः ३

विबुध्य तु महाभागो राक्षसेन्द्रः प्रतापवान्।
स्रस्तमाल्याम्बरधरो वैदेहीमन्वचिन्तयत् ४

---

दृष्टीस पडताच हनुमानाच्या नेत्रांतून आनंदाश्रु आले व त्याने रामाला नमस्कार केला. रामाला व लक्ष्मणाला नमस्कार केल्यानंतर सीतेच्या दर्शनामुळे आनंदित झालेला तो बलाढ्य हनुमान् सूक्ष्म रूप घेऊन फांद्यामध्येच दडून राहिला. ( २८-३२ )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडापैकी सतरावा सर्ग समाप्त झाला ॥ १७ ॥

ज्यातील वृक्ष पूर्णपणे फुललेले आहेत, असे ते वन पहात असतानाच आणि सीतेची उघडपणे भेट व्हावी म्हणून राक्षसस्त्रियांना निद्रा येण्याची वाट पहात असताना रात्रीचा अगदीच थोडा भाग उरला आणि षडंगवेद जाणणाऱ्या व श्रेष्ठ श्रेष्ठ यज्ञ करणाऱ्या ब्रह्मराक्षसांचा वेदघोष उत्तररात्री त्याच्या कानी पडूं लागला. नंतर मंगलवाद्ये आणि कानाला मधुर लागणारे सुस्वर ध्वनि यांनी तो महाबलाढ्य व महापराक्रमी दशानन रावण जागा झाला आणि अस्ताव्यस्त झालेल्या पुष्पमाला व वस्त्रे परिधान केलेला, तो महाभाग्यवान राक्षसराज प्रतापी रावण जागा झाल्याबरोबर सीतेचेच चिंतन करूं लागला. मदनाच्या बाणांनी



अशोकवनातील सीता ( सुदर० स. १७ श्लो २३।२४ )

भृशं नियुक्तस्तस्यां च मदनेन मदोत्कटः ।
न तु तं राक्षसः कामं शशाकात्मनि गूहितुम्   ५
स सर्वाभरणैर्युक्तो बिभ्रच्छ्रियमनुत्तमाम् ।
तां नगैर्विविधैर्जुष्टां सर्वपुष्पफलोपगैः   ६
वृतां पुष्करिणीभिश्च नानापुष्पोपशोभिताम् ।
सदा मत्तैश्च विहगैर्विचित्रां परमाद्भुतैः   ७
ईहामृगैश्च विविधैर्वृतां दृष्टिमनोहरैः ।
वीथीः संप्रेक्षमाणश्च मणिकाञ्चनतोरणाम्   ८
नानामृगगणाकीर्णां फलैः प्रपतितैर्वृताम् ।
अशोकवनिकामेव प्राविशत्संततद्रुमाम्   ९
अङ्गनाः शतमात्रं तु तं व्रजन्तमनुव्रजन् ।
महेन्द्रमिव पौलस्त्यं देवगन्धर्वयोषित.   १०

---

मदमस्त झालेल्या त्या राक्षसाचे मन तिच्याविषयीं अतिशय आसक्त होऊन राहिलेले होतें आणि यामुळे आपली ती कामवासनाही अंतऱ्यांत दाबून टाकण्यास तो राक्षस समर्थ नव्हता (१-५)

नंतर सर्व भूषणें आणि अनुपम वैभव उपभोगणारा रावण सर्व प्रकारच्या पुष्पांनीं व फलांनी भरलेल्या नाना प्रकारच्या वृक्षांनी व्यापलेल्या त्या अशोकवनामध्ये गेला तें अशोकवन पुष्करिणींनी व्याप्त झालेलें होतें, नाना प्रकारच्या पुष्पांनी त्याला शोभा आलेली होती, अत्यंत अद्भुत आणि सर्वदा मत्त अशा पक्ष्यांमुळे तें चित्रविचित्र झालेलं होतें आणि दृष्टीला आश्चर्यचकित करून टाकणाऱ्या नाना प्रकारच्या क्रीडा करणाऱ्या मृगांनी तें भरलेलें होतें असो अंतःपुरांतून उठून अशोकवनाकडे जात असता, वाटेंत इकडेतिकडे पहात पहात तो रावण रत्नखचित सोन्याच्या तोरणांनीं युक्त व नाना प्रकारच्या मृगगणांनी व वृक्षाखाली पडलेल्या फळांनीं व्याप्त आणि एकसारख्या वृक्षपंक्तींनी भरलेल्या त्या वनामध्ये गेला देवांतील आणि गंधर्वांतील स्त्रिया, ज्याप्रमाणें इंद्र जाऊं लागला असतां त्याच्या मागोमाग चालत असतात, त्याप्रमाणे तो पुलस्त्यपुत्र रावण निघाला असतां, त्याचे मागोमाग शंभर स्त्रिया चालल्या

दीपिकाः काञ्चनीः काश्चिज्जगृहुस्तत्र योषितः।
वालव्यजनहस्ताश्च तालवृन्तानि चापराः ११
काञ्चनैश्चैव भृङ्गारैर्जह्रुः सलिलमग्रतः।
मण्डलाग्रा बृसींश्चैव गृह्यान्याः पृष्ठतो ययुः १२
काचिद्रत्नमयीं पात्रीं पूर्णां पानस्य भ्राजतीम्।
दक्षिणा दक्षिणेनैव तदा जग्राह पाणिना १३
राजहंसप्रतीकाशं छत्रं पूर्णशशिप्रभम्।
सौवर्णदण्डमपरा गृहीत्वा पृष्ठतो ययौ १४
निद्रामदपरीताक्ष्यो रावणस्योत्तमस्त्रियः।
अनुजग्मुः पतिं वीरं घनं विद्युल्लता इव १५
व्याविद्धहारकेयूराः समामृदितवर्णकाः।
समागलितकेशान्ताः सस्वेदवदनास्तथा १६
घूर्णन्त्यो मदशेषेण निद्रया च शुभाननाः।

---

होत्या. ( ६-१० )

काही स्त्रियांनी हातात सोन्याचे दीप घेतले होते, काहींनी आपल्या हातात चौऱ्या घेतलेल्या होत्या, काहींनी पंखे घेतलेले होते. काही सोन्याच्या झाऱ्यामध्ये उदक घेऊन पुढे चालल्या होत्या आणि दुसऱ्या काही वसनमयाची वर्तुलाकार आसने घेऊन मागून चालल्या होत्या. पेयाने पूर्ण भरलेले रत्नांचे असल्याने चकाकत असलेले एक पात्र उजव्या हातात घेऊन रावणाचे इच्छेनुसार वागणारी अशी एक स्त्री चालली होती. पूर्ण चंद्राप्रमाणे ज्याचे तेज आहे, राजहंसाप्रमाणे ज्याचा वर्ण आहे आणि ज्याचा दंड सुवर्णाचा आहे, असे छत्र हातात घेऊन दुसरी एक स्त्री त्याच्या मागोमाग चालली आणि निद्रेने व मदाने ज्यांची दृष्टि व्याकुल झाली आहे अशा रावणाच्या उत्तम स्त्रिया मेघाच्या मागोमाग जाणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणे आपल्या पराक्रमी पतीच्या मागोमाग चालल्या होत्या. ( ११-१५ )

त्यांचे हार व बाहुभूषणे त्यांच्या योग्य स्थानापासून ढळून गेली आहेत, त्यांची उटी चोळवटून गेली आहे, त्यांचे केश सैल झाले आहेत, त्यांचे मुख

स्वेदाक्लिष्टाङ्गकुसुमाः समाल्याकुलमूर्धजाः १७
प्रयान्तं नैर्ऋतपतिं नार्यो मदिरलोचनाः।
बहुमानाच्च कामाच्च प्रियभार्यास्तमन्वयुः १८
स च कामपराधीनः पतिस्तासां महाबलः।
सीतासक्तमना मन्दो मन्दाञ्चितगतिर्बभौ १९
ततः काञ्चीनिनादं च नूपुराणां च निःस्वनम्।
शुश्राव परमस्त्रीणां कपिर्मारुतनन्दनः २०
तं चाप्रतिमकर्माणमचिन्त्यबलपौरुषम्।
द्वारदेशमनुप्राप्तं ददर्श हनुमान्कपिः २१
दीपिकाभिरनेकाभिः समन्तादवभासितम्।
गन्धतैलावसिक्ताभिर्ध्रियमाणाभिरग्रतः २२
कामदर्पमदैर्युक्तं जिह्मताम्रायतेक्षणम्।
समक्षमिव कंदर्पमपविद्धशरासनम् २३

घामाने डबडबले आहे, मद काहींना शिल्लक असल्यामुळे आणि निद्रेमुळे ज्या अद्याप धुंदींतच आहेत, ज्यांचीं मुखें मनोहर आहेत, घामामुळे ज्यांच्या शरीरावरील पुष्पें खराब झालीं आहेत, ज्यांचे केश पुष्पयुक्त व अस्ताव्यस्त झालेले आहेत आणि ज्यांचे नेत्र मदिरेसारखे मादक आहेत, अशा रावणाच्या प्रिय असलेल्या काही भार्या राक्षसाधिपति रावण जाऊं लागला असता, बहुमानामुळे आणि कामवासनेमुळे त्याच्या मागोमाग चालल्या होत्या. कामाचे अधीन झालेला त्यांचा तो महाबलाढ्य अविचारी पति मात्र एका सीतेचे ठिकाणींच मन आसक्त झालें असल्यामुळे मादकतेने व हुलत डुलत जाऊं लागला. इतक्यांत त्या उत्कृष्ट स्त्रियांच्या कमरपट्ट्याचा आवाज व तोरड्यांचा शब्द वायुपुत्र वानराच्या कानीं पडला आणि लगेच तो अतुलपराक्रमी, महाबलाढ्य व महासामर्थ्यवान् रावण अशोकवनिकेच्या दारापर्यंत आल्याचेंही त्या हनुमान वानरास दिसून आलें. पुढें धरलेल्या अनेक मशालींवर सुगंधी तेल ओतलें जात होतें व त्याचा सर्व बाजूंनी रावणावर प्रकाश पडलेला होता. ( १६–२२ )

काम, गर्व आणि मद यांमुळे ह्या रावणाचे नेत्र वक्र, ताम्रवर्ण व विशाल

*

मथितामृतफेनाभमरजोवस्त्रमुत्तमम् ।
सुपुष्पमवकर्षन्तं विमुक्तं सक्तमङ्गदे २४
तं पत्रविटपे लीनः पत्रपुष्पशतावृतः ।
समीपमुपसंक्रान्तं विज्ञातुमुपचक्रमे २५
अवेक्षमाणस्तु तदा ददर्श कपिकुञ्जरः ।
रूपयौवनसंपन्ना रावणस्य वरस्त्रियः २६
ताभिः परिवृतो राजा सुरूपाभिर्महायशाः २७
तन्मृगद्विजसंघुष्टं प्रविष्टः प्रमदावनम् ।
क्षीबो विचित्राभरणः शङ्कुकर्णो महाबलः २८
तेन विश्रवसः पुत्रः स दृष्टो राक्षसाधिपः ।
वृतः परमनारीभिस्ताराभिरिव चन्द्रमाः २९
तं ददर्श महातेजास्तेजोवन्तं महाकपिः ।
रावणोऽयं महाबाहुरिति संचिन्त्य वानरः ३०

---

असून, तो रावण नसून चापाचा त्याग केलेला प्रत्यक्ष मदनच भासत होता आणि घुसळलेल्या दुधाच्या फेसाप्रमाणे शुभ्र व निर्मल पुष्पें आणि उत्तम मोती लाविलेलें व बाहुभूषणाला अडकलेलें असें आपलें उत्कृष्ट वस्त्र तो सावरीत होता. रावण अगदी नजीक आला, तेव्हा पानांनी गच्च भरलेल्या एका फांदीवर लपून बसलेला आणि शेकडो पानें व पुष्पें यांत गुरफटून गेलेला तो हनुमान " हा कोण असावा, " हें ओळखण्याचा यत्न करूं लागला. तो वानरश्रेष्ठ हनुमान् रावणाकडे पाहूं लागला, तेव्हा रावणाच्या रूपवती व यौवनसंपन्न उत्कृष्ट स्त्रिया त्याच्या दृष्टीस पडल्या. त्या सुरूप स्त्रियांनी तो महाकीर्तिमान् राक्षसराजा वेढून गेलेला होता. इतक्यात मृग व पक्षी यांच्या शब्दांनी दुमदुमलेल्या आणि स्त्रियांच्या क्रीडेकरता तयार केलेल्या त्या वनामध्ये मद्यपानानें मत्त झालेला, अद्भुत अलंकार धारण केलेला आणि महाबलाढ्य असा शंकुकर्णनामक राक्षस आला व ताऱ्यांच्या योगानें जसा चंद्रमा परिवेष्टित झालेला असतो, तसा तो विश्रवसमुनींचा पुत्र राक्षसाधिपति रावण उत्कृष्ट स्त्रियांनी परिवेष्टिलेला आहे, असें त्या शंकुकर्णाच्या दृष्टीस पडलें ( २३-२९ )

सोऽयमेव पुरा शेते पुरमध्ये गृहोत्तमे ।
अवप्लुतो महातेजा हनूमान्मारुतात्मजः     ३१
स तथाप्युग्रतेजाः स निर्धूतस्तस्य तेजसा ।
पत्रे गुह्यान्तरे सक्तो मतिमान्संवृतोऽभवत्     ३२
स तामसितकेशान्तां सुश्रोणीं संहतस्तनीम् ।
दिदृक्षुरसितापाङ्गीमुपावर्तत रावणः     ३३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डेऽष्टादशः सर्गः ॥ १८ ॥

एकोनविंशः सर्गः ।     [ १११ ]

तस्मिन्नेव ततः काले राजपुत्री त्वनिन्दिता ।
रूपयौवनसंपन्नं भूषणोत्तमभूषितम्     १
ततो दृष्ट्वैव वैदेही रावणं राक्षसाधिपम् ।
प्रावेपत वरारोहा प्रवाते कदली यथा     २

---

अशा स्थितीत त्या तेजस्वी रावणाला पाहून महातेजस्वी व महाकपि हनुमानानें 'पूर्वी नगरांत उत्कृष्ट गृहामध्ये शयन करीत असलेला पाहिला होता, तोच हा महापराक्रमी रावण' असें मनामध्ये ओळखिलें आणि लगेच त्या महातेजस्वी वायुपुत्र हनुमानानें फारच उंच फांदीवर उडी मारली. तो बुद्धिमान् हनुमान् जरी स्वतः महातेजस्वी होता, तरी त्या रावणाच्या तेजानें अगदींच दिपून गेला आणि दृष्टोत्पत्तीस न येणाऱ्या व पानांनी भरलेल्या अशा दुसऱ्या एका फांदीवर जाऊन दडून बसला. इतक्यांत कृष्णवर्ण केश, सुंदर कटिप्रदेश, एकमेकांला लागलेले स्तन आणि कृष्णवर्ण नेत्रप्रदेश असलेल्या सीतेला पाहण्याकरतां रावणही अगदीं सन्निध आला. ( ३०–३३ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांतील अठरावा सर्ग समाप्त झाला. ॥ १८ ॥

याप्रमाणें मारुती झाडाच्या उंच फांदीवर उडी मारून बसल्यानंतर, रावण त्या निर्दोष विदेहराजकन्या सीतेच्या समीप आलेला तिच्या दृष्टीस पडला. उत्कृष्ट अलंकार धारण केलेला, रूपवान् व यौवनसंपन्न असा तो राक्षसाधिपति रावण सीतेनें पाहिला, तेव्हां ती सुंदरी वायूच्या सपाट्यांत सापडलेल्या केळीप्रमाणें थर-

ऊरुभ्यामुदरं छाद्य बाहुभ्यां च पयोधरौ ।
उपविष्टा विशालाक्षी रुदती वरवर्णिनी ३
दशग्रीवस्तु वैदेहीं रक्षितां राक्षसीगणैः ।
ददर्श दीनां दुःखार्तां नावं सन्नामिवार्णवे ४
असंवृतायामासीनां धरण्यां संशितव्रताम् ।
छिन्नां प्रपतितां भूमौ शाखामिव वनस्पतेः ५
मलमण्डनदिग्धाङ्गीं मण्डनार्हाममण्डनाम् ।
मृणाली पङ्कदिग्धेव विभाति न विभाति च ६
समीपं राजसिंहस्य रामस्य विदितात्मनः ।
संकल्पहयसंयुक्तैर्यान्तीमिव मनोरथैः ७
शुष्यन्तीं रुदतीमेकां ध्यानशोकपरायणाम् ।
दुःखस्यान्तमपश्यन्तीं रामां राममनुव्रताम् ८
चेष्टमानामथाविष्टां पन्नगेन्द्रवधूमिव ।

---

घर कापू लागली व मांड्यांनी उदर आणि बाहूंनी स्तन, आच्छादित करून, ती विशालनयना सुंदरी रडत बसली. रावणाने ती विदेहराजकन्या सीता पाहिली, त्या वेळा राक्षसस्त्रियांच्या समुदायानी तिचे रक्षण केलेलें होतें आणि महासागरामध्ये भग्न होऊं लागलेल्या नावेंतील लोकाप्रमाणे ती दुःखाकुल व दीन झालेली होती. उघड्या जमिनीवर ती बसला असल्यामुळे, भूमीवर मोडून पडलेली वृक्षाची शाखाच आहे की काय, अशी ती भासत होती. तिच्या शरीरावरील अलंकार घालण्याची स्थानें मलानें भरून गेलेलीं होतीं, भूषणें वापरण्यास योग्य असूनही ती भूषणरहित होती आणि म्हणूनच चिखलानें बरबटून गेलेल्या कमलिनीप्रमाणे ती धड शोभतही नव्हती आणि धड विशोभितही दिसत नव्हती. ( १-६ )

आपला पति जो नृपश्रेष्ठ जगद्विख्यात राम त्याच्याकडे चिंतन हेंच कोणी अश्व जोडून त्या मनोरथाच्या योगानें ती जात होती. तिचें मुख शुष्क झालें होतें, ती एकटीच रडत बसली होती, मनात एकसारखें चिंतन व शोक करीत होती. रामाचेच ठिकाणीं चित्त आसक्त असलेल्या त्या सीतेला दुःखातून पार पडण्याचा

धूप्यमानां ग्रहेणेव रोहिणीं धूमकेतुना ९
वृत्तशीले कुले जातामाचारवति धार्मिके ।
पुनः संस्कारमापन्नां जातामिव च दुष्कुले १०
सन्नामिव महाकीर्तिं श्रद्धामिव विमानिताम् ।
प्रज्ञामिव परिक्षीणामाशां प्रतिहतामिव ११
आयतीमिव विध्वस्तामाज्ञां प्रतिहतामिव ।
दीप्तामिव दिशं काले पूजामपहृतामिव १२
पौर्णमासीमिव निशां तमोग्रस्तेन्दुमण्डलाम् ।
पद्मिनीमिव विध्वस्तां हतशूरां चमूमिव १३
प्रभामिव तमोध्वस्तामुपक्षीणामिवापगाम् ।
वेदीमिव परामृष्टां शान्तामग्निशिखामिव १४
उत्कृष्टपर्णकमलां वित्रासितविहंगमाम् ।
हस्तिहस्तपरामृष्टामाकुलामिव पद्मिनीम् १५

---

काही मार्ग दिसत नव्हता. मंत्रानी जखडलेल्या नागराजाच्या भार्येप्रमाणे ती तडफडत होती, धूम्रवर्ण केतु ग्रहामुळे पीडल्यामुळे संतप्त होऊं लागलेली रोहिणीच की काय, अशी ती भासत होती. आचारसंपन्न, सुशील, धार्मिक आणि सद्वर्तनी कुलमध्ये जन्म घेऊन, त्याला योग्य अशा कुलामध्ये तिचा पाणिग्रहण-संस्कारही झाला असूनहि हीन कुलामध्ये उत्पन्न झालेल्या स्त्रीप्रमाणे तिची दुर्दशा झालेली होती. उतरती कळा लागलेली जगद्विख्यात कीर्तीच की काय, मान-खंडना झालेली प्रत्यक्ष श्रद्धाच की काय, क्षीण झालेली बुद्धीच की काय, भग्न झालेली आशाच की काय, विध्वंस करून टाकिलेली संपत्तीच की काय, हाणून पाडिलेली आज्ञाच की काय, उत्पाताचे वेळा प्रदीप्त झालेली दिशाच की काय, व्यथाहून दिलेली देवपूजाच की काय, अंधकाराने चंद्रमंडल ग्रस्त झालेली पौर्णिमेची रात्रीच की काय, तुडवून टाकलेली कमलिनीच की काय, शूराचा वध झालेली सेनाच की काय, अंधकाराने ग्रस्त केलेली सूर्याची प्रभाच की काय, आटून गेलेली नदीच की काय, पतितानी व्यापलेली वेदीच की काय, शांत झालेली अग्नीची ज्वालाच की काय, जिची पाने व कमळे तोडिलेली आहेत,

पतिशोकातुरां शुष्कां नदीं विस्त्रावितामिव ।
परया मृजया हीनां कृष्णपक्षे निशामिव १६
सुकुमारीं सुजाताङ्गीं रत्नगर्भगृहोचिताम् ।
तप्यमानामिवोष्णेन मृणालीमचिरोद्धृताम् १७
गृहीतां लाडितां स्तम्भे यूथपेन विनाकृताम् ।
निःश्वसन्तीं सुदुःखार्तां गजराजवधूमिव १८
एकया दीर्घया वेण्या शोभमानामयत्नतः ।
नीलया नीरदापाये वनराज्या महीमिव १९
उपवासेन शोकेन ध्यानेन च भयेन च ।
परिक्षीणां कृशां दीनामल्पाहारां तपोधनाम् २०
आयाचमानां दुःखार्तां प्राञ्जलिं देवतामिव ।

ज्यांच्या सन्निध असलेले पक्षी घालवून दिलेले आहेत आणि हत्तींनी आपल्या सोंडाचे तडाखे दिल्यामुळे जी अगदी जर्जर झालेली आहे, अशी कमलिनीच की काय, अशी ती सीता तेथे दिसली पतिशोकाने व्याकुल व शुष्क झाल्यामुळे दुसरीकडे पाणी काढून लाविलेली शुष्क नदीच की काय आणि अभ्यंगस्नान वगैरे चांगले सरकार शरीरावर होत नसल्यामुळे कृष्णपक्षातील रात्रच दिसावी, तशी ती दिसत होती। (७–१६)

ती फारच सुकुमार होती, तिचें रूप फारच मनोहर होतें, रत्नखचित प्रासादात राहण्यासच ती योग्य होती, नुकतीच उपटून टाकलेली व उन्हाने करपत असलेली कमलिनीच की काय अशी ती भासत होती, सर्व हत्तीच्या टोळीचें रक्षण करणाऱ्या गजेंद्राचा वियोग झाल्यामुळे त्या गजेंद्राची भार्या धरली जाऊन, स्तंभाशी टाकून टाकल्यावर त्या गजेंद्र भार्येने अत्यंत दुःखाकुल होऊन सुस्कारे टाकावेत, तशी ती दिसत होती, पाठीवर एकच लांब वेणी असल्यामुळे, पर्जन्यकाल संपल्यानंतर नीलवर्णाचे वनपङ्क्तीमुळे शोभणाऱ्या पृथ्वीप्रमाणे तिला अनायासे शोभा आलेली होती उपवास, शोक, चिंता आणि भय यामुळे त्या बिचारीचा आहारही अल्प झाला होता व ती क्षीण, कृश व दीन झालेली होती रघुकुलश्रेष्ठ रामाच्या हातून रावणाचा पराभव व्हावा, असे ती दुःखाकुल

भावेन रघुमुख्यस्य दशग्रीवपराभवम्　　२१
समीक्षमाणां रुदतीमनिन्दितां सुपक्ष्मताम्रायतशुक्ललोचनाम् ।
अनुव्रतां राममतीव मैथिलीं प्रलोभयामास वधाय रावणः　२२
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे एकोनविंशः सर्गः ॥१९॥

विंशः सर्गः ।　　[ ५३३ ]

स तां परिवृतां दीनां निरानन्दां तपस्विनीम् ।
साकारैर्मधुरैर्वाक्यैर्न्यदर्शयत रावणः　　१
मां दृष्ट्वा नागनासोरु गूहमाना स्तनोदरम् ।
अदर्शनमिवात्मानं भयान्नेतुं त्वमिच्छसि　　२
कामये त्वां विशालाक्षि बहु मन्यस्व मां प्रिये ।
सर्वाङ्गगुणसंपन्ने सर्वलोकमनोहरे　　३
नेह किंचिन्मनुष्या वा राक्षसाः कामरूपिणः ।

---

झालेली सीता अगदी मनापासून देवतेप्रार्थी हात जोडून मागते मागतच आहे, अशी भासत होती. असो. उत्कृष्ट पापण्यांनी युक्त असलेले जिचे विशाल व स्वच्छ नेत्र तांबूस झाले आहेत, जी स्वतः निर्दोष असून इकडेतिकडे पहात रडत बसली आहे आणि रामाचे ठिकाणी जी अतिशयच अनुरक्त आहे, अशा त्या मिथिलराजकन्या सीतेला रावण आपल्या स्वतःचा वध करून घेण्यासाठी यत्न करूं लागला ( १७-२२ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकी एकोणिसावा सर्ग समाप्त झाला. ॥१९॥

राक्षसस्त्रियांनी गराडा दिलेल्या त्या बिचाऱ्या आनंदरहित दीन सीतेला सहेतुक अशा मधुर शब्दांनी रावण आपला मनोदय दर्शवूं लागला तो म्हणाला "हे सीते, तुझ्या मांड्या हत्तीच्या सोंडेप्रमाणे गरगरीत आहेत, परंतु तूं मला पाहून आपले स्तन व उदर झाकतां झाकतां, भीतीने आपले कांहीही शरीर माझ्या मुळीच दृष्टीस पडूं न देण्याची इच्छा करीत आहेस, हे काय? हे विशालनयने, हे प्रिये, हे सर्वांगसुंदरी, हे त्रैलोक्यमोहिनि, मी तुझी इच्छा करीत आहें; यासाठी तूं मला बहुमान दे. हे सीते, तुला जें माझें भय वाटत आहे, तें तूं

व्यपसर्पतु ते सीते भयं मत्तः समुत्थितम् ४
स्वधर्मो रक्षसां भीरु सर्वदैव न संशयः ।
गमनं वा परस्त्रीणां हरणं संप्रमथ्य वा ५
एवं चैवमकामां त्वां न च स्प्रक्ष्यामि मैथिलि ।
कामं कामः शरीरे मे यथाकामं प्रवर्तताम् ६
देवि नेह भयं कार्यं मयि विश्वासिहि प्रिये ।
प्रणयस्व च तत्त्वेन मैवं भूः शोकलालसा ७
एकवेणी अधःशय्या ध्यानं मलिनमम्बरम् ।
अस्थानेऽप्युपवासश्च नैतान्यौपयिकानि ते ८
विचित्राणि च माल्यानि चन्दनान्यगुरूणि च ।
विविधानि च वासांसि दिव्यान्याभरणानि च ९
महार्हाणि च पानानि शयनान्यासनानि च ।
गीतं नृत्यं च वाद्यं च लभ मां प्राप्य मैथिलि १०
स्त्रीरत्नमसि मैवं भूः कुरु गात्रेषु भूषणम् ।

सोडून दे, कारण या ठिकाणी मनुष्य आणि वाटेल ते रूप धारण करणारे राक्षस यांपैकी कोणीही नाही. ( १–४ )

हे भित्रे, बलात्काराने परस्त्रिया हरण करणे आणि त्याचा उपभोग घेणे हा तर राक्षसाचा सर्वदा स्वधर्मच आहे, यात मुळीच संशय नाही. सीते, असें जरी आहे, तरी तुझ्या मनात माझी इच्छा झाल्याशिवाय मी तुला स्पर्शही करणार नाही. माझ्या शरीरामध्ये मदनाला वाटेल तशी विषयवासना उत्पन्न करूं दे. हे देवी, या ठिकाणी भिण्याचें मुळीच कारण नाही. हे प्रिये, माझ्यावर विश्वास ठेवून तूं खऱ्या प्रीतीने माझ्यावर प्रेम कर, अशी शोकाकुल होऊं नको. एक वेणी, भूमीवर पडून राहणें, चिंता, मलिन वस्त्र आणि विनाकारण उपवास, हीं तुझ्या काहीएक उपयोगी पडणार नाहीत. हे मैथिली, चित्रविचित्र पुष्पें, नाना प्रकारचें चंदन, अनेक प्रकारचे अगुर, नाना प्रकारचीं वस्त्रें, दिव्य भूषणें, मोठ्या मोठ्या किंमतीचीं उंची पेयें, शय्या, आसनें, गीत, नृत्य आणि सुस्वर वाद्य यांचा, तूं माझा स्वीकार करून, प्राप्ति करून घे. ( ५–१० )

मां प्राप्य हि कथं वा स्यास्त्वमनर्हा सुविग्रहे ११
इदं ते चारु संजातं यौवनं ह्यतिवर्तते ।
यदतीतं पुनर्नैति स्रोतः स्रोतस्विनामिव १२
त्वां कृत्वोपरतो मन्ये रूपकर्ता स विश्वकृत् ।
नहि रूपोपमा ह्यन्या तवास्ति शुभदर्शने १३
त्वां समासाद्य वैदेहि रूपयौवनशालिनीम् ।
कः पुनर्नातिवर्तेत साक्षादपि पितामहः १४
यद्यत्पश्यामि ते गात्रं शीतांशुसदृशानने ।
तस्मिंस्तस्मिन्पृथुश्रोणि चक्षुर्मम निबध्यते १५
भव मैथिलि भार्या मे मोहमेतं विसर्जय ।
बह्वीनामुत्तमस्त्रीणां ममाग्रमहिषी भव १६

हे सुंदरी, तूं स्त्रियांमध्ये रत्न आहेस म्हणून हें असें वागणें तुला योग्य नाहीं. तूं आपल्या अंगावर अलंकार घाल. माझा स्वीकार केलास तर तुला अशा प्रकारें अलंकाररहित राहण्याची पाळी कशी बरें येईल ? उत्कृष्ट दशेला पोचलेलें हें तुझें यौवन व्यर्थ जात आहे आणि जलप्रवाहाचे वहात असलेलें पाणी ज्याप्रमाणें फिरून पहिल्या स्थितींत परत येत नाहीं, त्याप्रमाणें हें तुझें यौवन पुनः परत येण्याची आशा नाहीं. तस्मात्, तूं माझ्या म्हणण्याप्रमाणें वागून विषयाचा उपभोग घे. हे सुंदरी, तुला निर्माण केल्यानंतर जगांत दिव्य रूपें उत्पन्न करणाऱ्या जगत्स्रष्ट्यानें आपलें काम सोडूनच दिलें असावें, असें मला वाटतें, कारण, तुझ्या रूपाला दुसरी उपमाच सापडत नाहीं. हे वैदेहि, सौंदर्य आणि यौवन हीं एकत्रित असलेल्या तुला पाहिल्यावर प्रत्यक्ष ब्रह्मदेवासुद्धां जरी वेडा झाला, तरी कोणाच्या बरें मनःप्रवृत्ति क्षुब्ध झाल्यावाचून राहतील ? हे चंद्रमुखि, तुझ्या जांघा विशाल आहेत आणि जो जो तुझा अवयव मी पहात आहें, त्याचे त्याचे ठिकाणीं तेथल्या तेथें माझी दृष्टि अगदीं खिळून रहात आहे. म्हणून हे मैथिलि, तूं माझी भार्या हो. हें वेड सोडून दे. मला जरी उत्कृष्ट व सुंदर स्त्रिया पुष्कळ आहेत, तरी त्या सर्वांमध्यें तूंच माझी पट्टराणी हो. ( ११-१६ )

लोकेभ्यो यानि रत्नानि संप्रमथ्याहृतानि मे ।
तानि ते भीरु सर्वाणि राज्यं चैव ददामि ते १७
विजित्य पृथिवीं सर्वां नानानगरमालिनीम् ।
जनकाय प्रदास्यामि तव हेतोर्विलासिनि १८
नेह पश्यामि लोकेऽन्य यो मे प्रतिबलो भवेत् ।
पश्य मे सुमहद्वीर्यमप्रतिद्वन्द्वमाहवे १९
असकृत्संयुगे भग्ना मया विमृदितध्वजाः ।
अशक्ताः प्रत्यनीकेषु स्थातुं मम सुरासुराः २०
इच्छ मां क्रियतामद्य प्रतिकर्म तवोत्तमम् ।
सुप्रभाण्यवसज्जन्तां तवाङ्गे भूषणानि हि २१
साधु पश्यामि ते रूपं सुयुक्त प्रतिकर्मणा ।
प्रतिकर्माभिसंयुक्ता दाक्षिण्येन वरानने २२
भुङ्क्ष्व भोगान्यथाकामं पिब भीरु रमस्व च ।
यथेष्टं च प्रयच्छ त्वं पृथिवीं वा धनानि च २३

हे विनयशाल सुंदरी, त्रैलोक्यातून जी रत्ने मी स्वपराक्रमाने, बलात्काराने हरण करून आणलेली आहेत, तीं सर्व मी तुला देतों तसेंच राज्यही अर्पण करतो हे विलासिनी, नाना प्रकारचा नगरसमुदाय असलेली ही सर्व पृथ्वी जिंकून मी पाहिजेतर तुझ्याकरता जनकाला अर्पण करीन या जगतामध्ये समरांगणात माझ्याशीं युद्ध करणारा मला कोणीच दिसत नाहीं यासाठी युद्धामध्ये अजिंक्य ठरलेल्या माझ्या अतिप्रचंड सामर्थ्याचा तू पुन एकदा विचार तर करून पहा अनेक वेळा मी ध्वज उध्वस्त करून, संग्रामामध्ये जिंकलेले देवदैत्य यापुढे माझ्यासमोर प्रतिपक्षी या नात्याने नुसते उभे राहण्यासही समर्थ नाहींत, यास्तव तू माझा स्वीकार कर आणि उत्कृष्ट प्रकारें आपलें शरीर तेजस्वी अलंकारानी भूषित करून घ तुझें रूप मला फारच सुंदर व अलंकार घालण्यास सर्वथा योग्य दिसत आहे तरी हे सुंदरी, तू माझ्या कृपेमुळे आपले शरीर भूषित करून टाक ( १७–२२ )

हे विनयसंपन्न सीते, तू आप या इच्छेप्रमाणे विषयाचा उपभोग घे, इच्छेस

ललस्व मयि विस्रब्धा धृष्टमाज्ञापयस्व च ।
मत्प्रसादाल्ललन्त्याश्च ललन्तां बान्धवास्तव २४
ऋद्धिं ममानुपश्य त्वं श्रियं भद्रे यशस्विनि ।
किं करिष्यसि रामेण सुभगे चीरवासिना २५
निक्षिप्तविजयो रामो गतश्रीर्वनगोचरः ।
व्रती स्थण्डिलशायी च शङ्के जीवति वा न वा २६
न हि वैदेहि रामस्त्वां द्रष्टुं वाप्युपलभ्यते ।
पुरोबलाकैरसितैर्मेघैर्ज्योत्स्नामिवावृताम् २७
न चापि मम हस्तात्त्वां प्राप्तुमर्हति राघवः
हिरण्यकशिपुः कीर्तिमिन्द्रहस्तगतामिव २८
चारुस्मिते चारुदति चारुनेत्रे विलासिनि ।

येईल तें पेय सेवन कर आणि माझ्याशीं रममाण होऊन पृथ्वी अथवा संपत्ति वाटेल तें तूं इच्छेस येईल त्या लोकांना दे. माझी इच्छा परिपूर्ण कर, माझ्या-सारख्या धाडसी वीराला तूं निःशंकपणें हवी ती आज्ञा कर. माझ्या कृपेमुळें तुझा भाग्योदय होऊं लागला, तर तुझ्या बांधवांचेही मनोरथ परिपूर्ण होतील. हे कल्याणी, हे यशस्विनी, तूं माझे पराक्रम, संपन्नता आणि वैभव पहा तर खरें ! हे भाग्यवती, वल्कलें परिधान करणाऱ्या रामाशीं तुला काय बरें कर्तव्य आहे ? विजय मिळवण्याचें साधनही रामापाशीं काहीएक राहिलेलें नाही व त्याच्या-पाशी संपत्तीही नाही, इतकेंच नव्हे तर तो आता वनात राहणारा व व्रतस्थ बनला असून, भूमीवर शयन करीत आहे तेव्हा अशा अवस्थेमध्ये तो जिवंत तरी राहिला असेल की नाही, याची मला शंका येते. बगळे ज्याचे अग्रेसर आहेत, अशा काळ्याकुट्ट मेघानी झाकून टाकलेल्या चंद्रिकेप्रमाणे राक्षसस्त्रियानी तुला पूर्णपणे आच्छादून टाकली आहे व म्हणून तुझें नुसतें दर्शन करून घेण्यासही राम समर्थ होणार नाही, मग तुझ्या प्राप्तीची तर गोष्ट दूरच आहे. इंद्राच्या हातीं गेलेली भार्या ज्याप्रमाणे हिरण्यकशिपूला केवळ नारदमुनींच्या मार्फत प्रार्थना केल्यामुळेच प्राप्त झाली, त्याप्रमाणे माझ्या हातातून तुला पराक्रमाचे जोरावर प्राप्त करून घेण्यास राम समर्थ नाही ( २३-२८ )

मनो हरसि मे भीरु सुपर्णः पन्नगं यथा २९
क्लिष्टकौशेयवसनां तन्वीमप्यनलंकृताम् ।
त्वां दृष्ट्वा स्वेषु दारेषु रतिं नोपलभाम्यहम् ३०
अन्तःपुरनिवासिन्यः स्त्रियः सर्वगुणान्विताः
यावत्यो मम सर्वासामैश्वर्यं कुरु जानकि ३१
मम ह्यसितकेशान्ते त्रैलोक्यप्रवराः स्त्रियः ।
तास्त्वां परिचरिष्यन्ति श्रियमप्सरसो यथा ३२
यानि वैश्रवणे सुभ्रु रत्नानि च धनानि च ।
तानि लोकांश्च सुश्रोणि मया भुङ्क्ष्व यथासुखम् ३३
न रामस्तपसा देवि न बलेन च विक्रमैः ।
न धनेन मया तुल्यस्तेजसा यशसापि वा ३४
पिब विहर रमस्व भुङ्क्ष्व भोगान्धननिचयं प्रदिशामि मेदिनीं च ।
मयि लल ललने यथासुखं त्वं त्वयि च समेत्य ललन्तु बान्धवास्ते ३५

---

हे सुहास्यवदने, हे सुंदरी, हे चारुनयने, हे विलासिनी, गरुड ज्याप्रमाणे सर्पाला हरण करून नेतो, त्याप्रमाणे तूं माझें मन हरण करीत आहेस अंगाने सडपातळ, अलंकाररहित आणि जीर्ण पैठणी नेसलेल्या तुला अवलोकन करून, स्वतःच्या स्त्रियावरहि माझें मन आता नसे झालें आहे हे जानकी, सर्वगुणसंपन्न अशा जितक्या स्त्रिया माझ्या अन्तःपुरात आज वास्तव्य करीत आहेत, त्या सर्वांचें आधिपत्य तूं स्वीकार हे कृष्णकेशयुक्त कांते, त्रैलोक्यांतील उत्कृष्ट अशा ज्या स्त्रिया माझ्यापाशी आहेत, त्या लक्ष्मीची सेवा करणाऱ्या अप्सराप्रमाणे, तुझी सेवा करतील हे सुंदरी, कुबेरापाशी जी काही उत्कृष्ट रत्नें व नाना प्रकारचीं उत्कृष्ट धनें आहेत, तीं सर्व आणि त्याचप्रमाणे त्रैलोक्यातील सर्वहि उत्कृष्ट वस्तु याचा तू माझ्यासह खुशाल उपभोग घे हे देवी, तप, बल, पराक्रम, धन, तेज आणि कीर्ति यापैकी कोणत्याहि एका गुणाच्या बाबतींत रामाला माझी बरोबरी करता येणार नाही ( २९–३४ )

हे प्रिये, माझ्यावर प्रेम करून तूं यथेष्ट विहार कर, क्रीडा कर, इच्छेप्रमाणे पान कर भोग्य वस्तूंचा उपभोग घे, धनराशि देऊन राज्य आणि पृथ्वीहि

कुसुमिततरुजालसंततानि भ्रमरयुतानि समुद्रतीरजानि ।
कनकविमलहारभूषिताङ्गी विहर मया सह भीरु काननानि　३६

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे विंशः सर्गः ॥ २० ॥

एकविंशः सर्गः ।　[ ५६६ ]

तस्य तद्वचनं श्रुत्वा सीता रौद्रस्य रक्षसः ।
आर्ता दीनस्वरा दीनं प्रत्युवाच ततः शनैः　१
दुःखार्ता रुदती सीता वेपमाना तपस्विनी ।
चिन्तयन्ती वरारोहा पतिमेव पतिव्रता ॥
तृणमन्तरतः कृत्वा प्रत्युवाच शुचिस्मिता　२
निवर्तय मनो मत्तः स्वजने प्रीयतां मनः ।
न मां प्रार्थयितुं युक्तस्त्वं सिद्धिमिव पापकृत्　३
अकार्यं न मया कार्यमेकपत्न्या विगर्हितम् ।
कुलं संप्राप्तया पुण्यं कुले महति जातया　४

---

घेतला अर्पण कर, असलें म्हणजे तुझ्या वाधवानाही तुझी भेट घेऊं देत आपले सर्व मनोरथ इच्छेप्रमाणे परिपूर्ण करून घेऊं देत हे विनयसपन्न सीते, प्रफुल्लित वृक्षसमुदाय एकसारखे एक उद्यात आहेत आणि भ्रमरानी जी युक्त आहेत, अशा समुद्रतीरावरील वनामध्ये माझ्यासह तू सुवर्णाच्या उज्ज्वल हाराने भूषित होऊन यथेच्छ विहार कर (३५—३६)

याप्रमाणे महर्षि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणरूप आदिकाव्यातील सुंदरकांडविषयी विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २० ॥

त्या क्रूर राक्षसाचें तें भाषण श्रवण केल्यावर दुःखाकुल झालेली सीता दीनपणाने आणि मोठ्या व्याकुळतेने हळूहळू त्याला म्हणाली सारांश, दुःखाकुल झालेली, रडत असलेली, भीतीने कांपत असलेली व पतिव्रता असल्यामुळे पतीचेंच चिंतन करीत असलेली आणि राम समीप असताना शुभ हास्य करणारी, ती बिचारी सुंदरी सीता, तृण मध्ये ठेवून रावणाला म्हणाली, "तुझें मन माझ्यापासून निवृत्त होऊन स्वस्त्रियांचे ठिकाणी प्रीतियुक्त होऊं दे पापी पुरुष ज्याप्रमाणे ब्रह्मज्ञानप्राप्तीला योग्य होत नाही, त्याप्रमाणे तू माझी इच्छा करण्याला

एवमुक्त्वा तु वैदेही रावणं तं यशस्विनी ।
रावणं पृष्ठतः कृत्वा भूयो वचनमब्रवीत् ५
नाहमौपयिकी भार्या परभार्या सती तव ।
साधु धर्ममवेक्षस्व साधु साधुव्रतं चर ६
यथा तव तथान्येषां रक्ष्या दारा निशाचर ।
आत्मानमुपमां कृत्वा स्वेषु दारेषु रम्यताम् ७
अतुष्टं स्वेषु दारेषु चपलं चपलेन्द्रियम् ।
नयन्ति निकृतिप्रज्ञं परदाराः पराभवम् ८
इह सन्तो न वा सन्ति सतो वा नानुवर्तसे ।
यथा हि विपरीता ते बुद्धिराचारवर्जिता ९
वचो मिथ्या प्रणीतात्मा पथ्यमुक्तं विचक्षणैः ।
राक्षसानामभावाय त्वं वा न प्रतिपद्यसे १०

योग्य नाहींस. मोठ्या कुलामध्ये जन्मास येऊन पुण्य कुलात प्राप्त झालेल्या माझ्यासारख्या पतिव्रतेच्या हातून निंद्य कार्य कदापि होणार नाही. ( १–४ )

याप्रमाणे रावणाला सांगितल्यानंतर, ती यशस्विनी विदेहराजकन्या त्याच्याकडे पाठ करून पुनरपि म्हणाली, " तुला योग्य भार्या मी नव्हे मी परस्त्री आहे आणि पतिव्रता आहे यास्तव तूं चांगल्या रीतीने धर्माकडे दृष्टि देऊन, उत्तम प्रकाराने आपलें आचरण शुद्ध ठेव ( ५–६ )

हे निशाचरा, जशा तुझ्या स्त्रिया तुला संरक्षणीय आहेत, तशाच दुसऱ्याच्याही आहेत म्हणून आपणाला जसें दुःख होतें, तसेंच तें दुसऱ्याला दुःख होतें, असें समजून तूं स्वतः च्याच स्त्रियांचे ठिकाणीं रममाण हो स्वस्त्रीचे ठिकाणी असंतुष्ट, चंचल आणि प्रक्षुब्ध इंद्रियवृत्ति असणारा व सज्जनांना तिरस्करणीय वाटणारी बुद्धि धारण करणारा जो पुरुष असतो, त्याच्या पराजयाला परस्त्रिया कारणीभूत होत असतात ज्या अर्थी तुझी बुद्धि सदाचाररहित व विपरीत दिसत आहे, त्या अर्थी येथे कोणी सज्जनच नसावेत अथवा ते असले, तरी तूं त्यांची पर्वा करीत नसावास असें मला वाटतें दूरदर्शी लोकांनी सांगितलेला तुझा हिताचा उपदेश, तुझ्या बुद्धीचा ग्रह विपरीत झाला असल्यामुळे तू

अकृतात्मानमासाद्य राजानमनये रतम्।
समृद्धानि विनश्यन्ति राष्ट्राणि नगराणि च ११
तथैव त्वां समासाद्य लङ्का रत्नौघसंकुला।
अपराधात्तवैकस्य न चिराद्विनशिष्यति १२
स्वकृतैर्हन्यमानस्य रावणादीर्घदर्शिनः।
अभिनन्दन्ति भूतानि विनाशे पापकर्मणः १३
एवं त्वां पापकर्माणं वक्ष्यन्ति निकृता जनाः।
दिष्ट्यैतद्व्यसनं प्राप्तो रौद्र इत्येव हर्षिताः १४
शक्या लोभयितुं नाहमैश्वर्येण धनेन वा।
अनन्या राघवेणाहं भास्करेण यथा प्रभा १५
उपधाय भुजं तस्य लोकनाथस्य सत्कृतम्।
कथं नामोपधास्यामि भुजमन्यस्य कस्यचित् १६

ऐकत नाहीस, यामुळे सर्व राक्षसांचा नाश होईल. चांगला हिताचा उपदेश ऐकणे, ज्याच्या बुद्धीला पटत नाही व जो नेहमी लोकांवर अन्याय करीत असतो, अशा राजाच्या आश्रयाखालील समृद्ध असलेलींही राष्ट्रें व नगरें ज्याप्रमाणे नाश पावतात, त्याचप्रमाणे तुझा आश्रय केल्यामुळे रत्नसमुदायांनी खच्चून भरलेली ही लंका केवळ तुझ्या एकट्याच्या अपराधाने लवकरच नाश पावेल. ( ७–१२ )

हे रावणा, ज्याचे ठिकाणी दूरवर विचार नसतो आणि म्हणूनच स्वतःच्या कृत्यांनीच त्याचा नाश होणार, हे ठरलेलें असते. अशा दुष्ट पुरुषाचा नाश झाला, तर सर्व प्राणी ज्याप्रमाणे आनंद मानीत असतात, त्याचप्रमाणे " या दुष्टावर हें घोर संकट आलें, ही मोठी सुदैवाचीच गोष्ट समजली पाहिजे, " असेंच तूं दुःख दिलेले सर्व लोक, तुझीं दुष्कर्मे आठवून तुला उद्देशून म्हणूं लागतील. ऐश्वर्य अथवा धन यांचे जोरावर माझें मन कोणालाही वळवता येणें शक्य नाही, कारण सूर्यापासून जसें त्याचें तेज भिन्न असत नाही, तशीच मी रामापासून निराळी होणारी नाहीं. त्या लोकनाथ रामाचा मान्य हात उशाशीं घेऊन एकदा शयन केल्यावर दुसऱ्या कोणाचाही हात मस्तकाखाली घेऊन, मी कसें बरें शयन करणें शक्य आहे? ( १३–१६ )

अहमौपयिकी भार्या तस्यैव च धरापतेः ।
व्रतस्नातस्य विद्येव विप्रस्य विदितात्मनः १७
साधु रावण रामेण मां समानय दुःखिताम् ।
वने वासितया सार्धं करेण्वेव गजाधिपम् १८
मित्रमौपयिकं कर्तुं रामः स्थानं परीप्सता ।
वधं चानिच्छता घोरं त्वयासौ पुरुषर्षभः १९
विदितः सर्वधर्मज्ञः शरणागतवत्सलः ।
तेन मैत्री भवतु ते यदि जीवितुमिच्छसि २०
प्रसादयस्व त्वं चैनं शरणागतवत्सलम् ।
मां चास्मै प्रयतो भूत्वा निर्यातयितुमर्हसि २१
एवं हि ते भवेत्स्वस्ति संप्रदाय रघूत्तमे ।
अन्यथा त्वं हि कुर्वाणः परां प्राप्स्यसि चापदम् २२

ज्याप्रमाणे ब्रह्मविद्या ही ब्राह्मणालाच योग्य आहे, त्याप्रमाणे ब्रह्मचर्यव्रतपूर्वक समावर्तन झाल्यावर यथाविधि माझें पाणिग्रहण केलेल्या त्या पृथ्वीपति रामाचीच मी योग्य भार्या आहे, यासाठी, हे रावणा, वनामध्ये वास्तव्य केलेल्या हत्तिणीची ज्याप्रमाणे गजेशाशीं गाठ घालून देणें योग्य असतें, त्याप्रमाणे तूं नीट विचार कर व मजसारख्या या दुःखीकष्टी अबलेला रामाकडे पोचती कर. हें लंकास्थान सुरक्षित रहावें आणि आपणावर भयंकर आक्रमणास तोंड देण्याचा प्रसंग न यावा, अशी जर तुझी इच्छा असेल, तर या पुरुषश्रेष्ठ रामाला मित्र करून घेणेंच तुला योग्य आहे. जगद्विख्यात राम सर्व धर्म जाणणारा असून शरणागतास अभय देऊन प्रेम करणारा आहे. म्हणून तुला जर जिवंत राहण्याची इच्छा असेल, तर तूं त्याच्याशीं मैत्री जोड. शरणागतावर कृपा करणाऱ्या या रामाला तूं प्रसन्न करून घे आणि मन शुद्ध ठेऊन, तूं मला त्याच्या स्वाधीन कर. ( १७-२१ )

सारांश, मला जर रघुवंशजश्रेष्ठ रामाच्या स्वाधीन करशील, तरच तुझें कल्याण होईल आणि या माझ्या सांगण्याच्या विरुद्ध जर तू वागूं लागशील, तर तुला परात्पर असें भयंकर संकट प्राप्त होईल. इंद्राच्या हातून सुटलेलें वज्र अथवा

वर्जयेद्वज्रमुत्सृष्टं वर्जयेदन्तकश्चिरम् ।
त्वद्विधं न तु संक्रुद्धो लोकनाथः स राघवः २३
रामस्य धनुषः शब्दं श्रोष्यसि त्वं महास्वनम् ।
शतक्रतुविसृष्टस्य निर्घोषमशनेरिव २४
इह शीघ्रं सुपर्वाणो ज्वलितास्या इवोरगाः ।
इषवो निपतिष्यन्ति रामलक्ष्मणलक्षिताः २५
रक्षांसि निहनिष्यन्तः पुर्यामस्यां न संशयः ।
असंपातं करिष्यन्ति पतन्तः कङ्कवाससः २६
राक्षसेन्द्र महासर्पान्स रामगरुडो महान् ।
उद्धरिष्यति वेगेन वैनतेय इवोरगान् २७
अपनेष्यति मां भर्ता त्वत्तः शीघ्रमरिन्दमः ।
असुरेभ्यः श्रियं दीप्तां विष्णुस्त्रिभिरिव क्रमैः २८
जनस्थाने हतस्थाने निहते रक्षसां बले ।

प्रत्यक्ष मृत्यु हे यांही काळ कदाचित् तुझी उपेक्षा करतील, परंतु त्या लोकनाथ रामास एकदा जर क्रोध आला, तर तो तुझ्यासारख्याचा समूळ नाश केल्यावाचून राहणार नाही. इंद्राने सोडलेल्या वज्राच्या भयंकर आवाजाप्रमाणे रामाच्या धनुष्याचा अति प्रचंड शब्द तुझ्या कानीं पडेल. उत्कृष्ट पेरें व प्रदीप्त मुखें असलेल्या भुजंगाप्रमाणे दिसत असलेले आणि रामलक्ष्मणाच्या नावांनी चिन्हित झालेले बाण सत्वरच येथे तुझ्यावर येऊन पडतील. कंकपक्ष्याच्या पिसांनी युक्त असलेले त्यांचे बाण राक्षसांचा घात करण्याकरता या नगरींतील यत्किंचितही जागा मोकळी ठेवणार नाहींत. ( २१-२६ )

विनतापुत्र गरुड ज्याप्रमाणे मोठे मोठे सर्प वेगाने, त्वरेने उचलून नेत असतो, त्याप्रमाणे राक्षसराजरूपी मोठमोठे सर्प तो रामरूपी गरुड या नगरींतून वेगाने उचलून नेईल. तीन पावलें टाकून ज्याप्रमाणे विष्णूने दैत्यांपासून उज्ज्वल लक्ष्मी हरण करून नेली, त्याप्रमाणे शत्रूंना जेरीस आणणारा माझा भर्ता तुझ्यापासून मला त्वरेने घेऊन जाईल. हे राक्षसा, राक्षसांच्या सैन्याचा रामाच्या हातून वध होऊन, त्याने जनस्थानांतील सर्व राक्षसांचा स्थाने उध्वस्त केलीं आहेत. यामुळे

अशक्तेन त्वया रक्षः कृतमेतदसाधु वै २९
आश्रमं तत्तयोः शून्यं प्रविश्य नरसिंहयोः ।
गोचरं गतयोर्भ्रात्रोरपनीता त्वयाधम ३०
न हि गन्धमुपाघ्राय रामलक्ष्मणयोस्त्वया ।
शक्यं संदर्शने स्थातुं शुना शार्दूलयोरिव ३१
तस्य ते विग्रहे ताभ्यां युगग्रहणमस्थिरम् ।
वृत्रस्येवेन्द्रबाहुभ्यां बाहोरेकस्य विग्रहे ३२
क्षिप्रं तव सनाथो मे रामः सौमित्रिणा सह ।
तोयमल्पमिवादित्यः प्राणानादास्यते शरैः ३३
गिरिं कुबेरस्य गतोऽथवालयं सभां गतो वा वरुणस्य राज्ञः।
असंशयं दाशरथेर्विमोक्ष्यसे महाद्रुमः कालहतोऽशनेरिव ३४
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे एकविंशः सर्गः ॥ २१ ॥

[१००३]

इतका निर्बल झालास, तरी मला येथे हरण करून आणिलीस, हें नीट केलें नाहीस हे अधमा, ते पुरुषश्रेष्ठ बंधू वनामध्ये गेले असताना, त्यांच्या आश्रमामध्ये कोणी नाहींसें पाहून तूं प्रवेश केलास व मला तेथून घेऊन आलास, हे खरोखर वाईट केलेस अरे, वाघाच्या दृष्टीसमोर उभें राहण्यास ज्याप्रमाणे क्षुद्र श्वान समर्थ नसतें, त्याप्रमाणे रामलक्ष्मणांचा वास आल्यावर त्यांच्यासमोर उभा राहण्यास तू समर्थ होणार नाहीस ( २७–३१ )

वज्राने एक हात तुटून पडल्यानंतर वृत्रासुराचा शिल्लक राहिलेला दुसरा हात ज्याप्रमाणे युद्धामध्ये इंद्राच्या दोन हातांशीं टिकाव धरण्यास समर्थ झाला नाही, त्याप्रमाणे त्या रामलक्ष्मणांशी तुझें युद्ध सुरू झालें, तर तुला सहाय्य करणारें तुझें सैन्य मुळींसुद्धा टिकाव धरणार नाही. ज्याप्रमाणे पाणी थोडें असलें, तर तें सूर्य आपल्या किरणांनी तावडतोब नाहींसें करतो, त्याप्रमाणे लक्ष्मणासह तो माझा नाथ, राम आपल्या बाणांनी तुझा प्राण थोड्या क्षणात हरण करील. कुबेराचें निवासस्थान जो कैलास पर्वत, तेथे जरी तू गेलास किंवा वरुणराजाच्या सभेमध्ये जरी जाऊन बसलास, तरी विजेचा तडाका बसल्यावर महा प्रचंड वृक्ष ज्या-

द्वाविंशः सर्गः ।

सीताया वचनं श्रुत्वा परुषं राक्षसेश्वरः ।
प्रत्युवाच ततः सीतां विप्रियं प्रियदर्शनाम् ॥ १
यथा यथा सान्त्वयिता वश्यः स्त्रीणां तथा तथा ।
यथा यथा प्रियं वक्ता परिभूतस्तथा तथा ॥ २
संनियच्छति मे क्रोधं त्वयि कामः समुत्थितः ।
द्रवतो मार्गमासाद्य हयानिव सुसारथिः ॥ ३
वामः कामो मनुष्याणां यस्मिन्किल निबध्यते ।
जने तस्मिंस्त्वनुक्रोशः स्नेहश्च किल जायते ॥ ४
एतस्मात्कारणान्न त्वां घातयामि वरानने ।
वधार्हामवमानार्हां मिथ्या प्रव्रजने रताम् ॥ ५

---

प्रमाणें प्राण सोडिती, त्याप्रमाणें काळाचाच तडाका बसलेला तूं दशरथी रामाची गाठ पडेपर्यंतच निःसंशय प्राण सोडशील." ( ३२-३४ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांतील एकविसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २१ ॥

सीतेचें तें मर्मभेदी कठोर भाषण श्रवण केल्यावर, राक्षसाधिपति रावण अप्रिय शब्दांनी त्या प्रियदर्शन सीतेला म्हणाला, " पुरुष जों जों स्त्रियांचें सांत्वन करीत जातो, तों तों तो त्यांना आवडूं लागतो, असें सामान्यतः जगतामध्ये दिसून येतें; परंतु मी जसें जसें तुझ्याशीं प्रिय भाषण करीत आहें, तसा तसा तूं माझा अनादरच करीत आहेस. रस्ता सोडून धावत सुटलेल्या अश्वांना ज्याप्रमाणें चांगला सारथी आवरून धरतो, त्याप्रमाणें तुझ्यासंबंधीं माझ्या मनामध्यें उत्पन्न झालेला काम माझ्या क्रोधाला आवरून धरीत आहे. मनुष्याचा कामच खरोखर क्रोधापेक्षांहि क्रूर आहे; कारण ज्या ज्या व्यक्तीसंबंधीं अत्यंत क्रोध स्वाभाविकपणेंच येतो, त्याच व्यक्तीच्या ठिकाणीं काम बद्ध होऊन राहतो व त्या व्यक्तीबद्दल दया आणि प्रेम हीं खरोखर उत्पन्न होतात व या कारणामुळेच, हे सुंदरी, तुझा तिरस्कार करून, वध करणेंच योग्य असतांहि ब्रह्मचर्यपालनाविषयीं व्यर्थ तत्परता दाखवणाऱ्या तुझ्यासारखीचा मी घात करीत नाहीं. हे मैथिली, तूं माझ्याशीं

परुषाणि हि वाक्यानि यानि यानि ब्रवीषि माम् ।
तेषु तेषु वधो युक्तस्तव मैथिलि दारुणः ॥ ६
एवमुक्त्वा तु वैदेहीं रावणो राक्षसाधिपः ।
क्रोधसंरम्भसंयुक्तः सीतामुत्तरमब्रवीत् ७
द्वौ मासौ रक्षितव्यौ मे योऽवधिस्ते मया कृतः ।
ततः शयनमारोह मम त्वं वरवर्णिनि ८
द्वाभ्यामूर्ध्वं तु मासाभ्यां भर्तारं मामनिच्छतीम् ।
मम त्वां प्रातराशार्थं सूदाश्छेत्स्यन्ति खण्डशः ९
तां भर्त्स्यमानां संप्रेक्ष्य राक्षसेन्द्रेण जानकीम् ।
देवगन्धर्वकन्यास्ता विषेदुर्विकृतेक्षणाः १०
ओष्ठप्रकारैरपरा नेत्रैर्वक्त्रैस्तथापराः ।
सीतामाश्वासयामासुस्तर्जितां तेन रक्षसा ११
ताभिराश्वासिता सीता रावणं राक्षसाधिपम् ।
उवाचात्महितं वाक्यं वृत्तशौटीर्यगर्वितम् १२

जें जें कठोर भाषण करीत आहेस, त्या त्या अपराधाबद्दल भयंकर रीतीनें तुझा वध करणेंच योग्य आहे. " ( १-६ )

याप्रमाणे विदेहराजकन्या सीतेला सांगितल्यानंतर, क्रोधवश झालेला तो राक्षसाधिपति रावण पुनरपि तिला म्हणाला, " हे सुंदरी, माझ्या विचारास संमति देण्याबद्दल वाट पाहण्याची जी कालमर्यादा मी तुला सांगितली आहे, ती संपूर्ण होण्यास मला सुमारें दोन महिने थांबलें पाहिजे. या दोन महिन्यानंतर एक तर तुला माझ्या शय्येवर आरोहण करावें लागेल किंवा जर दोन महिन्यानंतरही भर्ता या नात्यानें तूं माझा स्वीकार केला नाहींस, तर माझ्या न्याहारीकरितां आचारी तुझे तुकडे तुकडे करून टाकितील. " ( ७-९ )

असें बोलून राक्षसराज रावण सीतेची निर्भर्त्सना करूं लागला, तेव्हां तेथें असलेल्या देवकन्या व गंधर्वकन्या यांचीं तोंडें उतरलीं व त्या मनांत खिन्न झाल्या आणि रावणानें सीतेला धमकी दिल्यानंतर दुसऱ्या देवकन्यांनी व गंधर्वकन्यांनी ओठ, नेत्र व मुख यांनी खुणा करून तिला धीर दिला. त्यांचा आधार

नूनं न ते जनः कश्चिदस्ति निःश्रेयसि स्थितः ।
निवारयति यो न त्वां कर्मणोऽस्माद्विगर्हितात् १३
मां हि धर्मात्मनः पत्नीं शचीमिव शचीपतेः ।
त्वदन्यास्त्रिषु लोकेषु प्रार्थयेन्मनसापि कः १४
राक्षसाधम रामस्य भार्याममिततेजसः ।
उक्तवानसि यत्पापं क्व गतस्तस्य मोक्ष्यसे १५
यथा दृप्तश्च मातङ्गः शशश्च सहितौ वने ।
तथा द्विरदवद्रामस्त्वं नीच शशवत्स्मृतः १६
स त्वमिक्ष्वाकुनाथं वै क्षिपन्निह न लज्जसे ।
चक्षुषो विषये तस्य न यावदुपगच्छसि १७
इमे ते नयने क्रूरे विकृते कृष्णपिङ्गले ।
क्षितौ न पतिते कस्मान्मामनार्य निरीक्षतः १८

मिळाल्यावर, सदाचरण आणि पतीचें शौर्य याचा अभिमान बाळगणाऱ्या सीतेनें राक्षसाधिपति रावणाला हितावह असें भाषण त्याच्याशीं तीनें केलें. (१०-१२)

ती म्हणाली " या नगरामध्ये तुझें कल्याण करण्याविषयीं दक्ष असलेला असा कोणीही पुरुष खरोखर नाहीं, कारण या निंद्य कर्मापासून तुझें कोणीच कसें निवारण करीत नाहीं ? अरे, इंद्राच्या शचीप्रमाणे असणारी जी मी, धर्मात्म्या रामाची पत्नी, तिची प्रार्थना करण्याचें मनामध्ये आणणारा तुझ्याशिवाय त्रैलोक्यामध्ये दुसरा कोणी सापडेल काय ? हे राक्षसाधमा, ज्याच्या तेजाला अंत नाहीं अशा रामाच्या भार्येला उद्देशून ज्या अर्थी तूं आपल्या मनांतील पापाचा उच्चार केलेला आहेस, त्या अर्थी कोठें गेलास तर तूं त्याच्या हातून सुटशील बरें ? मत्त हत्ती आणि ससा यांची वनामध्ये दुर्दैवानें प्रतिपक्षा या नात्यानें एकत्र गांठ पडावी, त्याप्रमाणें सांप्रतचा तुझा प्रकार झालेला आहे. राम हा मत्त गजाप्रमाणें आहे आणि हे नीचा, तूं क्षुद्र सशाप्रमाणें आहेस. त्याच्या दृष्टीच्या टप्प्यांत जोंपर्यंत तूं गेला नाहींस, तोंपर्यंत त्या इक्ष्वाकुनाथाची येथे निर्लज्जपणें निंदा करतांना तुला कांहींच वाटणार नाहीं, हे ठीक आहे, परंतु हे अनार्या, तूं माझ्याकडे वाईट नजरेनें निरखून पहात असतांना तुझे क्रूर, विकृत आणि कृष्णवर्ण व पिंगट-

तस्य धर्मात्मनः पत्नीं स्नुषां दशरथस्य च।
कथं व्याहरतो मां ते न जिह्वा पाप शीर्यति १९
असंदेशात्तु रामस्य तपसश्चानुपालनात्।
न त्वां कुर्मि दशग्रीव भस्म भस्मार्हतेजसा २०
नापहर्तुमहं शक्या तस्य रामस्य धीमतः।
विधिस्तव वधार्थाय विहितो नात्र संशयः २१
शूरेण धनदभ्राता बलैः समुदितेन च।
अपोह्य रामं कस्माच्चिद्दारचौर्यं त्वया कृतम् २२
सीताया वचनं श्रुत्वा रावणो राक्षसाधिपः।
विवृत्य नयने क्रूरे जानकीमन्ववैक्षत २३
नीलजीमूतसंकाशो महाभुजशिरोधरः।
सिंहसत्त्वगतिः श्रीमान्दीप्तजिह्वाग्रलोचनः २४

र्णाचे डोळे पृथ्वीवर गळून कसे पडले नाहीत? ( १३–१८ )

अरे, मी त्या धर्मात्म्या रामाची पत्नी व दशरथाची स्नुषा असून, माझ्याशीं असभ्य भाषण करीत असताना, हे पाप्या, तुझ्या जिव्हेचे तुकडे तुकडे कसे होत नाहींत? रामाची आज्ञा मला नाहीं आणि तपाचें परिपालन करावयाचें आहे, म्हणून, हे दशानना मी आपल्या पातिव्रत्याच्या तेजानें तुझें भस्म करण्यास समर्थ असलें, तरी तसें करत नाहीं. वस्तुत त्या विवेकी रामाची मी भार्या आहें, म्हणून तुझ्या हातून माझा अपहार होणें शक्यच नव्हतें परंतु तुझा वध व्हावा, त्यासाठीं दैवानेच हा प्रकार घडवून आणिला आहे, यात संशय नाहीं सैन्यबलावर प्रबल झालेला तूं, कुबेराचा भ्राता, मोठा शूर पडलास की नाहीं, म्हणून मारीच राक्षसाच्या मायेने रामाला फसवून दूर घालवून, स्त्रीचौर्य करण्याचें शौर्य तुझ्या हातून घडलें!" ( १९–२२ )

हें सीतेचें भाषण ऐकताच तो राक्षसाधिपति रावण आपले उग्र डोळे वटारून तिच्याकडे पाहूं लागला. या वेळीं मोठे मोठे हात व मस्तकें असलेला तो भव्य रावण नीलमेघाप्रमाणे दिसत होता, त्याचा पराक्रम व चालण्याची ढब ही सिंहाप्रमाणे होती, त्याच्या जिव्हा प्रदीप्त झाल्या असून, नेत्र उग्र दिसत होते, मुकुटाचा

चलाग्रमुकुटप्रांशुश्चित्रमाल्यानुलेपनः।
रक्तमाल्याम्बरधरस्तप्ताङ्गदविभूषणः २५
श्रोणीसूत्रेण महता मेचकेन सुसंवृतः।
अमृतोत्पादने नद्धो भुजङ्गेनेव मन्दरः २६
ताभ्यां स परिपूर्णाभ्यां भुजाभ्यां राक्षसेश्वरः।
शुशुभेऽचलसंकाशः शृङ्गाभ्यामिव मन्दरः २७
तरुणादित्यवर्णाभ्यां कुण्डलाभ्यां विभूषितः।
रक्तपल्लवपुष्पाभ्यामशोकाभ्यामिवाचलः २८
स कल्पवृक्षप्रतिमो वसन्त इव मूर्तिमान्।
श्मशानचैत्यप्रतिमो भूषितोऽपि भयङ्करः २९
अवेक्षमाणो वैदेहीं कोपसंरक्तलोचनः।
उवाच रावणः सीतां भुजङ्ग इव निःश्वसन् ३०

---

अग्रभाग वर वर सरत असल्यामुळे, तो अधिकच उंच दिसत होता; चित्रविचित्र पुष्पमाला व उट्या त्याने लावलेल्या होत्या; रक्तवर्णाची पुष्पें आणि वस्त्रें त्याने धारण केलीं असून, उत्कृष्ट सुवर्णाचीं बाहुभूषणें त्याने घातलेलीं होतीं, मोठ्या कृष्णवर्ण कटिसूत्राने तो चांगलाच बद्ध झाला असल्यामुळे, अमृत उत्पन्न करण्या-करता वासुकि नावाच्या भुजंगाने बद्ध झालेला मंदरपर्वतच कीं काय असा तो दिसत होता. ( २३-२६ )

हातांनी परिपूर्ण असलेल्या आपल्या भुजामुळे तो पर्वतप्राय देहाचा राक्षसाधि-पति शिखरांच्या योगाने शोभणाऱ्या मंदरपर्वताप्रमाणे शोभत होता. बालसूर्या-प्रमाणे तेजस्वी कुंडलांनी तो भूषित झाला होता, म्हणून तो आरक्तवर्ण पानें व पुष्पें असणाऱ्या अशोकवृक्षांनी भूषित झालेला दुसरा पर्वतच कीं काय, असा दिसत होता. सर्व भोग्य पदार्थ जवळ असल्यामुळे तो रावण कल्पवृक्षतुल्य असून, अलंकार धारण केलेला असल्यामुळे जरी मूर्तिमान् वसंत ऋतूच असा भासत होता, तरी श्मशानातील प्रसिद्ध ठिकाणच्या वृक्षाप्रमाणे तो भयंकरहि होता. याप्रमाणे क्रोधाने ज्याचे डोळे लालबुंद झाले आहेत, असा तो रावण भुजंगाप्रमाणे सुस्कारे टाकीत टाकीत सीतेकडे वळून म्हणाला, " सूर्य ज्याप्रमाणे

अनयेनाभिसंपन्नमर्थहीनमनुव्रते ।
नाशयाम्यहमद्य त्वां सूर्यः संध्यामिवौजसा ३१
इत्युक्त्वा मैथिलीं राजा रावणः शत्रुरावणः ।
संददर्श ततः सर्वा राक्षसीर्घोरदर्शनाः ३२
एकाक्षीमेककर्णां च कर्णप्रावरणां तथा ।
गोकर्णीं हस्तिकर्णीं च लम्बकर्णीमकर्णिकाम् ३३
हस्तिपद्यश्वपद्यौ च गोपदीं पादचूलिकाम् ।
एकाक्षीमेकपादीं च पृथुपादीमपादिकाम् ३४
अतिमात्रशिरोग्रीवामतिमात्रकुचोदरीम् ।
अतिमात्रास्यनेत्रां च दीर्घजिह्वानखामपि ३५
अनासिकां सिंहमुखीं गोमुखीं सूकरीमुखीम् ३६
यथा मद्वशगा सीता क्षिप्रं भवति जानकी ।

---

संधिकालीन अंधःकाराचा नाश करतो, त्याप्रमाणे मर्यादा सोडून वागणाऱ्या दरिद्री रामाचें अवलंबन करीत असलेल्या तुझा मी आज आपल्या सामर्थ्याच्या योगानें नाश करून टाकीन." (२७-३१)

. असें सीतेला सांगितल्यानंतर शत्रूला गर्भगळित करणाऱ्या रावणराजानें त्या ठिकाणच्या दिसण्यातही भयंकर असलेल्या सर्व राक्षसस्त्रिया अवलोकन केल्या. कोणाला एकच नेत्र, कोणाला एकच कान, कोणाचे कान उत्तरीय वस्त्राप्रमाणें शरीर आच्छादन करता येण्यासारखे विशाल, तर कोणाचे कान गाईसारखे, कोणाचे हत्तीसारखे, कोणाचे लांब व कोणी मुळीच कानाशिवाय होत्या. कोणाचे पाय हत्तीसारखे, कोणाचे अश्वासारखे, कोणाचे बैलासारखे, कोणाच्या पायालाच कानाप्रमाणे पाळ्या फुटलेल्या, कोणाला एकच नेत्र, कोणाला एकच पाय, कोणाचे पाय स्थूल, कोणी मुळीच पायांशिवाय; कोणाच्या मस्तकाचें व मानेचें प्रमाण फारच मोठें, कोणाचे स्तन व उदर अतिशयच प्रचंड, कोणाचें मुख व नेत्र फारच मोठे, कोणाची जीभ व नखें फारच लांब, कोणी मुळीच नासिकाहीन, कोणाचें मुख सिंहासारखें, कोणाचें बैलासारखें आणि कोणाचें डुकरासारिखें होतें. अशा प्रकारच्या राक्षसस्त्रिया पाहून त्यांना तो म्हणाला, "हे

तथा कुरुत राक्षस्यः सर्वाः क्षिप्रं समेत्य वा ३७
प्रतिलोमानुलोमैश्च सामदानादिभेदनैः ।
आवर्जयत वैदेहीं दण्डस्योद्यमनेन च ३८
इति प्रतिसमादिश्य राक्षसेन्द्रः पुनः पुनः ।
काममन्युपरीतात्मा जानकीं प्रति गर्जत ३९
उपगम्य ततः क्षिप्रं राक्षसी धान्यमालिनी ।
परिष्वज्य दशग्रीवमिदं वचनमब्रवीत् ४०
मया क्रीड महाराज सीतया किं तवानया ।
विवर्णया कृपणया मानुष्या राक्षसेश्वर ४१
नूनमस्यां महाराज न देवा भोगसत्तमान् ।
विदधत्यमरश्रेष्ठास्तव बाहुबलार्जितान् । ४२
अकामां कामयानस्य शरीरमुपतप्यते ।
इच्छतीं कामयानस्य प्रीतिर्भवति शोभना ४३

---

राक्षसस्त्रियांनो जनकन्या सीता मला लवकर वश होईल, अशा रीतीने तुम्ही सर्व व्यवस्था लवकर करा, तुम्ही एकत्र जमून तिला उपदेश करा आणि प्रतिकूल व अनुकूल हे दोन्हा प्रकार उपायामध्ये आहेत, अशा साम, दान प्रभृति भेदक उपायानी अथवा दंड उगारूनही तुम्ही सीतेचें मन वळवा ”( ३७–३८ )

असें त्याना सांगून विषयवासना व क्रोध यात गुरफटलेला तो राक्षसराज पुन्हा पुन्हा जानकीला उद्देशून मोठ्याने गर्जना करू लागला तेव्हा धान्यमालिनी नावाची राक्षसी लागलीच त्याच्याजवळ गेली आणि त्याला आलिंगन देऊन म्हणाली, “ हे महाराजा, तू माझ्यासह क्रीडा कर हे राक्षसाधिपते, या कळकट भिकारड्या मानवी सीतेशी तुला काय कर्तव्य आहे ? हे महाराज, आपल्या बाहुबलाने तूं ज्या सर्वोत्कृष्ट भोग्य वस्तु संपादन केल्या आहेत, त्या केवळ हिच्यासाठी तू खर्चून टाकण्यास अमरश्रेष्ठ देवहि तुला मान्यता देणार नाहीत इतकी थोर योग्यता हिचा नाही शिवाय निष्काम असलेल्या स्त्रीची इच्छा धरणाऱ्याचें शरीर मात्र जळत असतें, पण तेच सकाम स्त्रीची इच्छा धरणाऱ्याला तिच्यापासून चांगला आनंद प्राप्त होत असतो ( ३९–४३ )

एवमुक्तस्तु राक्षस्या समुत्क्षिप्तस्ततो बली ।
प्रहसन्मेघसंकाशो राक्षसः स न्यवर्तत ४४
प्रस्थितः स दशग्रीवः कम्पयन्निव मेदिनीम् ।
ज्वलद्भास्करसंकाशं प्रविवेश निवेशनम् ४५
देवगन्धर्वकन्याश्च नागकन्याश्च तास्ततः ।
परिवार्य दशग्रीवं प्रविष्टास्ता गृहोत्तमम् ४६
स मैथिलीं धर्मपरामवस्थितां प्रवेपमानां परिभर्त्स्य रावणः ।
विहाय सीतां मदनेन मोहितः स्वमेव वेश्म प्रविवेश रावणः ४७
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे द्वाविंशः सर्गः ॥२२॥

त्रयोविंशः सर्गः । [ १०५० ]

इत्युक्त्वा मैथिलीं राजा रावणः शत्रुरावणः ।
संदिश्य च ततः सर्वा राक्षसीर्निर्जगाम ह १
निष्क्रान्ते राक्षसेन्द्रे तु पुनरन्तःपुरं गते ।
राक्षस्यो भीमरूपास्ताः सीतां समभिदुद्रुवुः २

---

याप्रमाणे बोलून त्या राक्षसीने त्याला तेथून दूर सारलें, तेव्हां तो मेघतुल्य बलाढ्य राक्षस तेथून हसतहसत परत फिरला. चालण्यामुळे जणू पृथ्वी कंपित करीतच तो रावण तेथून निघाला आणि उज्ज्वल सूर्याप्रमाणे तेजस्वी असलेल्या आपल्या प्रासादांत त्याने प्रवेश केला. देवकन्या, गंधर्वकन्या व नागकन्या ज्या त्याच्याभोवती गराडा देऊन उभ्या होत्या, त्याही त्याच्याबरोबर त्या श्रेष्ठ गृहामध्ये प्रविष्ट झाल्या. सारांश, धर्माविषयी तत्पर आणि थरथर कांपत असलेल्या त्या मिथिलराजकन्या सीतेची निर्भर्त्सना केल्यानंतर, तिला तेथेंच सोडून देऊन तो मदनाने मोहवश झालेला रावण स्वतःच्याच प्रासादांत परत गेला. (४४-४७)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडापैकी बाविसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २२ ॥

शत्रूंमध्ये हाहाकार करून टाकणारा तो रावण याप्रमाणे सीतेला बोलून आणि त्या सर्व राक्षसींना आपल्या आज्ञा सांगून तेथून निघून गेला. तो राक्षसराज तेथून निघून पुनः अंतःपुरामध्ये गेल्यावर सीतेभोंवताली असलेल्या भयंकर

ततः सीतामुपागम्य राक्षस्यः क्रोधमूर्च्छिताः ।
परं परुषया वाचा वैदेहीमिदमब्रुवन् ३
पौलस्त्यस्य वरिष्ठस्य रावणस्य महात्मनः ।
दशग्रीवस्य भार्यात्वं सीते न बहु मन्यसे ४
ततस्त्वेकजटा नाम राक्षसी वाक्यमब्रवीत् ।
आमन्त्र्य क्रोधताम्राक्षी सीतां करतलोदरीम् ५
प्रजापतीनां षण्णां तु चतुर्थोऽयं प्रजापतिः ।
मानसो ब्रह्मणः पुत्रः पुलस्त्य इति विश्रुतः ६
पुलस्त्यस्य तु तेजस्वी महर्षिर्मानसः सुतः ।
नाम्ना स विश्रवा नाम प्रजापतिसमप्रभः ७
तस्य पुत्रो विशालाक्षि रावणः शत्रुरावणः ।
तस्य त्वं राक्षसेन्द्रस्य भार्या भवितुमर्हसि ।
मयोक्तं चारुसर्वाङ्गि वाक्यं किं नानुमन्यसे ८
ततो हरिजटा नाम राक्षसी वाक्यमब्रवीत् ।

---

रूप धारण करणाऱ्या राक्षसस्त्रिया संताप अनावर होऊन तिच्याकडे धावल्या. क्रोधाने व्याप्त झालेल्या त्या राक्षसस्त्रिया सीतेसमीप गेल्यानंतर अति कठोर वाणीने तिला म्हणाल्या, " हे सीते, पुलस्त्यपुत्र व श्रेष्ठ अशा त्या महात्म्या दशानन रावणाची भार्या होणें तुला बरें वाटत नाही, हें नीट नव्हे. " ( १-४ )

नंतर क्रोधाने जिचे डोळे लालबुंद झाले आहेत, अशी एकजटा नांवाची राक्षसी त्या सडपातळ सीतेला हाक मारून म्हणाली, "सहा प्रजापतींपैकी पुलस्त्य या नावाने प्रसिद्ध असलेला हा प्रजापति, ब्रह्मदेवाचा मानसपुत्र असून, चवथा प्रजापतिच होय. तो कांतीने प्रजापतीसारखा असून विश्रवा या नावाने प्रसिद्ध असलेला तेजस्वी महर्षि त्या पुलस्त्याचा मानसपुत्र होय. हे विशालनयने सीते, शत्रूंमध्ये हाहाकार उडवून देणारा हा रावण त्या प्रख्यात पुलस्त्याचा पुत्र होय. तेव्हा त्या राक्षसराजाची भार्या होणें तुला अयोग्य नाही. हे सर्वांगसुंदरी, मी केलेला हा उपदेश तुला पटत कसा नाही? " ( ५-८ )

विवृत्य नयने कोपान्मार्जारसदृशेक्षणा ९
येन देवास्त्रयस्त्रिंशद्देवराजश्च निर्जितः ।
तस्य त्वं राक्षसेन्द्रस्य भार्या भवितुमर्हसि १०
वीर्योत्सिक्तस्य शूरस्य संग्रामेष्वनिवर्तिनः ।
बलिनो वीर्ययुक्तस्य भार्यात्वं किं न लिप्ससे ११
प्रियां बहुमतां भार्यां त्यक्त्वा राजा महाबलः
सर्वासां च महाभागां त्वामुपैष्यति रावणः १२
समृद्धं स्त्रीसहस्रेण नानारत्नोपशोभितम् ।
अन्तःपुरं तदुत्सृज्य त्वामुपैष्यति रावणः १३
अन्या तु विकटा नाम राक्षसी वाक्यमब्रवीत् १४
असकृद्भीमवीर्येण नागा गन्धर्वदानवाः ।
निर्जिताः समरे येन स ते पार्श्वमुपागतः १५
तस्य सर्वसमृद्धस्य रावणस्य महात्मनः ।
किमर्थं राक्षसेन्द्रस्य भार्यात्वं नेच्छसेऽधमे ।
ततस्तां दुर्मुखी नाम राक्षसी वाक्यमब्रवीत् १६

या नंतर माजरासारख्या नेत्रांची हरिजटा नामक राक्षसी रागाने डोळे वटारून म्हणाली, " ज्याने तेहेतीस देव आणि देवराज इंद्र यांचा युद्धात पराभव केला, त्या राक्षसराज रावणाची तूं भार्या होणेंच उचित आहे. वीर्याने उचंबळत असलेला आणि संग्रामामध्ये कधींही परावृत्त न होणारा जो शूर, बलाढ्य व वीर्यवान् रावण, त्याची भार्या होणें तुझ्या मनात कसें बरें येत नाही ? महाबलाढ्य रावणराजा अतिशय श्रेष्ठ असलेल्या आपल्या प्रिय भार्येचा त्याग करून, सर्वांमध्ये अतिशय भाग्यवान् असलेल्या तुझाच स्वीकार करील. सहस्र स्त्रियांनी परिपूर्ण भरलेलें आणि नाना प्रकारच्या रत्नांनी सुशोभित असलेलें आपलें अन्तःपुर सोडून देऊन रावण तुझाच स्वीकार करील. " ( ९-१३ )

यानंतर विकटा नामक राक्षसी म्हणाली, " ज्या भयंकर पराक्रमी रावणाने नाग, गंधर्व आणि दानव यांना समरांगणामध्ये जिंकलें, तो तुझ्या अगदी निकट सांनिध्यात आला असून, हे अधमे, त्या सर्वगुणसंपन्न महात्म्या राक्षसराज

यस्य सूर्यो न तपति भीतो यस्य स मारुतः १७
न वाति स्मायतापाङ्गि किं त्वं तस्य न तिष्ठसे १८
पुष्पवृष्टिं च तरवो मुमुचुर्यस्य वै भयात्।
शैलाः सुषुवुः पानीयं जलदाश्च यदेच्छति १९
तस्य नैर्ऋतराजस्य राजराजस्य भामिनि।
किं त्वं न कुरुषे बुद्धिं भार्यार्थे रावणस्य हि २०
साधु ते तत्त्वतो देवि कथितं साधु भामिनि।
गृहाण सुस्मिते वाक्यमन्यथा न भविष्यसि २१

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रयोविंशः सर्गः ॥२३॥

चतुर्विंशः सर्गः । [ १०७१ ]

ततः सीतां समस्तास्ता राक्षस्यो विकृताननाः।
परुषं परुषानर्हामूचुस्तद्वाक्यमप्रियम् १
किं त्वमन्तःपुरे सीते सर्वभूतमनोरमे।

रावणाची भार्या होणें तुझ्या कसें बरें मनांत येत नाही?" यानंतर दुर्मुखी नावाची राक्षसी तिला म्हणाली, "ज्याला भिऊन जाऊन सूर्य प्रकाशत नाही आणि वायूही वहात नाही, त्या रावणाच्या वश होऊन, हे विशालनयने सीते, तूं का घरें रहात नाहीस? ज्याच्या भीतीनें वृक्ष पुष्पांचा वर्षाव करतात, आणि ज्याने इच्छा प्रकट केली असता पर्वत व मेघ जलस्राव करूं लागतात, त्या राजाधिराज राक्षसाधिपति रावणाची भार्या होण्याची बुद्धि तुला कशी बरें होत नाही? हे देवी, हे भामिनी, खरोखर तुझ्या हिताचा आणि उत्कृष्ट असा उपदेश मी तुला केला आहे; यास्तव, हे सुहास्यवदने, तूं हा उपदेश ऐक, नाही तर तुझें अस्तित्वच रहाणार नाही." (१४-२१)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडांतील तेविसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २३ ॥

नंतर अक्राळविक्राळ चेहऱ्याच्या त्या सर्व राक्षसस्त्रिया, कठोर भाषण करण्यास पात्र नसलेल्या त्या सीतेला उद्देशून कर्णकठोर व अप्रिय भाषण करूं लागल्या त्या म्हणाल्या, "सर्व प्राण्यांचें मन आकर्षून टाकणाऱ्या आणि मोठ्या

महार्हशयनोपेते न वासमनुमन्यसे २
मानुषे मानुषस्यैव भार्यात्वं बहु मन्यसे।
प्रत्याहर मनो रामान्नैवं जातु भविष्यति ३
त्रैलोक्यवसुभोक्तारं रावणं राक्षसेश्वरम्।
भर्तारमुपसंगम्य विहरस्व यथासुखम् ४
मानुषी मानुषं तं तु राममिच्छसि शोभने।
राज्याद्भ्रष्टमसिद्धार्थं विक्लवं तमनिन्दिते ५
राक्षसीनां वचः श्रुत्वा सीता पद्मनिभेक्षणा।
नेत्राभ्यामश्रुपूर्णाभ्यामिदं वचनमब्रवीत् ६
यदिदं लोकविद्विष्टमुदाहरत संगताः।
नैतन्मनसि वाक्यं मे किल्बिषं प्रतितिष्ठति ७
न मानुषी राक्षसस्य भार्या भवितुमर्हति।
कामं खादत मां सर्वा न करिष्यामि वो वचः ८
दीनो वा राज्यहीनो वा यो मे भर्ता स मे गुरुः।

मोठ्या मूल्यवान् शय्या असलेल्या अंतःपुरामध्ये राहणें तुला का बरें पसंत पडत नाही? हे मानुषे, मनुष्याचीच भार्या होऊन राहणें तुला उत्तम वाटत आहे, परंतु रामापासून तूं आपलें मन निवृत्त कर; कारण तुझ्या मनात असलेल्या रामाची व तुझी गाठ पडणें पुनः कधीच शक्य नाही. सारांश, त्रैलोक्यातील संपत्तीचा उपभोग घेणाऱ्या राक्षसाधिपति रावणाशीं तूं भर्ता या नात्यानें समागम करून खुशाल क्रीडा कर. हे कल्याणी, हे सुंदरी, तूं स्वतः मनुष्य असून राज्यापासून भ्रष्ट झालेल्या व मनोरथ भग्न झाल्यामुळे दुःखित झालेल्या त्या मनुष्यदेही रामाची तू इच्छा करीत आहेस, हे नीट नाही." ( १—५ )

हें राक्षसस्त्रियांचें भाषण श्रवण केल्यावर त्या कमलनयना सीतेचे डोळे अश्रूंनी भरून आले आणि ती म्हणाली, " तुम्ही एकत्र होऊन जगतामध्ये निंद्य ठरलेला उपदेश मला करीत आहा, परंतु तो पातक वाटवणारा असल्यामुळे माझ्या मनामध्ये ठसत नाही. मनुष्यस्त्री राक्षसाची भार्या होणें योग्य नाही. यास्तव, तुम्ही साऱ्या जणी मला खाऊन टाका, पण मी तुमचें म्हणणें ऐकणार

तं नित्यमनुरक्तास्मि यथा सूर्यं सुवर्चला ९
यथा शची महाभागा शक्रं समुपतिष्ठति ।
अरुन्धती वसिष्ठं च रोहिणी शशिनं यथा १०
लोपामुद्रा यथागस्त्यं सुकन्या च्यवनं यथा ।
सावित्री सत्यवन्तं च कपिलं श्रीमती यथा ११
सौदासं मदयन्तीव केशिनी सगरं यथा ।
नैषधं दमयन्तीव भैमी पतिमनुव्रता १२
तथाहमिक्ष्वाकुवरं रामं पतिमनुव्रता ।
तथाहमिक्ष्वाकुवरं रामं पतिमनुव्रता १३
सीताया वचनं श्रुत्वा राक्षस्यः क्रोधमूर्च्छिताः ।
भर्त्सयन्ति स्म परुषैर्वाक्यै रावणचोदिताः १४
अवलीनः स निर्वाक्यो हनुमाञ्शिंशपाद्रुमे ।
सीतां संतर्जयन्तीस्ता राक्षसीरशृणोत्कपिः १५
तामभिक्रम्य संरब्धा वेपमानां समन्ततः ।

नाही. दीन असो अथवा राज्यहीन असो, भर्ता हेंच माझें उपास्यदैवत आहे, म्हणून सूर्यपत्नी सुवर्चला ज्याप्रमाणें सूर्यावर नेहमी अनुरक्त असते, त्याप्रमाणें मी नेहमी त्या रामच्याच ठिकाणीं अनुरक्त आहें. ज्याप्रमाणें महाभाग्यवती शची इंद्राचें, अरुंधती वसिष्ठाचें, रोहिणी चंद्राचें, लोपामुद्रा अगस्त्याचें, सुकन्या च्यवनाचें, सावित्री सत्यवानाचें, श्रीमती कपिलाचें, मदयंती सौदासाचें, केशिनी सगराचें अथवा भीमराजाची कन्या दमयंती निषधराज नलाचें अवलंबन करून राहिली, त्याप्रमाणें मी माझा भर्ता इक्ष्वाकुवंशज श्रेष्ठ जो राम त्याचेंच अवलंबन करून राहिलेली आहें " ( ९—१३ )

हें सीतेचें भाषण ऐकतांच राक्षसस्त्रियांना अत्यंत क्रोध आला आणि रावणाची त्यांना तशी आज्ञा झाली असल्यामुळें कर्णकटु शब्दांनीं तिची निर्भर्त्सना करूं लागल्या. त्या राक्षसस्त्रिया सीतेला धमकी देऊं लागल्या असतांना, त्याचीं भाषणें, शिंशपावृक्षावर कांहींएक न बोलतां गुपचुप दडून बसलेला हनुमान वानर ऐकत होता. रागानें लटलट कांपत असलेल्या व सभोंवतीं गराडा देऊन

भृशं संलिलिहुर्दीप्तान्प्रलम्बान्दशनच्छदान् १६
ऊचुश्च परमक्रुद्धाः प्रगृह्याशु परश्वधान् ।
नेयमर्हति भर्तारं रावणं राक्षसाधिपम् १७
सा भर्त्स्यमाना भीमाभी राक्षसीभिर्वराङ्गना ।
सा बाष्पमपमार्जन्ती शिंशपान्तामुपागमत् १८
ततस्तां शिंशपां सीता राक्षसीभिः समावृता ।
अभिगम्य विशालाक्षी तस्थौ शोकपरिप्लुता १९
तां कृशां दीनवदनां मलिनाम्बरवासिनीम् ।
भर्त्सयाञ्चक्रिरे भीमा राक्षस्यस्ताः समन्ततः २०
ततस्तु विनता नाम राक्षसी भीमदर्शना ।
अब्रवीत्कुपिताकारा कराला निर्णतोदरी २१
सीते पर्याप्तमेतावद्भर्तुः स्नेहः प्रदर्शितः ।
सर्वत्रातिकृतं भद्रे व्यसनायोपकल्पते २२

---

बसलेल्या राक्षसस्त्रिया क्रुद्ध होऊन सीतेजवळ आल्या आणि आपले प्रदीप्त व दीर्घ ओठ एकसारख्या चाटू लागल्या नंतर त्या अतिशय क्रुद्ध होऊन व हातातील कुऱ्हाडी सरसावून म्हणाल्या, " राक्षसाधिपति रावण हिचा भर्ता व्हावा, इतकी हिची योग्यताच नाही " याप्रमाणे तेथल्या भयंकर राक्षसस्त्रिया तिची कठोर शब्दांनी निर्भर्त्सना करू लागल्या तेव्हा ती श्रेष्ठ स्त्री सीता अश्रु पुशीत पुशीत त्या शिंशपावृक्षाजवळ गेली ( १४–१८ )

अशा रीतीने राक्षसस्त्रियांनी वेढून टाकलेली व शोकाने घेरलेली ती विशाल-नयना सीता त्या शिंशपावृक्षासमीप जाऊन उभी राहिली, तरी त्या दीनवदन होऊन मलिन वस्त्र परिधान करणाऱ्या व कृश झालेल्या सीतेच्याभोवती जमून, त्या भयंकर राक्षसस्त्रिया तिची निर्भर्त्सना करू लागल्याच शिंशपावृक्षासमीप गेल्यानंतर भयंकर नेत्र, रागीट मुद्रा व खपाटी गेलेले पोट असलेली विनतानामक अक्राळ-विक्राळ राक्षसी तिला म्हणाली, " हे सीते, झालें इतकें पुरें झालें तू भर्त्याविषयीं आपलें प्रेम दर्शविलेंस हें ठीक झालें, पण हे कल्याणी, कोणतीही गोष्ट अति झाली, तर तीच संकटाला कारणीभूत होत असते. हे मैथिली, तुझें देव बरें

परितुष्टास्मि भद्रं ते मानुषस्ते कृतो विधिः ।
ममापि तु वचः पथ्यं ब्रुवन्त्याः कुरु मैथिली २३
रावणं भज भर्तारं भर्तारं सर्वरक्षसाम् ।
विक्रान्तमापतन्तं च सुरेशमिव वासवम् २४
दक्षिणं त्यागशीलं च सर्वस्य प्रियवादिनम् ।
मानुषं कृपणं रामं त्यक्त्वा रावणमाश्रय २५
दिव्याङ्गरागा वैदेहि दिव्याभरणभूषिता ।
अद्यप्रभृति लोकानां सर्वेषामीश्वरी भव २६
अग्नेः स्वाहा यथा देवी शची वेन्द्रस्य शोभने ।
किं ते रामेण वैदेहि कृपणेन गतायुषा २७
एतदुक्तं च मे वाक्यं यदि त्वं न करिष्यसि ।
अस्मिन्मुहूर्ते सर्वास्त्वां भक्षयिष्यामहे वयम् २८
अन्या तु विकटा नाम लम्बमानपयोधरा ।
अब्रवीत्कुपिता सीतां मुष्टिमुद्यम्य तर्जती २९

---

खरो मनुष्यजातीला योग्य असें वर्तन तूं केलें आहेस. आता मी तुझ्यावर संतुष्ट झालें आहें, म्हणून यापुढें तुझ्या हिताचें मी सांगत आहे म्हणून माझ्या सांगण्याप्रमाणें तूं वाग. देवराज इंद्राप्रमाणें पराक्रमी व शत्रूवर चाल करून जाणाऱ्या त्या सर्व राक्षसाधिपति रावणाचा तूं भर्ता म्हणून अंगीकार कर. सारांश, दरिद्री मनुष्यजातीच्या रामाचा त्याग करून, सरळ दानशूर आणि सर्वांशीं प्रिय भाषण करणाऱ्या रावणाचा तूं आश्रय कर. ( १९—२५ )

हे विदेहराजकन्ये, दिव्य अलंकारांनी भूषित होऊन आणि दिव्य उटी अंगाला लावून तूं आजपासून सर्व लोकांची स्वामिनी हो. हे कल्याणी, अग्नीची ज्याप्रमाणें स्वाहा अथवा इंद्राची शची भार्या आहे, त्याप्रमाणें तूं रावणाची भार्या हो. हे वैदेही, तुला त्या अभागी मुमूर्षु रामाशीं काय कर्तव्य आहे? या माझ्या सांगण्याप्रमाणें जर तूं न वागशील, तर या क्षणामध्येंच आम्ही साऱ्या जणी तुला खाऊन टाकूं" यानंतर जिचे स्तन खालीं लोंबत आहेत, अशी एक मूठ उगारून सीतेला धमकी देत असलेली विकटा नामक क्रुद्ध झालेली राक्षसी म्हणाला

बहून्यप्रतिरूपाणि वचनानि सुदुर्मते
अनुक्रोशान्मृदुत्वाच्च सोढानि तव मैथिलि ३०
न च नः कुरुषे वाक्यं हितं कालपुरस्कृतम् ।
आनीतासि समुद्रस्य पारमन्यैर्दुरासदम् ।
रावणान्तःपुरे घोरे प्रविष्टा चासि मैथिलि - ३१
रावणस्य गृहे रुद्धा अस्माभिस्त्वभिरक्षिता ।
न त्वां शक्तः परित्रातुमपि साक्षात्पुरन्दरः ३२
कुरुष्व हितवादिन्या वचनं मम मैथिलि ।
अलमश्रुनिपातेन त्यज शोकमनर्थकम् । ३३
भज प्रीतिं प्रहर्षं च त्यजन्ती नित्यदैन्यताम् ।
सीते राक्षसराजेन परिक्रीड यथासुखम् ३४
जानीमहे यथा भीरु स्त्रीणां यौवनमध्रुवम् ।
यावन्न ते व्यतिक्रामेत्तावद् दुःखमवाप्नुहि ३५

" हे महादुष्टे मैथिली, दयेमुळे आणि आमचा स्वभाव गरीब पडल्यामुळे तुझी पुष्कळच अप्रिय भाषणें या वेळेपर्यंत आम्ही सहन केली. ( २६-३० )

आता सांप्रतच्या कालाला योग्य व तुला हितावह असा आमचा उपदेश जर तूं ऐकणार नाहींस, तर प्राप्त परिस्थितीचा विचार कर, कारण इतरास जेथे प्रवेश करतां येणे अशक्य आहे, अशा समुद्राच्या परतीराला-लंकेला-तुला आणलें असून, हे मैथिलि, रावणाच्या घोर अंतःपुरामध्ये तुला आणून ठेविलें आहे. इतकेच नव्हे तर रावणाच्या गृहामध्ये तुला डांबून ठेवून तुझ्या पहाऱ्यावर आम्ही आहों. तेव्हां इंद्रही आता तुझें रक्षण करण्यास समर्थ नाहीं, हे तूं पक्के समजून ठेव आणि हे मैथिलि, तुझ्या हिताची गोष्ट मी सांगत आहे, ती ऐक. डोळ्यातून अश्रु टाळणें आता बस झालें, असा शोक करण्यात काही अर्थ नाहीं हे सीते, नेहमींचा दीनपणा सोडण्याची इच्छा असली, तर रावणाचे ठिकाणीं प्रेमबुद्धि धारण कर व तूं आनंदित हो आणि, त्या राक्षसराजासह तूं सुखाने क्रीडा करीत रहा हे भित्र्या सीते, स्त्रियांचे यौवन अशाश्वत आहे, असें आम्ही समजतों, म्हणून ते जोंपर्यंत कायम आहे तोंपर्यंत तूं दुःख ओढवून घेऊ

उद्यानानि च रम्याणि पर्वतोपवनानि च ।
सह राक्षसराजेन चर त्वं मदिरेक्षणे ३६
स्त्रीसहस्राणि ते देवि वशे स्थास्यन्ति सुन्दरि ।
रावणं भज भर्तारं भर्तारं सर्वरक्षसाम् ३७
उत्पाट्य वा ते हृदयं भक्षयिष्यामि मैथिलि ।
यदि मे व्याहृतं वाक्यं न यथावत्करिष्यसि ३८
ततश्चण्डोदरी नाम राक्षसी क्रूरदर्शना ।
भ्रामयन्ती महच्छूलमिदं वचनमब्रवीत् ३९
इमां हरिणशावाक्षीं त्रासोत्कम्पपयोधराम् ।
रावणेन हृतां दृष्ट्वा दौर्हृदो मे महानयम् ४०
यकृत्प्लीहं महत्क्रोडं हृदयं च सबन्धनम् ।
गात्राण्यपि तथा शीर्षं खादेयमिति मे मतिः ४१
ततस्तु प्रघसा नाम राक्षसी वाक्यमब्रवीत् ।
कण्ठमस्या नृशंसायाः पीडयामः किमास्यते ४२
निवेद्यतां ततो राज्ञे मानुषी सा मृतेति च ।

---

मजोस. ( ३१–३५ )

हे मदिरेक्षणे, राक्षसराज रावणासह तूं रम्य उद्यानांतून आणि पर्वतावरलि उपवनांतून यथेच्छ संचार कर. हे देवी, हजारो स्त्रिया तुझ्या आज्ञेत राहतील. याकाठी हे सुंदरी, सर्व राक्षसाधिपति रावणाचा तूं भर्ता म्हणून स्वीकार कर. हे मैथिलि, मी सांगितल्याप्रमाणे जर तूं वागली नाहीस, तर मात्र मी तुझें हृदय फाडून खाईन." यानंतर क्रूर मुद्रेची एक चंडोदरी नामक राक्षसी मोठा शूल फिरवीत फिरवीत म्हणाली, " हरणाच्या पाडसाप्रमाणे डोळे असलेली आणि भीतीमुळे जिचे स्तन कंपित होत असलेली ही स्त्री रावणाने हरण करून आणलेली पाहिल्यापासूनच मलाही एक प्रबल इच्छा झाली आहे आणि ती इच्छा म्हणजे हिचें यकृत्, प्लीहा, वक्षस्थल, शिरावंधनासह हृदय, मस्तक आणि इतरही अवयव खाऊन टाकावे." ( ३६–४१ )

नंतर प्रघसा नामक राक्षसी म्हणाली, " अग, तुम्ही अशा बसलां काय ?

नात्र कश्चिच्च संदेहः खादतेति स वक्ष्यति । ४३
ततस्त्वजामुखी नाम राक्षसी वाक्यमब्रवीत् ।
विशस्येमां ततः सर्वान्समान्कुरुत पिण्डकान् ४४
विभजाम ततः सर्वा विवादो मे न रोचते ।
पेयमानीयतां क्षिप्रं माल्यं च विविधं बहु ४५
ततः शूर्पणखा नाम राक्षसी वाक्यमब्रवीत् ।
अजामुख्या यदुक्तं वै तदेव मम रोचते ४६
सुरा चानीयतां क्षिप्रं सर्वशोकविनाशिनी ।
मानुषं मांसमासाद्य नृत्यामोऽथ निकुम्भिलाम् ४७
एवं निर्भर्त्स्यमाना सा सीता सुरसुतोपमा ।
राक्षसीभिर्विरूपाभिर्धैर्यमुत्सृज्य रोदिति ४८

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चतुर्विंशः सर्गः ॥२४॥

पञ्चविंशः सर्गः । [१११२]

अथ तासां वदन्तीनां परुषं दारुणं बहु ।

---

या दुष्टेचें नरडेंच आपण आवळून टाकू आणि मग ती मनुष्य स्त्री मेली म्हणून राजाला सांगू म्हणजे हिला 'तुम्ही खाऊन टाका,' असें तो सांगेल, यांत मुळीच संशय नाहीं " अजामुखीनामक राक्षसी म्हणाली, " हिला प्रथम चिरा आणि नंतर हिचे सर्व सारखे गोळे करा म्हणजे आपण सर्वजणी ते सारखे वाटून घेऊं, मला हा तुमचा वाद रुचत नाहीं. नाना प्रकारचीं पुष्पें आणि पुष्कळसें पेय लवकर घेऊन या " तदनंतर दुसरी एक शूर्पणखानामक राक्षसी म्हणाली, " अजामुखीनें जें सांगितलें, तेंच मला बरें दिसतें सर्व दुःखविनाशक अशी आपली सुरा सत्वर आणवा, म्हणजे आपण या मानुषमांसाचें सेवन करून निकुंभिला देवीपुढें नृत्य करूं " याप्रमाणे देवकन्यातुल्य असलेल्या सीतेची तेथील अकाळविकाळ राक्षसस्त्रिया निर्भर्त्सना करू लागल्या, तेव्हां ती धैर्य सोडून रडूं लागली (४२-४८)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांतील चोविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २४ ॥

राक्षसीनामसौम्यानां रुरोद जनकात्मजा १
एवमुक्ता तु वैदेही राक्षसीभिर्मनस्विनी ।
उवाच परमत्रस्ता बाष्पगद्गदया गिरा २
न मानुषी राक्षसस्य भार्या भवितुमर्हति ।
कामं खादत मां सर्वा न करिष्यामि वो वचः ३
सा राक्षसीमध्यगता सीता सुरसुतोपमा ।
न शर्म लेभे शोकार्ता रावणेनेव भर्त्सिता ४
वेपते स्माधिकं सीता विशन्तीवाङ्गमात्मनः ।
वने यूथपरिभ्रष्टा मृगी कोकैरिवार्दिता ५
सा त्वशोकस्य विपुलां शाखामालम्ब्य पुष्पिताम् ।
चिन्तयामास शोकेन भर्तारं भग्नमानसा ६
सा स्नापयन्ती विपुलौ स्तनौ नेत्रजलस्रवैः ।
चिन्तयन्ती न शोकस्य तदान्तमधिगच्छति ७

याप्रमाणे त्या क्रूर राक्षसी फारच कठोर व क्रूर भाषण करूं लागल्यावर जनककन्या सीता रडूं लागली; परंतु राक्षसस्त्रियांनी तिला सांगितलें तें ऐकून ती विचारी सीता फारच भिऊन गेली आणि अश्रूंनी कंठ दाटून आल्यामुळे अस्पष्ट शब्दांनी त्यांना म्हणाली, " मनुष्यजातीची स्त्री राक्षसाची भार्या होण्यास समर्थ नाही. तुम्ही सर्व मिळून मला खुशाल खाऊन टाका, पण मी तुमचें म्हणणें ऐकणार नाही. " राक्षसस्त्रियांमध्ये सापडलेल्या आणि जशी कांही रावणानेच निर्भर्त्सना केली आहे कीं काय, असें समजून शोकाकुल झालेल्या त्या देवकन्यातुल्य सीतेला मुळींच बरें वाटेना. वनामध्ये कळपांतून चुकलेल्या आणि लांडग्यानी भंडावून सोडलेल्या हरिणीप्रमाणे भीतीने आपलें शरीर संकुचित करूं लागलेली सीता भयाने थरथर कांपूं लागली. शोकाने तिचें मन खिन्न होऊन गेलें आणि ती अशोकवृक्षाच्या एका मोठ्या प्रफुल्लित फांदीचा आधार घेऊन आपल्या प्रिय भर्त्याचें मनामध्ये चिंतन करूं लागली. नेत्रांतून चाललेल्या दोन्ही जलप्रवाहांनीं आपल्या मोठ्या मोठ्या स्तनांना जणु स्नान घालीत असलेली ती सीता, जों जों मनांत रामाचें एकसारखें चिंतन करूं लागली, तों तों तिला

सा वेपमाना पतिता प्रवाते कदली यथा ।
राक्षसीनां भयत्रस्ता विवर्णवदनाभवत् ८
तस्याः सा दीर्घबहुला वेपन्त्याः सीतया तदा ।
ददृशे कम्पिता वेणी व्यालीव परिसर्पती ९
सा निःश्वसन्ती शोकार्ता कोपोपहतचेतना ।
आर्ता व्यसृजदश्रूणि मैथिली विललाप च १०
हा रामेति च दुःखार्ता हा पुनर्लक्ष्मणेति च ।
हा श्वश्रूर्मम कौसल्ये हा सुमित्रेति भामिनी ११
लोकप्रवादः सत्योऽयं पण्डितैः समुदाहृतः ।
अकाले दुर्लभो मृत्युः स्त्रिया वा पुरुषस्य वा १२
यत्राहमाभिः क्रूराभी राक्षसीभिरिहार्दिता ।
जीवामि हीना रामेण मुहूर्तमपि दुःखिता १३
एषाल्पपुण्या कृपणा विनशिष्याम्यनाथवत् ।

---

शोक आवरता येईना (१-७)

राक्षसस्त्रियांच्या भीतीने त्रस्त झाल्यामुळे सीतेचें मुख निस्तेज झालें व प्रचंड वाऱ्याचे तडाख्यात सापडलेल्या केळीप्रमाणे लटलट हलता हलता ती शेवटी भूमीवरही पडली. लटलट कापत असलेल्या त्या सीतेचा तो लांब व मोठा वेणा इकडेतिकडे हलूं लागला, तेव्हा ती इकडेतिकडे वळवळ करणाऱ्या नागिणी-प्रमाणे भासूं लागली. कोपाने त्या मैथिलीचें अंतःकरण अगदी भडक गेलें होतें. ती शोकाकुल झाली, दुःखाने गांजून गेल्यामुळे दीर्घ सुस्कारे टाकूं लागली आणि अश्रु टाकून विलापही करूं लागली "हे रामा, हे लक्ष्मणा, अहो सासूबाई, हे कौसल्ये, हे सुमित्रे" याप्रमाणे दुःखाकुल झालेली ती सुंदरी शोक करूं लागली आणि म्हणाली, "स्त्रीला काय नि पुरुषाला काय वेळ आल्यावाचून मृत्यु येणें दुर्लभ आहे, ही जी पंडितांनी लिहून ठेविलेली म्हण ती अगदी खरी आहे; कारण रामाचा वियोग होऊन मी इतकी दुःखी झालें असतां आणि या क्रूर राक्षसस्त्रियांनी मला येथे गांजिलें असतांना एक घटकाभर का होईना, परंतु मी जिवंत राहिलें आहे (८-१३)

समुद्रमध्ये नौः पूर्णा वायुवेगैरिवाहता १४
भर्तारं तमपश्यन्ती राक्षसीवशमागता ।
सीदामि खलु शोकेन कूलं तोयहतं यथा १५
तं पद्मदलपत्राक्षं सिंहविक्रान्तगामिनम् ।
धन्याः पश्यन्ति मे नाथं कृतज्ञं प्रियवादिनम् १६
सर्वथा तेन हीनाया रामेण विदितात्मना ।
तीक्ष्णं विषमिवास्वाद्य दुर्लभं मम जीवनम् १७
कीदृशं तु महापापं मया देहान्तरे कृतम् ।
येनेदं प्राप्यते घोरं महादुःखं सुदारुणम् १८
जीवितं त्यक्तुमिच्छामि शोकेन महता वृता ।
राक्षसीभिश्च रक्षन्त्या रामो नासाद्यते मया १९
धिगस्तु खलु मानुष्यं धिगस्तु परवश्यताम् ।

---

या कपाळकरंटीच्या पदरीं पुण्य अगदींच थोडें आहे, म्हणून पूर्ण भरलेली नौका वाऱ्याचे तडाखे बसल्यावर जशी समुद्रात नष्ट होऊन जाते, तशी मी अनाथाप्रमाणे नाहीशी होईन. माझा भर्ता माझ्या दृष्टी पडत नाही व मी राक्षसस्त्रियांच्या तावडींत सांपडून पाण्याच्या लाटेचे धक्के बसलेल्या तीराप्रमाणे शोकाच्या लाटांनी खचून जात आहे. कमलपत्राप्रमाणे ज्याचे नेत्र विशाल आहेत आणि सिंहासारखी ज्याची गति पराक्रमसूचक आहे, असा तो कृतज्ञ व प्रिय भाषण करणारा माझा नाथ, राम ज्यांच्या दृष्टी पडत असेल, ते धन्य आहेत. एखादें जालीम विष सेवन केल्यावर जीवन जसें दुर्लभ आहे, तसें सर्व प्रकारें त्या जगद्विख्यात रामाचा व माझा वियोग झाल्यामुळे मी जिवंत राहणें अशक्य आहे. ( १४–१७ )

माझ्या हातून पूर्व जन्मांतरीं कमले बरें महापातक घडलें आहे की, त्यामुळे मला हें अत्यंत दारुण, घोर व भयंकर दुःख भोगणे प्राप्त झालें आहे. अतिशय मोठ्या शोकाने ग्रस्त झालेली मी, आता जीविताचा त्याग करण्याची इच्छा करीत आहें, कारण मी राक्षसस्त्रियांच्या प्रतिबंधात असल्यामुळे रामाची व माझी भेट होत नाही. जीवन अशक्य झाल्यामुळे, त्याचा आपल्या इच्छेने त्याग

न शक्यं यत्परित्यक्तुमात्मच्छन्देन जीवितम् २०

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चविंशः सर्गः ॥२५॥

षड्विंशः सर्गः । [ ११३९ ]

प्रसक्ताश्रुमुखी त्वेवं ब्रुवती जनकात्मजा ।
अधोगतमुखी बाला विलप्तुमुपचक्रमे १
उन्मत्तेव प्रमत्तेव भ्रान्तचित्तेव शोचती ।
उपावृत्ता किशोरीव विचेष्टन्ती महीतले २
राघवस्य प्रमत्तस्य रक्षसा कामरूपिणा ।
रावणेन प्रमथ्याहमानीता क्रोशती बलात् ३
राक्षसीवशमापन्ना भर्त्स्यमाना च दारुणम् ।
चिन्तयन्ती सुदुःखार्ता नाहं जीवितुमुत्सहे ४
न हि मे जीवितेनार्थो नैवार्थैर्न च भूषणैः ।

---

करण्याइतकेंहि स्वातंत्र्य ज्यात नाही, अशा त्या मनुष्यपणाला व त्या परवश तेला धिक्कार असो. ( १८—२० )

याप्रमाणे महर्षि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदर-कांडापैकी पंचविसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २५ ॥

मुखांवर अश्रूंचे ओघळ आलेले आहेत, अशी ती जनककन्या, बाला सीता याप्रमाणे बोलत खाली मान घालून विलाप करूं लागली. पिशाचादिकांनी झपाटल्याप्रमाणे, पित्ताचा अतिरेक वगैरे झाल्यामुळे मत्त झाल्याप्रमाणे आणि मनाला भ्रांति झाल्याप्रमाणे शोक करीत असलेली ती सीता जेव्हा भूमीवर गड-बडा लोळूं लागली. तेव्हा, श्रमपरिहार करण्याकरिता लोळणाऱ्या किशोरीप्रमाणे दिसूं लागली. ती म्हणाली, " इच्छेप्रमाणे रूप धारण करणाऱ्या मारीच राक्ष-साने राघवाला मोह पाडून त्याला दूर नेलें व त्यामुळे रावणाने माझे हाल-हाल करून, मी आक्रोश करीत असतांना, बलात्काराने मला येथे आणिलें. मी राक्षस-स्त्रियांच्या तावडींत सापडलें असून, त्यांनी भयंकर रीतीने माझी निर्भर्त्सना चालवली आहे आणि मी अत्यंत दुःखी झाले असून, मनात चिंतेने जळत आहे. यामुळे आता यापुढे मला जगावेंसें वाटत नाही. महारथी रामाला सोडून ज्या

वसन्त्या राक्षसीमध्ये विना रामं महारथम् ५
अश्मसारमिदं नूनमथवाप्यजरामरम् ।
हृदयं मम येनेदं न दुःखेन विशीर्यते ६
धिङ्मामनार्यामसतीं याहं तेन विनाकृता ।
मुहूर्तमपि जीवामि जीवितं पापजीविका ७
चरणेनापि सव्येन न स्पृशेयं निशाचरम् ।
रावणं किं पुनरहं कामयेयं निशाचरम् ८
प्रत्याख्यानं न जानाति नात्मानं नात्मनः कुलम् ।
यो नृशंसस्वभावेन मां प्रार्थयितुमिच्छति ९
छिन्ना भिन्ना प्रभिन्ना वा दीप्ता वाग्नौ प्रदीपिता ।
रावणं नोपतिष्ठेयं किं प्रलापेन वश्चिरम् १०
ख्यातः प्राज्ञः कृतज्ञश्च सानुक्रोशश्च राघवः ।
सद्वृत्तो निरनुक्रोशः शङ्के मद्भाग्यसंक्षयात् ११

अर्थी मला राक्षसस्त्रियांच्या संगतींत रहावें लागत आहे, त्या अर्थी जीविताशीं, संपत्तीशीं आणि भूषणांशीं मला कांहीच कर्तव्य नाहीं. ( १-५ )

माझें हें हृदय खरोखर अगदीं बळकट पाषाणाचें तरी आहे, किंवा तें अजरामर तरी आहे, म्हणूनच मला इतकें असह्य दुःख झालें असूनही फाटून जात नाहीं. रामाचा वियोग झाल्यावर एक मुहूर्तभरसुद्धा मला जिवंत राहणें योग्य नसतांना, पाप्याप्रमाणें उपजीविका करून मी जिवंत राहिलें आहें, अशा मला असाध्वी दुष्टेला धिक्कार असो. कोणाही निशाचराला मी डाव्या पायानेंही कधीं स्पर्श करणार नाहीं, मग मनांत निशाचर रावणाची मी इच्छा कोठून धरणार ? रावण स्वतः आपण कोण हें जाणीत नाहीं, आणि आपल्या कुलाची यांत अपकीर्ति होत आहे, हेंही त्याला समजत नाहीं; कारण तो आपल्या दुष्ट स्वभावाला अनुसरून, राक्षसस्त्रियांना मध्यस्थी घालून, मला वश करून घेण्याची इच्छा करीत आहे. हे राक्षसस्त्रियांनो, तुमच्या या बडबडीचा उपयोग काय ? मी छिन्नभिन्न झालें, माझे तुकडे तुकडे झाले, ते भाजून गेले अथवा पेटले, तरीही मी रावणाचा स्वीकार करणार नाहीं. ( ६-१० )

राक्षसानां जनस्थाने सहस्राणि चतुर्दश ।
एकेनैव निरस्तानि स मां किं नाभिपद्यते ॥ १२
कामं मध्ये समुद्रस्य लङ्केयं दुष्प्रधर्षणा ।
न तु राघवबाणानां गतिरोधो भविष्यति ॥ १३
किं नु तत्कारणं येन रामो दृढपराक्रमः ।
रक्षसापहृतां भार्यामिष्टां यो नाभिपद्यते ॥ १४
इहस्थां मां न जानीते शङ्के लक्ष्मणपूर्वजः ।
जानन्नपि स तेजस्वी धर्षणां मर्षयिष्यति ॥ १५
हृतेति मां योऽधिगत्य राघवाय निवेदयेत् ।
गृध्रराजोऽपि स रणे रावणेन निपातितः ॥ १६
कृतं कर्म महत्तेन मां तदाभ्यवपद्यता ।
तिष्ठता रावणवधे वृद्धेनापि जटायुषा ॥ १७
यदि मामिह जानीयाद्वर्तमानां हि राघवः ।
अद्य बाणैरभिक्रुद्धः कुर्याल्लोकमराक्षसम् ॥ १८

राघव प्रज्ञ, कृतज्ञ, दयाळु आणि सद्वर्तनी म्हणून प्रसिद्ध आहे, परंतु, सांप्रत माझें भाग्य नाहींसें झाल्यामुळेच का काय कोण जाणे, तो असा निर्दय झाला आहे, अशी मला शंका येते. जनस्थानामध्ये ज्या एकट्यानें चवदा हजार राक्षसांचा नाश केला, तो राम आज मला घेऊन का जात नाही? समुद्रांतील ही लंका इतरांना अजिंक्य असेल, परंतु रामबाणाची गति येथें कुंठित होणार नाहीं. राम महापराक्रमी असतांना, राक्षसानें हरण करून नेलेल्या आपल्या प्रिय भार्येला घेऊन जात नाहीं, याचें कारण तरी काय बरें असावें? मी येथें आहें, हें लक्ष्मणाच्या ज्येष्ठ भ्रात्याला ठाऊकच नाहीं, असें मला वाटतें, कारण जाणून-बुजून तो तेजस्वी राम एवढा अपमान कसा सहन करील? राक्षसानें मला नेलें आहे, असें रामाकडे जाऊन त्याला सांगता आलें असतें, त्या गृध्रराज जटायूलाही रावणानें रणामध्ये वध केला. माझी सुटका करण्याकरितां जटायूनें वृद्ध असतानाही रावणाचा वध करण्याची तत्परता दर्शविली, हें त्यानें मोठेंच कृत्य केलें (११-१७)

निर्दहेच पुरीं लङ्कां निर्दहेच महोदधिम्।
रावणस्य च नीचस्य कीर्ति नाम च नाशयेत् १९
ततो निहतनाथानां राक्षसीनां गृहे गृहे।
यथाहमेवं रुदती तथा भूयो न संशयः २०
अन्विष्य रक्षसां लङ्कां कुर्याद्रामः सलक्ष्मणः।
न हि ताभ्यां रिपुर्दृष्टो मुहूर्तमपि जीवति २१
चिता धूमाकुलपथा गृध्रमण्डलमण्डिता।
अचिरेणैव कालेन श्मशानसदृशी भवेत् २२
अचिरेणैव कालेन प्राप्स्याम्येनं मनोरथम्।
दुष्प्रस्थानोऽयमाभाति सर्वेषां वो विपर्ययः २३
यादृशानि तु दृश्यन्ते लङ्कायामशुभानि तु।
अचिरेणैव कालेन भविष्यति हतप्रभा २४

मी येथें जिवत असल्याचें जर राघवाला समजेल, तर आजच्या आजच क्रुद्ध राम आपल्या बाणांनीं सर्व जगत् राक्षसशून्य करून टाकील. इतकेंच नव्हे, तर तो लंकानगरी जाळून खाक करील, महासागर दग्ध करील आणि या नीच रावणाची कीर्ति व नावही पूर्णपणें नष्ट करून टाकील. असें झालें, म्हणजे ज्याप्रमाणें मी येथें रडत बसलें आहे, त्याप्रमाणें पतींचा वध झालेल्या राक्षसस्त्रिया घरोघरी म इयापेक्षाही अधिक रडारड करतील, यांत संशय नाही. लंकेचा शोध लावून लक्ष्मणासह राम राक्षसांचा नाश करील, हें खरें, परंतु मी येथें आहें, हें त्याला समजावें कसें ? शत्रु त्या रामलक्ष्मणांच्या दृष्टीस पडला, तर मुहूर्तभरही जिवंत राहणार नाही. (१८-२१)

थोडक्याच अवकाशांत रामलक्ष्मण लंका जिंकून टाकतील; तिच्यातील मार्ग धुरानें व्यापले जातील, गिधाडांच्या टोळ्यांनीं ती भूषित होईल व लवकरच ती श्मशानासारखी दिसूं लागेल. थोडक्याच काळांत माझा हा मनोरथ सिद्धीस जाणार आहे. तुम्हां सर्वांच्या या विपरीत बुद्धीचा परिणाम मला नीट दिसत नाहीं. लंकेमध्यें जीं अशुभ वर्तणारीं चिन्हें मला दिसत आहेत, त्यावरून थोडक्याच काळानें ही लंका निस्तेज होऊन जाईलसें दिसतें. राक्षसाधिपति

नूनं लङ्कां हते पापे रावणे राक्षसाधिपे।
शोषमेष्यति दुर्धर्षा प्रमदा विधवा यथा २५
पुण्योत्सवसमृद्धा च नष्टभर्त्री सराक्षसा।
भविष्यति पुरी लङ्का नष्टभर्त्री यथाङ्गना २६
नूनं राक्षसकन्यानां रुदतीनां गृहे गृहे।
श्रोष्यामि न चिरादेव दुःखार्तानामिह ध्वनिम् २७
सान्धकारा हतद्योता हतराक्षसपुंगवा।
भविष्यति पुरी लङ्का निर्दग्धा रामसायकैः २८
यदि नाम स शूरो मां रामो रक्तान्तलोचनः।
जानीयाद्वर्तमानां यां राक्षसस्य निवेशने २९
अनेन तु नृशंसेन रावणेनाधमेन मे।
समयो यस्तु निर्दिष्टस्तस्य कालोऽयमागतः ३०
स च मे विहितो मृत्युरस्मिन्दुष्टे न वर्तते।
अकार्यं ये न जानन्ति नैर्ऋताः पापकारिणः ३१
अधर्मात्तु महोत्पातो भविष्यति हि सांप्रतम्।

पापी रावणाचा वध होऊन ही अजिंक्य लंका वैधव्य प्राप्त झालेल्या तरुण स्त्री-प्रमाणे शुष्क होऊन जाईल. पूज्य आनंदकारक उत्सवसमारंभांनी भरलेली आणि राक्षसांनी व्यापलेली ही लंकानगरी, तिच्या अधिपतीचा वध होऊन, तिची स्थिति विधवा स्त्रीप्रमाणे शोचनीय होऊन जाईल ( २२—२६ )

लंकेमध्ये घरोघर शोकाकुल होऊन रडू लागलेल्या राक्षसकन्यांचा ध्वनि लवकरच माझ्या कानीं येणार आहे. रामबाणांनी या लंकानगरींतील श्रेष्ठ राक्षसांचा वध होईल, ही निस्तेज होईल आणि दग्ध होऊन अंधकाराने भरून जाईल, परंतु ज्याचे नेत्रांभोवतालचा भाग आरक्तवर्ण आहे त्या शूर रामाला मी राक्षसाच्या घरीं निश्चिंत असल्याचें समजलें, तरच या सर्व गोष्टी घडणार आहेत. या दुष्ट व अधम रावणाने जी मला मुदत सांगितली, ती मरण्याचा समय तर जवळ येऊन ठेपला आहे. त्यामुळे राक्षसाने मनांत योजल्याप्रमाणे मला मरण प्राप्त होणार, हे ठरलेंच आहे. कारण पापकर्म करणारे

नैते धर्मं विजानन्ति राक्षसाः पिशिताशनाः ३२
ध्रुवं मां प्रातराशार्थे राक्षसः कल्पयिष्यति ।
साहं कथं करिष्यामि तं विना प्रियदर्शनम् ३३
रामं रक्तान्तनयनमपश्यन्ती सुदुःखिता ।
क्षिप्रं वैवस्वतं देवं पश्येयं पतिना विना ३४
नाजानाज्जीवतीं रामः स मां भरतपूर्वजः ।
जानन्तौ तु न कुर्यातां नोर्व्यां हि परिमार्गणम् ३५
नूनं ममैव शोकेन स वीरो लक्ष्मणाग्रजः ।
देवलोकमितो यातस्त्यक्त्वा देहं महीतले ३६
धन्या देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः ।
मम पश्यन्ति ये वीरं रामं राजीवलोचनम् ३७
अथवा न हि तस्यार्थो धर्मकामस्य धीमतः ।
मया रामस्य राजर्षेर्भार्यया परमात्मनः ३८
दृश्यमाने भवेत्प्रीतिः सौहृदं नास्त्यदृश्यतः ।

---

ठाऊकच नसतें. आपण परस्त्रीहरण करून जो अनर्थ झाला आहे, त्या अनर्थापासून मोठा उत्पात होईल, कारण हे मांसभक्षक राक्षस धर्म मुळीच जाणीत नाहीत. (२७–३२)

तो राक्षस निश्चय माझा न्याहारीच्या कामी उपयोग करील, अशा संकटात मी सापडलेली आहें; तर ज्याचें दर्शनही प्रिय आहे, अशा त्या रामावाचून मी आता कसें बरें करूं? ज्याचे नेत्रप्रांत आरक्तवर्ण आहेत, असा राम दृष्टीस पडत नसल्यामुळे मी अत्यंत दुःखी झालेली आहें व मी पतीवाचून लवकरच यमधर्माला पाहीन. रामाला आणि त्या लक्ष्मणालाही मी जिवंत असल्याचें ठाऊक नाही कारण त्यांना जर समजलें असतें, तर सर्व पृथ्वीवर माझा शोध केल्यावाचून ते कधीही राहते ना. मला वाटते माझ्या शोकामुळे तो वीर राम भूतलावर देह टाकून चालता झाला आहे. माझ्या कमलनयन वीर रामाचें दर्शन घेणारे देव, गंधर्व, सिद्ध आणि महर्षि धन्य आहेत. किंवा त्या विवेकी, धर्मनिष्ठ व परमात्म्या राजर्षि रामाला माझे काही प्रयोजनच उरलें नसावें (३३—३८)

नाशयन्ति कृतघ्नास्तु न रामो नाशयिष्यति ३९
किं वा मय्यगुणाः केचित्किं वा भाग्यक्षयो हि मे ।
या हि सीता वरार्हेण हीना रामेण भामिनी ४०
श्रेयो मे जीवितान्मर्तुं विहीनाया महात्मना ।
रामादक्लिष्टचारित्राच्छूराच्छत्रुनिबर्हणात् ४१
अथवा न्यस्तशस्त्रौ तौ वने मूलफलाशनौ ।
भ्रातरौ हि नरश्रेष्ठौ चरन्तौ वनगोचरौ ४२
अथवा राक्षसेन्द्रेण रावणेन दुरात्मना ।
छद्मना घातितौ शूरौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ४३
साहमेवंविधे काले मर्तुमिच्छामि सर्वतः ।
न च मे विहितो मृत्युरस्मिन्दुःखेऽतिवर्तति ४४

कारण दृष्टीसमोर असलेल्या मनुष्याबद्दल प्रेम कायम असते पण तेच मनुष्य दृष्टीआड झालें, तर त्यान्यासंबधाने प्रेम कायम रहात नाही, परंतु साप्रत असेही म्हणता येणार नाही, कारण कृतघ्न पुरुष तेवढे दृष्टीआड झालेल्या मनुष्यावरील प्रेम नाहीसें करतात, तसें राम करणार नाही, हे निश्चित कदाचित् माझ्या ठिकाणीं पतीने माझी उपेक्षा करावी, असे काही दोषही असतील, अथवा जगातील उत्कृष्ट वस्तूंचा उपभोग घेण्यास पात्र असलेल्या रामाचा व माझा वियोग झाला आहे, त्या अर्थी या दुर्दैवी सीतेच्या नशिबातील सुखच सपलें म्हणावें त्या महात्म्या रामाचा वियोग सहन करून, जीवन कंठण्यापेक्षा त्या निर्मल वर्तनाच्या शूर, शत्रुनाशक अशा रामाच्या हातून मला मरण येणेंच श्रेयस्कर वाटतें, परंतु वनामध्ये वास्तव्य करणारे व हिंडणारे ते श्रेष्ठ दोघे भ्रात अता शस्त्राचा त्याग करून फलमूलावर उपजीविका करणारे बनले असतील, तेव्हा हाही आपला मनोरथ सिद्धीस जाण्याचा संभव नाही किंवा त्या दुरात्म्या राक्षसाधिपति रावणाने त्या दोघा शूर बंधूचा, रामलक्ष्मणाचा, कपटाने वधही करवला असेल तेव्हा या अशा प्रसगीं मग मरणच पत्करणे बरें वाटत आहे परंतु या पराकाष्ठेला पोचलेल्या दुःखामध्ये माझा मृत्यु ठरलेला असेल, असें वाटत नाही ( ३९—४४ )

धन्याः खलु महात्मानो मुनयः सत्यसंमताः ।
जितात्मानो महाभागा येषां न स्तः प्रियाप्रिये　४५
प्रियान्न संभवेद् दुःखमप्रियादधिकं भवेत् ।
ताभ्यां हि ते वियुज्यन्ते नमस्तेषां महात्मनाम्　४६
साहं त्यक्ता प्रियेणैव रामेण विदितात्मना ।
प्राणांस्त्यक्ष्यामि पापस्य रावणस्य गता वशम्　४७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षड्विंशः सर्गः ॥२६॥

सप्तविंशः सर्गः ।　[११८६]

इत्युक्ताः सीतया घोरं राक्षस्यः क्रोधमूर्च्छिताः ।
काश्चिज्जग्मुस्तदाख्यातुं रावणस्य दुरात्मनः　१
ततः सीतामुपागम्य राक्षस्यो भीमदर्शनाः
पुनः परुषमेकार्थमनर्थार्थमथाब्रुवन्　२
अद्येदानीं तवानार्ये सीते पापविनिश्चये ।

---

जे प्रिय आणि अप्रिय ही दोन्ही सारखीच लेखून वागतात, ते महात्मे, सत्यनिष्ठ, जितेंद्रिय व महाभाग्यवान् मुनि खरोखर धन्य होत. प्रिय वस्तूचा वियोग झाला असता ज्यांना दुःख होत नाही आणि अप्रिय गोष्ट प्राप्त झाली असता ज्यांना अधिक काही वाटत नाही आणि म्हणूनच प्रिय आणि अप्रिय या दोन्ही गोष्टींपासून ज्यांचें मन अलिप्त असतें, त्या महात्म्यांना नमस्कार असो. सारांश, आत्मवेत्त्या प्रिय रामानेच माझा त्याग केला आहे. अशा परिस्थितीत मी दुष्ट रावणाच्या आधीन झालेली असल्यानें मी प्राणत्यागच करीन. (४५—४७.)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडांतील सव्विसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २६ ॥

याप्रमाणे सीतेने आपल्याभोवतालच्या राक्षसस्त्रियांशीं कठोर भाषण केलें, तेव्हा त्या राक्षसस्त्रिया क्रोधाने लाल झाल्या आणि त्यांपैकीं काही हे सारें दुरात्म्या रावणाला सांगण्याकरिता गेल्या. यानंतर दिसण्यातही भयंकर असलेल्या दुसऱ्या राक्षसस्त्रिया सीतेकडे आल्या आणि तिच्याशीं परिणामीं अनर्थावह एकाच अर्थाचें असें कठोर भाषण पुनः करूं लागल्या. त्या म्हणाल्या, " हे दुष्ट सीते, तुझ्या

नाशयन्ति कृतघ्नास्तु न रामो नाशयिष्यति ३९
किं वा मय्यगुणाः केचित्किं वा भाग्यक्षयो हि मे ।
या हि सीता वरार्हेण हीना रामेण भामिनी ४०
श्रेयो मे जीवितान्मर्तुं विहीनाया महात्मना ।
रामादक्लिष्टचारित्राच्छूराच्छत्रुनिबर्हणात् ४१
अथवा न्यस्तशस्त्रौ तौ वने मूलफलाशनौ ।
भ्रातरौ हि नरश्रेष्ठौ चरन्तौ वनगोचरौ ४२
अथवा राक्षसेन्द्रेण रावणेन दुरात्मना ।
छद्मना घातितौ शूरौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ४३
साहमेवंविधे काले मर्तुमिच्छामि सर्वतः ।
न च मे विहितो मृत्युरस्मिन्दुःखेऽतिवर्तति ४४

---

कारण दृष्टीसमोर असलेल्या मनुष्याबद्दल प्रेम कायम असते. पण तेच मनुष्य दृष्टीआड झालें, तर त्याच्यासंबंधानें प्रेम कायम रहात नाही, परंतु साम्प्रत असेंही म्हणता येणार नाही, कारण कृतघ्न पुरुष तेवढे दृष्टीआड झालेल्या मनुष्यावरील प्रेम नाहींसें करतात, तसें राम करणार नाही, हें निश्चित. कदाचित् माझ्या ठिकाणीं पतीनें माझी उपेक्षा करावी, असे कांही दोषही असतील, अथवा जगांतील उत्कृष्ट वस्तूचा उपभोग घेण्यास पात्र असलेल्या रामाचा व माझा वियोग झाला आहे, त्या अर्थी या दुर्दैवी सीतेच्या नशिबातील सुखच संपलें म्हणावें त्या महात्म्या रामाचा वियोग सहन करून, जीवन कंठण्यापेक्षा त्या निर्मळ वर्तनाच्या शूर, शत्रुनाशक अशा रामाच्या हातून मला मरण येणेंच श्रेयस्कर वाटतें, परंतु वनामध्यें वास्तव्य करणारे व हिंडणारे ते श्रेष्ठ दोघे भ्राते शस्त्राचा त्याग करून फलमूलावर उपजीविका करणारे बनले असतील, तेव्हां हाही आपला मनोरथ सिद्धीस जाण्याचा संभव नाही किंवा त्या दुरात्म्या राक्षसाधिपति रावणानें त्या दोघा शूर बंधूचा, रामलक्ष्मणाचा, कपटानें वधही करवला असेल तेव्हां या अशा प्रसंगीं मला मरणच पत्करणें बरें वाटत आहे, परंतु या पराकाष्ठेला पोचलेल्या दुःखामध्यें माझा मृत्यु ठरलेला असेल, असें वाटत नाहीं ( ३९—४४ )

धन्याः खलु महात्मानो मुनयः सत्यसंमताः ।
जितात्मानो महाभागा येषां न स्तः प्रियाप्रिये ४५
प्रियान्न संभवेद् दुःखमप्रियादधिकं भवेत् ।
ताभ्यां हि ते वियुज्यन्ते नमस्तेषां महात्मनाम् ४६
साहं त्यक्ता प्रियेणैव रामेण विदितात्मना ।
प्राणांस्त्यक्ष्यामि पापस्य रावणस्य गता वशम् ४७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षड्विंशः सर्गः ॥२६॥

सप्तविंशः सर्गः । [११८६]

इत्युक्ताः सीतया घोरं राक्षस्यः क्रोधमूर्च्छिताः ।
काश्चिज्जग्मुस्तदाख्यातुं रावणस्य दुरात्मनः १
ततः सीतामुपागम्य राक्षस्यो भीमदर्शनाः
पुनः परुषमेकार्थमनर्थार्थमथाब्रुवन् २
अद्येदानीं तवानार्ये सीते पापविनिश्चये ।

---

जे प्रिय आणि अप्रिय ही दोन्ही सारखींच लेखून वागतात, ते महात्मे, सत्यनिष्ठ, जितेंद्रिय व महाभाग्यवान् मुनि खरोखर धन्य होत. प्रिय वस्तूचा वियोग झाला असतां ज्यांना दुःख होत नाही आणि अप्रिय गोष्ट प्राप्त झाली असता ज्याला अधिक काही वाटत नाही आणि म्हणूनच प्रिय आणि अप्रिय या दोन्ही गोष्टींपासून ज्याचें मन अलिप्त असतें, त्या महात्म्यांना नमस्कार असो. सारांश, आत्मवेत्त्या प्रिय रामानेच माझा त्याग केला आहे. अशा परिस्थितींत मी, दुष्ट रावणाच्या आधीन झालेली असल्यानें मी प्राणत्यागच करीन. ( ४५—४७ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांपैकीं सव्विसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २६ ॥

याप्रमाणें सीतेनें आपल्याभोंवतालच्या राक्षसस्त्रियांशीं कठोर भाषण केलें, तेव्हा त्या राक्षसस्त्रिया क्रोधानें लाल झाल्या आणि त्यांपैकीं कांहीं हें सारें दुरात्म्या रावणाला सांगण्याकरितां गेल्या. यानंतर दिसण्यांतही भयंकर असलेल्या दुसऱ्या राक्षसस्त्रिया सीतेकडे आल्या आणि तिच्याशीं परिणामीं अनर्थावह एकाच अर्थाचें असें कठोर भाषण पुनः करूं लागल्या. त्या म्हणाल्या, “ हे दुष्ट सीते, तुझ्या

राक्षस्यो भक्षयिष्यन्ति मांसमेतद्यथासुखम् ३
सीतां ताभिरनार्याभिर्दृष्ट्वा सतर्जितां तदा।
राक्षसी त्रिजटा वृद्धा प्रबुद्धा वाक्यमब्रवीत् ४
आत्मानं खादतानार्या न सीतां भक्षयिष्यथ।
जनकस्य सुतामिष्टां स्नुषां दशरथस्य च ५
स्वप्नो ह्यद्य मया दृष्टो दारुणो रोमहर्षणः।
राक्षसानामभावाय भर्तुरस्या भवाय च ६
एवमुक्तास्त्रिजटया राक्षस्यः क्रोधमूर्च्छिताः।
सर्वा एवाब्रुवन्भीतास्त्रिजटां तामिदं वचः।
कथयस्व त्वया दृष्टः स्वप्नोऽयं कीदृशो निशि ७
तासां श्रुत्वा तु वचनं राक्षसीनां मुखोद्गतम्।
उवाच वचनं काले त्रिजटा स्वप्नसंश्रितम् ८
गजदन्तमयीं दिव्यां शिबिकामन्तरिक्षगाम्।
युक्तां वाजिसहस्रेण स्वयमास्थाय राघवः ९

मनातील हेतु वाईट आहे. यास्तव आज या राक्षसस्त्रिया आताच्या आताच तुला फाडून आनंदाने तुझें मांस भक्षण करतील." याप्रमाणे त्या दुष्ट राक्षसींनी सीतेला धमकी दिलेली पाहताच त्रिजटा नावाची एक वृद्ध व समंजस राक्षसी त्यांना म्हणाली, "हे दुष्ट राक्षसींनो, स्वतःलाच तुम्ही खाऊन टाका. जनकाची प्रिय कन्या आणि दशरथाची प्रिय स्नुषा जी ही सीता तिला भक्षण करणें तुमच्या हातून होणार नाही; कारण जें पाहून शरीरावर रोमांच उठतील, असें राक्षसांच्या नाशाचें व हिच्या भर्त्याच्या अभ्युदयाचें सूचक असें एक महाभयंकर स्वप्न मी पाहिलें" (१—६)

याप्रमाणे त्रिजटेनें सांगितलें, तेव्हां त्या क्रोधवश झालेल्या सर्व राक्षसस्त्रिया भयभीत होऊन, त्या त्रिजटेला म्हणाल्या, "रात्रीं तुला कशा प्रकारचें स्वप्न पडलें, ते तूं आम्हाला सविस्तर सांग" हें त्या राक्षसस्त्रियांच्या मुखातून एकदम निघालेले उद्गार ऐकताच ती त्रिजटा त्यांना आपलें स्वप्न सांगू लागली. "सहस्र अश्वांचा आणि हस्तिदंती अशा आकाशगामी दिव्य शिबिकेमध्यें राम बसलेला

शुक्लमाल्याम्बरधरो लक्ष्मणेन समागतः ।
स्वप्ने चाद्य मया दृष्टा सीता शुक्लाम्बरावृता १०
सागरेण परिक्षिप्तं श्वेतपर्वतमास्थिता ।
रामेण संगता सीता भास्करेण प्रभा यथा । ११
राघवश्च पुनर्दृष्टश्चतुर्दन्तं महागजम् ।
आरूढः शैलसंकाशं चकास सहलक्ष्मणः । १२
ततस्तु सूर्यसंकाशौ दीप्यमानौ स्वतेजसा ।
शुक्लमाल्याम्बरधरौ जानकीं पर्युपस्थितौ १३
ततस्तस्य नगस्याग्रे ह्याकाशस्थस्य दन्तिनः ।
भर्त्रा परिगृहीतस्य जानकी स्कन्धमाश्रिता १४
भर्तुरङ्कात्समुत्पत्य ततः कमललोचना ।
चन्द्रसूर्यौ मया दृष्टा पाणिभ्यां परिमार्जती १५
ततस्ताभ्यां कुमाराभ्यामास्थितः स गजोत्तमः
सीतया च विशालाक्ष्या लङ्काया उपरि स्थितः १६

---

होता. त्याने पादरी शुभ्र पुष्पें आणि वस्त्रें धारण केलेलीं होतीं आणि लक्ष्मणहि त्याच्याबरोबर होता, असें मी आज स्वप्नामध्ये पाहिलें. त्याचप्रमाणे शुभ्र वर्णाचीं वस्त्रें सीतेने परिधान केलेलीं असून, ती सागराने वेष्टलेल्या श्वेतपर्वतावर आरूढ झालेली होती, हें मी आज स्वप्नामध्ये पाहिलें. ती सीता सूर्याशी मिळणाऱ्या प्रभेप्रमाणे रामाशीं मिळून गेलेली होती. ( ७–११ )

" त्यानंतर पुनः राम मोठ्या पर्वतप्राय चौदंती गजावर लक्ष्मणासह बसलेला तो तेजःपुंज दिसत आहे, असें मी पाहिलें. तद्नंतर स्वतःच्या तेजाने देदीप्यमान असलेले आणि शुभ्र वस्त्रें व पुष्पें धारण केलेले सूर्यतुल्य राम–लक्ष्मण सीतेसमीप उभे आहेत, असेंही मी पाहिलें. यानंतर आकाशाम ये असलेल्या त्या पादऱ्या शुभ्र पर्वताऱ्या अग्रभागीं, जानकीस भर्त्याने अंकावर घेतलें असून, ती गजाच्या स्कंधावर बसलेली होती, असें मला दिसलें. यानंतर कमलासारख्या नेत्राची ती सीता हातांनी चंद्रसूर्यांना झाडीत असल्याचेंही मी पाहिलें. नंतर ते राजकुमार राम–लक्ष्मण आणि विशाल डोळ्यांची ती सीता, ज्यावर बसली होती, तो गज

पाण्डुरर्षभयुक्तेन रथेनाष्टयुजा स्वयम् ।
शुक्लमाल्याम्बरधरो लक्ष्मणेन सहागतः १७
ततोऽन्यत्र मया दृष्टो रामः सत्यपराक्रमः ।
लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया सह वीर्यवान् १८
आरुह्य पुष्पकं दिव्यं विमानं सूर्यसंनिभम् ।
उत्तरां दिशमालोक्य प्रस्थितः पुरुषोत्तमः १९
रावणश्च मया दृष्टो मुण्डस्तैलसमुक्षितः ।
रक्तवासाः पिबन्मत्तः करवीरकृतस्रजः २०
विमानात्पुष्पकादद्य रावणः पतितः क्षितौ ।
कृष्यमाणः स्त्रिया मुण्डो दृष्टः कृष्णाम्बरः पुनः २१
रथेन खरयुक्तेन रक्तमाल्यानुलेपनः ।
पिबंस्तैलं हसन्नृत्यन्भ्रान्तचित्ताकुलेन्द्रियः २२
गर्दभेन ययौ शीघ्रं दक्षिणां दिशमाश्रितः ।

---

लंकेवर उभा असलेल्याचें मी पाहिलें ( १२–१६ )

पांढरे शुभ्र आठ वृषभ ज्याला जोडले आहेत, अशा रथात श्वेतवर्ण पुष्पें व वस्त्रें धारण केलेला राम लक्ष्मणासह बसून येथे आलेला मला दिसला त्यानंतर अमोघपराक्रमी व वीर्यवान् पुरुषश्रेष्ठ राम, आपला बंधु लक्ष्मण आणि सीता यासह सूर्याप्रमाणे उज्ज्वल असलेल्या दिव्य पुष्पकविमानामध्ये आरूढ होऊन व उत्तरदिशेच्या रोखानें निघालेला मी पाहिला ( १७–१९ )

रावण तांबड्या कण्हेरीच्या माळा घालून आरक्तवर्ण वस्त्रें परिधान केलेला, अंगाला तेल चोपडलेला, श्मश्रु करविलेला आणि मस्त होऊन तेल पीत असलेला मी पाहिला रावण पुष्पकविमानातून पृथ्वीवर पडलेला मी आज पाहिला. त्याच-प्रमाणे त्याचें मुंडण केलेलें असून, त्याने काळ्या रंगाचा वस्त्र परिधान केलेलें आहेत आणि एक स्त्री त्याला ओढून नेत आहे, असेही मी पाहिलें त्याचप्रमाणे आरक्त वर्णाची पुष्पें धारण करून आणि आरक्त गंध उटी लावून रावण गर्दभ जोडलेल्या रथात बसला आहे आणि त्याचें मन व इंद्रियें पूर्ण भ्रांतियुक्त झाली असून, तो तेल पीत आहे, हसत आहे व नृत्य करीत आहे, असा भ्रमिष्ट मध्य

पुनरेव मया दृष्टो रावणो राक्षसेश्वरः २३
पतितो विशिरा भूमौ गर्दभाद्भयमोहितः ।
सहसोत्थाय संभ्रान्तो भयार्तो मदविह्वलः २४
उन्मत्तरूपो दिग्वासा दुर्वाक्यं प्रलपन्बहु ।
दुर्गन्धं दुःसहं घोरं तिमिरं नरकोपमम् २५
मलपङ्कं प्रविश्याशु मग्नस्तत्र स रावणः ।
प्रस्थितो दक्षिणामाशां प्रविष्टो कर्दमं ह्रदम् २६
कण्ठे बद्ध्वा दशग्रीवं प्रमदा रक्तवासिनी ।
काली कर्दमलिप्ताङ्गी दिशं याम्यां प्रकर्षती २७
एवं तत्र मया दृष्टः कुम्भकर्णो महाबलः ।
रावणस्य सुताः सर्वे मुण्डास्तैलसमुक्षिताः २८
वराहेण दशग्रीवः शिशुमारेण चेन्द्रजित् ।
उष्ट्रेण कुम्भकर्णश्च प्रयातो दक्षिणां दिशम् २९

दिसला. तसाच तो राक्षसाधिपति रावण गर्दभावर बसून दक्षिण दिशेस जात असलेला पुनः स्वप्नामध्ये माझ्या दृष्टीस पडला. रावणास भयाने कांही सुचेना व त्याचा शिरच्छेद होऊन तो गर्दभावरून भूमीवर पडला; तेथून लगबगीने उठून तो अतिशयच आतिग्रस्त झाला. तो भयभीत व मदमत्त झालेला होता. मी हें पाहिलें. (२०-२४)

उन्मत्त, दिगंबर आणि हवें तितकें अभद्र भाषण बोलणारा असा तो रावण दुर्गंधी, दुःसह, घोर, नरकतुल्य आणि मळ व चिखल यांनीच भरलेल्या अंधःकारामध्ये सत्वर शिरला व त्यात गडप झाला, हें मी पाहिलें. त्याचप्रमाणे दक्षिणदिशेस निघालेला रावण कर्दमरहित तळ्यात शिरल्याचेंही मी पाहिलें. आरक्तवर्ण वस्त्र नेसलेली व सर्व शरीर चिखलाने भरलेलें असलेली एक कृष्णवर्णाची तरुण स्त्री रावणाच्या गळ्याला फास लावून त्याला दाक्षिणदिशेस ओढून नेत आहे, असें माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें. महाबलाढ्य कुंभकर्णही याच तऱ्हेचा स्वप्नामध्ये माझ्या दृष्टीस पडला. रावणाच्या सर्व पुत्रांचें मुंडण केलें असून, त्यांच्या अंगावर तेल शिपडलेलें आहे, असेंही मी पाहिलें. रावण डुकरावर, इंद्रजित् शिशु-

एकस्तत्र मया दृष्टः श्वेतच्छत्रो विभीषणः ।
चतुर्भिः सचिवैः सार्धं वैहायसमुपस्थितः ३०
समाजश्च महान्वृत्तो गीतवादित्रनिःस्वनः ।
पिबतां रक्तमाल्यानां रक्षसां रक्तवाससाम् ३१
लङ्का चेयं पुरी रम्या सवाजिरथकुञ्जरा ।
सागरे पतिता दृष्टा भग्नगोपुरतोरणा ३२
पीत्वा तैलं प्रमत्ताश्च प्रहसन्त्यो महास्वनाः ।
लङ्कायां भस्मरूक्षायां सर्वा राक्षसयोषितः ३३
कुम्भकर्णादयश्चेमे सर्वे राक्षसपुङ्गवाः ।
रक्तं निवसनं गृह्य प्रविष्टा गोमयह्रदम् ३४
अपगच्छत पश्यध्वं सीतामाप्नोति राघवः ।
घातयेत्परमामर्षी युष्मान्सार्धं हि राक्षसैः ३५
प्रियां बहुमतां भार्यां वनवासमनुव्रताम् ।

---

मार नावाच्या एका जलचर प्राण्यावर आणि कुंभकर्ण उंटावर आरूढ होऊन, दक्षिण दिशेस गेल्याचें माझ्या दृष्टीस पडलें ( २०–२९ )

" एक बिभीषण मात्र श्वेतवर्णाचें छत्र धारण करून तो आपल्या चार मंत्र्यांसह आकाशमार्गानें जाणाऱ्या विमानात बसलेला मी पाहिला त्याच्याभोंवती गायन व वादन यांचा ध्वनी काढीत असलेला एक प्रचंड लोकसमुदाय मी पाहिला लाललाल वस्त्र आणि लाललाल पुष्पें धारण करून, तेल पीत बसलेल्या राक्षसांच्या या रम्य लंकानगरीचीं गोपुरें व तोरणें मोडून जाऊन यातील अश्व, रथ व गज यासह ही नगरी सागरामध्ये पडलेली मला दिसली तेल पिऊन सर्व राक्षसस्त्रिया मत्त झाल्या आहेत आणि भस्मीभूत होऊन रुक्ष झालेल्या या लंकेमध्ये उच्च स्वरानें खदखदा हसत आहेत, असेंही मी पाहिलें हे सर्व कुंभकर्ण वगैरे राक्षसश्रेष्ठ आरक्तवर्ण वस्त्र नेसून, शेणखळ्याच्या डबक्यात शिरलेले मला दिसले म्हणून हे राक्षसस्त्रियांनो, तुम्ही दूर व्हा पहा, राम आता आपल्या सीतेला पुन्हा परत मिळवील व क्रोध आलेला तो राम सर्व राक्षसांसह तुमचाही वध करील ( ३०–३५ )

भर्त्सितां तर्जितां वापि नानुमंस्यति राघवः  ३६
तदलं क्रूरवाक्यैश्च सान्त्वमेवाभिधीयताम्।
अभियाचाम वैदेहीमेतद्धि मम रोचते  ३७
यस्या ह्येवंविधः स्वप्नो दुःखितायाः प्रदृश्यते।
सा दुःखैर्बहुभिर्मुक्ता प्रियं प्राप्नोत्यनुत्तमम्  ३८
भर्त्सितामपि याचध्वं राक्षस्यः किं विवक्षया।
राघवाद्धि भयं घोरं राक्षसानामुपस्थितम्  ३९
प्रणिपातप्रसन्ना हि मैथिली जनकात्मजा।
अलमेषा परित्रातुं राक्षस्यो महतो भयात्  ४०
अपि चास्या विशालाक्ष्या न किंचिदुपलक्षये।
विरूपमपि चाङ्गेषु सुसूक्ष्ममपि लक्षणम्  ४१
छायावैगुण्यमात्रं तु शङ्के दुःखमुपस्थितम्।

"वनवासामध्येही बरोबर असलेल्या त्याच्या प्रिय व आवडत्या भार्येची तुम्ही निर्भर्त्सना केल्याचें अथवा तिला धमकी दिल्याचें समजलें, तर तें त्या राघवाला सहन होणार नाही. यासाठी आता हिच्याशीं कठोर शब्दानें न बोलतां तिच्याशीं सौम्य भाषणच केलें पाहिजे. इतकेंच काय, पण वैदेहीची आपण क्षमाही मागितली पाहिजे, हें मला बरें दिसतें. जी दुःखामध्ये इतकी असतानाही तिच्यासंबंधीं अशा प्रकारचें स्वप्न दृष्टीस पडत आहे, ती सर्व दुःखांपासून मुक्त होत असते आणि तिचे सर्वोत्कृष्ट मनोरथ परिपूर्ण होत असतात. हे राक्षसस्त्रियांनो, तुम्ही जरी हिची निर्भर्त्सना केली आहे, तरी आता हिची क्षमा मागा. हिच्याशीं कुत्सित भाषण करण्याची इच्छा धरून कांहीएक उपयोग होणार नाही. रघुवंशज रामापासून राक्षसांना भय उत्पन्न झालें आहे, हें तुम्ही पक्कें समजा. साध्या नमस्कारानें ही जनककन्या सीता प्रसन्न झाली, तर हे राक्षसस्त्रियांनो, ती तुमचें त्या मोठ्या संकटापासून संरक्षण करील. ( ३६-४० )

शिवाय विशाल नेत्र असलेल्या या सतीचे अवयव पाहिले तर कोणत्याही ठिकाणीं मला सूक्ष्मही न्यून असें कांहींच आढळत नाही. सारांश, दुःख भोगण्यास योग्य नसलेल्या आणि स्वप्नामध्ये विमानांत आरूढ होऊन माझ्या

अदुःखार्हामिमां देवीं वैहायसमुपस्थिताम् ४२
अर्थसिद्धिं तु वैदेह्याः पश्याम्यहमुपस्थिताम् ।
राक्षसेन्द्रविनाशं च विजयं राघवस्य च ४३
निमित्तभूतमेतत्तु श्रोतुमस्या महत्प्रियम् ।
दृश्यते च स्फुरच्चक्षुः पद्मपत्रमिवायतम् ४४
ईषच्च हृषितो वास्या दक्षिणाया ह्यदक्षिणः ।
अकस्मादेव वैदेह्या बाहुरेकः प्रकम्पते ४५
करेणुहस्तप्रतिमः सव्यश्चोरुरनुत्तमः ।
वेपन्कथयतीवास्या राघवं पुरतः स्थितम् ४६
पक्षी च शाखानिलयं प्रविष्टः पुनः पुनश्चोत्तमसान्त्ववादी ।
सुखागतां वाचमुदीरयाणः पुनः पुनश्चोदयतीव हृष्टः ४७
ततः सा ह्रीमती बाला भर्तुर्विजयहर्षिता ।

---

दृष्टीस पडलेल्या या सीतेच्या शरीरावर कोणत्याही ठिकाणी दुःखाचा परिणाम काहीच झालेला नाही. फक्त स्नानवगैरे नसल्यामुळे देहाच्या कांतीत मात्र वैगुण्य दिसत असल्याची मला शंका येत आहे. सीतेचा मनोरथ लवकरच पूर्ण होणार असून, राक्षसाधिपतीचा नाश आणि राघवाचा जय या गोष्टीही अगदी जवळच येऊन ठेपल्या आहेत, असे मला दिसतें. या सीतेचा मुख्य मनोरथ सिद्धीस गेल्याचें ऐकण्याची पाळी आपणाला लवकरच येणार आहे, असेंही एक चिन्ह मला दिसत आहे. कमलपत्रासारखा विशाल असलेला हिचा डावा डोळा स्फुरण पावत असल्याचें दृष्टीस येत आहे. वर्तनाने सरळ असलेल्या या वैदेहीचा डावा बाहु किंचित् रोमांचयुक्त झाला असून, एकाएकी स्फुरण पावत आहे. (४१-४५)

"त्याचप्रमाणे गजशुंडेप्रमाणे असलेली हिची उत्कृष्ट डावी मांडीही स्फुरण पावत आहे आणि त्यामुळे ती राम तिच्यापुढे येऊन उभा राहिल्याचेंच जसें काही सुचवीत आहे. पक्षी वृक्षशाखावरील आपल्या घरट्यांमध्ये जाऊन वरचेवर मधुर व सौम्य शब्द करीत आहेत. आनंदित होऊन वारंवार मनोरथसिद्धिसूचक शब्दांचा उच्चार करणारे ते पक्षी सीतेला राघवाचें दर्शन घेण्यास जणों काही

अवोचयदि तत्तथ्यं भवेयं शरणं हि वः ४८

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे सप्तविंशः सर्गः ॥ २७ ॥

अष्टाविंशः सर्गः । [१२३४]

सा राक्षसेन्द्रस्य वचो निशम्य तद्रावणस्याप्रियमप्रियार्ता ।
सीता वितत्रास यथा वनान्ते सिंहाभिपन्ना गजराजकन्या १
सा राक्षसीमध्यगता च भीरुर्वाग्भिर्भृशं रावणतर्जिता च ।
कान्तारमध्ये विजने विसृष्टा बालेव कन्या विललाप सीता २
सत्यं बतेदं प्रवदन्ति लोके नाकालमृत्युर्भवतीति सन्तः ।
यत्राहमेवं परिभर्त्स्यमाना जीवामि यस्मात्क्षणमप्यपुण्या ३
सुखाद्विहीनं बहुदुःखपूर्णमिदं तु नूनं हृदयं स्थिरं मे ।
विदीर्यते यन्न सहस्रधाद्य वज्राहतं शृङ्गमिवाचलस्य ४

प्रेरणाच करीत आहेत." याप्रमाणे त्रिजटेने सांगितल्यावर लज्जेने युक्त असलेली ती बाला सीता पतीला विजय मिळणारच, असें समजून आनंदित झाली आणि "त्या त्रिजटेचें बोलणें जर खरें होईल, तर मी तुमचें रक्षण करीन," असें त्या राक्षसींना तिनें आश्वासनही दिलें. (४६—४८)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांपैकी सत्ताविसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २७ ॥

असो. राक्षसाधिपति रावणाचें अप्रिय भाषण ऐकून दुःखाकुल झालेली सीता, वनामध्ये सिंहानीं घेरून टाकिलेल्या गजेंद्रकन्येप्रमाणे त्रासून गेली होती. राक्षसस्त्रियांच्या कचाट्यांत सांपडलेली आणि रावणाच्या धमकीच्या शब्दांनी अतिशय भिऊन गेलेली, एखाद्या निर्जन घोर अरण्यांत अल्पवयी कन्या सोडून दिल्यावर ती जसा विलाप करते, तसा विलाप सीता तेथें करूं लागली. ती म्हणाली, "अशा प्रकारें माझी विटंबना होत असून, क्षणभर का होईना, मी पापी ज्या अर्थी जिवंत रहात आहें, त्या अर्थी योग्य वेळ आल्यावाचून, दुःखभोग सरल्यावाचून मृत्यु येत नाहीं, असें जें जगतामध्ये सज्जन म्हणत असतात, तें अगदी खरें आहे. सुखाला मुकलेल्या आणि अपार दुःखानें भरलेल्या या माझ्या हृदयाचे ज्या अर्थी वज्राचा तडाखा बसलेल्या पर्वताप्रमाणे हजारो तुकडे होऊन जात नाहींत, त्या ."

नैवास्ति नूनं मम दोषमत्र वध्याहमस्याप्रियदर्शनस्य ।
भावं न चास्याहमनुप्रदातुमलं द्विजो मन्त्रमिवाद्विजाय ५
तस्मिन्ननागच्छति लोकनाथे गर्भस्य जन्तोरिव शल्यकृन्तः ।
नूनं ममाङ्गान्यचिरादनार्यः शरैः शितैश्छेत्स्यति राक्षसेन्द्रः ६
दुःखं बतेदं ननु दुःखिताया मासौ चिरायाभिगमिष्यतो द्वौ ।
बद्धस्य वध्यस्य यथा निशान्ते राजोपरोधादिव तस्करस्य ७
हा राम हा लक्ष्मण हा सुमित्रे हा राममातः सह मे जनन्यः ।
एषा विपद्याम्यहमल्पभाग्या महार्णवे नौरिव मूढवाता ८

हृदय खरोखर बळकट असलें पाहिजे. ज्याचें नुसतें दर्शनही दुःखदायक आहे, अशा या रावणाच्या हातून जर माझा वध व्हावयाचाच आहे, तर या प्रसंगीं मी आत्मघात केला, तर त्याचा मला खरोखर दोष लागणार नाही; कारण, ब्राह्मणाच्या हातून वध पावलेला आणि आत्मघात करणारा या उभयतांनाही अग्निसंस्काराचा अधिकार नसल्यामुळे, ब्राह्मणकुलांत जन्म घेतलेल्या रावणाच्या हातून माझा वध होण्यापेक्षा मी आत्मघात केला, तरी तें वाईट नाही. द्विजेतराला वेद देणें, ज्याप्रमाणे द्विजाला शक्य नसतें, त्याप्रमाणे मी आपलें प्रेम या रावणाला समर्पण करण्यास समर्थ नाहीं. ( १ —५ )

"रावणानें मला दिलेली मुदत भरण्यापूर्वी तो जगन्नाथ राम मला सोडवण्यास जर न येईल, तर गर्भामध्ये असलेल्या रोगी प्राण्याचे ज्याप्रमाणे शस्त्रवैद्य तुकडे करून टाकतो, त्याप्रमाणे राक्षसाधिपति दुष्ट रावण आपल्या तीक्ष्ण बाणांनी खरोखर माझ्या सर्व अवयवांचे तुकडे तुकडे करून टाकील. आधीच पुष्कळ दिवसपर्यंत मी रामाच्या वियोगाचें दारुण दुःख भोगत आहें. आता मला वधदुःखही भोगावें लागणार आहे; कारण रावणाच्या मुदतीचे हे दोन महिने लवकरच संपून जातील आणि राजाला त्रास दिल्यामुळे वधाच्या शिक्षेस पात्र झालेल्या व म्हणूनच प्रतिबंधात ठेवलेल्या चोराचा ज्याप्रमाणे रात्र संपल्यावर वध होत असतो, त्याप्रमाणे माझाही येथे निःसंशय वध होईल. हे रामा, हे लक्ष्मणा, हे सुमित्रे, हे राममाते, हे माझ्या मातांनो, वादळाच्या तडाख्यात सापडलेली नौका ज्याप्रमाणे महासागरामध्ये मग्न होऊन जाते, त्याप्रमाणे ही मी

तरस्विनौ धारयता मृगस्य सत्त्वेन रूपं मनुजेन्द्रपुत्रौ ।
नूनं विशस्तौ मम कारणात्तौ सिंहर्षभौ द्वाविव वैद्युतेन ९
नूनं स कालो मृगरूपधारी मामल्पभाग्यां लुलुभे तदानीम् ।
यत्रार्यपुत्रौ विससर्ज मूढा रामानुजं लक्ष्मणपूर्वजं च १०
हा राम सत्यव्रत दीर्घबाहो हा पूर्णचन्द्रप्रतिमानवक्त्र ।
हा जीवलोकस्य हितः प्रियश्च वध्यां न मां वेत्सि हि राक्षसानाम् ११
अनन्यदेवत्वमियं क्षमा च भूमौ च शय्या नियमश्च धर्मे ।
पतिव्रतात्वं विफलं ममेदं कृतं कृतघ्नेष्विव मानुषाणाम् १२
मोघं हि धर्मश्चरितो ममायं तथैकपत्नीत्वमिदं निरर्थकम् ।
या त्वां न पश्यामि कृशा विवर्णा हीना त्वया संगमने निराशा १३
पितुर्निदेशं नियमेन कृत्वा वनान्निवृत्तश्चरितव्रतश्च ।

---

भाग्यहीन स्त्री मरण पावणार. ( ६-८ )

"विद्युत्‌ता पडून दोन बलाढ्य सिंहांचा वध व्हावा, त्याप्रमाणे मृगाचें धारण करणाऱ्या त्या राक्षसाने त्या बलाढ्य राजपुत्रांचा खरोखर माझ्याकरिता वध केला असून, त्यांना फाडून टाकलें असेल आर्यपुत्र राम आणि लक्ष्मण या उभयतांचाही व या मूढ स्त्रीचा वियोग करण्यासाठी मला वाटतें, प्रत्यक्ष कालच मृगवेष धारण करून आला होता व त्यानेच त्या वेळीं भाग्यहीन अशा मला मोहित करून मतिभ्रष्ट केलें. हे रामा, हे सत्यनिष्ठा, हे महापराक्रमी, हे पूर्णचंद्र-तुल्यमुखास्यवदना, तू जगनातील सर्व प्राण्यांचें हित करणारा आहेस, तसाच त्यांना प्रिय असूनही जी राक्षसांचे तावडींत सापडून ते आता माझा वधहि कर-तील, हें तुला कसें समजत नाही ? मनुष्यांनी कृतघ्न लोकांवर केलेला उपकार ज्याप्रमाणे व्यर्थ जातो, त्याप्रमाणे पति हेंच मुख्य दैवत मानून राहणें, अशा प्रकारची क्षमा, भूमीवर शय्या, धर्माचे ठिकाणी निष्ठा आणि पातिव्रत्य हे सर्व सद्गुण व्यर्थ झाले आहेत. रामा, तुझा वियोग झाल्यामुळे मी कृश व निस्तेज झालें आहे, आपण माझ्या दृष्टीस पडत नाही, यामुळे मी आपल्या भेटीविषयी निराश झाले आहे आणि म्हणूनच हें माझें धर्माचरण व्यर्थ झालें असून, हें पतिव्रतही निष्फळ झालें आहे. ( ९-१३ )

स्त्रीभिस्तु मन्ये विपुलेक्षणाभिः संरंस्यसे वीतभयः कृतार्थः १४
अहं तु राम त्वयि जातकामा चिरं विनाशाय निबद्धभावा ।
मोघं चरित्वाऽथ तपो व्रतं च त्यक्ष्यामि धिग्जीवितमल्पभाग्याम्१५
संजीवितं क्षिप्रमहं त्यजेयं विषेण शस्त्रेण शितेन वापि ।
विषस्य दाता न तु मेऽस्ति कश्चिच्छस्त्रस्य वा वेश्मनि राक्षसस्य १६
शोकाभितप्ता बहुधा विचिन्त्य सीताथ वेणीग्रथनं गृहीत्वा ।
उद्बध्य वेण्युद्ग्रथनेन शीघ्रमहं गमिष्यामि यमस्य मूलम् १७
उपस्थिता सा मृदुसर्वगात्री शाखां गृहीत्वा च नगस्य तस्य ।
तस्यास्तु रामं परिचिन्तयन्त्या रामानुजं स्वं च कुलं शुभाङ्ग्याः१८
तस्या विशोकानि तदा बहूनि धैर्यार्जितानि प्रवराणि लोके ।

"नियम पाळून आणि व्रतस्थ राहून पित्याची आज्ञा पार पाडल्यानंतर आपण वनातून परत जाल आणि निर्भय व कृतार्थ होऊन विशाल नेत्र असलेल्या स्त्रियांशीं रममाण व्हाल, असें मला वाटतें. हे रामा, माझ्या सर्व काही इच्छा आपणावरच अवलंबून आहेत आणि चिरकालपर्यंत मी आपल्या ठिकाणींच प्रेम ठेऊन राहिलें आहे, परंतु या सर्वांचा शेवट प्राणांतिक दु:खातच होणार आहे, म्हणून आजपर्यंत आचरलेलें व्रत व तप व्यर्थ झाल्यामुळे, मी या जीविताचाच त्याग करते. धिक्कार असो या भाग्यहीन स्त्रीला ! जहरी विषानें अथवा तीक्ष्ण शस्त्रानें माझ्या जीविताचा मी सत्वर त्याग करणार आहें; परंतु राक्षसाच्या या गृहामध्ये मला विष अथवा शस्त्र देणारा कोणीही आढळत नाही." शोकानें तापून गेलेल्या त्या सीतेनें याप्रमाणें नाना प्रकारानी विचार केल्यानंतर वेणी हातात घेतली आणि ती वर बांधून " मी सत्वर यमाकडे जाईन, " असें म्हणून ती सर्व कोमल अवयव असलेली सीता त्या वृक्षाची एक शाखा हातीं धरून, आपला प्राण देण्याचा बेत शेवटास नेण्यास तयार झाली, परंतु याप्रमाणें जीविताचा शेवट करण्यास तयार झालेली ती सीता राम, लक्ष्मण आणि आपलें कुल या-विषयी जसजसा अधिक विचार करूं लागली, तसतशीं शुभ अवयव असलेल्या त्या सीतेला शोकनाशक आणि धैर्यवर्धक अशीं सुचिन्हें पुष्कळच दिसून येऊं लागलीं. तीं सुचिन्हें जगतामध्ये उत्कृष्ट व बरोबर ठरलेलीं होतीं, आणि पूर्वीही

प्रादुर्निमित्तानि तदा बभूवुः पुरापि सिद्धान्युपलक्षितानि     १९
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डेऽष्टाविंशः सर्गः ॥ २८ ॥

एकोनत्रिंशः सर्गः ।     [ १२५३ ]

तथागतां तां व्यथितामनिन्दितां व्यतीतहर्षां परिदीनमानसाम् ।
शुभां निमित्तानि शुभानि भेजिरे नरं श्रिया जुष्टमिवोपसेविनः १
तस्याः शुभं वाममरालपक्ष्मराज्या वृतं कृष्णविशालशुक्लम् ।
प्रास्पन्दतैकं नयनं सुकेश्या मीनाहतं पद्ममिवाभिताम्रम्     २
भुजश्च चार्वञ्चितवृत्तपीनः परार्ध्यकालागुरुचन्दनार्हः ।
अनुत्तमेनाध्युषितः प्रियेण चिरेण वामः समवेपताशु     ३
गजेन्द्रहस्तप्रतिमश्च पीनस्तयोर्द्वयोः संहतयोस्तु जातः ।
प्रस्पन्दमानः पुनरूरुरस्या रामं पुरस्तात्स्थितमाचचक्षे     ४

याचा अनुभव आला असल्यामुळे, ते घडून अभ्युदयसूचक व तिच्या मनाची खात्री पटविणारे होते. ( १४-१९ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडांतील अठ्ठाविसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २८ ॥

दु:खपीडित आणि हर्षरहित अशी ती सीता मनामध्ये अतिशय कष्टी होऊन विचार करीत बसली असतां, वैभवसंपन्न पुरुषाची सेवा करण्यास सेवक जसे पुढे सरसावतात, त्याप्रमाणे त्या निर्दोष व शुभ सीतेला शुभ शकुन भराभर पुढे येऊं लागले. वक्र पापण्या, काळीभोर बुबुळें व सभोंवतीं श्वेतवर्ण असलेला आणि दोन्ही बाजूंना आरक्तवर्ण असा—उत्कृष्ट केशपाशाने युक्त असलेल्या—त्या सीतेचा शुभ डावा डोळा, सभोंवतीं आरक्तवर्ण असून मत्स्याचा धक्का लागल्यामुळे स्फुरण पावत असलेल्या कमलाप्रमाणे स्फुरण पावूं लागला. मनोहर, रोमांचयुक्त, वर्तुल, पुष्ट, उत्कृष्ट प्रकारच्या, कृष्णागरूची व चंदनाची उटी लावण्यास योग्य आणि पुष्कळ दिवसपर्यंत सर्वोत्कृष्ट प्रिय रामाचा संपर्क झालेला तिचा वामबाहु एकाएकीं स्फुरण पावूं लागला. एट असा तिच्या दोन पायांपैकी एक गजशुंडेप्रमाणे वर्तुल, पुष्ट व सुंदर पाय स्फुरण पावूं लागला आणि त्यामुळेच राम अगदीं पुढे येऊन उभाच राहिला आहे, असें तिला जणूं सुचवूं लागला ( १-४ )

शुभं पुनर्हेमसमानवर्णमीषद्रजोध्वस्तमिवातुलाक्ष्याः।
वासः स्थितायाः शिखराग्रदन्त्याः किंचित्परिस्रंसत चारुगात्र्याः ५
एतैर्निमित्तैरपरैश्च सुभ्रूः संचोदिता प्रागपि साधुसिद्धैः ।
वातातपक्लान्तमिव प्रणष्टं वर्षेण बीजं प्रतिसंजहर्ष ६
तस्याः पुनर्बिम्बफलोपमोष्ठं स्वक्षिभ्रुकेशान्तमरालपक्ष्म ।
वक्त्रं बभासे सितशुक्लदंष्ट्रं राहोर्मुखाच्चन्द्र इव प्रमुक्तः ७
सा वीतशोका व्यपनीततन्द्रा शान्तज्वरा हर्षविबुद्धसत्त्वा ।
अशोभतार्या वदनेन शुक्ले शीतांशुना रात्रिरिवोदितेन ८

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे एकोनविंशः सर्गः ॥ २९ ॥

त्रिंशः सर्गः । [१२६१]

हनुमानपि विक्रान्तः सर्वं शुश्राव तत्त्वतः ।

---

त्याचप्रमाणे अनुपम नेत्र, डाळिंबाच्या बियांच्या अग्रासारखे दंत आणि मनोहर स्वरूप असलेली ती सीता, तेथे बसली असताना तिचें किंचित् मलिन झालेलें, परंतु सुवर्णासारखें पीतवर्ण वस्त्र थोडेसें स्व-स्थानापासून बाजूस झालें पूर्वी ज्याचें चांगलें प्रत्यंतर आलेलें आहे, असे हे व अशाच प्रकारचे दुसरेही शुभ शकुन होऊ लागले, तेव्हा वारा याने व उन्हाने कोमेजून जाऊन जवळ जवळ वाळून नाश पावलेलें बीज ज्याप्रमाणे पर्जन्यवृष्टीच्या योगाने हर्षयुक्त होतें, त्याप्रमाणे ती सीता हर्षित झाली पिकलेल्या तोंडल्याप्रमाणे लाल ओठ, उत्तम नेत्र, भिवया, कुरळे केस, वक्र पापण्या आणि पांढऱ्या स्वच्छ दाढा असलेली तिची मुद्रा, राहूच्या जबड्यातून मुक्त झालेल्या चंद्राप्रमाणे तेजस्वी दिसू लागली असे शुभ शकुन होऊ लागले यामुळे तिचा शोक नाहीसा झाला, सुस्ती गेली, संताप शांत झाला व हर्षाने अंतःकरण प्रफुल्लित झालें आणि यामुळे शुक्लपक्षामध्ये ज्याप्रमाणे उदय पावलेल्या चंद्रामुळे रात्र अल्हाददायक दिसू लागते, त्याप्रमाणे त्या साध्वी सीतेचा चेहरा प्रफुल्लित दिसू लागला (५-८)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडापैकी एकोणतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ २९ ॥

महापराक्रमी हनुमानाने सीतेचें भाषण आणि त्रिजटा व राक्षसी यांचा

सीतायास्त्रिजटायाश्च राक्षसानां च गर्जितम् १
अवेक्षमाणस्तां देवीं देवतामिव नन्दने ।
ततो बहुविधां चिन्तां चिन्तयामास वानरः २
यां कपीनां सहस्राणि सुबहून्ययुतानि च ।
दिक्षु सर्वासु मार्गन्ते सेयमासादिता मया ३
चारेण तु सुयुक्तेन शत्रोः शक्तिमवेक्षता ।
गूढेन चरता तावदवेक्षितमिदं मया ४
राक्षसानां विशेषश्च पुरी चेयं निरीक्षिता ।
राक्षसाधिपतेरस्य प्रभावो रावणस्य च ५
यथा तस्याप्रमेयस्य सर्वसत्त्वदयावतः ।
समाश्वासयितुं भार्यां पतिदर्शनकाङ्क्षिणीम् ६
अहमाश्वासयाम्येनां पूर्णचन्द्रनिभाननाम् ।
अदृष्टदुःखां दुःखस्य न ह्यन्तमधिगच्छतीम् ७

आरडाओरडा सर्व इन्थंभूत श्रवण केलें होतें. नंदनवनामध्येच दृष्टीस पडणारी देवताच की काय, अशा प्रकारची ती सीतादेवी तो वानर पाहूं लागला, तेव्हां नाना प्रकारचे, विचार त्याच्या मनामध्ये येऊं लागले. तो म्हणाला, " जिला हजारो, लाखो किंबहुना असंख्य वानर सर्व दिशांना शोधीत आहेत, ती ही सीता मला आढळली. शत्रूचें सामर्थ्य अजमावण्यासाठी मोठ्या बंदोबस्ताने हेराचा वेष धारण करून गुप्तपणें संचार करता करता माझ्या सर्व कांही आढळ्यांत आलें. ( १-४ )

राक्षसांचे ठिकाणी विशेष काय आहे, हेंही दिसून आलें; ही नगरी पाहिली. राक्षसाधिपति रावणाचा प्रभावही आढळून आला आणि प्राणिमात्रावर दया करणाऱ्या, त्या अतर्क्यस्वरूपाच्या रामाने पतिदर्शनाची इच्छा धरून राहिलेल्या आपल्या असल्या भार्येकरिता त्रैलोक्य पालथें घालण्याचेंही मनामध्ये जे आणलें तें योग्यच आहे, याविषयीं माझी खात्री झाली. पूर्ण चंद्राप्रमाणें जिचें मुख आल्हादकारक आहे आणि पतिवियोगदुःखाचा अनुभव नसल्यामुळे शोक करता करताही जो थांबत नाहीं, अशा या सीतेला पुढे होऊन, मी धीर देतों.

यदि ह्यहं सतीमेनां शोकोपहतचेतनाम्।
अनाश्वास्य गमिष्यामि दोषवद्गमनं भवेत् ८
गते हि मयि तत्रेयं राजपुत्री यशस्विनी।
परित्राणमपश्यन्ती जानकी जीवितं त्यजेत् ९
यथा च स महाबाहुः पूर्णचन्द्रनिभाननः।
समाश्वासयितुं न्याय्यः सीतादर्शनलालसः १०
निशाचरीणां प्रत्यक्षमक्षमं चाभिभाषितम्।
कथं नु खलु कर्तव्यमिदं कृच्छ्रगतो ह्यहम् ११
अनेन रात्रिशेषेण यदि नाश्वास्यते मया।
सर्वथा नास्ति संदेहः परित्यक्ष्यति जीवितम् १२
रामस्तु यदि पृच्छेन्मां किं मां सीताब्रवीद्वचः।
किमहं तं प्रतिब्रूयामसंभाष्य सुमध्यमाम् १३
सीतासंदेशरहितं मामितस्त्वरया गतम्।

---

शोकानं जिचें अंतःकरण व्याकुल झालेलें आहे, अशा या साध्वी सीतेचें सांत्वन केल्यावाचून मी जर परत जाईन, तर माझ्या परत जाण्यानेंही येथें अनर्थ होईल, कारण मी तिकडे परत गेल्यावर, आपलें रक्षण करणारा कोणी नाहीं, असें सीतेला आढळून आलें, म्हणजे ही यशस्वी राजकन्या जानकी आपल्या जीविताचा त्यागही करील (८—९)

"पूर्ण चंद्रासारखा आल्हादकारक मुख असून सीतेच्या दर्शनाची उत्कंठा लागलेल्या महापराक्रमी रामचंद्राला ज्याप्रमाणे आपणास सीतेचा शोध लागला, हें कळवून धीर देणें न्याय्य आहे, त्याचप्रमाणे हिलाही या वेळीं धीर देणें न्याय्य आहे शिवाय, राक्षसस्त्रियांनी तिच्यापुढें केलेलें भाषणही उपेक्षा करण्यासारखें नाहीं तेव्हां आतां काय करावें, या मोठ्या अडचणींत मी सांप्रत पडलों आहे ही रात्र शिल्लक आहे, तोंच जर मी हिला धीर दिला नाहीं, तर ती जीविताचा त्याग करील, याविषयीं मुळींच शंका नाहीं. बरें, सुंदरी सीतेशीं भाषण न करतांच जर मी रामाकडे गेलों, आणि "सीतेनें मला काय निरोप सांगितला आहे?" असें जर रामानें मला विचारलें, तर मी याला उत्तर काय देऊं? सीतेचा रामाला

निर्दहेदपि काकुत्स्थः क्रोधतीव्रेण चक्षुषा १४
यदि चोद्योजयिष्यामि भर्तारं रामकारणात्।
व्यर्थमागमनं तस्य ससैन्यस्य भविष्यति १५
अन्तरं त्वहमासाद्य राक्षसीनामवस्थितः।
शनैराश्वासयाम्यद्य संतापबहुलामिमाम् १६
अहं ह्यतितनुश्चैव वानरश्च विशेषतः।
वाचं चोदाहरिष्यामि मानुषीमिह संस्कृताम् १७
यदि वाचं प्रदास्यामि द्विजातिरिव संस्कृताम्।
रावणं मन्यमाना मां सीता भीता भविष्यति १८
अवश्यमेव वक्तव्यं मानुषं वाक्यमर्थवत्।
मया सान्त्वयितुं शक्या नान्यथेयमनिन्दिता १९
सेयमालोक्य मे रूपं जानकी भाषितं तथा।
रक्षोभिस्त्रासिता पूर्वं भूयस्त्रासमुपैष्यति २०

निरोप घेतल्याशिवाय जर मी येथून त्वरेने गेलों, तर ककुत्स्थकुलोत्पन्न राम आपल्या क्रोधानें संतप्त झालेल्या दृष्टीने मला जाळून टाकील. सीतेशीं संभाषण न करतां ती अमुक अमुक ठिकाणीं आहे असा वृत्तांत वानराधिपति सुग्रीवाला कळवून रामाकरिता जर मी त्याला उद्योग करण्यास लावीन, तर त्याचें सैन्यासह येथे येणेंच व्यर्थ होऊन जाईल; कारण इतका काल लोटेपर्यंत सीतेला सुटकेचें आश्वासन न मिळेल, तर ती जिवंत राहण्याचाच संभव नाही. ( १०–१५ )

"राक्षसी इकडेतिकडे पहात आहेत, अशी संधि साधून मी येथे येऊन बसलों आहें, याकरितां ती अतिशय संतप्त झालेली आहे, तरी हिचें आजच हळू हळू मी सांत्वन करीन. मी जरी अति सूक्ष्म रूप धारण केलें आहे आणि विशेषतः मी जरी वानर आहें, तरी या ठिकाणीं मानवाच्या बोलीनेच मी बोलेन; परंतु ब्राह्मणाप्रमाणे उत्तम संस्कृत भाषण मी जर करूं लागलों, तर मला वानर न समजतां रावण समजून सीता भयभीत होईल. तथापि, कांहीं झालें तरी अर्थयुक्त असें भाषण मनुष्यवाणीचें अवलंबन करूनच मला अवश्य केलें पाहिजे. नाहीतर माझ्या हातून या साध्वीचें सांत्वन होणेंच शक्य नाही. परंतु या

ततो जातपरित्रासा शब्दं कुर्यान्मनस्विनी ।
जानाना मां विशालाक्षी रावणं कामरूपिणम् २१
सीतया च कृते शब्दे सहसा राक्षसीगणः ।
नानाप्रहरणो घोरः समेयादन्तकोपमः २२
ततो मां संपरिक्षिप्य सर्वतो विकृताननाः ।
वधे च ग्रहणे चैव कुर्युर्यत्नं महाबलाः २३
तं मां शाखाः प्रशाखाश्च स्कन्धांश्चोत्तमशाखिनाम् ।
दृष्ट्वा च परिधावन्तं भवेयुः परिशङ्किताः २४
मम रूपं च संप्रेक्ष्य वने विचरतो महत् ।
राक्षस्यो भयवित्रस्ता भवेयुर्विकृतस्वराः २५
ततः कुर्युः समाह्वानं राक्षस्यो रक्षसामपि ।
राक्षसेन्द्रनियुक्तानां राक्षसेन्द्रनिवेशने २६
ते शूलशरनिस्त्रिंशविविधायुधपाणयः ।

जानकीला अगोदरच राक्षसांनी त्रासून सोडलें आहे; तेव्हां माझें रूप अवलोकन केल्यावर आणि भाषण श्रवण केल्यावरही कदाचित् तिला अधिकच त्रास होईल आणि घस्त झाल्यानंतर विशाल नेत्र असलेली ही विचारी सीता हा हवें ते रूप धारण करणारा रावण आहे, असें मला समजून आक्रोश करूं लागेल. सीतेनें आक्रोश केल्यावर राक्षसस्त्रियांचा घोर समुदाय नाना प्रकारचीं शस्त्रें घेऊन मृत्यू-प्रमाणें एकदम तिच्यावर तुटून पडेल. ( २१-२२ )

" तदनंतर अक्राळविक्राळ मुखांनी महाबलाढ्य राक्षस चोहोंकडे पहात पहात मला हुडकून काढतील व ते माझा वध करण्याविषयीं अथवा मला पकडण्या-विषयीं प्रयत्न करतील. मोठ्या मोठ्या वृक्षांच्या शाखा, उपशाखा व खोडें यांवरून धावतां-धावतांना मला पाहून ते राक्षस साशंक होतील आणि वनामध्यें मी संचार करूं लागलों असतां माझें प्रचंड स्वरूप अवलोकन करून राक्षसस्त्रियाही भयभीत होतील व भयंकर सूर काढूं लागतील इतकेंच नव्हे तर राक्षसाधिपति रावणाच्या गृहामध्यें लंकेच्या रक्षणाकरितां त्या राक्षसराजानें नेमलेल्या राक्षसांनाही त्या हाका मारतील व शूल, बाण, खड्ग वगैरे नाना प्रकारचीं आयुधें हातामध्यें

आपतेयुर्विमर्देऽस्मिन्वेगेनोद्वेगकारणात् २७
संरुद्धस्तैस्तु परितो विधमे रक्षसां बलम् ।
शक्नुयां न तु संप्राप्तुं परं पारं महोदधेः २८
मां वा गृह्णीयुराप्लुत्य बहवः शीघ्रकारिणः ।
स्यादियं चागृहीतार्था मम च ग्रहणं भवेत् २९
हिंसाभिरुचयो हिंस्युरिमां वा जनकात्मजाम् ।
विपन्नं स्यात्ततः कार्यं रामसुग्रीवयोरिदम् ३०
उद्देशे नष्टमार्गेऽस्मिन्राक्षसैः परिवारिते ।
सागरेण परिक्षिप्ते गुप्ते वसति जानकी ३१
विशस्ते वा गृहीते वा रक्षोभिर्मयि संयुगे ।
नान्यं पश्यामि रामस्य सहायं कार्यसाधने ३२
विमृशंश्च न पश्यामि यो हते मयि वानरः ।

---

धेऊन ते राक्षस, मनातून त्रासून निकराने व वेगावेगाने या गर्दीमध्ये समाविष्ट होतील. त्यानी मला सर्व बाजूंनी जरसहून टाकलें, तरी मी राक्षससैन्याचा नाश करीन; परंतु नंतर महासागराच्या परतीराला परत जाण्याइतकी माझे अंगीं शक्ति राहणार नाही (२३-२८)

"कदाचित् शीघ्र पराक्रम गाजविण्यात प्रसिद्ध असे असंख्य राक्षस मला वेढा देऊन पकडतील, मग मात्र माझें कोणतेंच कार्य सिद्धीस जाणार नाही मी येथे कशाकरिता आलों, हें या सीतेला समजणार नाही आणि यामुळे घोटाळा उडून मी पकडलों गेलों, म्हणजे सीतेची हकीगतही रामाला कळणार नाही अथवा हिंसाप्रिय राक्षसांनी जर या जनककन्येचा वध केला, तर राम आणि सुग्रीव या दोघांच्याही कार्यांचा घात होईल. ज्याच्या सर्व बाजूंना सागराचा वेढा आहे, ज्याच्या सभोंवतीं राक्षसांचा पहारा आहे व ज्याना प्रवेश करण्यास कोणीकडूनही मार्ग नाही, अशा या गुप्त प्रदेशामध्ये जानकी सांप्रत वास्तव्य करीत आहे. म्हणून संग्रामात ये राक्षसांनी जर माझा वध केला किंवा मला धरून ठेवलें, तर प्रस्तुतचें कार्य सिद्धीस नेण्यामध्ये रामाला दुसरा कोणी सहाय्य करणारा मला दिसत नाही, कारण माझा जर वध झाला, तर या शंभर योजनें विस्तीर्ण

शतयोजनविस्तीर्णं लङ्घयेत महोदधिम् ३३
कामं हन्तुं समर्थोऽस्मि सहस्राण्यपि रक्षसाम् ।
न तु शक्ष्याम्यहं प्राप्तुं परं पारं महोदधेः ३४
असत्यानि च युद्धानि संशयो मे न रोचते ।
कश्च निःसंशयं कार्यं कुर्यात्प्राज्ञः ससंशयम् ३५
एष दोषो महान्हि स्यान्मम सीताभिभाषणे ।
प्राणत्यागश्च वैदेह्या भवेदनभिभाषणे ३६
भूताश्चार्था विरुध्यन्ति देशकालविरोधिताः ।
विक्लवं दूतमासाद्य तमः सूर्योदये यथा ३७
अर्थानर्थान्तरे बुद्धिर्निश्चितापि न शोभते ।
घातयन्ति हि कार्याणि दूताः पण्डितमानिनः ३८

असलेला महासागर उल्लंघन करून येथे येईल, असा दुसरा वानर, मी किती विचार केला, तरी मला आढळत नाहीं ( २९–३३ )

"हजारो राक्षसांचा वध करण्यास मी एकटा खरोखर समर्थ आहें, परंतु राक्षसांशी युद्ध करून दमल्यावर या महासागराच्या परतीराला जाण्यास मला शक्ति राहणार नाही युद्धामध्ये कोणाला जय येईल, हें निश्चित नसतें आणि या प्रसंगीं संशयित अवस्थेंत अडकून पडणें तर मला बरें दिसत नाही जें कार्य सिद्धीस जाण्याबद्दल संशयच आहे, तें नि संशय सिद्धीस जाण्याची खात्री तरी कोण देणार ? तेव्हा आधींच भिऊन गेलेल्या या सीतेशीं मी जर कोणत्याहि तऱ्हेचे भाषण केले, तर हा असा मोठा अनर्थ होण्याचा संभव आहे आणि मी जर काहीच भाषण न करीन, तर सीतेच्या हातून प्राणत्यागहि होण्याचा संभव आहे सूर्योदय झाला असता ज्याप्रमाणे अंधकार नाहीसा होतो; तसा अयोग्य दूताशीं प्रसंग पडला, तर देश व काल विरुद्ध झाल्याकारणाने जवळ जवळ सिद्धीस पोचलेलींही कार्ये निष्फल होत असतात कार्याकार्याविषयी स्वामीने मन्त्र्यासह जरी एखादा बेत निश्चित केला असला, तरी अयोग्य दूताशी गाठ पडल्यावर त्या बेतापासून काहीएक निष्पन्न होत नाही, कारण स्वतःच्या शहाणपणाच्या घमेंडात असणारे दूत स्वामिकार्याचा घात करतात ( ३४–३८ )

न चिन्तयेत्कथं कार्यं वैक्लव्यं न कथं मम ।
लङ्घनं च समुद्रस्य कथं नु न वृथा भवेत् ३९
कथं नु खलु वाक्यं मे शृणुयान्नोद्विजेत च ।
इति संचिन्त्य हनुमांश्चकार मतिमान्मतिम् ४०
राममक्लिष्टकर्माणं सुबन्धुमनुकीर्तयन् ।
नैनामुद्वेजयिष्यामि तद्बन्धुगतचेतनाम् ४१
इक्ष्वाकूणां वरिष्ठस्य रामस्य विदितात्मनः ।
शुभानि धर्मयुक्तानि वचनानि समर्पयन् ४२
श्रावयिष्यामि सर्वाणि मधुरां प्रब्रुवन्गिरम् ।
श्रद्धास्यति यथा सीता तथा सर्वं समादधे ४३
इति स बहुविधं महाप्रभावो जगतिपतेः प्रमदामवेक्षमाणः ।
मधुरमवितथं जगाद वाक्यं द्रुमविटपान्तरमास्थितो हनुमान् ४४
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रिंशः सर्गः ॥३०॥

[१२०५]

---

"तेव्हा काय केलें असता कार्यविघात होणार नाही? कसें वागलें असता बुद्धिभ्रंश होणार नाही? कोणता उपाय योजिला असतां, मी केलेलें हें समुद्राचें उल्लंघन व्यर्थ जाणार नाही? आणि कशाचें अवलंब केले असतां सीता उद्विग्न न होता माझें भाषण ऐकून घेईल?" असें मनांत एकसारखें चिंतन करतां करतां त्या बुद्धिमान् हनुमानाला एक विचार सुचला. "उत्कृष्ट संबंधी जो सत्कर्मनिष्ठ राम त्याचें वर्णन केलें, तर त्या रामाचेच ठिकाणीं मनाची एकाग्रता करून राहिलेल्या या सीतेला उद्वेग वाटणार नाही. तेव्हा इक्ष्वाकुवंशजांमध्ये श्रेष्ठ आणि स्वपराक्रमाने प्रसिद्ध अशा रामाला अनुलक्षून असलेलें, धर्मयुक्त, शुभ वर्णन मी करूं लागलों, तर सीतेच्या मनात उद्विग्नता येणार नाही; यासाठी मधुर शब्द बोलतां बोलतांच मी माझें मनोगत सीतेला ऐकवीन आणि तिचा विश्वास बसेल अशा रीतीने मी तिला जें कांही सांगावयाचें तें सर्व सांगेन." याप्रमाणे जगन्नाथ रामाची तरुण भार्या शोधून काढण्यासाठी वृक्षशाखांमध्ये बसलेला तो महापराक्रमी हनुमान् स्वतःचे मनाशींच अशा प्रकारें नाना प्रकारचें मधुर व

एकत्रिंशः सर्गः ।

एवं बहुविधां चिन्तां चिन्तयित्वा महामतिः ।
संश्रवे मधुरं वाक्यं वैदेह्या व्याजहार ह १
राजा दशरथो नाम रथकुञ्जरवाजिमान् ।
पुण्यशीलो महाकीर्तिरिक्ष्वाकूणां महायशाः २
अहिंसारतिरक्षुद्रो घृणी सत्यपराक्रमः ।
मुख्यस्येक्ष्वाकुवंशस्य लक्ष्मीवाँल्लक्ष्मिवर्धनः ३
पार्थिवव्यञ्जनैर्युक्तः पृथुश्रीः पार्थिवर्षभः ।
पृथिव्यां चतुरन्तायां विश्रुतः सुखदः सुखी ४
तस्य पुत्रः प्रियो ज्येष्ठस्ताराधिपनिभाननः ।
रामो नाम विशेषज्ञः श्रेष्ठः सर्वधनुष्मताम् ५
रक्षिता स्वस्य वृत्तस्य स्वजनस्यापि रक्षिता ।
रक्षिता जीवलोकस्य धर्मस्य च परंतपः ६

---

सत्य भाषण करू लागला. ( ३९–४४ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांपैकी तीसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३०॥

याप्रमाणे अनेक प्रकारानी विचार केल्यावर, तो महाबुद्धिमान् हनुमान् सीतेलाच ऐकूं येईल, अशा जवळच्या आगेत जाऊन, मधुर भाषण करूं लागला तो म्हणाला, " रथ, गज आणि अश्व यानी युक्त, पुण्यशील, महाकीर्तिमान् व महायशस्वी असा एक इक्ष्वाकुवंशराजामध्ये दशरथ नामक राजा होऊन गेला तो अहिंसेविषयी तत्पर असे, मनाचा उदार असे, दयाळु असे; त्याचा पराक्रम अमोघ असे, तो वैभवसंपन्न राजा, श्रेष्ठ इक्ष्वाकुवंशाचें वैभव वृद्धिंगत करणारा होता राजचिन्हानी तो युक्त असे, त्याची संपत्ति मोठी होती आणि तो नृपश्रेष्ठ संपूर्ण पृथ्वीमध्ये विख्यात, प्रजेला सुख देणारा व सुखी होता ( १–४ )

"त्याचा एक ' राम ' म्हणून महाज्ञानी व प्रिय असा ज्येष्ठ पुत्र आहे त्याचें मुख नक्षत्राधिपति चंद्राप्रमाणे आल्हादकारक आहे सर्व धनुर्धरामध्ये तो श्रेष्ठ आहे आणि स्वतःच्या शीलाचें, स्वजनाचें, जीवलोकाचें व धर्माचें तो शत्रुतापन

तस्य सत्याभिसंधस्य वृद्धस्य वचनात्पितुः ।
सभार्यः सह च भ्रात्रा वीरः प्रव्रजितो वनम् ७
तेन तत्र महारण्ये मृगयां परिधावता ।
राक्षसा निहताः शूरा बहवः कामरूपिणः ८
जनस्थानवधं श्रुत्वा निहतौ खरदूषणौ ।
ततस्त्वमर्षापहृता जानकी रावणेन तु ।
वञ्चयित्वा वने रामं मृगरूपेण मायया ९
स मार्गमाणस्तां देवीं रामः सीतामनिन्दिताम् ।
आससाद वने मित्रं सुग्रीवं नाम वानरम् १०
ततः स वालिनं हत्वा रामः परपुरंजयः ।
आयच्छत्कपिराज्यं तु सुग्रीवाय महात्मने ११
सुग्रीवेणाभिसंदिष्टा हरयः कामरूपिणः ।
दिक्षु सर्वासु तां देवीं विचिन्वन्तः सहस्रशः १२
अहं संपातिवचनाच्छतयोजनमायतम् ।
तस्या हेतोर्विशालाक्ष्याः समुद्रं वेगवान्प्लुतः १३

राम रक्षण करणारा आहे. त्याचा जो सत्यप्रतिज्ञ वृद्ध पिता त्याच्या आज्ञेवरून तो वीर राम भार्या आणि भ्राता यासह वनामध्ये निघून गेला व त्या महावनामध्ये मृगया करता करता इच्छेनुरूप हवें तें रूप धारण करणाऱ्या असंख्य शूर राक्षसांचाही त्याने वध केला, परंतु जनस्थानातील राक्षसांचा व त्याचप्रमाणें खर-दूषणाचा वध झाल्याचे ऐकून रावणास क्रोध आला व त्याने जानकीचा अपहार केला, तो अपहार मायेने मृगरूप धारण करून वनामध्ये रामाला फसवून केला. तेव्हा त्या निर्दोष सीतादेवीचा शोध लावण्याकरिता राम वनामध्ये हिंडत असता त्या रामाला सुग्रीवनामक एक वानरमित्र मिळाला (७-१०)

"यानंतर वालीचा वध करून शत्रुसमूह जिंकणाऱ्या रामाने महात्म्या सुग्रीवाला वानरांचें राज्य अर्पण केलें इतकें झाल्यावर इच्छित रूप धारण करणाऱ्या वानरांना सुग्रीवाने त्या सीतेचा शोध लावण्याची आज्ञा केली व त्याप्रमाणे हजारो वानर सर्व दिशास त्या सीतादेवीचा शोध करीत हिंडत आहेत. विशालनेत्र

यथारूपां यथावर्णां यथालक्ष्मवतीं च ताम्।
अश्रौषं राघवस्याहं सेयमासादिता मया १४
विररामैवमुक्त्वा स वाचं वानरपुङ्गवः।
जानकी चापि तच्छ्रुत्वा विस्मयं परमं गता १५
ततः सा वक्रकेशान्ता सुकेशी केशसंवृतम्।
उन्नम्य वदनं भीरुः शिंशपामन्ववैक्षत १६
निशम्य सीता वचनं कपेश्च दिशश्च सर्वाः प्रदिशश्च वीक्ष्य।
स्वयं प्रहर्षं परमं जगाम सर्वात्मना राममनुस्मरन्ती १७
सा तिर्यगूर्ध्वं च तथा ह्यधस्तान्निरीक्षमाणा तमचिन्त्यबुद्धिम्।
ददर्श पिङ्गाधिपतेरमात्यं वातात्मजं सूर्यमिवोदयस्थम् १८

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दर० एकत्रिंशः सर्गः ॥३१॥ [१३२३]

असलेल्या त्याच सीतेच्या शोधाकरिता मी वेगाने सपातीच्या सांगण्यावरून शभर योजनें विस्तृत असलेल्या समुद्राचें उल्लंघन केलें आणि रामाच्या मुखातून सीता ज्या रूपाची, ज्या वर्णाची व ज्या चिन्हांनी युक्त आहे, असें ऐकलें होतें तशी सीता शेवटीं माझ्या दृष्टीस पडली." ( ११–१४ )

असें भाषण बोलून तो वानरश्रेष्ठ हनुमान् स्वस्थ राहिला। तें त्याचें भाषण ऐकून जनककन्या सीतेलाही पराकाष्ठेचा विस्मय वाटला. यानंतर वक्र केशाग्र आणि उत्कृष्ट केश असलेली ती विनयशील सीता तोंडावर आलेले केस बाजूस करून तिनें आपलें मुख वर केलें व ती त्या शिंशपा वृक्षाकडे पाहूं लागली. याप्रमाणे त्या वानराचें भाषण ऐकल्यावर सीता सर्व दिशा व उपदिशा यांकडे पाहूं लागली आणि अगदीं मनापासून ती रामाचा ध्यास घेऊन बसली असल्यामुळे तिला स्वतःला पराकाष्ठेचा हर्षही झाला. याप्रमाणे इकडेतिकडे आणि खालीवर पहात होती, तों उदयाचलावर आलेला सूर्यच कीं काय, अशा प्रकारचा वानराधिपति सुग्रीवाचा अमात्य, तो अतर्क्य-बुद्धिमान् वायुपुत्र हनुमान् तिच्या दृष्टीस पडला ( १५—१८ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदर-कांडापैकी एकतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३१ ॥

द्वात्रिंशः सर्गः ।

ततः शाखान्तरे लीनं दृष्ट्वा चलितमानसा ।
वेष्टितार्जुनवस्त्रं तं विद्युत्संघातपिङ्गलम् ॥ १
सा ददर्श कपिं तत्र प्रश्रितं प्रियवादिनम् ।
फुल्लाशोकोत्कराभासं तप्तचामीकरेक्षणम् ॥ २
साऽथ दृष्ट्वा हरिश्रेष्ठं विनीतवदवस्थितम् ।
मैथिली चिन्तयामास विस्मयं परमं गता ॥ ३
अहो भीममिदं सत्त्वं वानरस्य दुरासदम् ।
दुर्निरीक्ष्यमिदं मत्वा पुनरेव मुमोह सा ॥ ४
विललाप भृशं सीता करुणं भयमोहिता ।
राम रामेति दुःखार्ता लक्ष्मणेति च भामिनी ॥ ५
रुरोद सहसा सीता मन्दमन्दस्वरा सती ॥ ६
साऽथ दृष्ट्वा हरिवरं विनीतवदुपागतम् ।
मैथिली चिन्तयामास स्वप्नोऽयमिति भामिनी ॥ ७

---

वृक्षशाखेवर पांढरें वस्त्र पांघरून दडून बसलेल्या आणि विद्युद्गणांप्रमाणे तेजस्वी असलेल्या त्या हनुमानाला पाहून, सीतेच्या मनामध्ये हाही मायामृगच असावा, अशी शंका आली. विनयसंपन्न, प्रिय भाषण करणारा, अशोकवृक्षाच्या फुललेल्या फुलांच्या गुच्छाप्रमाणे भासणारा आणि सुवर्णतुल्य नेत्र असलेला तो वानर तिने पाहिला; वृक्षावर गुपचुप बसलेला तो वानरश्रेष्ठ पाहून, सीतेला आश्चर्य वाटलें व ती स्वतःशीच विचार करूं लागली– " अहो, वानराचें हें भयंकर रूप इतरांना अजिंक्य दिसत आहे, इतकेंच काय पण इतरांची याकडे पाहण्याचीही छाती होणार नाही " असें मनामध्ये आणून, ती पुनः मनांत गांगरून गेली आणि भयानें गोंधळून जाऊन, दुःखानें व्याकुल झाली. ती उत्कृष्ट स्त्री सीता " हे रामा, हे रामा, हे लक्ष्मणा, " असें म्हणून, करुण स्वर काढून एकसारखा विलाप करूं लागली. नंतर तोंडांतून शब्दही उमटेनासा मन्दा, सती ती साध्वी एकसारखी रडत होती. ( १-६ )

नंतर नम्रपणें समीप आलेल्या त्या वानरश्रेष्ठाला अवलोकन केल्यावर,

सा वीक्षमाणा पृथुभग्नवक्त्रं शाखामृगेन्द्रस्य यथोक्तकारम् ।
ददर्श पिङ्गप्रवरं महार्हं वातात्मजं बुद्धिमतां वरिष्ठम् ८
सा तं समीक्ष्यैव भृशं विपन्ना गतासुकल्पेव बभूव सीता ।
चिरेण संज्ञां प्रतिलभ्य चैवं विचिन्तयामास विशालनेत्रा ९
स्वप्नो मयाऽयं विकृतोऽद्य दृष्टः शाखामृगः शास्त्रगणैर्निषिद्धः ।
स्वस्त्यस्तु रामाय सलक्ष्मणाय तथा पितुर्मे जनकस्य राज्ञः १०
स्वप्नो हि नायं न हि मेऽस्ति निद्रा शोकेन दुःखेन च पीडितायाः ।
सुखं हि मे नास्ति यतो विहीना तेनेन्दुपूर्णप्रतिमाननेन ११
रामेति रामेति सदैव बुद्ध्या विचिन्त्य वाचा ब्रुवती तमेव ।
तस्यानुरूपं च कथां तदर्थामेवं प्रपश्यामि तथा शृणोमि १२

हे स्वप्न आहे, असा विचार ती मनामध्ये आणूं लागली. आपले हे शब्द राक्षसस्त्रियांनी ऐकले आहेत की काय, अशी शंका येऊन, ती सीता इकडेतिकडे पाहूं लागली. तेव्हां वानरराज सुग्रीवाच्या आज्ञेप्रमाणे वागणारा महायोग्य वायुपुत्र वानरश्रेष्ठ तिने पाहिला. तो बुद्धिमानांमध्ये श्रेष्ठ होता आणि वज्रप्रहारामुळे त्याच्या विशाल मुखाचा भंग झालेला होता त्याला पाहताच तिच्या छातीत अतिशयच धडकी भरली आणि हा रूपांतर करून रावणच आला असावा, या भीतीने ती अगदी मृतवत् निश्चेष्ट पडली. नंतर विशाल नेत्रांची ती सीता बऱ्याच वेळाने शुद्धीवर येऊन विचार करूं लागली. " हें आज मला वाईट स्वप्न पडलें. कारण शास्त्रगणांनी निषिद्ध सांगितलेला वानर मी स्वप्नामध्ये प्रत्यक्ष पाहिला, तेव्हां लक्ष्मणासह रामाचें आणि त्याचप्रमाणे माझ्या पित्या जनकराजाचें कुशल असो, परंतु मी शोकानें व दुःखानें पीडलें असल्यानें माझा जर मुळीं डोळाच लागत नाही, तर मी पाहिलें हे स्वप्न नव्हे, कारण, पूर्णचंद्रतुल्य आल्हादकारक मुखानें युक्त असलेल्या त्या रामाचा वियोग झाला असल्यामुळे डोळा लागण्याइतकें सुख मला लाभत नाही ( ७-११ )

"हे रामा, हे रामा, असे एकसारखें मी मनामध्ये चिंतन करीत असून, वाणीनेही त्याच्याच नावाचा उच्चार करीत आहें त्याचा ज्यात संबंध आहे, अशीच गोष्ट ऐकण्याकडे माझ्या मनाचा ओढा आहे आणि माझ्या दृष्टीपुढेही त्याच्याच गोष्टी

अहं हि तस्याद्य मनोभवेन संपीडिता तद्गतसर्वभावा ।
विचिन्तयन्ती सततं तमेव तथैव पश्यामि तथा शृणोमि १३
मनोरथः स्यादिति चिन्तयामि तथापि बुद्ध्यापि वितर्कयामि ।
किं कारणं तस्य हि नास्ति रूपं सुव्यक्तरूपश्च वदत्ययं माम् १४
नमोऽस्तु वाचस्पतये सवज्रिणे स्वयंभुवे चैव हुताशनाय ।
अनेन चोक्तं यदिदं ममाग्रतो वनौकसा तच्च तथास्तु नान्यथा १५

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे द्वात्रिंशः सर्गः ॥३२॥

त्रयस्त्रिंशः सर्गः । [ १३३८ ]

सोऽवतीर्य द्रुमात्तस्माद्विद्रुमप्रतिमाननः ।
विनीतवेषः कृपणः प्रणिपत्योपसृत्य च १

---

दिसत आहेत. साराश त्या रामासंबंधी उत्कट विचार मनात येत असल्याने मी आज अस्वस्थ झालें आहे; माझें सर्व मन त्याचे ठिकाणींच लीन होऊन राहिलें आहे, मनात एकसारखें चिंतनही त्याचेंच करीत आहें व दृष्टीपुढेही सर्व काही त्याचाच पराक्रम असून, कानानेंही सर्व काही त्याच्याचसंबंधी ऐकूं येत आहे, असा भास होत आहे. आतापर्यंत झालेला हा सर्व प्रकार मनोराज्य असेल, कल्पित असेल, असें समजावें, तर स्थिर अंतःकरणानें असूनही मला तसेंच वाटत आहे. तेव्हा असें होण्याचें कारण काय ? हा सर्व मनोराज्यातीलच प्रकार आहे, असें म्हणावें, तर तसल्या प्रकारचा प्रत्यक्ष अनुभव कधी काहींच येत नसतो; परंतु हा वानर जो मला उद्देशून भाषण करीत आहे, याचें रूप तर अगदी स्पष्ट दिसत आहे. बृहस्पति, इंद्र, ब्रह्मदेव आणि अग्नि यांना नमस्कार असो. या वनचर वानरानें माझ्यासमोर केलेलें हें भाषण, या देवतांच्या कृपेनें सत्य असो, तें अन्यथा न होवो. " ( १२–१५ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडापैकी बत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३२ ॥

नवीन फुटलेल्या पालवीप्रमाणे ज्याचें मुख आहे, असा तो विनम्र वेष केलेला विचारा हनुमान् त्या झाडावरच्या झाडावरच, उंच फांदीवरून एका अगदी जवळच्या फांदीवर आला आणि सीतेसमीप येऊन तिला त्यानें नमस्कार

नामब्रवीन्महातेजा हनूमान्मरुतात्मजः ।
शिरस्यञ्जलिमाधाय सीतां मधुरया गिरा २
का नु पद्मपलाशाक्षि क्लिष्टकौशेयवासिनि ।
द्रुमस्य शाखामालम्ब्य तिष्ठसि त्वमनिन्दिता ३
किमर्थं तव नेत्राभ्यां वारि स्रवति शोकजम् ।
पुण्डरीकपलाशाभ्यां विप्रकीर्णमिवोदकम् ४
सुराणामसुराणां च नागगन्धर्वरक्षसाम् ।
यक्षाणां किंनराणां च का त्वं भवसि शोभने ५
का त्वं भवसि रुद्राणां मरुतां वा वरानने ।
वसूनां वा वरारोहे देवता प्रतिभासि मे ६
किं नु चन्द्रमसा हीना पतिता विबुधालयात् ।
रोहिणी ज्योतिषां श्रेष्ठा श्रेष्ठसर्वगुणाधिका ७
कोपाद्वा यदि वा मोहाद्भर्तारमसितेक्षणे ।

---

घेला तो महातेजस्वी वायुपुत्र हनुमान् मस्तकाइतके वर हात जोडून, मधुर वाणीने त्या सीतेला म्हणाला, " कमलपत्राप्रमाणे नेत्र आहेत, मलिन रेशमी वस्त्र जिने परिधान केलेलें आहे आणि रूपाच्या बाबतींत नावें ठेवण्यास कोठेच जागा नाही, अशी तूं या झाडाच्या फांदीचा आधार घेऊन उभी राहिली आहेस, ही तूं कोण बरें आहेस ? कमलपत्रावर पडलेलें उदक ज्याप्रमाणे कमलपत्रापासून खाली गळत असतें, त्याप्रमाणे तुझ्या नेत्रापासून शोकजन्य उदक-अश्रु-कशा-करिता खाली स्रवत आहे ? ( १-४ )

"हे कल्याणी, देव, दैत्य, नाग, गंधर्व, राक्षस, यक्ष आणि किंनर यापैकीं तूं कोणत्या जातीची आहेस ? हे सुंदरी, तूं मला देवतेसारखी भासत आहेस. तर हे सुमुखि, रुद्राची, मरुद्गणाची अथवा अष्टवसूंची तूं अधिष्ठात्री देवता आहेस की काय ? नक्षत्रामध्ये श्रेष्ठ आणि उत्कृष्ट अशा सर्व गुणानी सर्वांत अधिक अशी तूं रोहिणी असून, चंद्राचा वियोग होऊन, स्वर्गांतून खाली पडलेली तर नाहींस ना ? हे कृष्णनयने, क्रोधाने अथवा मोहाने वसिष्ठाला कोप आणवून, तूं कल्याणी अरुंधती तर येथे आली नाहींस ना ? हे सुंदरी, इहलोकाहून परलोकीं गेलेल्या

वसिष्ठं कोपयित्वा त्वं वासि कल्याण्यरुन्धती ८
को नु पुत्रः पिता भ्राता भर्ता वा ते सुमध्यमे।
अस्माल्लोकादमुं लोकं गतं त्वमनुशोचसि ९
रोदनादतिनिःश्वासाद्भूमिसंस्पर्शनादपि।
न त्वा देवीमहं मन्ये राज्ञः संज्ञावधारणात् १०
व्यञ्जनानि हि ते यानि लक्षणानि च लक्षये।
महिषी भूमिपालस्य राजकन्या च मे मता ११
रावणेन जनस्थानाद्बलात्प्रमथिता यदि।
सीता त्वमसि भद्रं ते तन्ममाचक्ष्व पृच्छतः १२
यथा हि तव वै दैन्यं रूपं चाप्रतिमानुषम्।
तपसा चान्वितो वेषस्त्वं राममहिषी ध्रुवम् १३
सा तस्य वचनं श्रुत्वा रामकीर्तनहर्षिता।
उवाच वाक्यं वैदेही हनूमन्तं द्रुमाश्रितम् १४
पृथिव्यां राजसिंहानां मुख्यस्य विदितात्मनः।
स्नुषा दशरथस्याहं शत्रुसैन्यप्रणाशिनः १५

कोणाचातरी तूं शोक करीत आहेस तेव्हा परलोकीं गेलेला तो तुझा पुत्र होता का ? कीं पिता होता, कीं भ्राता होता, किंवा भर्ता होता ? एकसारखें रडणें, अतिशय श्वासोच्छ्वास येणें व जमिनीवर बसून राहणें आणि रामराजाचें नाव घेणें, यावरून तूं देवता नव्हेस, असें मला वाटतें. ( ५-१० )

"राजपत्नीत्वसूचक अशीं जीं लक्षणें तुझ्या ठिकाणीं मला दिसत आहेत, त्यावरून तूं पृथ्वीपति रामाची पट्टराणी व जनकराजाची कन्या असावीस, असें मला वाटतें. रावणानें जनस्थानापासून बलात्कारानें अपहार करून आणलेली सीता जर तूं असशील, तर तुझें देव बरें करो, हे विचारणाऱ्या मला तूं तसें सांग. तुझी ही साम्प्रतची दैन्यावस्था, मनुष्यामध्ये ज्याला कोठेही उपमा नाही, असें हें तुझें रूप आणि तपश्चर्येला योग्य असा हा तुझा वेष, यांवरून तूं निःसंशय रामाची पट्टराणीच आहेस " हें हनुमानाचें भाषण ऐकताच रामराजाचा उच्चार झाल्यामुळे सीतेला हर्ष झाला आणि वृक्षावर बसलेल्या त्या हनुमानाशीं ती

दुहिता जनकस्याहं वैदेहस्य महात्मनः।
सीतेति नाम्ना चोक्ताहं भार्या रामस्य धीमतः १६
समा द्वादश तत्राहं राघवस्य निवेशने।
भुञ्जाना मानुषान्भोगान्सर्वकामसमृद्धिनी १७
ततस्त्रयोदशे वर्षे राज्ये चेक्ष्वाकुनन्दनम्।
अभिषेचयितुं राजा सोपाध्यायः प्रचक्रमे १८
तस्मिन्संभ्रियमाणे तु राघवस्याभिषेचने।
कैकेयी नाम भर्तारमिदं वचनमब्रवीत् १९
न पिबेयं न खादेयं प्रत्यहं मम भोजनम्।
एष मे जीवितस्यान्तो रामो यद्यभिषिच्यते २०
यत्तदुक्तं त्वया वाक्यं प्रीत्या नृपतिसत्तम।
तच्चेन्न वितथं कार्यं वनं गच्छतु राघवः २१
स राजा सत्यवाग्देव्या वरदानमनुस्मरन्।
मुमोह वचनं श्रुत्वा कैकेय्याः क्रूरमप्रियम् २२

विदेहराजकन्या बोलूं लागली. ती म्हणाली, "पृथ्वीतील श्रेष्ठ राजामध्ये मुख्य, स्वपराक्रमानें प्रसिद्ध आणि शत्रुसैन्यघातक अशा दशरथाची मी स्नुषा आहें; महात्म्या विदेहराज जनकाची मी कन्या आहें आणि बुद्धिमान् रामाची मी भार्या असून, सीता या नांवानें मला लोक हाक मारीत असतात. ( ११–१६ )

"मनांतील सर्व इच्छा परिपूर्ण होत होत्या आणि मनुष्यजातीला योग्य अशा सर्वही भोग्य वस्तूंचा उपभोग घडत होता, अशा स्थितींत राघवाच्या गृहामध्यें मी बारा वर्षेंपर्यंत राहिलें होतें. तदनंतर तेरावे वर्षी इक्ष्वाकुवंशज रामाला राज्याभिषेक करण्याचा उपाध्यायासह दशरथराजानें उपक्रम सुरू केला, परंतु रामाच्या राज्याभिषेकाची ती तयारी चालली असतां, कैकेयीनामक स्त्री आपल्या भर्त्या दशरथाला म्हणाली, " रामाला जर राज्याभिषेक व्हावयाचा असेल, तर यानंतर मी मुळींच नेहमींचें भोजनही घेणार नाहीं व जलप्राशनही करणार नाहीं हे नृपश्रेष्ठा, त्या वेळेला जें तू वरप्रदान देण्याचें माझ्याशीं प्रेमानें भाषण केलें होतेंस तें जर व्यर्थ करावयाचें नसेल, तर रामाला वनांत जाऊं दे. " हें कैकेयीचें

ततस्तं स्थविरो राजा सत्यधर्मे व्यवस्थितः ।
ज्येष्ठं यशस्विनं पुत्रं रुदन्राज्यमयाचत ॥ २३

स पितुर्वचनं श्रीमानभिषेकात्परं प्रियम् ।
मनसा पूर्वमासाद्य वाचा प्रतिगृहीतवान् ॥ २४

दद्यान्न प्रतिगृह्णीयात्सत्यं ब्रूयान्न चानृतम् ।
अपि जीवितहेतोर्हि रामः सत्यपराक्रमः ॥ २५

स विहायोत्तरीयाणि महार्हाणि महायशाः ।
विसृज्य मनसा राज्यं जनन्यै मां समादिशत् ॥ २६

साहं तस्याग्रतस्तूर्णं प्रस्थिता वनचारिणी ।
न हि मे तेन हीनाया वासः स्वर्गेऽपि रोचते ॥ २७

प्रागेव तु महाभागः सौमित्रिर्मित्रनन्दनः ।
पूर्वजस्यानुयात्रार्थे कुशचीरैरलंकृतः ॥ २८

---

क्रूर व अप्रिय भाषण श्रवण केल्यावर तिला पूर्वी एकदा वर दिल्याचें स्मरण झालें आणि तो सत्यवचनी राजा मूर्च्छित झाला. ( १७-२२ )

"नंतर सत्यधर्माचें अवलंबन करून राहिलेला तो वृद्ध राजा रडत रडत आपल्या त्या यशस्वी ज्येष्ठ पुत्रापाशीं राज्याची याचना करूं लागला. त्या श्रीमान् रामानें राज्याभिषेकापेक्षाही तें पित्याचें वनात जाण्याचें भाषण मनामध्ये अधिक प्रमाण मानून, तसें वाणीनेंही उच्चारून दाखविलें. " सत्यपराक्रमी राम जीविताकरिताही कधी खोटें बोलणार नाही; सत्यच बोलेल आणि त्याचप्रमाणे कधी प्रतिग्रह करणार नाही; परंतु, दुसऱ्याला नेहमी दानच देईल " असें म्हणून त्या महायशस्वी रामानें अंगावरचीं मोठीमोठीं मूल्यवान् वस्त्रें काढून टाकलीं आणि आपल्या मनानेच राज्याचा त्याग करून, माझें रक्षण करण्याविषयीं मातेची प्रार्थना केली, परंतु मी त्याच्यापुढेच वनामध्यें संचार करण्यास सिद्ध होऊन, त्यांच्याबरोबर सत्वर चालूं लागलें, कारण त्यांच्याशिवाय स्वर्गामध्येंही वास्तव्य करणें मला रुचत नाही. मित्रांना आनंद देणारा महाभाग्यवान् सुमित्रा–पुत्र लक्ष्मण माझ्याहीपूर्वी आपल्या ज्येष्ठ भ्रात्याच्या मागोमाग जाण्याकरिता दर्भ घेऊन व वल्कलें नेसून तयार झाला होता ( २३–२८ )

ते वयं भर्तुरादेशं बहुमान्य दृढव्रताः ।
प्रविष्टाः स्म पुराः दृष्टं वनं गम्भीरदर्शनम् २९
वसतो दण्डकारण्ये तस्याहममितौजसः ।
रक्षसापहृता भार्या रावणेन दुरात्मना ३०
द्वौ मासौ तेन मे कालो जीवितानुग्रहः कृतः ।
ऊर्ध्वं द्वाभ्यां तु मासाभ्यां ततस्त्यक्ष्यामि जीवितम् ३१

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रयस्त्रिंशः सर्गः ॥३३॥

चतुस्त्रिंशः सर्गः । [ १३६९ ]

तस्यास्तद्वचनं श्रुत्वा हनुमान्हरियूथपः ।
दुःखाद्दुःखाभिभूतायाः सान्त्वमुत्तरमब्रवीत् १
अहं रामस्य संदेशाद्देवि दूतस्तवागतः ।
वैदेहि कुशली रामः स त्वां कौशलमब्रवीत् २
यो ब्राह्ममस्त्रं वेदांश्च वेद वेदविदां वरः ।
स त्वां दाशरथी रामो देवि कौशलमब्रवीत् ३

अशा रीतीने स्वीकारलेल्या व्रताचें परिपालन करणारे ते आम्ही निवर्गही राजा दशरथाच्या आज्ञेला बहुमान देऊन, पूर्वी कधीही न पाहिलेल्या आणि दिसण्यातही भयंकर असलेल्या अशा त्या वनामध्ये आलों. अतुलसामर्थ्यवान् राम दंडकारण्यामध्ये वास्तव्य करीत असताना दुरात्म्या रावणाने त्याची भार्या जी मी तिला, हरण करून येथे आणलें आहे. यापुढे दोन महिन्याचा काल लोटे-पर्यंत त्या रावणाने माझ्या जीवितरक्षणाची मुदत दिलेली आहे आणि दोन महिन्यानंतर माझेवर प्राणत्याग करण्याचा प्रसंग येणार आहे " ( २९-३१ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदर-कांडापैकी तेहेतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३३ ॥

दुःखपरंपरेने घेरून टाकलेल्या त्या सीतेचें भाषण ऐकून घेऊन, तो वानरश्रेष्ठ हनुमान् सौम्य शब्दानी तिला म्हणाला, " हे देवी, रामाच्या आज्ञेने मी तुझ्या कडे आलों आहे हे वैदेही, राम कुशल आहे आणि त्याने तुलाही कुशल प्रश्न केला आहे हे देवी, सर्व वेदवेत्त्यामध्ये श्रेष्ठ असून, जो वेद व ब्रह्मास्त्र जाणत

लक्ष्मणश्च महातेजा भर्तुस्तेऽनुचरः प्रियः।
कृतवाञ्छोकसंतप्तः शिरसा तेऽभिवादनम् ४
सा तयोः कुशलं देवी निशम्य नरसिंहयोः।
प्रतिसंहृष्टसर्वाङ्गी हनूमन्तमथाब्रवीत् ५
कल्याणी बत गाथेयं लौकिकी प्रतिभाति मा।
एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि ६
तयोः समागमे तस्मिन्प्रीतिरुत्पादिताद्भुता।
परस्परेण चालापं विश्वस्तौ तौ प्रचक्रतुः ७
तस्यास्तद्वचनं श्रुत्वा हनूमान्मारुतात्मजः।
सीतायाः शोकतप्तायाः समीपमुपचक्रमे ८
यथा यथा समीपं स हनूमानुपसर्पति।
तथा तथा रावणं सा तं सीता परिशङ्कते ९
अहो धिग्धिक्कृतमिदं कथितं हि यदस्य मे।
रूपान्तरमुपागम्य स एवाऽयं हि रावणः १०

---

आहे, त्या दाशरथी रामाने तुला कुशल प्रश्न केला आहे. तुझ्या भर्त्याचा अत्यंत लाडका अनुयायी, महातेजस्वी लक्ष्मण शोकाने संतप्त झाला असून, त्याने तुला शिरसाष्टांग नमस्कार सांगितला आहे." (१-४)

याप्रमाणे त्या उभयतां पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मणांचें कुशल ऐकून, त्या सीतादेवीच्या सर्व शरीरावर आनंदाचे रोमांच उभे राहिले आणि ती हनुमानाला म्हणाली, "मनुष्य जिवंत राहील, तर शंभर वर्षांनी तरी त्याला सुखाचे दिवस येतील, ही लोकप्रसिद्ध म्हण खरोखर मला मोठी कल्याणकारक दिसते." त्या वेळीं जणु प्रत्यक्ष रामलक्ष्मणांची भेट झाल्याप्रमाणेच, सीतेला अनिर्वचनीय आनंद झाला आणि सीता व हनुमान् या उभयतांनी एकमेकांशीं विश्वासानें भाषण करण्यास आरंभ केला. शोकसंतप्त झालेल्या सीतेचें भाषण ऐकल्यावर वायुपुत्र हनुमान तिच्याजवळ जाऊं लागला; परंतु तो हनुमान् जसजसा जवळ येऊं लागला, तसतशी तो हनुमान नसून रावण असावा, अशी सीतेला शंका येऊं लागली आणि ती म्हणाली "अहो, धिक्कार असो; धिक्कार असो या माझ्या

तामशोकस्य शाखां तु विमुक्त्वा शोककर्शिता ।
तस्यामेवानवद्याङ्गी धरण्यां समुपाविशत् ११
अवन्दत महाबाहुस्ततस्तां जनकात्मजाम् ।
सा चैनं भयसंत्रस्ता भूयो नैनमुदैक्षत १२
तं दृष्ट्वा वन्दमानं च सीता शशिनिभानना ।
अब्रवीद्दीर्घमुच्छ्वस्य वानरं मधुरस्वरा १३
मायां प्रविष्टो मायावी यदि त्वं रावणः स्वयम् ।
उत्पादयसि मे भूयः संतापं तन्न शोभनम् १४
स्वं परित्यज्य रूपं यः परिव्राजकरूपवान् ।
जनस्थाने मया दृष्टस्त्वं स एव हि रावणः १५
उपवासकृशां दीनां कामरूप निशाचर ।
संतापयसि मां भूयः संतापं तन्न शोभनम् १६

असें करण्याला याला मी माझें मनोगत सांगितलें हें ठीक झालें नाही, कारण तो रावणच हें दुसरें रूप घेऊन येथे आला आहे " ( ५-१० )

याप्रमाणे बोलून शोकाने व्याकुल झालेल्या त्या सीतेने अशोकवृक्षाची धरलेली ती फांदी सोडून दिली आणि ती निर्दोष अवयव असलेली सीता त्या भूमीवर तशीच तेथे बसली हें पाहून महापराक्रमी हनुमानाने त्या जनककन्येला वंदन केलें, परंतु त्याला पाहून भयभीत झाल्यामुळे, पुनरपि त्याच्याकडे पाहण्याचेंही तिला धैर्य होईना, पण तो वंदन करीत आहे, असें पाहून, मधुर स्वर आणि चंद्रासारखें आल्हाददायक मुख असलेली ती सीता दुःखाने लांब सुस्कारा टाकून, त्या वानराला म्हणाली ( ११—१३ )

" मायेचें अवलंबन करून, जर तू स्वतः मायावी रावण असशील व मला पुनः असा येथे येऊन त्रास देत असशील तर हे तुझें करणें चांगलें नाही. अरे, आपल्या मूळ रूपाचा त्याग करून संन्याशाचें रूप घेतलेला जो रावण जनस्थानामध्ये मी पाहिला, तोच तू रावण आहेस हे रूप बदलणाऱ्या निशाचरा, उपवासानें कृश होऊन रामवियोगदुःखानें मी दीन झालें आहें, पण मला तू पुनः संताप आणीत आहेस, परंतु हें तुझं करणें चांगलें नव्हे, अथवा

अथवा नैतदेवं हि यन्मया परिशङ्कितम् ।
मनसो हि मम प्रीतिरुत्पन्ना तव दर्शनात् १७
यदि रामस्य दूतस्त्वमागतो भद्रमस्तु ते ।
पृच्छामि त्वां हरिश्रेष्ठ प्रिया रामकथा हि मे १८
गुणान्रामस्य कथय प्रियस्य मम वानर ।
चित्तं हरासि मे सोम्य नदीकूलं यथा रयः १९
अहो स्वप्नस्य सुखता याहमेव चिराहृता ।
प्रेषितं नाम पश्यामि राघवेण वनौकसम् २०
स्वप्नेऽपि यद्यहं वीरं राघवं सहलक्ष्मणम् ।
पश्येयं नावसीदेयं स्वप्नोऽपि मम मत्सरी २१
नाहं स्वप्नमिमं मन्ये स्वप्ने दृष्ट्वा हि वानरम् ।
न शक्योऽभ्युदयः प्राप्तुं प्राप्तश्चाभ्युदयो मम २२

---

ज्या अर्थी तुझें दर्शन झाल्यामुळे, माझ्या मनाला आनंद झाला आहे, त्या अर्थी मला शंका आल्याप्रमाणे तर हा प्रकार नाही ? यासाठी तू जर रामदूत होऊन आला असशील, तर तुझें कल्याण असो हे वानरश्रेष्ठा, मी तुला रामकथा विचारीत आहें, कारण ती मला प्रिय आहे तेव्हा हे वानरा, तू मला माझ्या प्रिय रामाचे गुण सांग हे विनयशील, पाण्याचे वाहण्याचा वेग ज्याप्रमाणे नदीचे तीर शिथिल करून टाकीत असतो, त्याप्रमाणे तुझा मला पक्का विश्वास येत नसल्यामुळे तू माझें अंतःकरण घाबरें करीत आहेस (१४–१९)

अहो, या मला पडणाऱ्या स्वप्नाचा कितीतरी सुखकारक परिणाम झाला आहे पहा ! रावणाने मला आणून बरेच दिवस झाले असतानाही रघुवंशज रामाने पाठवलेला वानर मी स्वप्नामध्ये पहात आहें त्याचप्रमाणे लक्ष्मणासह वीर राम जरी स्वप्नामध्येहा माझ्या दृष्टीं पडला, तरीसुद्धा मी निराश होणार नाहीं, परंतु, स्वप्नदेखील या वेळेला माझ्याशीं वैर साधीत आहे. छे ! छे ! हें स्वप्न असावं असें मला वाटत नाही, कारण स्वप्नामध्ये वानर पाहिला, तर पाहणाऱ्याचा अभ्युदय होणं शक्य नसतें आणि मला तर मन आनंदित झा यामुळे अभ्युदय लवकरच होण्याचीं स्पष्ट चिन्हं दिसत आहेत अरे, पण

किं नु स्यांश्चित्तमोहोऽयं भवेद्वातगतिस्त्वियम् ।
उन्मादजो विकारो वा स्यादयं मृगतृष्णिका २३
अथवा नायमुन्मादो मोहोऽप्युन्मादलक्षणः ।
संबुध्ये चाहमात्मानमिमं चापि वनौकसम् २४
इत्येवं बहुधा सीता संप्रधार्य बलाबलम् ।
रक्षसां कामरूपत्वान्मेने तं राक्षसाधिपम् २५
एतां बुद्धिं तदा कृत्वा सीता सा तनुमध्यमा ।
न प्रतिव्याजहाराथ वानरं जनकात्मजा २६
सीतायाः निश्चितं बुद्‌ध्वा हनूमान्मारुतात्मजः ।
श्रोत्रानुकूलैर्वचनैस्तदा तां संप्रहर्षयन् २७
आदित्य इव तेजस्वी लोककान्तः शशी यथा ।
राजा सर्वस्य लोकस्य देवो वैश्रवणो यथा २८
विक्रमेणोपपन्नश्च यथा विष्णुर्महायशाः ।

हा चित्तमोह तर नव्हे ना ? कदाचित् वायूच्या झटक्याचाही हा परिणाम असेल, न जाणो, उन्मादामुळे मनाला हा काही विकारही झाला असेल किंवा मृगजलाप्रमाणे हा कदाचित् मनास झालेला प्रत्यक्ष भ्रमही असेल अँ हं ' हा उन्माद नव्हे, मोह व उन्माद यांची लक्षणें जवळजवळ सारखीच असल्यामुळे हा मोहह नव्हे, कारण मी स्वत ला पूर्णपणें जाणीत आहें आणि हा वानरही मला स्पष्टपणें दिसत आहे " ( २०–२४ )

याप्रमाणे सीतेने नाना प्रकारानी सारासार विचार करून पाहिला, परंतु राक्षस इच्छेस येईल त्याप्रमाणे रूप धारण करणारे असल्यामुळे, समोर आहे तो हनुमान नसून राक्षसाधिपति रावणच असावा, असेंच शेवटीं तिला वाटलें आणि याप्रमाणे निश्चित वाटल्यावर ती जनककन्या कृशोदरी सीता त्या वानराशीं काहीएक बोलेनाशी झाली सीतेच्या मनातील हेतु जाणून, वायुपुत्र हनुमान् कर्णमधुर शब्दानी तिला हर्ष उत्पन्न करीत करीत म्हणाला, ( २५–२७ )

"सूर्याप्रमाणे तेजस्वी, चंद्राप्रमाणे जगताला आल्हाददायक, व कुबेराप्रमाणे सर्व लोकाना धनधान्य वगैरे देऊन रंजन करणारा, महायशस्वी, विष्णूप्रमाणे पराक्रम-

सत्यवादी मधुरवाग्देवो वाचस्पतिर्यथा २९
रूपवान्सुभगः श्रीमान्कन्दर्प इव मूर्तिमान् ।
स्थानक्रोधे प्रहर्ता च श्रेष्ठो लोके महारथः ३०
बाहुच्छायामवष्टब्धो यस्य लोको महात्मनः ।
अपक्रम्याश्रमपदान्मृगरूपेण राघवम् ॥
शून्ये येनापनीतासि तस्य द्रक्ष्यसि तत्फलम् ३१
अचिराद्रावणं संख्ये यो वधिष्यति वीर्यवान् ।
क्रोधप्रमुक्तैरिषुभिर्ज्वलद्भिरिव पावकैः ३२
तेनाहं प्रेषितो दूतस्त्वत्सकाशमिहागतः ।
त्वद्वियोगेन दुःखार्तः स त्वां कौशलमब्रवीत् ३३
लक्ष्मणश्च महातेजाः सुमित्रानन्दवर्धनः ।
अभिवाद्य महाबाहुः स त्वां कौशलमब्रवीत् ३४
रामस्य च सखा देवि सुग्रीवो नाम वानरः ।
राजा वानरमुख्यानां स त्वां कौशलमब्रवीत् ३५

संयत, सत्यवादी, देवगुरु बृहस्पतीप्रमाणे मधुर भाषण करणारा, प्रत्यक्ष मदनाप्रमाणे रूपवान्, महाभाग्यवान्, वैभवशाली, क्रोध करणें योग्य असेल, अशा ठिकाणींच प्रहार करणारा आणि जगतामध्ये श्रेष्ठ महारथी असा जो आहे आणि ज्या महात्म्याच्या बाहूंचा आश्रय आहे, म्हणून हें जगत् राहिलेलें आहे, त्या राघवाला मृगरूपानें फसवून आश्रमांतून ज्यानें दूर केलें व त्या निराश्रित आश्रमामध्ये येऊन, ज्यानें तुला भरून आणलें, त्याला आपल्या त्या दुष्ट कर्माचें फल प्राप्त होत असल्याचें लवकरच तुझ्या दृष्टीस पडेल. ( २८-३१ )

जो वीर्यवान् लवकरच रागारागानें सोडलेल्या आणि प्रज्वलित अग्नीप्रमाणे भासत असलेल्या आपल्या बाणांनी संग्रामामध्ये रावणाचा वध करणार आहे, त्या रामानें तुझ्याकडे पाठविलेला मी दूत असून येथे आलों आहें. तुझ्या वियोगानें दुःखाकुल झालेल्या त्या रामानें तुला कुशल सांगितलें असून, सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या त्या महातेजस्वी व महापराक्रमी लक्ष्मणानेंही तुला कुशल सांगितलें आहे, आणि त्याचप्रमाणे हे देवी, रामाचा सखा आणि वानरश्रेष्ठांचा

नित्यं स्मरति ते रामः ससुग्रीवः सलक्ष्मणः ।
दिष्ट्या जीवसि वैदेहि राक्षसीवशमागता ३६
न चिराद्द्रक्ष्यसे रामं लक्ष्मणं च महारथम् ।
मध्ये वानरकोटीनां सुग्रीवं चामितौजसम् ३७
अहं सुग्रीवसचिवो हनूमान्नाम वानरः ।
प्रविष्टो नगरीं लङ्कां लङ्घयित्वा महोदधिम् ३८
कृत्वा मूर्ध्नि तदा न्यासं रावणस्य दुरात्मनः ।
त्वां द्रष्टुमुपयातोऽहं समाश्रित्य पराक्रमम् ३९
नाहमस्मि तथा देवि यथा मामवगच्छसि ।
विशङ्का त्यज्यतामेषा श्रद्धत्स्व वदतो मम ४०

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चतुस्त्रिंशः सर्गः ॥३४॥

पञ्चत्रिंशः सर्गः । [ १४०९ ]

तां तु रामकथां श्रुत्वा वैदेही वानरर्षभात् ।

---

राजा जो सुग्रीव वानर त्यानेही तुला कुशल प्रश्न केला आहे. सुग्रीव आणि लक्ष्मण यासह राम नित्य तुझी आठवण काढीत असतो. हे वैदेही, राक्षसस्त्रियांच्या तावडीत सापडून तूं जिवंत राहिली आहेस, ही मोठ्या भाग्याचीच गोष्ट समजली पाहिजे. ( ३२-३६ )

आता राम, महारथी लक्ष्मण आणि अतुलसामर्थ्यवान् सुग्रीव हे लवकरच कोट्यवधि वानरांसह येथे आलेले तुझ्या दृष्टीस पडतील. मी हनुमान् नावाचा वानर असून सुग्रीवाचा मंत्री आहें आणि महासागराचें उल्लंघन करून या लंका-नगरींत आलों आहें. इतकेंच नव्हे तर, स्वपराक्रमाच्या जोरावर त्या दुरात्म्या रावणाच्या मस्तकावर पाय देऊन मी तुझें दर्शन घेण्याकरितां तुझ्याकडे आलों आहें. यासाठीं हे देवी, तूं मनांतील सर्व संशय सोडून दे आणि मी सांगत आहें, यावर विश्वास ठेव. माझ्यासंबंधीं तुला जी शंका आली, त्याप्रमाणें मी नाहीं, हें तूं पक्कें समज." ( ३७-४० )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदर-काडांपैकीं चौतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३४ ॥

उवाच वचनं सान्त्वमिदं मधुरया गिरा १
क्व ते रामेण संसर्गः कथं जानासि लक्ष्मणम् ।
वानराणां नराणां च कथमासीत्समागमः २
यानि रामस्य चिह्नानि लक्ष्मणस्य च वानर ।
तानि भूयः समाचक्ष्व न मां शोकः समाविशेत् ३
कीदृशं तस्य संस्थानं रूपं तस्य च कीदृशम् ।
कथमूरू कथं बाहू लक्ष्मणस्य च शंस मे ४
एवमुक्तस्तु वैदेह्या हनूमान्मारुतात्मजः ।
ततो रामं यथातत्त्वमाख्यातुमुपचक्रमे ५
जानन्ती बत दिष्ट्या मां वैदेहि परिपृच्छसि ।
भर्तुः कमलपत्राक्षि संस्थानं लक्ष्मणस्य च ६
यानि रामस्य चिह्नानि लक्ष्मणस्य च यानि वै ।
लक्षितानि विशालाक्षि वदतः शृणु तानि मे ७
रामः कमलपत्राक्षः पूर्णचन्द्रनिभाननः ।

वानरश्रेष्ठ हनुमानाच्या मुखातून रामकथा ऐकल्यानंतर विदेहराजकन्या सीता मधुर व सौम्य शब्दांनी त्याला म्हणाली, " रामाची व तुझी गाठ कोठे पडली ? लक्ष्मण तुला कशावरून समजला आणि व नर व मनुष्य यांची गट्टी कशी जमली, हे तू मला सांग हे वानरा, राम आणि लक्ष्मण यांची जी लक्षणें आहेत, तीं तू मला पुन नीट सांग, म्हणजे मला त्यांचेविषयींचा शोक ग्रासून टाकणार नाही. सारांश, त्या रामाच्या शरीराची ठेवण कशी आहे, त्याचें रूप कसें आहे, त्याच्या मांड्या कशा आहेत, हात कसे आहेत आणि त्याचप्रमाणे लक्ष्मणाच्या अंगाची ठेवण वगैरे कशी आहे, हें तूं मला सविस्तर सांग " ( १-४ )

याप्रमाणे सीतेने सांगितल्यावर तो वायुपुत्र हनुमान्, रामाचें जसें होतें, तसें वर्णन करूं लागला. तो म्हणाला, " हे वैदेही, मी रामदूत आहें, असें सुदैवानें जाणून ज्या अर्थी हे कमलनयने, तूं मला भर्त्याची व लक्ष्मणाच्या शरीराची ठेवण वगैरे विचारीत आहेस, त्या अर्थी हे विशालनयने सीते, रामाचीं व लक्ष्मणाचीं जा चिन्हें माझ्या दृष्टीस पडलीं, तीं मी तुला सांगतों. तीं तू ऐक हे

रूपदाक्षिण्यसंपन्नः प्रसूतो जनकात्मजे ८
तेजसादित्यसंकाशः क्षमया पृथिवीसमः ।
बृहस्पतिसमो बुद्ध्या यशसा वासवोपमः ९
रक्षिता जीवलोकस्य स्वजनस्य च रक्षिता ।
रक्षिता स्वस्य वृत्तस्य धर्मस्य च परंतपः १०
रामो भामिनि लोकस्य चातुर्वर्ण्यस्य रक्षिता ।
मर्यादानां च लोकस्य कर्ता कारयिता च सः ११
अर्चिष्मानर्चितोऽत्यर्थं ब्रह्मचर्यव्रते स्थितः ।
साधूनामुपकारज्ञः प्रचारज्ञश्च कर्मणाम् १२
राजनीत्यां विनीतश्च ब्राह्मणानामुपासकः ।
ज्ञानवाञ्शीलसंपन्नो विनीतश्च परंतपः १३
यजुर्वेदविनीतश्च वेदविद्भिः सुपूजितः ।
धनुर्वेदे च वेदे च वेदाङ्गेषु च निष्ठितः १४

जनककन्ये, रामाचे नेत्र कमलपत्राप्रमाणे आहेत, त्याचें मुख पूर्णचंद्राप्रमाणे आल्हादकारक आहे आणि तो जातीचाच रूपवान् व सरळ आहे, तेजाने तो सूर्याची बरोबरी करणारा आहे, क्षमेने तो पृथ्वीसारखा आहे, बुद्धीने तो बृहस्पतीची बरोबरी करणारा आहे आणि कीर्तीने फक्त इंद्राशींच त्याची तुलना होणारी आहे (८-९)

तो शत्रुतापन राम जीवलोक, स्वजन, स्वत चें वर्तन आणि धर्म यांचें रक्षण करणारा असून, हे सीते, जगतांतील चातुर्वर्ण्याचेंही तो राम परिपालन करणारा आहे आणि त्याचप्रमाणे जगतामध्ये तो मर्यादा घालून देणारा असून, त्या मर्यादेप्रमाणे तो लोकांना वागविणाराही आहे तो तेजस्वी आहे, लोकांना तो अत्यंत पूज्य आहे, तो ब्रह्मचर्यव्रताने राहिलेला आहे; साधूंचा उपकार जाणणारा आहे आणि कर्मानुष्ठानही त्याला अवगत आहे. राजनीतीमध्ये तो निपुण आहे, ब्राह्मणाचा उपासक आहे; ज्ञानवान् आहे, सुशील आहे आणि विनयसंपन्न असून, शत्रूना ताप देणारा आहे. यजुर्वेदाचें त्याने अध्ययन केलेलें आहे; वेदवेत्त्यांना तो फारच मान्य आहे आणि धनुर्वेद, वेद व वेदांगें यामध्येही तो निष्णात आहे. (१०-१४)

विपुलांसो महाबाहुः कम्बुग्रीवः शुभाननः ।
गूढजत्रुः सुताम्राक्षो रामो नाम जनैः श्रुतः १५
दुन्दुभिस्वननिर्घोषः स्निग्धवर्णः प्रतापवान् ।
समश्च सुविभक्ताङ्गो वर्णं श्यामं समाश्रितः १६
त्रिस्थिरस्त्रिप्रलम्बश्च त्रिसमस्त्रिषु चोन्नतः ।
त्रिताम्रस्त्रिषु च स्निग्धो गम्भीरस्त्रिषु नित्यशः १७
त्रिवलीमांस्त्र्यवनतश्चतुर्व्यङ्गस्त्रिशीर्षवान् ।
चतुष्कलश्चतुर्लेखश्चतुष्किष्कुश्चतुःसमः १८
चतुर्दशसमद्वन्द्वश्चतुर्दंष्ट्रश्चतुर्गतिः ।

त्याचे स्कंध विशाल आहेत, बाहु मोठे आहेत, कंठ शंखाप्रमाणे तीन रेषांनी युक्त आहे, मुख उत्कृष्ट आहे, त्याचे स्कंधसांधे बाहेर दिसत नाहीत, नेत्र चांगले ताम्रवर्णाचे आहेत आणि लोकांमध्ये तो राम म्हणून प्रसिद्ध आहे. दुंदुभीप्रमाणे त्याचा स्वर गंभीर आहे, वर्ण तुळतुळीत आहे, तो प्रतापी आहे, त्याच्या अवयवाची ठेवण सारखी आहे, सर्व अवयव चांगले स्पष्ट आहेत आणि त्याच्या शरीराचा वर्ण श्याम आहे, (माड्या, मनगट आणि मूठ हीं) तीन्हीं त्याचीं स्थिर आहेत, (भिवया, अंडकोश आणि हात हे) त्याचे तीन अवयव लांब आहेत; (केशाग्र, वृषण आणि गुडघे) हीं त्याचीं तीन सपाट आहेत, (नाभीजवळचा प्रदेश, कुशी आणि वक्षस्थल) हीं तीन उन्नत आहेत, (नेत्रप्रांत, नखें आणि हातापायांचे तळवे) या तीन ठिकाणीं तो ताम्रवर्ण आहे; (पायांवरील रेषा, मस्तकावरील केश आणि लिंगमणि) या तीन ठिकाणीं तो तुळतुळीत आहे; (स्वर, गति आणि नाभि) हीं तीन गंभीर आहेत. (१५-१७)

(उदर आणि कंठ यांचे ठिकाणीं) त्याला तीन तीन वळकट्या आहेत, (पायाच्या तळव्याचा मध्यभाग, पायांवरील रेषा आणि स्तनाचीं अग्रें) हीं त्याचीं तीन खोलगट आहेत, (मान, जननेंद्रिय, पाठ आणि पोटऱ्या) हे त्याचे चार अवयव आखूड आहेत; त्याच्या मस्तकावर तीन भोवरे आहेत, त्याच्या अंगुष्ठमूलाचे ठिकाणीं चार रेषा आहेत, त्याची उंची चार हात आहे; (हात, गुडघे, माड्या आणि गाल) हे चारी युग्म-अवयव त्याचे एकसारखे आहेत; भिवया, (नाकपुड्या,

महोष्ठहनुनासश्च पञ्चस्निग्धोऽष्टवंशवान्‌ १९
दशपद्मो दशबृहत्त्रिभिर्व्याप्तो द्विशुक्लवान्‌।
षडुन्नतो नवतनुस्त्रिभिर्व्याप्नोति राघवः २०
सत्यधर्मरतः श्रीमान्संग्रहानुग्रहे रतः।
देशकालविभागज्ञः सर्वलोकप्रियंवदः २१
भ्राता चास्य च द्वैमात्रः सौमित्रिरमितप्रभः।
अनुरागेण रूपेण गुणैश्चापि तथाविधः २२

नेत्र, कर्ण, ओष्ठ, स्तनाग्रे, कोपरे, मनगटे, गुडघे, वृषण, कमरेच्या बाजवा, हात, पाय आणि कुले) त्याचे हे चवदा युग्म-अवयव एकसारखे आहेत, त्याच्या प्रत्येक बाजूला बरोबर चार चार दाढा आहेत, (सिंह, व्याघ्र, गज आणि वृषभ) या चार पशूंप्रमाणे त्याची चालण्याची ढब आहे, त्याचे ओठ, हनुवटी आणि नासिका हीं प्रशस्त आहेत, त्याची ( जीभ, मुख, नखें, केस आणि त्वचा ) हीं पांची स्निग्ध आहेत; (हात, बोटें, मांड्या आणि पोटऱ्या) हे आठ अवयव त्याचे कळकाप्रमाणें सरळ आहेत. ( १८-१९ )

( मुख, नेत्र, चेहेरा, जीभ, ओठ, ताळू, स्तन, नखें, हात आणि पाय ) या त्याच्या दहा ठिकाणीं कमलासारिख्या आकृति आहेत ( वक्ष:स्थल, मस्तक, ललाट, मान, हात, रादे, नाभी, पाय, पाठ आणि कान) हे दहा अवयव त्याचे मोठे आहेत, (श्री, यश आणि तेज) या तिहींनी तो व्याप्त आहे, मातृवंश आणि पितृवंश ही दोन त्याचीं शुद्ध आहेत; (खाका, कुशी, वक्ष:स्थल, नासिका, स्कंध आणि ललाट) हीं सहा त्याचीं उन्नत आहेत; (त्याच्या बोटाचीं पेरें, केश, रोम, नखें, त्वचा, जननेंद्रिय, श्मश्रु, दृष्टि आणि बुद्धि ) हीं नऊ सूक्ष्म आहेत आणि धर्म, अर्थ व काम या तिहींचेंही तो राम पालन करणारा आहे. सत्य धर्माविषयीं तो तत्पर आहे; श्रीमान् आहे; निग्रहानुग्रहाविषयीं तो दक्ष आहे; देशकालवर्तमान जाणणारा आहे आणि सर्व लोकांशीं प्रिय भाषण करणारा आहे (२०-२१)

याचा अतुलतेजस्वी सुमित्रापुत्र लक्ष्मण भ्राता आहे, तो कौसल्या व सुमित्रा या दोन्हीही आपल्या माता समजत आहे आणि रूप, प्रजाजनाचे ठिकाणीं प्रेम

स सुवर्णच्छविः श्रीमान्रामः श्यामो महायशाः २३
तावुभौ नरशार्दूलौ त्वद्दर्शनकृतोत्सवौ।
विचिन्वन्तौ महीं कृत्स्नामस्माभिः सह संगतौ २४
त्वामेव मार्गमाणौ तौ विचरन्तौ वसुंधराम्।
ददर्शतुर्मृगपतिं पूर्वजेनावरोपितम् २५
ऋष्यमूकस्य मूले तु बहुपादपसंकुले।
भ्रातुर्भयार्तमासीनं सुग्रीवं प्रियदर्शनम् २६
वयं च हरिराजं तं सुग्रीवं सत्यसंगरम्।
परिचर्यामहे राज्यात्पूर्वजेनावरोपितम् २७
ततस्तौ चीरवसनौ धनुःप्रवरपाणिनौ।
स तौ दृष्ट्वा नरव्याघ्रौ धन्विनौ वानरर्षभः २८
अभिप्लुतो गिरेस्तस्य शिखरं भयमोहितः २९

---

व इतरही गुण याजी तो रामासारखाच आहे. महायशस्वी आणि वैभवशाली राम श्यामवर्ण असून, त्याची कांति सुवर्णासारखी आहे. ते उभयता पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण तुझ्या दर्शनाकरितां उत्सुक झालेले आहेत आणि आम्हां सुग्रीव-मंत्र्यांशीं त्यानी जूट करून ते सर्व पृथ्वी तुजसाठीं शोधीत आहेत. ते उभयता राजपुत्र तुला पाहण्याकरिता–पृथ्वीवर हिंडत होते, त्या वेळीं ज्येष्ठ भ्रात्याने राज्यातून हाकलून लावलेल्या वानराधिपति सुग्रीवाची व त्याची गांठ पडली. त्या वेळीं आल्हादकारक मुद्रेचा परंतु भ्रात्याच्या भयाने काळवंडलेला तो सुग्रीव, अनेक तऱ्हेच्या वृक्षानी गजबजून गेलेल्या ऋष्यमूक पर्वताच्या पायथ्याशीं बसला होता. (२२-२६)

ज्येष्ठ भ्रात्याने राज्यावरून हुसकून लाविलेल्या त्या सत्यप्रतिज्ञ वानरराज सुग्रीवाची आम्ही सेवा करीत असतों. मोठमोठीं धनुष्यें ज्यानी हातामध्ये घेतलेलीं आहेत व ज्यानी वल्कलें परिधान केलेलीं आहेत, अशा त्या पुरुषश्रेष्ठ धनुर्धर रामलक्ष्मणाना पाहताच तो वानरश्रेष्ठ सुग्रीव भीतीने अगदी गांगरून गेला आणि त्याने त्या पर्वताचे शिखरावर उड्डाण केलें. नंतर त्या शिखरावर बसलेल्या त्या वानरराज सुग्रीवाने रामाकडे मला लागलीच पाठवून दिलें. तेव्हा सुग्रीवाच्या

ततः स शिखरे तस्मिन्वानरेन्द्रो व्यवस्थितः।
तयोः समीपं मामेव प्रेषयामास सत्वरम् ३०
तावहं पुरुषव्याघ्रौ सुग्रीववचनात्प्रभू।
रूपलक्षणसंपन्नौ कृताञ्जलिरुपस्थितः ३१
तौ परिज्ञाततत्त्वार्थौ मया प्रीतिसमन्वितौ।
पृष्ठमारोप्य तं देशं प्रापितौ पुरुषर्षभौ ३२
निवेदितौ च तत्त्वेन सुग्रीवाय महात्मने।
तयोरन्योन्यसंभाषाद्भृशं प्रीतिरजायत ३३
तत्र तौ कीर्तिसंपन्नौ हरीश्वरनरेश्वरौ।
परस्परकृताश्वासौ कथया पूर्ववृत्तया ३४
तं ततः सान्त्वयामास सुग्रीवं लक्ष्मणाग्रजः।
स्त्रीहेतोर्वालिना भ्रात्रा निरस्तं पुरुतेजसा ३५
ततस्त्वन्नाशजं शोकं रामस्याक्लिष्टकर्मणः।
लक्ष्मणो वानरेन्द्राय सुग्रीवाय न्यवेदयत् ३६
स श्रुत्वा वानरेन्द्रस्तु लक्ष्मणेनेरितं वचः।

---

आज्ञेवरून मी त्या रूपवान्, सुलक्षणी व समर्थ पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मणाकडे गेलों आणि हात जोडून उभा राहिलो त्याचा मुख्य उद्देश मला समजून आल्यानंतर त्या परस्परावर प्रेम करणाऱ्या पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मणाना मी पाठीवर बसवून, सुग्रीव बसला होता, त्या ठिकाणीं घेऊन गेलों ( २७-३१ )

तेथे गेल्यानंतर महात्म्या सुग्रीवाला मी रामलक्ष्मणाचा खराखरा वृत्तांत निवेदन केला, तेव्हा त्या दोघाचें समाषण सुरू होऊन, सुग्रीव व रामचंद्र यांच्या-मध्ये अतिशयच प्रेम उत्पन्न झालें आपआपला पूर्ववृत्तांत त्या कीर्तिसंपन्न वानराधिपति व प्रजाधिपति रामसुग्रीवानी एकमेकाला कळवून, परस्परानी पर-स्पराला मैत्रीचें आश्वासन दिलें प्रथमत स्त्रीकरता महातेजस्वी वालि नावाच्या बधूने हाकून लावलेल्या त्या सुग्रीवाचें लक्ष्मणाग्रज रामचंद्राने सात्वन केलें, आणि नतर सरळ रीतीने वागणाऱ्या रामाला, तू नाहीशी झाल्यामुळे होत असलेलें दु ख लक्ष्मणाने वानरराज सुग्रीवाला सांगितलें लक्ष्मणाच्या तोंडचें भाषण ऐकतां-

तदासीन्निष्प्रभोऽत्यर्थं ग्रहग्रस्त इवांशुमान् ॥ ३७
ततस्त्वद्गात्रशोभीनि रक्षसा ह्रियमाणया ।
यान्याभरणजालानि पातितानि महीतले ॥ ३८
तानि सर्वाणि रामाय आनीय हरियूथपाः ।
संहृष्टा दर्शयामासुर्गतिं तु न विदुस्तव ॥ ३९
तानि रामाय दत्तानि मयैवोपहृतानि च ।
स्वनवन्त्यवकीर्णानि तस्मिन्विहतचेतसि ॥ ४०
तान्यङ्के दर्शनीयानि कृत्वा बहुविधं तदा ।
तेन देवप्रकाशेन देवेन परिदेवितम् ॥ ४१
प्रादीपयद्दाशरथेस्तदा शोकहुताशनम् ।
शायितं च चिरं तेन दुःखार्तेन महात्मना ॥ ४२
मयापि विविधैर्वाक्यैः कृच्छ्रादुत्थापितः पुनः ॥ ४३
तानि दृष्ट्वा महार्हाणि दर्शयित्वा मुहुर्मुहुः ।
राघवः सहसौमित्रिः सुग्रीवे संन्यवेशयत् ॥ ४४
स तवादर्शनादार्ये राघवः परितप्यते ।

---

क्षणीं तो वानराधिपति सुग्रीव, ग्रहण लागलेल्या सूर्याप्रमाणें अतिशय निस्तेज झाला. नंतर राक्षस तुला घेऊन चालला असतां तुझ्या शरीराला शोभा आणणारे जे अनेक अलंकार भूमीवर पडले होते, ते सर्व आणून वानरसेनाधिपतींनीं रामास आनंदानें दाखविले; परंतु तूं कोणत्या दिशेस गेलीस, हें त्यांना समजलें नाहीं. ( ३२-३९ )

मींच प्रथम तेथें आणलेले ते ध्वनियुक्त अलंकार रामाला दिले; पण ते घेतांक्षणींच त्याला मूर्छा आली आणि नंतर तीं प्रेक्षणीय भूषणें मांडीवर तशींच ठेवून, त्या देवावतारी रामराजानें नाना प्रकारानें शोक केला. सारांश, दाशरथी रामाचा शोकाग्नि त्या वेळीं फारच भडकला आणि दुःखाकुल झालेला तो महात्मा राम पुष्कळ वेळपर्यंत भूमीवर निपचित पडला, परंतु नाना प्रकारच्या गोष्टी सांगून मोठ्या कष्टानें मी त्याला फिरून उठविलें. नंतर ते महामूल्यवान् भूषणसमुदाय वारंवार सुग्रीवाला दाखवून, लक्ष्मणाबरोबर रामानें ते सुग्रीवाकडेच ठेवले.

महता ज्वलता नित्यमग्निनेवाग्निपर्वतः ४५
त्वत्कृते तमनिद्रा च शोकश्चिन्ता च राघवम् ।
तापयन्ति महात्मानमग्न्यगारमिवाग्नयः ४६
तवादर्शनशोकेन राघवः परिचाल्यते ।
महता भूमिकम्पेन महानिव शिलोच्चयः ४७
काननानि सुरम्याणि नदीप्रस्रवणानि च ।
चरन्न रतिमाप्नोति त्वामपश्यन्नृपात्मजे ४८
स त्वां मनुजशार्दूलः क्षिप्रं प्राप्स्यति राघवः ।
समित्रबान्धवं हत्वा रावणं जनकात्मजे ४९
सहितौ रामसुग्रीवावुभावकुरुतां तदा ।
समयं वालिनं हन्तुं तव चान्वेषणं प्रति ५०
ततस्ताभ्यां कुमाराभ्यां वीराभ्यां स हरीश्वरः ।
किष्किन्धां समुपागम्य वाली युद्धे निपातितः ५१
ततो निहत्य तरसा रामो वालिनमाहवे ।

असो हे साध्वी सीते, तूं दृष्टिआड झाल्यामुळे रघुवंशज राम ज्वालामुखी पर्वतातील मोठ्या पेटलेल्या अग्नीने जसा काही एकसारखा जळत राहिला आहे अग्नि ज्याप्रमाणे होमशाला सारखी प्रदीप्त ठेवीत असतो, त्याप्रमाणे महात्म्या राघवाला तुझ्याबद्दलची चिंता, चिंता आणि जागरण ही ताप देत आहेत मोठ्या भूकंपाने प्रचंड पर्वतही कंपित होऊ लागावा, त्याप्रमाणे तू दृष्टिआड झाल्यामुळे उत्पन्न झालेल्या शोकाने राम कंपित होत आहे. हे राजकन्ये, अतिरम्य वनातून आणि नदीप्रवाहाच्या बाजूने राम संचार करीत असला, तरी त्याच्या मनाला बरें वाटत नाही ( ४०—४८ )

हे जनककन्ये, तो पुरुषश्रेष्ठ राम मित्र आणि बांधव यांच सहायाने रावणाचा वध करून तुला लौकरच प्राप्त करून घेईल एकमेकांशीं मैत्री जोडलेल्या त्या उभयता रामसुग्रीवानी वालीचा वध करण्याची आणि तुझा शोध करण्याची एकाच वेळीं प्रतिज्ञा केली व तदनंतर तो वानरराज सुग्रीव त्या वीर कुमारासह वर्तमान किष्किंधा नगरीला आल्यावर तेथे वालीचा युद्धामध्ये वध झाला. सारांश,

सर्वर्क्षहरिसङ्घानां सुग्रीवमकरोत्पतिम् ५२
रामसुग्रीवयोरैक्यं देव्येवं समजायत ।
हनूमन्तं च मां विद्धि तयोर्दूतमुपागतम् ५३
स्वं राज्यं प्राप्य सुग्रीवः स्वानानीय महाकपीन् ।
त्वदर्थं प्रेषयामास दिशो दश महाबलान् ५४
आदिष्टा वानरेन्द्रेण सुग्रीवेण महौजसः ।
अद्रिराजप्रतीकाशाः सर्वतः प्रस्थिता महीम् ५५
ततस्ते मार्गमाणा वै सुग्रीववचनातुराः ।
चरन्ति वसुधां कृत्स्नां वयमन्ये च वानराः ५६
अङ्गदो नाम लक्ष्मीवान्वालिसूनुर्महाबलः ।
प्रस्थितः कपिशार्दूलस्त्रिभागबलसंवृतः ५७
तेषां नो विप्रणष्टानां विन्ध्ये पर्वतसत्तमे ।
भृशं शोकपरीतानामहोरात्रगणा गताः ५८
ते वयं कार्यनैराश्यात्कालस्यातिक्रमेण च ।

---

युद्धामध्ये वालीचा स्वपराक्रमानें वध करून, रामानें सुग्रीवाला सर्व ऋक्ष आणि वानर यांच्या जमातींचें आधिपत्य दिलें हे देवी, याप्रमाणें, राम आणि सुग्रीव यांची मैत्री जुळली आहे आणि मी त्यांचा दूत हनुमान् येथें आलों आहें, हें तूं समजून घे. ( ४९-५३ )

स्वराज्य प्राप्त झाल्यानंतर सुग्रीवानें महाबलाढ्य महाकपि बोलावून आणिले आणि तुझ्या शोधासाठीं त्यांना चोहोंकडे पाठवून दिलें. वानरराज सुग्रीवाची आज्ञा ऐकून महापर्वताची बरोबरी करणारे ते महाबलाढ्य वानर चोहोंकडे पृथ्वीवर तुझा शोध करण्याकरितां बाहेर पडले. सारांश, सुग्रीवाच्या आज्ञेची भीति बाळगून आम्ही व इतर असे ते सर्वही वानर सर्व पृथ्वीवर हिंडूं लागले. ( ५४-५६ )

वैभवशाली आणि महाबलाढ्य वानरश्रेष्ठ वालिपुत्र अंगद एकतृतीयांश सेना बरोबर घेऊन निघाला; परंतु विंध्यनावाच्या उंच पर्वतावर आम्ही जेव्हा विवरामध्यें गडप होऊन गेलों, तेव्हां आमच्या कित्येक रात्री व दिवस तेथेंच अत्यंत शोकामध्येंच गेले आणि शेवटीं कार्याविषयीं निराश होऊन व तुझा शोध

भयाच्च कपिराजस्य प्राणांस्त्यक्तुमुपस्थिताः ५९
विचित्य गिरिदुर्गाणि नदीप्रस्रवणानि च ।
अनासाद्य पदं देव्याः प्राणांस्त्यक्तुं व्यवस्थिताः ॥
ततस्तस्य गिरेर्मूर्ध्नि वयं प्रायमुपास्महे ६०
दृष्ट्वा प्रायोपविष्टांश्च सर्वान्वानरपुङ्गवान् ।
भृशं शोकार्णवे मग्नः पर्यदेवयदङ्गदः ६१
तव नाशं च वैदेहि वालिनश्च तथा वधम् ।
प्रायोपवेशमस्माकं मरणं च जटायुषः ६२
तेषां नः स्वामिसंदेशान्निराशानां मुमूर्षताम् ।
कार्यहेतोरिहायातः शकुनिर्वीर्यवान्महान् ६३
गृध्रराजस्य सोदर्यः संपातिर्नाम गृध्रराट् ।
श्रुत्वा भ्रातृवधं कोपादिदं वचनमब्रवीत् ६४
यवीयान्केन मे भ्राता हतः क्व च निपातितः ।
एतदाख्यातुमिच्छामि भवद्भिर्वानरोत्तमाः ६५

लावून परत फिरण्याचे कालातिक्रमण झाल्यामुळे, वानरराज सुग्रीवाला भिऊन जाऊन, प्राणत्याग करण्याकरिता आम्ही उद्युक्त झालों. सारांश, पर्वतावरील दुर्गम प्रदेश आणि नद्यांचे प्रवाह शोधले असतांही, तुझा मागमूससुद्धा जेव्हा लागला नाही, तेव्हा आम्ही प्राणत्याग करण्याचा निश्चय कायम केला, व त्या विंध्यपर्वताच्या माथ्यावर आम्ही प्रायोपवेशन करीत बसलों. तेव्हा सर्व वानरश्रेष्ठ प्रायोपवेशनार्थ बसलेले पाहून अंगद शोकसागरामध्ये तर अतिशय बुडून गेला आणि हे वैदेहि, वालीचा वध, तुझा तपास न लागणे, आमचें प्रायोपवेशन व जटायूचें मरण याबद्दल तो विलाप करूं लागला. (५७–६२)

याप्रमाणे आमचे प्रभूची आज्ञा झाली असता, कालातिक्रमण होऊनही कार्य शेवटास न गेल्यामुळे आम्ही निराश होऊन मरणाच्या दारी ठाण देऊन बसलों होतों, तोंच एक मोठा बलवान् पक्षी तेथे आला, आणि गृध्रराज जटायूचा बंधु तो संपातिनामक गृध्रराज, आपल्या भावाचा वध झाल्याचें ऐकून, रागारागाने म्हणाला, " हे वानरश्रेष्ठहो, माझ्या कनिष्ठ बंधूचा कोणी वध केला आणि कोठे

अङ्गदोऽकथयत्तस्य जनस्थाने महद्वधम् ।
रक्षसा भीमरूपेण त्वामुद्दिश्य यथार्थतः    ६६
जटायोस्तु वधं श्रुत्वा दुःखितः सोऽरुणात्मजः ।
त्वामाह स वरारोहे वसन्तीं रावणालये    ६७
तस्य तद्वचनं श्रुत्वा संपातेः प्रीतिवर्धनम् ।
अङ्गदप्रमुखाः सर्वे ततः प्रस्थापिता वयम्    ६८
विन्ध्यादुत्थाय संप्राप्ताः सागरस्यान्तमुत्तमम् ।
त्वद्दर्शने कृतोत्साहा हृष्टाः पुष्टाः प्लवङ्गमाः    ६९
अङ्गदप्रमुखाः सर्वे वेलोपान्तमुपागताः ।
चिन्तां जग्मुः पुनर्भीमां त्वद्दर्शनसमुत्सुकाः    ७०
अथाहं हरिसैन्यस्य सागरं दृश्य सीदतः ।
व्यवधूय भयं तीव्रं योजनानां शतं प्लुतः    ७१
लङ्का चापि मया रात्रौ प्रविष्टा राक्षसाकुला ।

---

केला, हें तुमच्या तोंडून ऐकण्याची माझी इच्छा आहे " याप्रमाणे त्याने विचारल्यावर तुझ्याकरिता त्या भयंकर रूप धारण करणाऱ्या राक्षसाने ( रावणाने ) जनस्थानामध्ये त्या महात्म्या जटायूचा वध केल्याचें समग्र वर्तमान अंगदानें त्याला सांगितलें जटायूचा वध झाल्याचें ऐकून, दुःखित झालेल्या अरुणपुत्रानें, हे सुंदरी, रावणाच्या गृहामध्ये तू वास्तव्य करीत आहेस, असें आम्हाला सांगितलें संपातीचें तें आल्हादकारक भाषण ऐकताक्षणीं अंगदप्रभृति, आम्ही सर्व जण तेथून निघालों ( ६३-६८ )

तुझ्या दर्शनाविषयी मनात उत्साह उत्पन्न झाल्यामुळे आमची शरीरें पुन टवटवीत होऊन आम्हास आनंद झाला आणि विंध्यपर्वतापासून उठून आम्ही सर्व वानर समुद्राच्या उत्कृष्ट तीराशीं आलों तुझ्या दर्शनाकरिता उत्सुक झालेले अंगदप्रभृति सर्व वानर समुद्राच्या तीराशीं आल्यावर त्यांच्या मनात पुन एक भयंकर चिंता उत्पन्न झाली तेव्हा तो अफाट सागर अवलोकन केल्यावर धीर सोडू लागलेल्या त्या वानरसैन्याची मोठी भीति दूर करून, मी शंभर योजनें उड्डाण केलें व राक्षसांनी व्याप्त झालेल्या या लंकेमध्ये मी रात्रींच प्रवेश केला;

रावणश्च मया दृष्टस्त्वं च शोकनिपीडिता ७२
एतत्ते सर्वमाख्यातं यथावृत्तमनिन्दिते ॥
अभिभाषस्व मां देवि दूतो दाशरथेरहम् ७३
तन्मां रामकृतोद्योगं त्वन्निमित्तमिहागतम् ।
सुग्रीवसचिवं देवि बुद्ध्यस्व पवनात्मजम् ७४
कुशली तव काकुत्स्थः सर्वशस्त्रभृतां वरः ।
गुरोराराधने युक्तो लक्ष्मणः शुभलक्षणः ७५
तस्य वीर्यवतो देवि भर्तुस्तव हिते रतः ।
अहमेकस्तु संप्राप्तः सुग्रीववचनादिह ७६
मयेयमसहायेन चरता कामरूपिणा ।
दक्षिणा दिगनुक्रान्ता त्वन्मार्गविचयैषिणा ७७
दिष्ट्याहं हरिसैन्यानां त्वन्नाशमनुशोचताम् ।
अपनेष्यामि संतापं तवाभिगमशासनात् ७८
दिष्ट्या हि न मम व्यर्थं सागरस्येह लङ्घनम् ।

रावण हा माझ्या दृष्टीस पडलेला आहे व शोकाकुल झालेल्या तुलाही मी पाहिलें हे निर्दोष देवी, हें सर्व इत्थंभूत वृत्त मी तुला सांगितलें आहे. यास्तव, मी दाशरथि रामाचा दूत असल्यामुळें, तू माझ्याशीं मोकळेपणानें संभाषण कर (६९-७३)

हे राजपत्नी, रामकार्याकरितां उद्युक्त होऊन मी तुझ्याकरितां येथें आलों आहें मी वायुपुत्र हनुमान् सुग्रीवाचा मंत्री आहें, हें तू समज. सर्व शस्त्रें धारण करणाऱ्यामध्ये श्रेष्ठ असा तुझा ककुत्स्थकुलोत्पन्न राम खुशाल आहे आणि त्या ज्येष्ठ बंधूच्या सेवेमध्ये सदैव तत्पर असलेला सुलक्षणी लक्ष्मणही सुखरूप आहे. हे राजपत्नी, त्या तुझ्या बलवान् भर्त्याचें हित करण्यासाठीं आम्ही झटणारे असून, मी एकटा सुग्रीवाच्या आज्ञेवरून येथें आलों आहें. बरोबर कोणाही सोबती नसतांना मला योग्य वाटलें तें तें रूप धारण करून, तुझा शोध लावण्याच्या उद्देशानें ही दक्षिण दिशा उल्लंघिली, आतां तुझा शोध लागत नाहीं, असें वाटून, शोक करीत बसलेल्या वानरसेनेचें दुःख, सुदैवानें तुझा शोध लागला असल्याची वार्ता कळवून, मी नाहींसें करीन (७४-७८)

प्राप्स्याम्यहमिदं देवि त्वद्दर्शनकृतं यशः ७९
राघवश्च महावीर्यः क्षिप्रं त्वामभिपत्स्यते ।
सपुत्रबान्धवं हत्वा रावणं राक्षसाधिपम् ८०
माल्यवान्नाम वैदेहि गिरीणामुत्तमो गिरिः ।
ततो गच्छति गोकर्णं पर्वतं केसरी हरिः ८१
स च देवर्षिभिर्दिष्टः पिता मम महाकपिः ।
तीर्थे नदीपतेः पुण्ये शम्बसादनमुद्धरन् ८२
यस्याहं हरिणः क्षेत्रे जातो वातेन मैथिलि ।
हनूमानिति विख्यातो लोके स्वेनैव कर्मणा ८३
विश्वासार्थं तु वैदेहि भर्तुरुक्ता मया गुणाः ।
अचिराद्राघवो देवि राघवो नयिता ध्रुवम् ८४
एवं विश्वासिता सीता हेतुभिः शोककर्शिता ।
उपपन्नैरभिज्ञानैर्दूतं तमधिगच्छति ८५

हे देवी, एवढा मोठा समुद्र उल्लंघन करून, माझें येथें येणें व्यर्थ झालें नाही, हें मोठें भाग्यच म्हणावयाचें. आता तुझा शोध लावण्यासंबंधी मला यश संपादतां आलें; आता महावीर्यवान् रघुवंशज राम राक्षसाधिपति रावण त्याचे पुत्र व बांधव यांचा वध करून तुला सत्वरच प्राप्त करून घेईल. हे वैदेहि, पर्वतामध्ये माल्यवान् म्हणून श्रेष्ठ पर्वत आहे. तेथून केसरी म्हणून वानर गोकर्ण पर्वतावर जात होता; कारण त्या माझ्या महाकपि पित्याला शंबसादन नामक असुराचा वध करण्याविषयी देवर्षींनी आज्ञा केली होती आणि त्या आज्ञेप्रमाणें सागराच्या पवित्र तीर्थावर त्याचा वधही केला. हे मैथिली, त्या वानराच्या पत्नीचे पोटीं मी वायूपासून जन्म घेतला आहे आणि स्वपराक्रमानेच मी जगतामध्ये हनुमान् या नावाने विख्यात झालो आहे. हे विदेहराजकन्ये, तुला विश्वास वाटावा, यासाठी मी तुझ्या भर्त्याचे गुण कथन केले. आता, हे राजपत्नि, रघुवंशज राम निःसंशय तुला येथून लवकरच घेऊन जाईल." (७९-८४)

याप्रमाणे विश्वास ठेवण्यास योग्य कारणें देऊन हनुमानाने आपल्याबद्दल सीतेचे ठिकाणीं विश्वास उत्पन्न केला, तेव्हा तेथें शोकाने दुःखी झालेल्या त्या सीतेलाही

अतुलं च गता हर्षं प्रहर्षेण तु जानकी।
नेत्राभ्यां वक्रपक्ष्माभ्यां मुमोचानन्दजं जलम्। ८६
चारु तद्वदनं तस्यास्ताम्रशुक्लायतेक्षणम्।
अशोभत विशालाक्ष्या राहुमुक्त इवोडुराट् ८७
हनूमन्तं कपिं व्यक्तं मन्यते नान्यथेति सा।
अथोवाच हनूमांस्तामुत्तरं प्रियदर्शनाम् ८८
एतत्ते सर्वमाख्यातं समाश्वसिहि मैथिलि।
किं करोमि कथं वा ते रोचते प्रतियाम्यहम् ८९
हतेऽसुरे संयति शम्बसादने कपिप्रवीरेण महर्षिचोदनात्।
ततोऽस्मि वायुप्रभवो हि मैथिलि प्रभावतस्तत्प्रतिमश्च वानरः ९०
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चत्रिंशः सर्गः॥३५॥
[१४९९]

रामलक्ष्मणाच्या चिन्हांची वास्तविक ओळख पटल्यावरून, तो रामदूत असावा, असें वाटलें. इतकेंच नव्हे तर, त्या जानकीला अनुपम हर्ष झाला व वक्र पापण्या असलेल्या तिच्या नेत्रांतून हर्षामुळें आनंदाश्रूही गळूं लागले. विशाल नेत्र असलेल्या सीतेचें आरक्तवर्ण आणि पांढऱ्याशुभ्र वर्णाच्या दीर्घ नयनांनीं युक्त असलेलें मुख हें ग्रहण सुटलेल्या नक्षत्राधिपति चंद्राप्रमाणें शोभूं लागलें आणि हनुमानाविषयीं भलतासलता समज न होता, तो हनुमान् वानरच आहे, अशी तिला पक्की खात्री वाटली. नंतर आल्हाददायक मुद्रा असलेल्या त्या सीतेला हनुमान् म्हणाला, "हे मैथिली! मी सर्व कांहीं तुला सांगितलें आहे; आतां तूं धैर्य धर आणि मी काय करूं, तें सांग. रामाकडे मी परत जाणार आहें; परंतु, हें तुला कसें काय रुचत आहे, तें मला कळूं दे. हे मैथिली! संग्रामामध्यें शंबसादन असुराचा ज्या वानरश्रेष्ठ केसरीनें महर्षींच्या आज्ञेवरून वध केला, तेव्हां महर्षींच्या प्रसादामुळें त्या वायूपासून मी उत्पन्न झालों. मी वानर हनुमान् प्रभावानेंही त्याच्यासारखाच निपजलों आहें." (८५-९०)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडांपैकीं पस्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३५ ॥

षट्त्रिंशः सर्गः ।

भूय एव महातेजा हनूमान्पवनात्मजः ।
अब्रवीत्प्रश्रितं वाक्यं सीताप्रत्ययकारणात् १
वानरोऽहं महाभागे दूतो रामस्य धीमतः ।
रामनामाङ्कितं चेदं पश्य देव्यङ्गुलीयकम् । २
प्रत्ययार्थं तवानीतं तेन दत्तं महात्मना ।
समाश्वसिहि भद्रं ते क्षीणदुःखफला ह्यसि ३
गृहीत्वा प्रेक्षमाणा सा भर्तुः करविभूषितम् ।
भर्तारमिव संप्राप्तं जानकी मुदिताऽभवत् ४
चारु तद्वदनं तस्यास्ताम्रशुक्लायतेक्षणम् ।
बभूव हर्षोदग्रं च राहुमुक्त इवोडुराट् ५
ततः सा ह्रीमती बाला भर्तुः संदेशहर्षिता ।
परितुष्टा प्रियं कृत्वा प्रशशंस महाकपिम् ६
विक्रान्तस्त्वं समर्थस्त्वं प्राज्ञस्त्वं वानरोत्तम ।
येनेदं राक्षसपदं त्वयैकेन प्रधर्षितम् ७

---

महातेजस्वी वायुपुत्र हनुमान् सीतेला आपला विश्वास वाटावा, याकरितां पुनः नम्रपणानें तिला म्हणाला, " हे महाभाग्यवति, मी बुद्धिमान् रामाचा दूत असा वानर आहें. हे राजपत्नी, रामनामानें अंकित अशी ही माझ्यापाशीं असलेली तूं अंगठी पहा. तुला विश्वास पटण्याकरितां त्या महात्म्यानें ही अंगठी मजकडे दिली असून, ती मी तुझ्यासाठीं येथें आणिली आहे. तुझें भलें असो; तूं आतां धैर्य धर. तुझ्या पूर्वसंचित पापाचें दुःखदायक फल आतां संपलें आहे. " भर्त्याचें तें हस्तभूषण हातांत घेऊन ती जानकी पाहूं लागली. तेव्हां जणु कांहीं प्रत्यक्ष भर्त्याचीच गांठ पडल्याप्रमाणें तिला आनंद झाला. ( १-४ )

आरक्त व शुभ्र वर्ण असलेले नेत्र ज्याच्यावर आहेत, असें तें तिचें सुंदर मुख ग्रहण सुटलेल्या नक्षत्राधिपति चंद्राप्रमाणें आल्हादकारक झालें आणि ती अंगठी पाहिल्यानंतर, पतीचा निरोप ऐकून आनंद झालेली ती विनयशील बाला, सीता सर्वस्वी संतुष्ट झाली व आदरपूर्वक त्या महाकपीची प्रशंसा करूं लागली.

शतयोजनविस्तीर्णः सागरो मकरालयः
विक्रमश्लाघनीयेन क्रमता गोष्पदीकृतः ८
नहि त्वां प्राकृतं मन्ये वानरं वानरर्षभ ।
यस्य ते नास्ति संत्रासो रावणादपि संभ्रमः ९
अर्हसे च कपिश्रेष्ठ मया समभिभाषितुम् ।
यद्यसि प्रेषितस्तेन रामेण विदितात्मना १०
प्रेषयिष्यति दुर्धर्षो रामो नह्यपरीक्षितम् ।
पराक्रममविज्ञाय मत्सकाशं विशेषतः ११
दिष्ट्या च कुशली रामो धर्मात्मा सत्यसंगरः ।
लक्ष्मणश्च महातेजाः सुमित्रानन्दवर्धनः १२
कुशली यदि काकुत्स्थः किं न सागरमेखलाम् ।
महीं दहति कोपेन युगान्ताग्निरिवोत्थितः १३
अथवा शक्तिमन्तौ तौ सुराणामपि निग्रहे ।

ती म्हणाली, " हे वानरश्रेष्ठा तू एकट्याने या राक्षसस्थानामध्ये प्रवेश केलास, तेव्हा तू पराक्रमी, समर्थ व बुद्धिमान् आहेस, हे खरें मकरांचें निवासस्थान असलेला हा सागर शंभर योजनें विस्तीर्ण आहे परंतु ज्याला पाहून स्तुति करणे योग्य आहे, असा पराक्रम करून, तू या सागराला गाईच्या पावलाप्रमाणे करून टाकिलें आहेस हे वानरश्रेष्ठा, तुला रावणापासूनही त्रास अथवा उद्वेग प्राप्त झाला नाही, त्या अर्थी तुला मी काही सामान्य वानर समजत नाहीं हे कपिश्रेष्ठा, स्वपराक्रमाने प्रसिद्ध असलेल्या त्या रामाने जर तुला पाठविलें असेल, तर माझ्याशीं भाषण करण्यास तू योग्य आहस. ( ५—१० )

तो अजिंक्य राम परीक्षा केल्यावाचून आणि पराक्रम पाहिल्यावाचून विशेषत माझ्याकडे कोणाला पाठविणार नाहीं. धर्मात्मा सत्यप्रतिज्ञ राम व त्याचप्रमाणे सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणारा महातेजस्वी लक्ष्मण कुशल आहे, हें सुदैवच समजलें पाहिजे, परंतु, ककुत्स्थकुलोत्पन्न राम जर कुशल आहे, तर प्रलयकालीं उत्पन्न झालेल्या अग्नीप्रमाणे तो कोपानेहा समुद्रवलयांकित पृथ्वी दग्ध करून का टाकीत नाही ? ते उभयता रामलक्ष्मण देवांचाही निग्रह कर-

ममैव तु न दुःखानामस्ति मन्ये विपर्ययः १४
कच्चिन्न व्यथते रामः कच्चिन्न परितप्यते ।
उत्तराणि च कार्याणि कुरुते पुरुषोत्तमः १५
कच्चिन्न दीनः संभ्रान्तः कार्येषु च न मुह्यति ।
कच्चित्पुरुषकार्याणि कुरुते नृपतेः सुतः १६
द्विविधं त्रिविधोपायमुपायमपि सेवते ।
विजिगीषुःसुहृत्कच्चिन्मित्रेषु च परंतपः १७
कच्चिन्मित्राणि लभते मित्रैश्चाप्यभिगम्यते ।
कच्चित्कल्याणमित्रश्च मित्रैश्चापि पुरस्कृतः १८
कच्चिदाशास्ति देवानां प्रसादं पार्थिवात्मजः ।
कच्चित्पुरुषकारं च दैवं च प्रतिपद्यते १९
कच्चिन्न विगतस्नेहो विवासान्मयि राघवः ।
कच्चिन्मां व्यसनादस्मान्मोक्षयिष्यति राघवः २०

---

ण्यास समर्थ आहेत, तेव्हा माझ्याच दुःखाचा अंत होण्याची वेळ अद्यापि आली नाही, असें मला वाटतें. राम कष्टी झाला नाही ना ? तो पुरुषश्रेष्ठ माझी सुटका करण्यासाठी पुढले उद्योग करीत आहे ना ? ( ११–१५ )

दीन होऊन व गोंधळून जाऊन काय करावें, हें त्याला सुचेनासें झालें नाही ना ? तो राजपुत्र वीराला योग्य अशींच कृत्यें करीत आहे ना ? सौम्य आणि कडक अशा दोन्ही प्रकारानी धर्म, अर्थ आणि काम हे त्रिविध पुरुषार्थ प्राप्त होण्याचे उपाय आणि त्याचप्रमाणे सामदानादि उपाय यांचें तो अवलंबन करीत आहे ना ? त्याच्या मित्राला विजयाची इच्छा आहे ना ? आणि त्याचप्रमाणे मित्राकरिता पराकाष्ठेचा तापही सहन करीत आहे ना ? तसाच तो मित्र संपादन करीत असून, मित्रही त्याला येऊन मिळत आहेत ना ? तसेंच त्याचे मित्र कल्याणकर्ते असून, ते त्याला मान देत आहेत ना ? तो राजपुत्र देवतांची कृपा संपादन करण्याची इच्छा धरीत आहे ना, आणि दैव व प्रयत्न या दोहोंचेंही तो अवलंबन करीत आहे ना ? ( १६–१९)

मी दूर झाल्यामुळे माझ्याविषयी त्याचें प्रेम नाहींसें तर झालें नाही ना ? व

सुखानामुचितो नित्यमसुखानामनूचितः ।
दुःखमुत्तरमासाद्य कच्चिद्रामो न सीदति २१
कौसल्यायास्तथा कच्चित्सुमित्रायास्तथैव च ।
अभीक्ष्णं श्रूयते कच्चित्कुशलं भरतस्य च २२
मन्निमित्तेन मानार्हः कच्चिच्छोकेन राघवः ।
कच्चिन्नान्यमना रामः कच्चिन्मां तारयिष्यति २३
कच्चिदक्षौहिणीं भीमां भरतो भ्रातृवत्सलः ।
ध्वजिनीं मन्त्रिभिर्गुप्तां प्रेषयिष्यति मत्कृते २४
वानराधिपते श्रीमान्सुग्रीवः कच्चिदेष्यति ।
मत्कृते हरिभिर्वीरैर्वृतो दन्तनखायुधैः २५
कच्चिच्च लक्ष्मणः शूरः सुमित्रानन्दवर्धनः ।
अस्त्रविच्छरजालेन राक्षसान्विधमिष्यति २६
रौद्रेण कच्चिदस्त्रेण रामेण निहतं रणे ।

या संकटापासून तो राघव मला मुक्त करणार आहे ना ? नेहमी सुखाचा उपभोग घेण्यामध्येच ज्याचे आयुष्याचे पहिले दिवस गेले आणि दुःखाचा अनुभव ज्याला मुळीच आलेला नाही, तो राम इतक्या दिवसानंतर दुःख प्राप्त झाल्यामुळे, धैर्यहीन तर झाला नाही ना ? कौसल्या, सुमित्रा आणि त्याचप्रमाणे भरत या सर्वांचेही कुशल वृत्त वारंवार त्याच्या कानावर येत असते ना ? संमानासच पात्र असलेला तो रघुवंशज राम, माझ्याकरिता त्याला जो शोक उत्पन्न झाला आहे, यामुळे संतप्त झाला आहे ना ? माझ्याशिवाय दुसरीकडे त्याचें मन गेलें नाहीं ना ? तो मला या संकटातून तारणारा आहे ना ? भ्रातृवत्सल भरत त्याच्या मन्त्र्यांनी रक्षण केलेली एक अक्षौहिणी भयंकर सेना माझ्याकरिता पाठविणार आहे ना ? हे वानराधिपते हनुमाना, वैभवशाली सुग्रीव, दंत व नखें या आयुधांनी युक्त असलेल्या वानरवीरांनी परिवेष्टित होऊन, माझ्याकरिता इकडे येणार आहे ना ? ( २०–२५ )

सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणारा, अस्त्रवेत्ता, शूर लक्ष्मण बाणसमूहांनी राक्षसांना उडवून देईल ना ? रामाच्या हातून त्याच्या भयंकर अस्त्रांनी सुहृज्जना-

द्रक्ष्याम्यल्पेन कालेन रावणं ससुहृज्जनम् २७
कच्चिन्न तद्धेमसमानवर्णं तस्याननं पद्मसमानगन्धि ।
मया विना शुष्यति शोकदीनं जलक्षये पद्ममिवातपेन २८
धर्मापदेशात्त्यजतः स्वराज्यं मां चाप्यरण्यं नयतः पदातेः ।
नासीद्यथा यस्य न भीर्न शोकः कच्चित्स धैर्यं हृदये करोति २९
न चास्य माता न पिता न चान्यः स्नेहाद्विशिष्टोऽस्ति मया समो वा ।
तावद्ध्यहं दूत जिजीविषेयं यावत्प्रवृत्तिं शृणुयां प्रियस्य ३०
इतीव देवी वचनं महार्थं तं वानरेन्द्रं मधुरार्थमुक्त्वा ।
श्रोतुं पुनस्तस्य वचोऽभिरामं रामार्थयुक्तं विरराम रामा ३१
सीताया वचनं श्रुत्वा मारुतिर्भीमविक्रमः ।
शिरस्यञ्जलिमाधाय वाक्यमुत्तरमब्रवीत् ३२

---

सह रावण वध पावल्याचें दृश्य थोडक्याच वेळांत मी पाहीन ना ? प्रखर उन्हानें सरोवरांतील पाणी आटून गेलें असतां कमल ज्याप्रमाणे वाळून जातें, त्याप्रमाणे सुवर्णासारखें तेजस्वी आणि पद्मासारखें सुगंधी असें त्या रामाचें मुख, माझ्या वियोगामुळे उत्पन्न झालेल्या शोकानें म्लान व शुष्क तर होत चाललें नाही ना ? धर्माकरितां स्वराज्याचा त्याग करून, मलांही बरोबर अरण्यामध्यें घेऊन जाणाऱ्या ज्या पादचारी रामाला त्या वेळीं भय अथवा दुःख झालें नाही, तो राम मनामध्यें तसेंच अतुल धैर्य धरून राहिला आहे ना ? हे दूता, माझें ज्याप्रमाणे त्याच्यावर प्रेम आहे, त्याप्रमाणे पित्याचेंही त्याच्यावर प्रेम नव्हतें; मातेचेंही नाही आणि दुसऱ्याही कोणाचें नाहीं; मग माझ्यापेक्षा त्यांच्यावर त्यानें अधिक प्रेम करण्याची तर गोष्टच नको. म्हणून जोंपर्यंत त्या प्रिय रामाच्या वृत्तांत माझ्या कानावर येत राहील, तोंपर्यंतच मी जीविताची आशा धरून राहीन." ( २५–३० )

याप्रमाणें त्या वानरश्रेष्ठाशीं गंभीर अर्थ आणि मधुर शब्द भरलेलें भाषण करून, ती राजपत्नी सुंदरी सीता रामाविषयींचें ज्यांत वृत्तांत आहे, असें हनुमानाचें चित्तवेधक भाषण ऐकण्यासाठीं स्तब्ध राहिली. सीतेचें भाषण ऐकून, महापराक्रमी मारुति, मस्तकीं हात जोडून, तिला म्हणाला, " कमलनयन रामाला

न त्वामिहस्थां जानीते राम: कमललोचन: ।
तेन त्वां नानयत्याशु शचीमिव पुरन्दर: ॥ ३३
श्रुत्वैव च वचो मह्यं क्षिप्रमेष्यति राघव: ।
चमूं प्रकर्षन्महतीं हर्यक्षगणसंयुताम् ॥ ३४
विष्टम्भयित्वा बाणौघैरक्षोभ्यं वरुणालयम् ।
करिष्यति पुरीं लङ्कां काकुत्स्थ: शान्तराक्षसाम् ॥ ३५
तत्र यद्यन्तरा मृत्युर्यदि देवा महासुरा: ।
स्थास्यन्ति पथि रामस्य स तानपि वधिष्यति ॥ ३६
तवादर्शनजेनार्य शोकेन परिपूरित: ।
न शर्म लभते राम: सिंहार्दित इव द्विप: ॥ ३७
मन्दरेण च ते देवि शपे मूलफलेन च ।
मलयेन च विन्ध्येन मेरुणा दर्दुरेण च ॥ ३८
यथा सुनयनं वल्गु बिम्बोष्ठं चारुकुण्डलम् ।
मुखं द्रक्ष्यसि रामस्य पूर्णचन्द्रमिवोदितम् ॥ ३९

---

तू येथेच असल्याचे ठाऊक नाही आणि म्हणूनच शचीला घेऊन जाणाऱ्या इंद्राप्रमाणे तो तुला येथून सत्वर घेऊन जात नाही. माझें भाषण ऐकताक्षणी वानरगण आणि ऋक्षगण असलेला प्रचंड सेना बरोबर घेऊन रघुवंशज राम सत्वर तेथून निघेल आणि अक्षोभ्य अशा सागराचें आपल्या बाणांनी स्तंभन करून तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम या लंकानगरातील सर्व राक्षसांचा नाश करून टाकील. इतकेंच नव्हे तर त्याच्या या मार्गामध्यें देव, मृत्यु अथवा महा असुर जरी आडवे आले तरी त्यांचा सुद्धा तो वध करील. ( ३१-३६ )

हे साध्वी सिंहानें जर्जर केलेल्या गजाप्रमाणें ज्याप्रमाणे चैन पडत नाही त्याप्रमाणें तू दृष्टिआड झाल्यामुळे शोकानें व्याप्त झालेल्या रामाला रात्रंदिवस मुळीं सुद्धां चैन पडत नाही. हे रामपत्नी ! मनोहर कुंडलें, उत्कृष्ट नेत्र आणि परिपक्व तोंडल्याप्रमाणें आरक्तवर्ण ओष्ठ असलेलें व उदय पावलेल्या पूर्ण चंद्राप्रमाणें आल्हादकारक असें रामाचें मुख तू लवकरच पाहशील. हें मी तुला मुळें फळें यांची आणि मंदर, मलय, विंध्य, मेरु व दर्दुर या पर्वतांची शपथ घेऊन सांगतो.

क्षिप्रं द्रक्ष्यसि वैदेहि रामं प्रस्रवणे गिरौ ।
शतक्रतुमिवासीनं नागपृष्ठस्य मूर्धनि ४०
न मांसं राघवो भुङ्क्ते न चैव मधु सेवते ।
वन्यं सुविहितं नित्यं भक्तमश्नाति पञ्चमम् ४१
नैव दंशान्न मशकान्न कीटान्न सरीसृपान् ।
राघवोऽपनयेद्गात्रात्त्वद्गतेनान्तरात्मना ४२
नित्यं ध्यानपरो रामो नित्यं शोकपरायणः ।
नान्यच्चिन्तयते किंचित्स तु कामवशं गतः ४३
अनिद्रः सततं रामः सुप्तोऽपि च नरोत्तमः ।
सीतेति मधुरां वाणीं व्याहरन्प्रतिबुध्यते ४४
दृष्ट्वा फलं वा पुष्पं वा यच्चान्यत्स्त्रीमनोहरम् ।
बहुशो हा प्रियेत्येवं श्वसंस्त्वामभिभाषते ४५
स देवि नित्यं परितप्यमानस्त्वामेव सीतेत्यभिभाषमाणः ।
धृतव्रतो राजसुतो महात्मा तवैव लाभाय कृतप्रयत्नः ४६

---

ऐरावताच्या मस्तकावर बसलेल्या इंद्राप्रमाणे प्रस्रवणपर्वतावर बसलेल्या रामाला, हे वैदेहि, तूं लवकरच पाहशील. ( ३७-४० )

राम मांस भक्षण करीत नाही आणि मद्यहि सेवन करीत नाही, फक्त शास्त्रविहित असें वनांतील ओदनच तो नित्य एक वेळ संध्याकाळीं सेवन करीत असतो. रामाचें अंतःकरण एका तुझ्या ठिकाणीं खिळून गेलें असल्यामुळे, डांस, माशा, कीटक आणि सर्प ही आपल्या शरीराशीं आले तरीही ते दूर करीत नाही. राम एकसारखा मनांत चिंताग्रस्त झालेला असून, सर्वदा शोक करीत असतो आणि कामाधीन होऊन गेलेल्या त्या रामाच्या मनांत तुझ्याशिवाय दुसरा कांही विचारच येत नाही. राम नेहमी जागाच असतो आणि कदाचित् जरी त्याला थोडा वेळ झोप लागली, तरी 'सीता' अशी मधुर वाणी उच्चारीत उच्चारीतच तो जागा होतो. फल, पुष्प अथवा स्त्रियांचें मन हरणारी अशी दुसरी कांही वस्तु दृष्टीस पडली, म्हणजे 'हे प्रिये,' असें सुस्कारा टाकीत टाकीत तो बोलूं लागतो. हे राजपत्नि, तो नेहमी शोक करीत असतो 'सीता' म्हणून तुलाच उद्देशून बोलत

सा रामसंकीर्तनवीतशोका रामस्य शोकेन समानशोका ।
शरन्मुखेनाम्बुदशेषचन्द्रा निशेव वैदेहसुता बभूव ४७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षट्त्रिंशः सर्गः ॥३६॥

सप्तत्रिंशः सर्गः । [१५४६]

सा सीता वचनं श्रुत्वा पूर्णचन्द्रनिभानना ।
हनूमन्तमुवाचेदं धर्मार्थसहितं वचः १
अमृतं विषसंपृक्तं त्वया वानर भाषितम् ।
यच्च नान्यमना रामो यच्च शोकपरायणः २

---

असतो आणि ब्रह्मचर्यव्रताने राहिलेला तो महात्मा राजपुत्र तुझ्याच प्राप्तीकरिता अहर्निश प्रयत्न करीत असतो " (४१-४६)

याप्रमाणे प्रथमतः रामाचा वृत्तान्त ऐकून शोकरहित झालेली, परंतु राम आपणाकरितां शोक करीत आहे, असें ऐकिल्यामुळे पुनरपि त्याच्यासारखा शोक करूं लागलेली ती विदेहराजकन्या सीता, तिचा मुद्रा वरचेवर पालटूं लागल्यामुळे आकाशामध्ये थोडे थोडे मेघाचे तुकडे राहिले असतांना शरदृतूंतील चांदणी रात्र ज्याप्रमाणे शोभूं लागते, त्याप्रमाणे शोभूं लागली, कारण रामाला एकसारखा आपला ध्यास लागून राहिलेला आहे असें ऐकतांक्षणीं सीतेची मुद्रा आनंदित दिसूं लागली परंतु तो शोकाकुल झालेला आहे, असें कानीं पडतांक्षणीं तिची मुद्रा पुनः शोकग्रस्तही दिसूं लागली अशा रीतीने तिच्या मुद्रेमध्ये वारंवार फेर होऊं लागल्यामुळे शरदृतूमध्ये आकाशांत इकडेतिकडे मेघाचे कांहीं तुकडे शिल्लक असतांना चांदण्यारात्रीं चंद्र ज्याप्रमाणे वारंवार मेघाच्छादित होतो व लगेच मेघनिर्मुक्तही होऊं लागतो यामुळे वरचेवर आल्हादकारक व आनंदनाशक भासूं लागतो, त्याप्रमाणे तिची ती मुद्रा भासूं लागली (४७)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणरूपक आदिकाव्यांतील सुंदरकांडांतील छत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३६ ॥

पूर्ण चंद्रासारखें आल्हादकारक मुख असलेली ती सीता हनुमानाचें भाषण ऐकून घेऊन, धर्म व अर्थ यांना अनुसरून योग्य असें भाषण करूं लागली. ती म्हणाली, "हे वानरा, रामाचें मन दुसरीकडे नाही आणि तो एकसारखा शोक

ऐश्वर्ये वा सुविस्तीर्णे व्यसने वा सुदारुणे ।
रज्ज्वेव पुरुषं बद्ध्वा कृतान्तः परिकर्षति ३
विधिर्नूनमसंहार्यः प्राणिनां प्लवगोत्तम ।
सौमित्रिं मां च रामं च व्यसनैः पश्य मोहितान् ४
शोकस्यास्य कथं पारं राघवोऽधिगमिष्यति ।
प्लवमानः परिक्रान्तो हतनौः सागरे यथा ५
राक्षसानां वधं कृत्वा सूदयित्वा च रावणम् ।
लङ्कामुन्मथितां कृत्वा कदा द्रक्ष्यति मां पतिः ६
स वाच्यः संत्वरस्वेति यावदेव न पूर्यते ।
अयं संवत्सरः कालस्तावद्धि मम जीवितम् ७
वर्तते दशमो मासो द्वौ तु शेषौ प्लवंगम ।
रावणेन नृशंसेन समयो यः कृतो मम ८
विभीषणेन च भ्रात्रा मम निर्यातनं प्रति ।
अनुनीतः प्रयत्नेन न च तत्कुरुते मतिम् ९

---

करीत आहे, हें तू केलेलें भाषण विषमिश्रित अमृताप्रमाणे मला भासत आहे. प्रचंड ऐश्वर्याचे ठिकाणीं अथवा भयंकर संकटाचे ठिकाणीं पुरुषाला दैव जसें काहा दोरी बांधून ओढ़नच नेत असतें. हे वानरश्रेष्ठा, प्राण्यांना खरोखर दैवाचें उल्लंघन करता येत नाहीं; कारण, सुमित्रापुत्र लक्ष्मण, मी आणि राम हे सर्व पहा कसे संकटामध्ये सापडलों आहों. ज्याची नाव बुडालेली आहे, असा पराक्रमी पुरुष सागरामध्ये पोहता पोहता ज्याप्रमाणे मोठ्या पराकाष्ठेनें तीराला जाऊन पोचतो, त्याप्रमाणें रघुवराज राम कसा बरें हा शोकसमुद्र उल्लंघून जाईल ? ( १–५ )

राक्षसांचा वध करून रावणाचाही नाश करून आणि लंकेचा विध्वंस करून माझा भर्ता मला केव्हा बरे दृष्टीस पडेल ? असो ' त्वरा कर ' असा निरोप तूं त्या माझ्या भर्त्या रामाला सांग, कारण जोंपर्यंत ही वर्षाची मुदत संपली नाहीं, तोंपर्यंत मी जिवंत आहे हे वानरा दुष्ट रावणाने जी वर्षाची मला मुदत दिली आहे, तिचा हा दहावा महिना सुरू असून, दोनच महिने ती मुदत संपावयास राहिले आहेत रावणाचा बंधु बिभीषण यानें मला परत पाठविण्याविषयीं, त्याचें

मम प्रतिप्रदानं हि रावणस्य न रोचते।
रावणं मार्गते सङ्ख्ये मृत्युः कालवशं गतम् १०
ज्येष्ठा कन्या कला नाम विभीषणसुता कपे।
तया ममैतदाख्यातं मात्रा प्रहितया स्वयम् ११
अविन्ध्यो नाम मेधावी विद्वान्राक्षसपुङ्गवः।
धृतिमाञ्छीलवान्वृद्धो रावणस्य सुसंमतः १२
रामक्षयमनुप्राप्तं रक्षसां प्रत्यचोदयत्।
न च तस्य स दुष्टात्मा शृणोति वचनं हितम् १३
आशंसेयं हरिश्रेष्ठ क्षिप्रं मां प्राप्स्यते पतिः।
अन्तरात्मा हि मे शुद्धस्तस्मिंश्च बहवो गुणाः १४
उत्साहः पौरुषं सत्त्वमानृशंस्यं कृतज्ञता।
विक्रमश्च प्रभावश्च सन्ति वानर राघवे १५
चतुर्दश सहस्राणि राक्षसानां जघान यः।

---

मन वळविण्याचा प्रयत्न केला, परतु त्याच्या सांगण्याप्रमाणे वागण्याची त्याला बुद्धि होत नाही मला पुनरपि रामाचे स्वाधीन करावें, ही गोष्ट रावणाला रुचत नाही, कारण मृत्यु हा कालाच्या कचाट्यात सापडलेल्या त्या रावणाची युद्धामध्ये वाट पहात आहे ( ९-१० )

हे वानरा, बिभीषणाची कला म्हणून एक ज्येष्ठ कन्या आहे त्या कन्येला मजकडे स्वतः तिच्या मातेने पाठविलें असता ती मला म्हणाली, " अविन्ध्य म्हणून एक मोठा बुद्धिमान् व विद्वान राक्षस आहे, तो धैर्यवान्, सुशील व वृद्ध असून, रावणाला फारच मान्य असा आहे. त्याने रामाच्या हातून राक्षसांचा क्षय होणार आहे, असें रावणाला कळविलें परंतु तो दुरात्मा त्याच्याहि हितकारक भाषणाकडे स्वकर लक्ष देत नाही म्हणून हे वानरश्रेष्ठा स्वकरच मला पति प्राप्त करून घेईल, अशी मला आशा वाटत आहे, कारण माझा अंतरात्मा शुद्ध असून, माझे मनोरथ सिद्धीस नेण्याला योग्य असे पुष्कळच गुण त्या नाथांच्या ठिकाणीं आहेत, हे वानरा, उत्साह, पौरुष, बल, दया, कृतज्ञता, पराक्रम आणि प्रभाव हे गुण राघवाच्या ठिकाणीं आहेत. ( ११-१५ )

जनस्थाने विना भ्रात्रा शत्रुः कस्तस्य नोद्विजेत् १६
न स शक्यस्तुलयितुं व्यसनैः पुरुषर्षभः ।
अहं तस्यानुभावज्ञा शक्रस्येव पुलोमजा १७
शरजालांशुमाञ्शूरः कपे रामदिवाकरः ।
शत्रुरक्षोमयं तोयमुपशोषं नयिष्यति १८
इति संजल्पमानां तां रामार्थे शोककर्शिताम् ।
अश्रुसंपूर्णवदनामुवाच हनुमान्कपिः १९
श्रुत्वैव च वचो मह्यं क्षिप्रमेष्यति राघवः ।
चमूं प्रकर्षन्महतीं हर्यृक्षगणसंकुलाम् २०
अथवा मोचयिष्यामि त्वामद्यैव स राक्षसात् ।
अस्माद् दुःखादुपारोह मम पृष्ठमनिन्दिते २१
त्वां तु पृष्ठगतां कृत्वा संतरिष्यामि सागरम् ।
शक्तिरस्ति हि मे वोढुं लङ्कामपि सरावणाम् २२
अहं प्रस्रवणस्थाय राघवायाद्य मैथिलि ।

---

अरे ! जनस्थानामध्ये चवदा हजार राक्षसांचा ज्याने आपल्या भ्रात्याचेंही सहाय्य न घेता वध केला, त्याचा कोणता वैरी शत्रु गर्भगळित होणार नाही ? कितीही संकटें आलीं, तरी तो पुरुषश्रेष्ठ त्यांना हार जाणें शक्य नाही. इंद्राणीला ज्याप्रमाणें इंद्राचा अनुभव आहे, त्याप्रमाणे मला त्याचा प्रभाव माहीत आहे. हे वानरा, शरसमुदायरूपी किरणें असलेला रामरूपी शूर सूर्य, राक्षसशत्रुरूपी उदक शुष्क करून टाकील. " याप्रमाणे रामासाठीं झालेल्या शोकानें जर्जर झालेली ती सीता भाषण करीत असतांना तिचें मुख अश्रूंनी भरून गेलें होतें व अशा अवस्थेमध्ये हनुमान वानर तिला म्हणाला, " माझें भाषण ऐकताच वानर आणि ऋक्ष यांची प्रचंड सेना बरोबर घेऊन तो राम सत्वर इकडे येईल. (१६-२०)

इतकें कशाला, राक्षसामुळे होत असलेल्या या दुःखापासून मीच आजच्या आजच तुझी सुटका करून टाकतों. हे निर्दोष सते, तूं माझ्या पाठीवर बैस. तुला पाठीवर घेऊन मी हा सर्व समुद्र तरून जाईन; इतकेंच नव्हे तर रावणासह लंका ही समुद्रावरीलकडे घेऊन जाण्याचें सामर्थ्य माझ्या अंगीं आहे. हे

प्रापयिष्यामि शक्राय हव्यं हुतमिवानलः २३
द्रक्ष्यस्यद्यैव वैदेहि राघवं सहलक्ष्मणम् ।
व्यवसायसमायुक्तं विष्णुं दैत्यवधे यथा २४
त्वद्दर्शनकृतोत्साहमाश्रमस्थं महाबलम् ।
पुरन्दरमिवासीनं नगराजस्य मूर्धनि २५
पृष्ठमारोह मे देवि मा विकाङ्क्षस्व शोभने ।
योगमन्विच्छ रामेण शशाङ्केनेव रोहिणी २६
कथयन्तीव शशिना संगमिष्यसि रोहिणी ।
मत्पृष्ठमधिरोह त्वं तराकाशं महार्णवम् २७
नहि मे संप्रयातस्य त्वामितो नयतोऽङ्गने ।
अनुगन्तुं गतिं शक्ताः सर्वे लङ्कानिवासिनः २८
यथैवाहमिह प्राप्तस्तथैवाहमसंशयम् ।
यास्यामि पश्य वैदेहि त्वामुद्यम्य विहायसम् २९

---

मैथिलि, हवन केलेले हव्य ज्याप्रमाणे अग्नि इन्द्राकडे नेऊन पोचवितो, त्याप्रमाणे प्रस्रवणपर्वतावर बसलेल्या राघवाकडे मी आजच्या आजच तुला नेऊन पोचवितो. हे वैदेहि, दैत्यवधार्थ उद्युक्त झालेल्या विष्णूप्रमाणे, रावणाच्या वधाविषयी उद्युक्त झालेल्या रामाला लक्ष्मणासह तूं आजच पाहू शकशील. सारांश, तुझ्या दर्शनासाठी उत्सुक झालेला महाबलाढ्य राम, पर्वतराज प्रस्रवणाच्या माथ्यावरील आश्रमामध्ये, इन्द्राप्रमाणे बसलेला आहे, असे पाहशील. यासाठी हे राजपत्नि, तू माझ्या पाठीवर बैस. हे कल्याणि, तू मनामध्ये कसलीही शंका आणू नकोस. चन्द्राशी समागम पावणाऱ्या रोहिणीप्रमाणे रामाचा समागम करण्याचे तू आज मनामध्ये आण" (२१-२६)

"रामाची भेट आजच होऊ दे" इतकी अक्षरें तुझ्या तोंडून निघाली की नाही, तोंच चन्द्राशी समागम पावणाऱ्या रोहिणीप्रमाणे तुला रामाची भेट होईल म्हणून तू माझ्या पाठीवर बैस आणि आकाशमार्गाचे अवलम्बन करून महार्णव तरून जा बाई, तुला घेऊन मी येथून चालता झालो, तर लंकेमध्ये राहणाऱ्यांपैकी कोणीही माझ्या मागोमाग येण्यास समर्थ नाही हे वैदेही, पहा तर तो.



हनुमान् सीतेला मुद्रिका दाखवतो ( सुंदर० स. ३६ श्लो ११४ )

मैथिली तु हरिश्रेष्ठाच्छ्रुत्वा वचनमद्भुतम् ।
हर्षविस्मितसर्वाङ्गी हनूमन्तमथाब्रवीत् ३०
हनूमन्दूरमध्वानं कथं मां नेतुमिच्छसि ।
तदेव खलु ते मन्ये कपित्वं हरियूथप ३१
कथं चाल्पशरीरस्त्वं मामितो नेतुमिच्छसि ।
सकाशं मानवेन्द्रस्य भर्तुर्मे प्लवगर्षभ ३२
सीतायास्तु वचः श्रुत्वा हनूमान्मारुतात्मजः ।
चिन्तयामास लक्ष्मीवान्नवं परिभवं कृतम् ३३
न मे जानाति सत्त्वं वा प्रभावं वासितेक्षणा ।
तस्मात्पश्यतु वैदेही यद्रूपं मम कामतः ३४
इति संचिन्त्य हनुमांस्तदा प्लवगसत्तमः ।
दर्शयामास सीतायाः स्वरूपमरिमर्दनः ३५
स तस्मात्पादपाद्धीमानाप्लुत्य प्लवगर्षभः ।

---

जसा मी येथे आलों, तसाच तुला घेऊन निःसंशय आकाशमार्गाने परत जाईन." याप्रमाणे वानरश्रेष्ठ हनुमानाच्या मुखातून अद्भुत भाषण श्रवण केल्यावर मिथिलराजकन्या सीतेच्या सर्व शरीरावर हर्षाचे रोमांच उठले आणि ती हनुमानाला म्हणाली, " हे हनुमाना, इतक्या लांब मार्गाने उल्लंघन करून, तूं मला परत घेऊन जाण्याचें मनामध्ये कसें आणीत आहेस ? हे वानरसेनाधिपते, तुझें बोलणें हीं तुझी मला खरोखर माकडचेष्टाच वाटत आहे ( २७-३१ )

अरे, वानरश्रेष्ठा, तुझें शरीर इतकें लहान असताना, माझ्या मानवराज भर्त्याकडे तूं मला येथून नेऊन पोंचवण्याची इच्छा करीत आहेस, याला काय म्हणावें ! " सीतेचें हें भाषण ऐकल्यावर सीतेने आपला आता अपमानच केला आहे, असें त्या शरीरसंपत्तिमान् वायुपुत्र हनुमानाला वाटूं लागलें आणि तो मनामध्यें म्हणाला, " या कृष्णवर्णनेत्रांच्या विदेहराजकन्या सीतेला माझें बल अथवा प्रभाव विदित नाही हें खरें, तेव्हा आज एकदा स्वेच्छेप्रमाणे बनणारें माझें रूप तिला दाखवतोंच " याप्रमाणे विचार करून शत्रुनाशक वानरश्रेष्ठ हनुमानाने सीतेला आपलें स्वरूप दाखविलें. तात्पर्य, त्या विचारी वानरश्रेष्ठाने त्या वृक्षावरून उडी

ततो वर्धितुमारेभे सीताप्रत्ययकारणात् ३६
मेरुमन्दरसंकाशो बभौ दीप्तानलप्रभः ।
अग्रतो व्यवतस्थे च सीताया वानरर्षभः ३७
हरिः पर्वतसंकाशस्ताम्रवक्त्रो महाबलः ।
वज्रदंष्ट्रनखो भीमो वैदेहीमिदमब्रवीत् ३८
सपर्वतवनोद्देशां साट्टप्राकारतोरणाम् ।
लङ्कामिमां सनाथां वा नयितुं शक्तिरस्ति मे ३९
तदवस्थाप्यतां बुद्धिरलं देवि विकाङ्क्षया ।
विशोकं कुरु वैदेहि राघवं सहलक्ष्मणम् ४०
तं दृष्ट्वाचलसंकाशमुवाच जनकात्मजा ।
पद्मपत्रविशालाक्षी मारुतस्यौरसं सुतम् ४१
तव सत्त्वं बलं चैव विजानामि महाकपे ।
वायोरिव गतिश्चापि तेजश्चाग्नेरिवाद्भुतम् ४२

प्राकृतोऽन्यः कथं चेमां भूमिमागन्तुमर्हति ।
उदधेरप्रमेयस्य पारं वानरयूथप ४३
जानामि गमने शक्तिं नयने चापि ते मम ।
अवश्यं संप्रधार्याशु कार्यसिद्धिरिवात्मनः ४४
अयुक्तं तु कपिश्रेष्ठ मया गन्तुं त्वया सह ।
वायुवेगसवेगस्य,वेगो मां मोहयेत्तव ४५
अहमाकाशमासक्ता उपर्युपरि सागरम् ।
प्रपतेयं हि ते पृष्ठाद्भयो वेगेन गच्छतः ४६
पतिता सागरे चाहं तिमिनक्रझषाकुले ।
भवेयमाशु विवशा यादसामन्नमुत्तमम् ४७
न च शक्ष्ये त्वया सार्धं गन्तुं शत्रुविनाशन ।
कलत्रवति संदेहस्त्वयि स्यादप्यसंशयम् ४८
ह्रियमाणं तु मां दृष्ट्वा राक्षसा भीमविक्रमाः ।
अनुगच्छेयुरादिष्टा रावणेन दुरात्मना ४९

"हे वानरसेन धिपते, दुसरा एखादा सामान्य वानर या अपार समुद्राचें उल्लंघन करून या भूमीवर येईल तरी कसा? येथून परत जाण्याचें आणि तेंही मला घेऊन जाण्याचें तुझे अंगी सामर्थ्य आहे, हें मी जाणून आहें, परंतु तूं ज्याप्रमाणे आपल्या कार्यसिद्धीचा सत्वर विचार केला आहेस, त्याप्रमाणे मलाही स्वत संबंधी अवश्य विचार केला पाहिजे. हे वानरश्रेष्ठा, तुझ्याबरोबर जाणें मला योग्य दिसत नाही. वायूप्रमाणे तुझा वेग असल्यामुळे, त्याने मला मूर्च्छा येईल आकाशामध्ये मी अगदी उच उच गेलें, म्हणजे वेगवेगाने जाणाऱ्या तुझ्या पाठीवरून मी समुद्रातच पडेन. तिमि, नक्र व मत्स्य असलेल्या सागरामध्ये मी निश्चेष्ट पडलें, म्हणजे जलचर प्राण्यांचे सत्वर उत्कृष्ट अन्नच मी होऊन जाईल शिवाय, हे शत्रुनाशना, तुझ्या बरोबर मला जातां येणार नाही, कारण स्त्रीसह तू परत ज ऊ लागलास, म्हणजे त्यांना खचित तुझा संशय येईल ( ४३-४८ )

तू मला घेऊन जात आहेस, असें ध्यानीं पडल्यावर दुरात्मा रावण भयंकर पराक्रमी राक्षस पाठवील व ते तुझ्या मागोमाग येतील. त्यातामध्ये शूर व मुद्गर

ततो वर्धितुमारेभे सीताप्रत्ययकारणात् ३६
मेरुमन्दरसंकाशो बभौ दीप्तानलप्रभः ।
अग्रतो व्यवतस्थे च सीताया वानरर्षभः ३७
हरिः पर्वतसंकाशस्ताम्रवक्त्रो महाबलः ।
वज्रदंष्ट्रनखो भीमो वैदेहीमिदमब्रवीत् ३८
सपर्वतवनोद्देशां साट्टप्राकारतोरणाम् ।
लङ्कामिमां सनाथां वा नयितुं शक्तिरस्ति मे ३९
तदवस्थाप्यतां बुद्धिरलं देवि विकाङ्क्षया ।
विशोकं कुरु वैदेहि राघवं सहलक्ष्मणम् ४०
तं दृष्ट्वाचलसंकाशमुवाच जनकात्मजा ।
पद्मपत्रविशालाक्षी मारुतस्यौरसं सुतम् ४१
तव सत्त्वं बलं चैव विजानामि महाकपे ।
वायोरिव गतिश्चापि तेजश्चाग्नेरिवाद्भुतम् ४२

---

म्हणून, सीतेला आपल्या सामर्थ्याचा विश्वास पटवण्याकरिता व आपला देह अधिकाधिक वृद्धिंगत करण्याला आरंभ केला, आणि मेरुमंदरतुल्य शरीर धारण करून प्रदीप्त अग्नीसारख्या तेजाने व्याप्त झालेला तो वानरश्रेष्ठ हनुमान् सीतेच्या समोर येऊन उभा राहिला ( ३६–३७ )

नंतर ताम्रवर्णाचें मुख आणि वज्रतुल्य दाढा व नखें असलेला तो महाबलाढ्य भयंकर वानर सीतेला म्हणाला, ' देवी, पर्वत, वनप्रदेश, गच्च्या, कोट, वेशी आणि अधिपति यांसह ही लंकानगरी उचलून घेऊन जाण्याचें मला सामर्थ्य आहे. यासाठीं हे राजकन्ये, तुला असलेली मनातील शंका सोडून देऊन, माझ्या सामर्थ्याविषयी तू आपल्या मनाची खात्री करून घे आणि लक्ष्मणासह राघवाला आपल्या दर्शनाने तू आज शोकमुक्त करून टाक " इतकें झाल्यावर कमलपत्राप्रमाणे विशाल नेत्र असलेली ती जनककन्या सीता वायूच्या त्या पर्वतप्राय औरस पुत्राला म्हणाली, " हे महाकपे, तुझें धैर्य व बल मी जाणते आहे. वायूप्रमाणे असलेली तुझी गति आणि अग्नीप्रमाणे असलेलें तुझें अद्भुत तेज हीं मला पूर्ण अवगत आहेत " ( ३८–४२ )

प्राकृतोऽन्यः कथं चेमां भूमिमागन्तुमर्हति ।
उदधेरप्रमेयस्य पारं वानरयूथप ४३
जानामि गमने शक्तिं नयने चापि ते मम ।
अवश्यं संप्रधार्याशु कार्यसिद्धिरिवात्मनः ४४
अयुक्तं तु कपिश्रेष्ठ मया गन्तुं त्वया सह ।
वायुवेगसवेगस्य वेगो मां मोहयेत्तव ४५
अहमाकाशमासक्ता उपर्युपरि सागरम् ।
प्रपतेयं हि ते पृष्ठाद्भयो वेगेन गच्छतः ४६
पतिता सागरे चाहं तिमिनक्रझषाकुले ।
भवेयमाशु विवशा यादसामन्नमुत्तमम् ४७
न च शक्ष्ये त्वया सार्धं गन्तुं शत्रुविनाशन ।
कलत्रवति संदेहस्त्वयि स्यादप्यसंशयम् ४८
ह्रियमाणां तु मां दृष्ट्वा राक्षसा भीमविक्रमाः ।
अनुगच्छेयुरादिष्टा रावणेन दुरात्मना ४९

---

'हे वानरसेनाधिपते, तुम्हांवांचून दुसरा एखादा सामान्य वानर या अपार समुद्राचें उल्लंघन करून या भूमीवर येईल तरी कसा? येथून परत जाण्याचें आणि तेंही मला घेऊन जाण्याचें तुझें अंगीं सामर्थ्य आहे, हें मी जाणून आहे, परंतु तू ज्याप्रमाणें आपल्या कार्यसिद्धीचा सत्वर विचार केला आहेस, त्याप्रमाणें मलाही स्वतःसंबंधीं अवश्य विचार केला पाहिजे. हे वानरश्रेष्ठा, तुझ्याबरोबर जाणें मला योग्य दिसत नाही. वायूप्रमाणें तुझा वेग असल्यामुळें, त्यानें मला मूर्च्छा येईल. आकाशामध्यें मी अगदी उंच उंच गेलें, म्हणजे वेगानें जाणाऱ्या तुझ्या पाठीवरून मी समुद्रांतच पडेन आणि, नक्र व मत्स्य असलेल्या सागरामध्यें मी निश्चेष्ट पडलें, म्हणजे जलचर प्राण्यांचें सत्वर उत्कृष्ट अन्नच मी होऊन जाईन. शिवाय, हे शत्रुनाशका, तुझ्याबरोबर मला जाताही येणार नाही, कारण स्त्रीसह तू परत जाऊं लागलास, म्हणजे लोकांना खचित तुझा संशय येईल (४३-४८)

तू मला घेऊन जात आहेस, असें दिसल्यावर दुरात्मा रावण भयंकर पराक्रमी राक्षस पाठवील व ते तुझ्या मागोमाग येतील. दानवांनी शूर व सुन्दर

तैस्त्वं परिवृतः शूरैः शूलमुद्गरपाणिभिः ।
भवेस्त्वं संशयं प्राप्तो मया वीर कलत्रवान् ५०
सायुधा बहवो व्योम्नि राक्षसास्त्वं निरायुधः ।
कथं शक्ष्यसि संयातुं मां चैव परिरक्षितुम् ५१
युद्ध्यमानस्य रक्षोभिस्ततस्तैः क्रूरकर्मभिः ।
प्रपतेयं हि ते पृष्ठाद्भयार्ता कपिसत्तम ५२
अथ रक्षांसि भीमानि महान्ति बलवन्ति च ।
कथंचित्सांपराये त्वां जयेयुः कपिसत्तम ५३
अथवा युद्ध्यमानस्य पतेयं विमुखस्य ते ।
पतितां च गृहीत्वा मां नयेयुः पापराक्षसाः ५४
मां वा हरेयुस्त्वद्धस्ताद्विशसेयुरथापि वा ।
अनवस्थौ हि दृश्येते युद्धे जयपराजयौ ५५
अहं वापि विपद्येयं रक्षोभिरभितर्जिता ।
त्वत्प्रयत्नो हरिश्रेष्ठ भवेन्निष्फल एव तु । ५६

घेऊन ते शूर राक्षस तुला वेढून टाकतील आणि, हे वीरा, माझ्यामुळे तुझ्यावर आणि माझ्यावरही प्राणांतिक संकट येईल आयुधें बरोबर घेतलेले असे पुष्कळ राक्षस तुझ्यावर चालून येतील आणि तुझ्यापाशी तर आयुध मुळींच नाहीं तेव्हां आकाशामध्यें त्यांना तोंड देण्यास आणि माझें रक्षण करण्यास तूं कसा समर्थ होशील ? हे वानरश्रेष्ठा, त्या क्रूरकर्मी राक्षसांशीं तुझें युद्ध होऊं लागलें, म्हणजे मी भयभीत होऊन, तुझ्या पाठीवरून खालीं पडेन अथवा प्रचंड, बलाढ्य व भयंकर असे ते राक्षस, हे वानरश्रेष्ठा, युद्धामध्यें कांहींही करून समरांत तुझा पराभव करतील, किंवा युद्ध करता करता तूं पराङ्मुख झालास, तरी मी खालीं पडेन आणि मी खालीं पडल्यावर ते दुष्ट राक्षस मला घेऊन जातील (४९-५४)

सारांश, राक्षस तुझ्या हातून मला ओढून तरी नेतील किंवा तेथल्या तेथेंच मला फाडून टाकतील, कारण युद्धामध्यें जय किंवा पराजय त्यांनींच होईल, असें सांगता येत नाहीं राक्षसांनीं सर्व प्रकारांनी मला धमकी दिली, तरीहि मी मरून जाईन आणि हे वानरश्रेष्ठा, असें झालें, म्हणजे तुझा एवढा प्रयत्न निष्फळ

काम त्वमपि पर्याप्तो निहन्तुं सर्वराक्षसान्।
राघवस्य यशो हीयेत्त्वया शस्तेस्तु राक्षसै· ५७
अथवादाय रक्षांसि न्यसेयुः संवृते हि माम्।
यत्र ते नाभिजानीयुर्हरयो नापि राघवः ५८
आरम्भस्तु मदर्थोऽयं ततस्तव निरर्थकः।
त्वया हि सह रामस्य महानागमने गुणः ५९
मयि जीवितमायत्तं राघवस्यामितौजसः।
भ्रातॄणां च महाबाहो तव राजकुलस्य च ६०
तौ निराशौ मदर्थे च शोकसंतापकर्शितौ।
सह सर्वर्क्षहरिभिस्त्यक्ष्यतः प्राणसंग्रहम् ६१
भर्तुर्भक्तिं पुरस्कृत्य रामादन्यस्य वानर।
नाहं स्प्रष्टुं स्वतो गात्रमिच्छेयं वानरोत्तम ६२
यदहं गात्रसंस्पर्शं रावणस्य गता बलात्।
अनीशा किं करिष्यामि विनाथा विवशा सती ६३

होईल सर्व राक्षसांचा वध करण्यास तूही समर्थ आहेस, परंतु, तू राक्षसांचा वध केलास, तर रामाचा नावलौकिक जाईल अथवा त्या वानरांना आणि रामालाही समजणार नाही, अशा एखाद्या गुप्त ठिकाणीं राक्षस मला नेऊन ठेवतील. असें झालें, म्हणजे माझ्याकरितां झालेला हा तुझा खटाटोप व्यर्थ जाईल तुझ्या सह रामाने येथे येण्यात मोठा लाभ आहे हे महापराक्रमी हनुमाना, अमित तेजस्वी राम, त्याचे भ्राते, तू आणि राजकुल या सर्वांचें जीवित माझ्यावर अवलंबून आहे ( ५५–६० )

माझ्याकरिता शोक व संताप यांनी कृश झालेले ते रामलक्ष्मण, माझ्या प्राप्तीविषयी निराश झाले, तर ते सर्व ऋक्ष आणि वानर यासह प्राणत्याग करतील हे वानरा, हे वानरश्रेष्ठा, भर्त्याचे ठिकाणीं अतिशयच भक्ति असल्यामुळे त्या रामावाचून दुसऱ्या कोणाच्याही शरिराला आपण होऊन स्पर्श करण्याची माझी इच्छा नाही रावणाच्या शरिराचा स्पर्श मला झाला आहे, परंतु तो माझ्या इच्छेविरुद्ध झालेला आहे मी अनाथ, स्वत असमर्थ आणि पराधीन असल्यामुळे

यदि रामो दशग्रीवमिह हत्वा सराक्षसम् ।
मामितो गृह्य गच्छेत तत्तस्य सदृशं भवेत् ६४
श्रुताश्च दृष्टा हि मया पराक्रमा महात्मनस्तस्य रणावमर्दिनः ।
न देवगन्धर्वभुजङ्गराक्षसा भवन्ति रामेण समा हि संयुगे ६५
समीक्ष्य तं संयति चित्रकार्मुकं महाबलं वासवतुल्यविक्रमम् ।
सलक्ष्मणं को विषहेत राघवं हुताशनं दीप्तमिवानिलेरितम् ६६
सलक्ष्मणं राघवमाजिमर्दनं दिशागजं मत्तमिव व्यवस्थितम् ।
सहेत को वानरमुख्य संयुगे युगान्तसूर्यप्रतिमं शरार्चिषम् ६७
स मे कपिश्रेष्ठ सलक्ष्मणं प्रियं सयूथपं क्षिप्रमिहोपपादय ।
चिराय रामं प्रति शोककर्शितां कुरुष्व मां वानरवीर हर्षिताम् ६८
इत्यार्षे श्रीमद्रामा॰ वाल्मी॰ आदिका॰ये सुन्दरकाण्डे सप्तत्रिंश सर्गः ॥३७॥[१६१४]

---

करणार तरी काय सारांश, राम येथील राक्षसांसह रावणाचा जर युद्धात वध करील आणि येथून मला घेऊन जाईल, तर तें त्याच्या कीर्तीला शोभण्यासारखें होईल रणामध्ये शत्रूचें मर्दन करणाऱ्या त्या महात्म्या रामाचे पराक्रम मी ऐकिले आहे व प्रत्यक्ष पाहिलेही आहेत त्यावरून देव, गंधर्व, भुजग आणि राक्षस यांपैकी कोणाच्यानेही युद्धामध्ये रामाची बरोबरी होणार नाही, अशी माझी खात्री आहे ( ६१—६५ )

हातात अद्भुत धनुष्य घेतलेला असा इंद्रतुल्य पराक्रमी, महाबलवान राम लक्ष्मणासह, वायूने प्रोत्साहन दिलेल्या प्रदीप्त अग्नीप्रमाणे, युद्धामध्ये उभा राहिलेला पाहिल्यावर त्याच्याशीं संग्राम करण्यास कोण बरें समर्थ होणार आहे? हे वानरश्रेष्ठ संग्रामामध्ये शत्रूचा चुराडा उडवून देणारा, मत्त गजाप्रमाणे अचल राहणारा आणि बाणरूपी किरणें फेकीत असल्यामुळे प्रलयकालच्या सूर्यासारखा दिसणारा जो राम, त्याला युद्धामध्ये कोण बरें तोंड देईल? हे वानरश्रेष्ठा, तो माझा प्रिय राम, लक्ष्मण आणि वानरसेनाधिपति सुग्रीव यांना घेऊन तू सत्वर इकडेच ये आणि मला आनंदित कर." ( ६६—६८ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणरूपक आदिकाव्यातील सुंदर-कांडांतील सदतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३७ ॥

अष्टात्रिंशः सर्गः ।

ततः स कपिशार्दूलस्तेन वाक्येन तोषितः ।
सीतामुवाच तच्छ्रुत्वा वाक्यं वाक्यविशारदः १
युक्तरूपं त्वया देवि भाषितं शुभदर्शने ।
सदृशं स्त्रीस्वभावस्य साध्वीनां विनयस्य च २
स्त्रीत्वाद्य त्वं समर्थासि सागरं व्यतिवर्तितुम् ।
मामधिष्ठाय विस्तीर्णं शतयोजनमायतम् ३
द्वितीयं कारणं यच्च ब्रवीषि विनयान्विते ।
रामादन्यस्य नार्हामि संसर्गमिति जानकि ४
एतत्ते देवि सदृशं पत्न्यास्तस्य महात्मनः ।
का ह्यन्या त्वामृते देवि ब्रूयाद्वचनमीदृशम् ५
श्रोष्यते चैव काकुत्स्थः सर्वं निरवशेषतः ।
चेष्टितं यत्त्वया देवि भाषितं च ममाग्रतः ६
कारणैर्बहुभिर्देवि रामप्रियचिकीर्षया ।
स्नेहप्रस्कन्नमनसा मयैतत्समुदीरितम् ७

---

तदनंतर तो वाक्पटु वानरश्रेष्ठ हनुमान् सीतेच्या वरील भाषणानें संतुष्ट झाला आणि तिचें म्हणणें ऐकून घेऊन तिला म्हणाला, " हे देवी, हे शुभदर्शने, तूं या वेळीं हें योग्यच भाषण केलेंस, हें स्त्रीस्वभावाला आणि पतिव्रताच्या विनयाला शोभणारेंच आहे. तूं स्त्री असल्यामुळे, माझ्या पाठुंगळीस बसून, शंभर योजनें विस्तीर्ण असा विशाल समुद्र उल्लंघन करून जाण्यास समर्थ नाहींस. हे विनय-संपन्न जनककन्ये सीते, रामाशिवाय दुसऱ्याच्या शरिराला मी स्पर्श करणार नाहीं, हें जें तूं दुसरें कारण सांगत आहेस, तेंही हे देवी, त्या महात्म्याच्या पत्नीलाच शोभण्यासारखें आहे. हे देवी, तुझ्याशिवाय दुसरी कोणती बरें स्त्री इतका दुर्धर प्रसंग येऊन ठेपला असताही असा प्रकारचें भाषण करण्यास तयार होईल ? ( १—५ )

हे देवी, तूं जी वागणूक केलीस आणि माझ्यासमक्ष जें भाषण केलेंस, त्यांतील शब्दन् शब्द ककुत्स्थकुलोत्पन्न रामाच्या कानावर जाईल. रामाचें

लङ्काया दुष्प्रवेशत्वाद्दुस्तरत्वान्महोदधेः।
सामर्थ्यादात्मनश्चैव मयैतत्समुदीरितम् ८
इच्छामि त्वां समानेतुमद्यैव रघुनन्दिना।
गुरुस्नेहेन भक्त्या च नान्यथा तदुदाहृतम् ९
यदि नोत्सहसे यातुं मया सार्धमनिन्दिते।
अभिज्ञानं प्रयच्छ त्वं जानीयाद्राघवो हि यत् १०
एवमुक्ता हनुमता सीता सुरसुतोपमा।
उवाच वचनं मन्दं बाष्पप्रग्रथिताक्षरम् ११
इदं श्रेष्ठमभिज्ञानं ब्रूयास्त्वं तु मम प्रियम्।
शैलस्य चित्रकूटस्य पादे पूर्वोत्तरे पदे १२
तापसाश्रमवासिन्याः प्राज्यमूलफलोदके।
तस्मिन्सिद्धाश्रिते देशे मन्दाकिन्यविदूरतः १३

---

आवडनें कार्य करण्याचा इच्छा, त्यांच्याविषयी प्रेमामुळे अंतःकरणात उत्पन्न झालेला ओलावा, अशीं अनेक कारणें असल्यामुळे मी असें भाषण केलें. शिवाय हा महासागर दुस्तर असून, राक्षसांच्या लंकेमध्ये प्रवेश होणें फारच दुर्घट आहे व म्हणून तुला घेऊन जाण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य असल्यामुळे मी असें बोललों. आता रघुवंशजाना आनंद देणाऱ्या रामाला आजच्या आजच येथे तुझ्या-कडे आणावें, अशी माझी इच्छा आहे. रामाबद्दलच्या अतिशय प्रेमानें व भक्तीनें तुझ्या मुखातून जे शब्द निघाले, ते खोटे होणार नाहीत. हे निर्दोष सती, माझ्या-बरोबर येण्याची जर तुझी इच्छा नसेल, तर रामाला ओळखूं शकेल अशी खाणाखुणा तुझ्या जवळची वस्तु खुणेसाठी तू माझ्यापाशी दे" (८–१०)

याप्रमाणें हनुमानानें सांगितलें असता देवकन्येची बरोबरी करणाऱ्या त्या सीतेचा अश्रूंनी कंठ दाटून आला व तिच्या तोंडून अस्पष्ट शब्द निघूं लागले. ती हळूहळू हनुमानाला म्हणाली, "चित्रकूटपर्वताच्या पायथ्याशीं ईशान्येच्या बाजूला तापसाश्रमामध्ये वास्तव्य करीत असताना, जी गोष्ट घडून आली, तीच गोष्ट खूण म्हणून तूं माझ्या प्रिय रामाला कथन कर. तूं त्याला म्हण निरोप असा द्या की, हे राजा, मंदाकिनी-जवळच्या सिद्धांनी वास्तव्य

तस्योपवनखण्डेषु नानापुष्पसुगन्धिषु ।
विहृत्य सलिले क्लिन्नो ममाङ्के समुपाविशः　　१४
ततो मां स समायुक्तो वायसः पर्यतुण्डयत् ।
नमहं लोष्टमुद्यम्य वारयामि स्म वायसम्　　१५
दारयन्स च मां काकस्तत्रैव परिलीयते ।
न चाप्युपारमन्मांसाद्भक्षार्थी बलिभोजनः　　१६
उत्कर्षन्त्यां च रशनां क्रुद्धायां मयि पक्षिणे ।
स्रंसमाने च वसने ततो दृष्टा त्वया ह्यहम्　　१७
त्वया विहसिता चाहं क्रुद्धा संलज्जिता तदा ।
भक्ष्यगृद्धेन काकेन दारिता त्वामुपागता　　१८
ततः श्रान्ताहमुत्सङ्गमासीनस्य तवाविशम् ।
क्रुध्यन्तीव प्रहृष्टेन त्वयाहं परिसान्त्विता　　१९
बाष्पपूर्णमुखी मन्दं चक्षुषी परिमार्जती ।
लक्षिताहं त्वया नाथ वायसेन प्रकोपिता　　२०

फुलेल्या प्रदेशातील नाना प्रकारच्या पुष्पांनी सुगंधयुक्त झालेल्या उपवनातून एकदा विहार करून, तूं भिजला होतास. नंतर माझ्या अंकावर टेकून बसला होतास. इतक्यात तेथे एक काकपक्षी आला व चोचीनें मला टोंचूं लागला, तेव्हा मी मातीचें एक ढेकूळ उगारून त्याला हाकूं लागलें; परंतु तो काकपक्षी मला ओरखडीत–ओरखडीत तेथेच घोटाळूं लागला. त्याला काहीतरी भक्ष्य हवें होतें, यामुळे माझ्या वक्षस्थलातील मांस काढण्याचें काम तो बलिभक्षक काकपक्षी बंद करीना. ( ११–१६ )

तेव्हा मी त्या पक्ष्यावर रागवून कमरपट्टा वर सारूं लागलें असता, माझें वस्त्र सुटूं लागलें आणि अशा वेळीं तुझी माझ्याकडे दृष्टि गेली. तेव्हा तूं मला हसलास; परंतु क्रुद्ध आणि भक्ष्यलोलुप काकपक्ष्यानें ओरखडल्यामुळे अतिशय लज्जित होऊन मी तुझ्याजवळ आलें. नंतर मी श्रमलें असल्यामुळे तूं जेथे बसला होतास तेथे आलें व तुझ्या अंकावर बसलें. मला तर राग आला होता, परंतु तूं हसतहसत माझें सांत्वन केलेंस. काक पक्ष्यानें त्रासून टाकल्यामुळे माझें मुख

परिश्रमाच्च सुप्ताहं राघवाङ्केऽस्म्यहं चिरम् ।
पर्यायेण प्रसुप्तश्च ममाङ्के भरताग्रजः २१
स तत्र पुनरेवाथ वायसः समुपागमत् ।
ततः सुप्तप्रबुद्धां मां राघवाङ्कात्समुत्थिताम् ॥
वायसः सहसागम्य विददार स्तनान्तरे २२
पुनः पुनरथोत्पत्य विददार स मां भृशम् ।
ततः समुत्थितो रामो मुक्तैः शोणितबिन्दुभिः २३
स मां दृष्ट्वा महाबाहुर्वितुन्नां स्तनयोस्तदा ।
आशीविष इव क्रुद्धः श्वसन्वाक्यमभाषत २४
केन ते नागनासोरु विक्षतं वै स्तनान्तरम् ।
कः क्रीडति सरोषेण पञ्चवक्त्रेण भोगिना २५
वीक्षमाणस्ततस्तं वै वायसं समवैक्षत ।
नखैः सरुधिरैस्तीक्ष्णैर्मामेवाभिमुखं स्थितम् २६

---

अर्धुनी भरून गेले होते आणि हळूहळू मी आपले डोळे पुसत होते, अशा वेळी तू मला पाहिलेस. ( १७-२० )

हे राघवा, हे भरताग्रजा रामा, श्रमल्यामुळे पाळीपाळीने आपल्या अंकावर मी व माझ्या अंकावर आपण या रीतीने एकमेकांच्या अंकावर आपण पुष्कळ वेळ पडलों; परंतु तो काकपक्षी पुनः तेथे आला. मी झोपेतून जागी होऊन रामाच्या मांडीवरून उठून बसलें होतें, तोंच त्याने एकाएकी माझ्याकडे येऊन, माझें वक्षस्थल ओरखडलें. अशा रीतीने तो पक्षी वारंवार उडून जाई आणि वारंवार माझें वक्षस्थल ओरखडून टाकी. नंतर रक्ताचे थेंब अंगावर पडल्यामुळे राम जागा झाला आणि मला स्तनाचे मध्यभागी ओरखडलेले आहे, असें पाहून तो सर्पाप्रमाणे रागावून फुत्कारे टाकूं लागला. तो महापराक्रमी राम मला म्हणाला. ( २१-२४ )

हे गजशुंडेसारखे चरण असलेल्या सीते, तुझ्या स्तनांमध्ये कोणी ओरखडले ! पंचमुखी क्रुद्ध नागाशीं असा खेळणारा कोण वरें आहे, तें मला सांग दे रम असें मला विचारीत आहे, इकडे तिकडे पहात आहे, तोंच त्याचा तीक्ष्ण नखें

पुत्रः किल स शक्रस्य वायसः पततां वरः ।
धरान्तरं गतः शीघ्रं पवनस्य गतौ समः २७
ततस्तस्मिन्महाबाहुः कोपसंवर्तितेक्षणः ।
वायसे कृतवान्क्रूरां मतिं मतिमतां वरः २८
स दर्भसंस्तराद्गृह्य ब्रह्मणोऽस्त्रेण योजयत् ।
स दीप्त इव कालाग्निर्ज्वालाभिमुखो द्विजम् २९
स तं प्रदीप्तं चिक्षेप दर्भं तं वायसं प्रति ।
ततस्तु वायसं दर्भः सोऽम्बरेऽनुजगाम ह ३०
अनुसृष्टस्तदा काको जगाम विविधां गतिम् ।
त्राणकाम इमं लोकं सर्वं वै विचचार ह ३१
स पित्रा च परित्यक्तः सर्वैश्च परमर्षिभिः ।
त्रीँल्लोकान्संपरिक्रम्य तमेव शरणं गतः ३२
स तं निपातितं भूमौ शरण्यः शरणागतम् ।

रत्नांनी भरलेली आहेत, असा तो माझ्यासमोरच बसलेला काकपक्षी त्याच्या दृष्टिस पडला खरोखर पक्ष्यामध्ये श्रेष्ठ असलेला तो काकपक्षी इंद्राचा पुत्र होता वायूसारखी गति असलेला तो पक्षी रामाला पाहताच, एकदम जमिनी-तील एका बिळात शिरला नंतर महापराक्रमी रामाचे डोळे रागाने लाल झाले आणि बुद्धिमानामध्ये श्रेष्ठ असलेल्या रामाच्या मनात त्या काकपक्ष्याविषयी क्रूर विचार आला तेव्हा दर्भास्तरणापैकी एक दर्भ घेऊन रामाने त्याचें ब्रह्मास्त्राने अभिमंत्रण केलें, तेव्हा तो प्रदीप्त झालेल्या कालाग्नीप्रमाणे त्या पक्ष्यापुढे प्रज्वलित होऊ लागला ( २५-२९ )

नंतर त्या काकपक्ष्यावर तो पेटलेला दर्भ रामाने सोडला, तेव्हा तो पक्षी जमिनींतील बिळातून निघाला व आकाशामध्ये त्याने उड्डाण केले, तरी त्या काकपक्ष्याच्या मागोमाग तो दर्भही लागलाच याप्रमाणे दर्भ त्याच्या मागे लागला तेव्हा तो पक्षी नानाप्रकारच्या गतींचें अवलंबन करून उडू लागला आणि आपलें रक्षण व्हावें म्हणून या सर्व जगतामध्यें तो हिंडला, परंतु, पित्याने आणि त्याचप्रमाणे सर्व महर्षींनीही जेव्हा त्याचा त्याग केला, तेव्हा सारें त्रैलोक्य

वधार्हमपि काकुत्स्थः कृपया पर्यपालयत् ३३
परिद्यूनं विवर्णं च पतमानं तमब्रवीत्।
मोघमस्त्रं न शक्यं तु ब्राह्मं कर्तुं तदुच्यताम् ३४
ततस्तस्याक्षि काकस्य हिनस्ति स्म स दक्षिणम्।
दत्त्वा तु दक्षिणं नेत्रं प्राणेभ्यः परिरक्षितः ३५
स रामाय नमस्कृत्वा राज्ञे दशरथाय च।
विसृष्टस्तेन वीरेण प्रतिपेदे स्वमालयम् ३६
मत्कृते काकमात्रेऽपि ब्रह्मास्त्रं समुदीरितम्।
कस्माद्यो माहरत्त्वत्तः क्षमसे तं महीपते ३७
स कुरुष्व महोत्साहां कृपां मयि नरर्षभ।
त्वया नाथवती नाथ अनाथा इव दृश्यते ३८

---

शेवटी तो रामालाच शरण गेला. तेव्हा शरण येऊन भूमीवर पडलेल्या काकपक्ष्याचा त्याच्या दुष्ट कर्मामुळे वध करणें जरी योग्य होतें, तरी शरणागताचें रक्षण करणाऱ्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला त्याची दया आली व त्याने त्याचें रक्षण केलें. सारांश, क्षोभित होऊन निस्तेज झालेल्या आणि उड्डाण करता-करताही खाली पडू लागलेल्या त्या काकपक्ष्याला तो म्हणाला " मला हें ब्रह्मास्त्र व्यर्थ होणें शक्य नाही. तेव्हा या अस्त्रापासून तुझ्या कोणत्या अवयवाचा नाश व्हावयास पाहिजे, तें तू मला सांग " ( ३०–३४ )

असें रामानें विचारल्यानंतर, त्यानें म्हटल्याप्रमाणें त्या काकपक्ष्याचा उजवा नेत्र रामानें नाहीसा केला. अशा प्रकारें आपला उजवा नेत्र देऊन या काकपक्ष्यानें आपले प्राण वाचवले. नंतर त्या वीर रामानें त्याला जाण्याची परवानगी दिली, तेव्हा तो इंद्रपुत्र जयंत रामाला आणि दशरथराजाला नमस्कार करून स्वस्थानी परत गेला. हे हनुमाना, म्हणून तू माझा असा निरोप रामाला कळीव की, हे भूपते, माझ्याकरिता य:कश्चित् काकपक्ष्यावरसुद्धा जर तू ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला होतास, तर ज्यानें तुझ्यापासून मला हरण करून नेलें, त्याला तू कशा-करिता क्षमा करीत आहेस ? हे पुरुषश्रेष्ठा, याकरता मला आनंद होणारें, कार्य करून तू माझ्यावर कृपा कर. हे नाथ, तुझ्यामुळे मी खरोखर सनाथ

आनृशंस्यं परो धर्मस्त्वत्त एव मया श्रुतम् ।
जानामि त्वां महावीर्यं महोत्साहं महाबलम् ३९
अपारपारमक्षोभ्यं गाम्भीर्यात्सागरोपमम् ।
भर्तारं ससमुद्राया धरण्या वासवोपमम् ४०
एवमस्त्रविदां श्रेष्ठो बलवान्सत्त्ववानपि ।
किमर्थमस्त्रं रक्षःसु न योजयसि राघव ४१
न नागा नापि गन्धर्वा न सुरा न मरुद्गणाः ।
रामस्य समरे वेगं शक्ताः प्रतिसमीहितुम् ४२
तस्य वीर्यवतः कश्चिद्यद्यस्ति मयि संभ्रमः ।
किमर्थं न शरैस्तीक्ष्णैः क्षयं नयति राक्षसान् ४३
भ्रातुरादेशमादाय लक्ष्मणो वा परंतपः ।
कस्य हेतोर्न मां वीरः परित्राति महाबलः ४४
यदि तौ पुरुषव्याघ्रौ वाय्विन्द्रसमतेजसौ ।

असतानाही आज अनाथाप्रमाणे झालें आहे. ( ३५—३८ )

अरे, दया हाच श्रेष्ठधर्म आहे; असें तुझ्या मुखातूनच मी ऐकिलें आहे; आणि तूं महावीर्यवान्, मोठा उत्साही, महाबलाढ्य, आदि-अंत न लागणारा, मनामध्ये न कचरणारा व गांभीर्यामुळे सागराची बरोबरी करणारा असा या समुद्रवलयांकित पृथ्वीचा इंद्रतुल्य भर्ता आहेस, हें मी जाणून आहें. परंतु, हे राघवा, याप्रमाणे तूं अस्त्रवेत्त्यामध्ये श्रेष्ठ, बलाढ्य व धैर्यवान् असतानाही राक्षसांवर अस्त्रप्रयोग कोणत्या कारणामुळे करत नाहीस ? नाग, गंधर्व, देव आणि मरुद्गण यांपैकीं कोणीही प्रतिपक्षी या नात्यानें रामाशीं संग्रामामध्ये युद्ध करण्यास आणि त्याचे आघात सहन करण्यास समर्थ नाहीं. त्या वरिष्ठ रामाला माझ्या सांप्रत-च्या स्थितीमुळे जर कांहीं क्षोभ उत्पन्न झाला असेल, तर तीक्ष्ण बाणांनीं तो या राक्षसांचा नाश का करून टाकीत नाही ? किंवा ज्येष्ठ बंधूची अनुज्ञा घेऊन, तो महाबलाढ्य, शत्रुतापन, वीर लक्ष्मण तरी कोणत्या कारणामुळे माझें रक्षण करावयास पुढे येत नाही ? ( ३९—४४ )

वायु आणि इंद्र यांसारखे तेजस्वी व देवांनाही अजिंक्य असे ते दोन्हा

सुराणामपि दुर्धर्षौ किमर्थं मामुपेक्षतः ४५
ममैव दुष्कृतं किंचिन्महदस्ति न संशयः।
समर्थावपि तौ यन्मां नावेक्षेते परंतपौ ४६
वैदेह्या वचनं श्रुत्वा करुणं साश्रुभाषितम्।
अथाब्रवीन्महातेजा हनूमान्हरियूथपः ४७
त्वच्छोकविमुखो रामो देवि सत्येन ते शपे।
रामे दुःखाभिपन्ने तु लक्ष्मणः परितप्यते ४८
कथंचिद्भवती दृष्टा न कालः परिशोचितुम्।
इमं मुहूर्तं दुःखानामन्तं द्रक्ष्यसि शोभने ४९
तावुभौ पुरुषव्याघ्रौ राजपुत्रौ महाबलौ।
त्वद्दर्शनकृतोत्साहौ लोकान्भस्मीकरिष्यतः ५०
हत्वा च समरक्रूरं रावणं सबान्धवम्।
राघवस्त्वां विशालाक्षि स्वां पुरीं प्रति नेष्यति ५१

पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण कशाकरितां माझी उपेक्षा करीत आहेत ? ते शत्रुतापन रामलक्ष्मण समर्थ असूनही ज्या अर्थी माझी परवा बाळगीत नाहीत, त्या अर्थी माझ्या हातूनच त्यांचे काहीतरी मोठें पातक घडलें आहे, यांत मुळींच संशय नाहीं." अश्रु टाळीत टाळीत करुण स्वराने सीतेने केलेलें हें भाषण ऐकून, तो वानरसेनाधिपति महातेजस्वी हनुमान् तिला म्हणाला " हे देवी, रामाला तुझ्या शोकामुळे अगदी काहीएक सुचेनासें झालें आहे, आणि राम दुःखित झाल्यामुळे लक्ष्मणाही अतिशय चिंताक्रान्त झाला आहे, हें मी तुला शपथपूर्वक खरें सांगतों. आतां कशीतरी आनन्दाने तूं दृष्टीस पडली आहेस तेव्हां या क्षणापासून शोक करण्याचें कारण राहिलें नाहीं, हें उघड आहे; कारण हे कल्याणी, तूं आतां तुझ्या दुःखाचा नाश झालेला आहे, असें लवकरच पाहशील. तुझ्या दर्शनाकरितां उत्सुक असलेले ते उभयतांही महापराक्रमी पुरुषश्रेष्ठ राजपुत्र तुझ्यासाठीं हे सर्व लोक भस्म करतील. ( ४५–५० )

हे विशालनेत्रे सीते, समरांगणांत क्रूर कर्म करणाऱ्या त्या रावणाचा त्याच्या बांधवांसह वध करून, राम तुला अयोध्यानगरीला घेऊन जाईल

ब्रूहि यद्राघवो वाच्यो लक्ष्मणश्च महाबलः ।
सुग्रीवो वापि तेजस्वी हरयो वा समागताः ५२
इत्युक्तवति तस्मिंश्च सीता पुनरथाब्रवीत् ।
कौसल्या लोकभर्तारं सुषुवे यं मनस्विनी ५३
तं ममार्थे सुखं पृच्छ शिरसा चाभिवादय ।
स्रजश्च सर्वरत्नानि प्रिया याश्च वराङ्गनाः ५४
ऐश्वर्यं च विशालायां पृथिव्यामपि दुर्लभम् ।
पितरं मातरं चैव संमान्याभिप्रसाद्य च ५५
अनुप्रव्रजितो रामं सुमित्रा येन सुप्रजाः ।
आनुकूल्येन धर्मात्मा त्यक्त्वा सुखमनुत्तमम् ५६
अनुगच्छति काकुत्स्थं भ्रातरं पालयन्वने ।
सिंहस्कन्धो महाबाहुर्मनस्वी प्रियदर्शनः ५७
पितृवद्वर्तते रामे मातृवन्मां समाचरत् ।
ह्रियमाणां तदा वीरो न तु मां वेद लक्ष्मणः ५८

काय निरोप सांगावयाचा आहे ? महाबलाढ्य लक्ष्मणाला काय विदित करावयाचें ? आणि तेजस्वी सुग्रीवाला अथवा तेथें जुळलेल्या वानरांना काय कळवावयाचें आहे ? तें मला सांग." याप्रमाणें त्या हनुमानानें भाषण केल्यावर सीता पुनः त्याला म्हणाली, "ज्या लोकनायकाला विचारी कौसल्या प्रसवली, त्याला तूं माझ्याकरितां मस्तकानें प्रणाम करून कुशल प्रश्न कर. माळा, सर्व प्रकारचीं रत्नें, प्रिय स्त्रिया आणि संपूर्ण पृथ्वीमध्येंही दुर्लभ ऐश्वर्य, यांचा त्याग करून व मातापितरांना संमानपूर्वक प्रसन्न करून घेऊन, जो रामाचे मागोमाग चालता झाला' (५१-५६)

ज्याच्या योगानें सुमित्रा सुपुत्रवती झाली, जो धर्म त्या अनुपम सुखाचा त्याग करून व अनुकूल वर्तन ठेवून वनामध्यें वडील बंधु रामाचें रक्षण करण्याकरितां त्याच्या मागोमाग जात आहे, सिंहासारखे स्कंध, आजानुबाहु आणि आल्हाद-कारक मुद्रा असलेला जो लक्ष्मण रामाला पित्याप्रमाणें मान देत आहे आणि मातेप्रमाणें जो माझ्याशीं वागला, त्या वीर लक्ष्मणाला रावण मला घेऊन जात

वृद्धोपसेवी लक्ष्मीवाञ्शक्तो न बहुभाषिता ।
राजपुत्रप्रियश्रेष्ठः सदृशः श्वशुरस्य मे ५९
मत्तः प्रियतरो नित्यं भ्राता रामस्य लक्ष्मणः ।
न युक्तो धुरि यस्यां तु तामुद्वहति वीर्यवान् ६०
यं दृष्ट्वा राघवो नैव वृत्तमार्यमनुस्मरत् ।
स ममार्थाय कुशलं वक्तव्यो वचनान्मम ६१
मृदुर्नित्यं शुचिर्दक्षः प्रियो रामस्य लक्ष्मणः ।
यथा हि वानरश्रेष्ठ दुःखक्षयकरो भवेत् ६२
त्वमस्मिन्कार्यनिर्वाहे प्रमाणं हरियूथप ।
राघवस्त्वत्समारम्भान्मयि यत्नपरो भवेत् ६३
इदं ब्रूयाश्च मे नाथं शूरं रामं पुनः पुनः ।
जीवितं धारयिष्यामि मासं दशरथात्मज ६४
ऊर्ध्वं मासान्न जीवेयं सत्येनाहं ब्रवीमि ते ।

---

आहे, हें समजलें नाही जो वृद्धांशीं साहचर्य करणारा आहे, वैभवशाली व समर्थ असून जो मित भाषण करणारा आहे, राजपुत्र रामाला जो अति प्रिय आहे, माझ्या सासऱ्यासारखी ज्याची वागणूक आहे, लक्ष्मण हें ज्याचें नाव असून, रामाला जो माझ्यापेक्षाही नेहमीच अधिक प्रिय आहे, आजपर्यंत आयुष्यात जें कार्य करण्याचा प्रसंग पडला नाही, तें कार्यही जो वीर्यवान् असल्यामुळे पार पाडीत आहे आणि ज्याच्याकडे पाहून आपल्या निवृत्त झालेल्या पित्याचें स्मरण होईनासें झालें आहे, त्या लक्ष्मणाला तू माझ्याकरिता माझ्या सांगण्यावरून कुशल प्रश्न कर, म्हणजे, हे वानरश्रेष्ठा, नेहमी सौम्य, शुचि, दक्ष आणि रामाला प्रिय असा तो लक्ष्मण माझें दुःख नाहीसें करील ( ५६–६२ )

हे वानरसेनाधिपते, [illegible] माझें कार्य सिद्धीस जाण्याविषयी मी तुझ्यावरच अवलंबून आहे; कारण तू कार्याचा उपक्रम केल्यास, म्हणजे राम माझ्या सुटकेविषयी यत्न करूं लागेल माझा नाथ जो शूर राम, त्याला पुनः पुनः तू माझा असा निरोप सांग की, " हे दशरथपुत्रा, यापुढें मी एक महिना भर जीव धरून राहीन या महिन्याच्यापुढे मी जिवंत राहणार नाहीं, हें मी खरें

रावणेनोपरुद्धां मां निकृत्या पापकर्मणा ।
त्रातुमर्हसि वीर त्वं पातालादिव कौशिकीम् ६५
ततो वस्त्रगतं मुक्त्वा दिव्यं चूडामणिं शुभम् ।
प्रदेयो राघवायेति सीता हनुमते ददौ ६६
प्रतिगृह्य ततो वीरो मणिरत्नमनुत्तमम् ।
अङ्गुल्या योजयामास नह्यस्य प्राभवद्भुजः ६७
मणिरत्नं कपिवरः प्रतिगृह्याभिवाद्य च ।
सीतां प्रदक्षिणं कृत्वा प्रणतः पार्श्वतः स्थितः ६८
हर्षेण महता युक्तः सीतादर्शनजेन सः ।
हृदयेन गतो रामं लक्ष्मणं च सलक्षणम् ६९
मणिवरमुपगृह्य तं महार्हं जनकनृपात्मजया धृतं प्रभावात् ।
गिरिरिव पवनावधूतमुक्तः सुखितमनाः प्रतिसंक्रमं प्रपेदे ७०
इत्यार्षे श्रीमद्रामा० वाल्मी० आदिकाव्ये सुन्दरकाण्डेऽष्टत्रिंशः सर्गः ॥३८॥ [१६८४]

खरें सांगून ठेवतें. म्हणून पातालामध्ये बुडून गेलेल्या पृथ्वीला, ज्याप्रमाणे भगवानांनी तारलें, त्याप्रमाणे हे वीरा, दुराचारी रावणानें कपट करून मला येथें अडकवून ठेविलें आहे. त्यांतून माझी तूं सुटका कर, मला तूं तार." (६३–६५)

• असा निरोप सांगितल्यानंतर सीतेने पदरांत बांधून ठेविलेलें एक दिव्य व शुभ शिरोरत्न सोडलें, आणि ' हें रामाला दे, ' असें म्हणून तिनें तें हनुमानाच्या स्वाधीन केलें. नंतर वीर हनुमानानें तें अनुपम श्रेष्ठ रत्न घेऊन आपल्या बोटाला घट्ट बांधून ठेवलें. तथापि तें रत्न स्वीकारण्यास मनापासून त्याचा हात पुढें झाला नाही. असो. शेवटीं तें मौल्यवान् रत्न घेऊन, त्यानें सीतेला अभिवंदन केलें, आणि तिला प्रदक्षिणा केल्यावर नम्र होऊन तो तिच्या बाजूस उभा राहिला. सीतेचें दर्शन झाल्यामुळे त्याला मोठा हर्ष झाला आणि राजलक्षणांनी युक्त असलेल्या लक्ष्मणाचें व रामाचें त्याला स्मरण झालें. त्यानें जनकराजाच्या कन्येनें अंतःपुरातल्या राक्षसींना न दिसेल अशा युक्तीनें जवळ ठेवलेलें तें बहुमूल्य श्रेष्ठ रत्न घेतलें. प्रथमतः सीतेचें दर्शन न झाल्यामुळे उच्च पर्वतावर असलेल्या पुरुषाप्रमाणे दुःखानें कंपित झालेला आणि नंतर सीतेचें दर्शन झाल्यामुळे

एकोनचत्वारिंशः सर्गः ।

मणिं दत्त्वा ततः सीता हनूमन्तमथाब्रवीत् ।
अभिज्ञानमभिज्ञातमेतद्रामस्य तत्त्वतः १
मणिं दृष्ट्वा तु रामो वै त्रयाणां संस्मरिष्यति ।
वीरो जनन्या मम च राज्ञो दशरथस्य च २
स भूयस्त्वं समुत्साहचोदितो हरिसत्तम ।
अस्मिन्कार्यसमुत्साहे प्रचिन्तय यदुत्तरम् ३
त्वमस्मिन्कार्यनिर्योगे प्रमाणं हरिसत्तम ।
तस्य चिन्तय यो यत्नो दुःखक्षयकरो भवेत् ४
हनुमन्यत्नमास्थाय दुःखक्षयकरो भव ।
स तथेति प्रतिज्ञाय मारुतिर्भीमविक्रमः ५
शिरसा वन्द्य वैदेहीं गमनायोपचक्रमे ।
ज्ञात्वा संप्रस्थितं देवी वानरं पवनात्मजम् ६

करण्याकरतां आलेला असा तो हनुमान् मनामध्ये प्रसन्न झाला व तेथून परत जाण्याची तयारी करूं लागला ( ६६–७० )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांपैकीं अडतिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ३८ ॥

हनुमंताला चुडेचें रत्न दिल्यानंतर सीता म्हणाली, " हें रत्न रामाच्या चांगलें ओळखीचें आहे. हें रत्न पाहिल्यावर त्या वीर रामाला मी, माता कौसल्या आणि दशरथराजा या तिघांचें स्मरण होईल; म्हणून हे वानरश्रेष्ठा, तुला हें माझ्या सुटकेचें कार्य हातीं घेण्याविषयीं प्रेरणा होईल, आणि अशी प्रेरणा झाल्यानंतर पुढें काय करावयाचें, त्याचा तूं विचार कर. हे वानरश्रेष्ठा, हें कार्य पार पाडण्याविषयीं सारा तुझ्यावर भार आहे, याकरितां रामानें योजावा असा प्रयत्न केला असतां सर्व दुःखाचा नाश होईल, तो तूं मनामध्ये आणून हे हनुमंता, हवे ते यत्न करून, तूं माझ्या दुःखाचा परिहार कर." त्यावर "ठीक आहे," असें म्हणून त्या अचाट पराक्रमी मारुतीनें सीतेला मस्तक लववून प्रणाम केला आणि तो तेथून निघण्यास तयार झाला. वायुपुत्र वानर परत निघाला, असें पाहून मैथिली,

बाष्पगद्गदया वाचा मैथिली वाक्यमब्रवीत् ।
हनूमन्कुशलं ब्रूयाः सहितौ रामलक्ष्मणौ ७
सुग्रीवं च सहामात्यं सर्वान्वृद्धांश्च वानरान् ।
ब्रूयास्त्वं वानरश्रेष्ठ कुशलं धर्मसंहितम् ८
यथा च स महाबाहुर्मां तारयति राघवः ।
अस्माद्दुःखाम्बुसंरोधात्त्वं समाधातुमर्हसि ९
जीवन्तीं मां यथा रामः संभावयति कीर्तिमान् ।
तत्त्वया हनुमन्वाच्यं वाचा धर्ममवाप्नुहि १०
नित्यमुत्साहयुक्तस्य वाचः श्रुत्वा मयेरिताः ।
वर्धिष्यते दाशरथेः पौरुषं मदवाप्तये ११
मत्संदेशयुता वाचस्त्वत्तः श्रुत्वैव राघवः ।
पराक्रमे मतिं वीरो विधिवत्संविधास्यति १२
सीतायास्तद्वचः श्रुत्वा हनूमान्मारुतात्मजः ।
शिरस्यञ्जलिमाधाय वाक्यमुत्तरमब्रवीत् १३
क्षिप्रमेष्यति काकुत्स्थो हर्यृक्षप्रवरैर्वृतः ।

---

अश्रूंनी कंठ दाटून आल्यामुळें, अडखळत अडखळत त्याला म्हणाली, " हे हनुमाना, उभयतां रामलक्ष्मणांना तूं माझें कुशल सांग आणि त्याचप्रमाणें हे वानरश्रेष्ठा, अमात्यांसह सुग्रीवाला व सर्व वृद्ध वानरांना तूं धर्माला अनुसरून कुशल सांग व तो महापराक्रमी राम या दुःखसागरांतून मला तारील, अशा रीतीनें तूं त्याचें मन वळीव. ( १-९ )

हे हनुमाना, मी जिवंत असतानाच तो कीर्तिमान् राम माझें रक्षण करील, असें भाषण तूं त्याच्याशीं कर आणि आपल्या चतुराईच्या बळावर मला दुःखांतून पार पाडण्याचें धर्मकार्य तुझ्या हातून होऊं दे. मी जें शब्द तुझ्याशीं बोललें, ते ऐकल्यावर नेहमी उत्साहयुक्त असलेला दशरथपुत्र राम माझ्या प्राप्तीकरतां अधिकाधिकच प्रयत्न करीत जाईल. माझा निरोप तुझ्या मुखांतून ऐकतांच राम स्वतःसाठीं पराक्रम करण्याचा योग्य तो विचार करील. " ( १०-१२ )

सीतेचें हें भाषण ऐकल्यानंतर वायुपुत्र हनुमानानें मस्तकीं हात जोडले व निरो

यस्ते युधि विजित्यारीञ्शोकं व्यपनयिष्यति १४
न हि पश्यामि मर्त्येषु नासुरेषु सुरेषु वा ।
यस्तस्य वमतो बाणान्स्थातुमुत्सहतेऽग्रतः १५
अप्यर्कमपि पर्जन्यमपि वैवस्वतं यमम् ।
स हि सोढुं रणे शक्तस्तव हेतोर्विशेषत १६
स हि सागरपर्यन्तां महीं साधितुमर्हति ।
त्वन्निमित्तो हि रामस्य जयो जनकनन्दिनि १७
तस्य तद्वचनं श्रुत्वा सम्यक्सत्यं सुभाषितम् ।
जानकी बहु मेने तं वचनं चेदमब्रवीत् १८
ततस्तं प्रस्थितं सीता वीक्ष्यमाणा पुनः पुनः ।
भर्तृस्नेहान्वितं वाक्यं सौहार्दादनुमानयत् १९
यदि वा मन्यसे वीर वसैकाहमरिन्दम ।
कस्मिंश्चित्संवृते देशे विश्रान्तः श्वो गमिष्यसि २०

म्हणाला " श्रेष्ठ श्रेष्ठ वानर आणि अस्वलें यांचें सैन्य बरोबर घेऊन ककुत्स्थकुलोत्पन्न राम लवकर इकडे येईल, आणि शत्रूंना युद्धामध्ये जिंकून, तो लवकरच तुझ्या दुःखाचा परिहार करील. एकदा राम बाण सोडू लागला, म्हणजे त्याच्यासमोर उभा राहण्यास समर्थ होईल, असा कोणीही वीर, पुरुष, मनुष्य, दैत्य अथवा देव यांच्यामध्ये आहे, असें मला आढळत नाही ( १३-१५ )

संग्रामामध्ये सूर्याशीं, इंद्राशीं अथवा वैवस्वत यमाशींही युद्ध करण्यास तो समर्थ आहे,-तर विशेषेंकरून तुझ्याकरितां-तर तो त्यांच्याशींही युद्ध करण्याचा प्रसंग पडला, तरी मागेंपुढे पाहणारच नाही, हें निश्चित. तो समुद्रवलयांकित पृथ्वीही जिंकण्यास तो समर्थ आहे. म्हणून हे जनककन्ये, तुझ्याकरितां राम हा त्याचा पराजय करणारा आहे" हनुमानानें केलेलें हें सत्य भाषण मानिलें उत्तम महत्त्वाचें वाटलें आणि तिनें त्याच्याशीं दुसरें काही भाषणही केलें तो हनुमान निघाला, तेव्हा सीता वारंवार त्याच्याकडे पाहू लागली, आणि भर्त्याच्या प्रेमानें उदात्त सबब आहे, अशा त्या हनुमानाच्या भाषणाची प्रेमानें तिनें प्रशंसा केली नंतर ती म्हणाली, " हे शत्रुदमना, वीरा, हनुमाना, कोणत्यातरी एकाद्या [illegible]

मम चैवाल्पभाग्यायाः सांनिध्यात्तव वानर।
अस्य शोकस्य महतो मुहूर्तं मोक्षणं भवेत् २१
ततो हि हरिशार्दूल पुनरागमनाय तु।
प्राणानामपि संदेहो मम स्यान्नात्र संशयः २२
तवादर्शनजः शोको भूयो मां परितापयेत्।
दुःखाद्दुःखपराभूतां दीपयन्निव वानरः २३
अयं च वीर संदेहस्तिष्ठतीव ममाग्रतः।
सुमहांस्त्वत्सहायेषु हर्यृक्षेषु हरीश्वरः २४
कथं नु खलु दुष्पारं तरिष्यति महोदधिम्।
तानि हर्यृक्षसैन्यानि तौ वा नरवरात्मजौ २५
त्रयाणामेव भूतानां सागरस्येह लङ्घने।
शक्तिः स्याद्वैनतेयस्य तव वा मारुतस्य वा २६

---

अदेशामध्ये वाटेल, तर तूं एक दिवस रहा. तूं विश्रांति घेऊन उद्या परत जाशील. ( १६-२० )

अशा प्रकारें तूं राहिलास, म्हणजे हे वानरा, या भाग्यहीन स्त्रीची, तुझें सान्निध्य लाभल्यामुळे या प्रचंड शोकांतून क्षणभर तरी सुटका होईल, कारण हे वानर-श्रेष्ठा, पुनः तरी तुझें आगमन येथे होण्याची पंचाईतच आहे आणि यदाकदा-चित् जरी झाले, तरी तोंपर्यंत खरोखर मी जिवंत राहीन की नाही, याबद्दल मला संशयच आहे हे वानरा, तूं माझ्या दृष्टिआड झालास म्हणजे मला अधिकच शोक होईल. मी अत्यंत दुःख भोगीत आहें त्याने या माझ्या अंगाचा जसा काही तूं गेल्यामुळे भडकाच उडेल. हे वीरा, माझ्या मनामध्ये हा एक जबरदस्त संशय येत आहे. तुला सहाय्य करणारे वानर व अस्वल एकत्र जुळले, तरी वानराधिपति सुग्रीव हा दुस्तर महासागर ओलांडून पुढे येण्यास कसा बरें समर्थ होईल ? किंवा अस्वलवानरांच्या त्या सेना अथवा ते पुरुषश्रेष्ठ दशरथाचे पुत्र तरी महासागराचें उल्लंघन करण्यास कसे समर्थ होतील ? या जगतामध्ये समुद्र उल्लंघन करण्याचें सामर्थ्य तीनच प्राण्यांचे ठिकाणीं असण्याचा संभव आहे. गरुडाचे ठिकाणीं, तुझ्या ठिकाणी आणि वायूचे ठिकाणीं, तेव्हा हें दुर्घट कार्य पार पाडण्या-

तदस्मिन्कार्यनियोगे वीरैवं दुरतिक्रमे ।
किं पश्यसे समाधानं त्वं हि कार्यविदां वरः २७
काममस्य त्वमेवैकः कार्यस्य परिसाधने ।
पर्याप्तः परवीरघ्न यशस्यस्ते फलोदयः २८
बलैः समग्रैर्युधि मां रावणं जित्य संयुगे ।
विजयी स्वपुरं यायात्तत्तस्य सदृशं भवेत् २९
बलैस्तु संकुलां कृत्वा लङ्कां परबलार्दनः ।
मां नयेद्यदि काकुत्स्थस्तत्तस्य सदृशं भवेत् ३०
तद्यथा तस्य विक्रान्तमनुरूपं महात्मनः ।
भवेदाहवशूरस्य तथा त्वमुपपादय ३१
तदर्थोपहितं वाक्यं प्रश्रितं हेतुसंहितम् ।
निशम्य हनुमाञ्शेषं वाक्यमुत्तरमब्रवीत् ३२
देवि हर्यृक्षसैन्यानामीश्वरः प्लवतां वरः ।
सुग्रीवः सत्यसंपन्नस्तवार्थे कृतनिश्चयः ३३

चा दुसरा कोणता उपाय तुला दिसत आहे ? हे वीरा, तू स्वकार्य कर्मे शेवटास न्यावें, हें जाणणाऱ्यामध्ये श्रेष्ठ आहेस ( २१–२७ )

हे शत्रुपक्षीय वीरनाशक हनुमाना, तूं एकट्याच खरोखर हें कार्य पार पाडण्यास समर्थ आहेस परंतु, तुझ्या एकट्याचे हातून हें कार्य शेवटास गेलें तर कीर्तिवर्धक असें विजयरूपी फल्ही तलाच प्राप्त होईल, रामास होणार नाही. परंतु संपूर्ण सैन्यें बरोबर घेऊन आणि संग्रामामध्ये रावणाला जिंकून विजय झाल्यावर जर राम मला घेऊन आपल्या राजधानीला जाईल, तर तेंच त्याला शोभेल शत्रुसैन्याचें मर्दन करणारा तो राम आपल्या सैन्याच्या योगाने लंकेमध्ये सर्वांची दाणादाण उडवून देऊन, जर मला घेऊन जाईल, तर तें त्याच्या नावलौकिकाला योग्य होईल, म्हणून त्या रणशूर महात्म्याचे हातून त्याला योग्य असा पराक्रम होईल, अशी तू योजना कर. " ( २८–३१ )

अर्थ, विनय आणि हेतु यांनी भरलेलें तें सीतेचें भाषण ऐकून घेऊन, हनुमान शेवटीं म्हणाला " हे देवी, वानर आणि अस्वलें यांच्या सैन्याचा अधिपति जो

स वानरसहस्राणां कोटीभिरभिसंवृतः ।
क्षिप्रमेष्यति वैदेहि राक्षसानां निबर्हणः ३४
तस्य विक्रमसंपन्नाः सत्त्ववन्तो महाबलाः ।
मनःसंकल्पसंपाता निदेशे हरयः स्थिताः ३५
येषां नोपरि नाधस्तान्न तिर्यक्सज्जते गतिः ।
न च कर्मसु सीदन्ति महत्स्वमिततेजसः ३६
असकृत्तैर्महोत्साहैः ससागरधराधरा ।
प्रदक्षिणीकृता भूमिर्वायुमार्गानुसारिभिः ३७
मद्विशिष्टाश्च तुल्याश्च सन्ति तत्र वनौकसः ।
मत्तः प्रत्यवरः कश्चिन्नास्ति सुग्रीवसंनिधौ ३८
अहं तावदिह प्राप्तः किं पुनस्ते महाबलाः ।
न हि प्रकृष्टाः प्रेष्यन्ते प्रेष्यन्ते हीतरे जनाः ३९
तदलं परितापेन देवि शोको व्यपैतु ते ।

वानरश्रेष्ठ सुग्रीव, तो सत्यनिष्ठ आहे आणि तुझे कार्य पार पाडण्याविषयीं त्याने ठाम निश्चय केलेला आहे. हे सीते, हजारो वानरांच्या कोट्यावधि झुंडी बरोबर घेऊन, तो राक्षसनाशक सत्वरच इकडे येईल पराक्रमी, धैर्यवान्, महाबलाढ्य आणि इच्छेप्रमाणे उड्डाण करणारे वानर त्याच्या आज्ञेत आहेत ऊर्ध्वभागीं, अधोभागीं आणि आठही दिशाना त्यांची गति कुंठित होत नाही आणि अपरिमित तेज असलेले ते वानर कसल्याही मोठ्या कर्मामध्ये कोणाला हार जात नाहीत ( ३२—३६ )

आकाशमार्गाने गमन करणाऱ्या महोत्साही वानरानी सागर आणि पर्वत यासह अनेक वेळा पृथ्वीला प्रदक्षिणा केली आहे. सुग्रीवाजवळ माझ्यापेक्षा पराक्रमात कमी असा कोणीही नाही जे काही वानर आहेत, त्यापैकी काही माझ्यापेक्षाही जास्त आहेत आणि काही माझ्या बरोबरीचे आहेत. मी कनिष्ठ प्रतीतला असूनही जर येथे आलों आहे, तर त्या महाबलाढ्य वानरांची गोष्ट पाहिजे कशाला ? मोठ्यामोठ्याना हलक्यासलक्या कर्मे करण्याकरिता कोणी पाठवीत नाहीत, ते कनिष्ठानाच बाहेर पाठवीत असतात. म्हणून हे देवी, तूं मनाला

एकोत्पातेन ते लङ्कामेष्यन्ति हरियूथपाः ४०
मम पृष्ठगतौ तौ च चन्द्रसूर्याविवोदितौ ।
त्वत्सकाशं महासङ्घौ नृसिंहावागमिष्यतः ४१
तौ हि वीरौ नरवरौ सहितौ रामलक्ष्मणौ ।
आगम्य नगरीं लङ्कां सायकैर्विधमिष्यतः ४२
सगणं रावणं हत्वा राघवो रघुनन्दनः ।
त्वामादाय वरारोहे स्वपुरीं प्रति यास्यति ४३
तदाश्वसिहि भद्रं ते भव त्वं कालकाङ्क्षिणी ।
न चिराद्द्रक्ष्यसे रामं प्रज्वलन्तमिवानलम् ४४
निहते राक्षसेन्द्रे च सपुत्रामात्यबान्धवे ।
त्वं समेष्यसि रामेण शशाङ्केनेव रोहिणी ४५
क्षिप्रं त्वं देवि शोकस्य पारं द्रक्ष्यसि मैथिलि ।
रावणं चैव रामेण द्रक्ष्यसे निहतं बलात् ४६
एवमाश्वास्य वैदेहीं हनूमान्मारुतात्मजः ।

---

संताप करून घेऊ नकोस. तुझा शोक आता पुरे झाला. ते वानरसेनाधिपति एका उड्डाणानेच लंकेमध्ये येतील. (३७-४०)

उदय पावलेल्या चंद्रसूर्याप्रमाणे असलेले ते पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण माझ्या पाठीवर बसून आणि मोठमोठ्या सेना बरोबर घेऊन येथे तुझ्याकडे येतील. एकत्र असलेले ते उभयता वीर पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण येथे येऊन लंकानगरी बाणांनी उद्ध्वस्त करतील. सारांश, रघुनंदन राम आपल्या अनुयायांसह रावणाचा वध करील आणि हे सुंदरी, तुला घेऊन आपल्या राजधानीला परत जाईल. यासाठी तू धीर धर आणि योग्य कालाची प्रतीक्षा करीत रहा. तुझे कल्याण होईल, आणि प्रज्वलित अग्नीप्रमाणे असलेल्या रामाला तू लवकर पाहशील. व रोहिणीचा ज्याप्रमाणे चंद्राशी समागम होत असतो, त्याप्रमाणे पुत्र, अमात्य आणि बांधव यांसह राक्षसाधिपति रावणाचा वध होऊन तुझा रामाशी समागम होईल. हे मैथिली, सांप्रतच्या शोकाचा शेवट झालेला पाहण्याचा प्रसंग तुला येईल आणि रामाच्या हातून रावणाचा वध पावल्याचेही तू लवकरच पाहशील." (४१-४६)

गमनाय मतिं कृत्वा वैदेहीं पुनरब्रवीत् ४७
तमरिघ्नं कृतात्मानं क्षिप्रं द्रक्ष्यसि राघवम् ।
लक्ष्मणं च धनुष्पाणिं लङ्काद्वारमुपागतम् ४८
नखदंष्ट्रायुधान्वीरान्सिंहशार्दूलविक्रमान् ।
वानरान्वारणेन्द्राभान्क्षिप्रं द्रक्ष्यसि संगतान् ४९
शैलाम्बुदनिकाशानां लङ्कामलयसानुषु ।
नर्दतां कपिमुख्यानामार्ये यूथान्यनेकशः ५०
स तु मर्मणि घोरेण ताडितो मन्मथेषुणा ।
न शर्म लभते रामः सिंहार्दित इव द्विपः ५१
रुद मा देवि शोकेन मा भूत्ते मनसो भयम् ।
शचीव भर्त्रा शक्रेण सङ्गमेष्यसि शोभने ५२
रामाद्विशिष्टः कोऽन्योऽस्ति कश्चित्सौमित्रिणा समः ।
अग्निमारुतकल्पौ तौ भ्रातरौ तव संश्रयौ ५३

याप्रमाणे सीतेला धीर देऊन, वायुपुत्र हनुमानानें तेथून जाण्याचा विचार केला आणि पुनरपि तो सीतेला म्हणाला,"तूं शत्रुनाशक महात्मा राम आणि हातामध्ये धनुष्य घेतलेला लक्ष्मण लंकेच्या द्वाराशीं येऊन ठेपल्याचें लवकरच पाहशील नखें आणि दंष्ट्रा हींच ज्यांचीं आयुधें आहेत, सिंह आणि व्याघ्र याप्रमाणे ज्यांचे पराक्रम आहेत आणि गजेंद्रासारखीं ज्यांचीं शरीरें आहेत, असे वीर वानर येथे एकत्र जुळलेले तूं सत्वरच पहशील हे साध्वी, लंकेंतील मलयपर्वताच्या शिखरावर गर्जना करीत असलेल्या आणि पर्वत व मेघ यांचेप्रमाणे दिसत असलेल्या मोठमोठ्या वानराच्या अनेक झुंडीच्या झुंडी तुझ्या दृष्टीस पडतील. सिंहानें जर्जर केलेल्या गजाप्रमाणे, मदनाचे घोर बाण मर्मस्थानीं बसून पीडित झालेल्या रामाला सुख मुळीच वाटत नाहीं (४६—५१)

हे देवी, तूं रडूं नकोस आणि शोकामुळे तूं आपला धीर खचू देऊं नकोस हे कल्याणी, इंद्राणीचा ज्याप्रमाणे इंद्राशीं समागम होतो, त्याप्रमाणे तुझा भर्त्याशीं, रामाशीं समागम होईल रामापेक्षा अधिक प्रतापी कोण आहे ? आणि लक्ष्मणाची बरोबरी करणारा तरी कोण आढळणार आहे ? तुझ्यावरच अवलंबून

नास्मिश्चिरं वत्स्यसि देवि देशे रक्षोगणैरध्युषितेऽतिरौद्रे ।
न ते चिरादागमनं प्रियस्य क्षमस्व मत्संगमकालमात्रम् ५४
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे एकोनचत्वारिंशः सर्गः ।३९।

चत्वारिंशः सर्गः । [ १७३८ ]

श्रुत्वा तु वचनं तस्य वायुसूनोर्महात्मनः ।
उवाचात्महितं वाक्यं सीता सुरसुतोपमा १
त्वां दृष्ट्वा प्रियवक्तारं संप्रहृष्यामि वानर ।
अर्धसंजातसस्येव वृष्टिं प्राप्य वसुंधरा २
यथा तं पुरुषव्याघ्रं गात्रैः शोकाभिकर्शितैः ।
संस्पृशेयं सकामाहं तथा कुरु दयां मयि ३
अभिज्ञानं च रामस्य दद्या हरिगणोत्तम ।
क्षिप्तामिषीकां काकस्य कोपादेकाक्षिशातनीम् ४

राक्षणाने ते दोघे धधु आणि च वायु याचेप्रमाणे आहेत हे देवी राक्षसगणानी वस्ती केलेल्या या अति भयंकर प्रदेशात यापुढे तुला आता फार दिवस रहावें लागणार नाही तुझ्या प्रियकराचें इकडे लवकर आगमन होईल. माझी व त्याची भेट होण्यास लागेल इतकाच काळ लोटेपर्यंत, तू आता त्याची वाट पहा, म्हणजे झाले " (५२-५४)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांपैकी एकूणचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३९ ॥

त्या महात्म्या वायुपुत्र हनुमानाचें तें हितकर भाषण ऐकून देवकन्येप्रमाणे असलेली सीता त्याला म्हणाली, " हे वानरा, अर्धवट धान्यें जिच्यामध्ये उगवलीं आहेत, अशा पृथ्वीला ज्याप्रमाणे पर्जन्यवृष्टि प्राप्त झाली असता आनंद होतो, त्याप्रमाणे प्रिय भाषण करणाऱ्या तुला पाहून, मला आनंद होत आहे. म्हणून शोकानी कृश झालेल्या या गात्रानी त्या पुरुषश्रेष्ठ रामाला स्पर्श करून मी कृतार्थ होईन, अशा प्रकारची तूं मजवर दया कर. हे महागुणवान् वानरा, काकपक्ष्याचा एक नेत्र नाहींसा करून टाकणारी इषीकास्त्र सोडल्याची खूण तूं रामाला दे आणि त्याला असेंही सांग की, ( १-४ )

मनःशिलायास्तिलको गण्डपार्श्वे निवेशितः ।
त्वया प्रणष्टे तिलके तं किल स्मर्तुमर्हसि ५
स वीर्यवान्कथं सीतां हृतां समनुमन्यसे ।
वसन्तीं रक्षसां मध्ये महेन्द्रवरुणोपम ६
एष चूडामणिर्दिव्यो मया सुपरिरक्षितः ।
एतं दृष्ट्वा प्रहृष्यामि व्यसने त्वामिवानघ ७
एष निर्यातितः श्रीमान्मया ते वारिसंभवः ।
अतः परं न शक्ष्यामि जीवितुं शोकलालसा ८
असह्यानि च दुःखानि वाचश्च हृदयच्छिदः ।
राक्षसैः सह संवासं त्वत्कृते मर्षयाम्यहम् ९
धारयिष्यामि मासं तु जीवितं शत्रुसूदन ।
मासादूर्ध्वं न जीविष्ये त्वया हीना नृपात्मज १०
घोरो राक्षसराजोऽयं दृष्टिश्च न सुखा मयि ।
त्वां च श्रुत्वा विपज्जन्तं न जीवेयमपि क्षणम् ११

पूर्वीचा तिलक पुसून गेला असतां माझ्या गालावर तूं एक जो मनःशिलेचा तिलक लावला होतास, त्याची आठवण कर. हे इंद्रवरुणतुल्य रामा, वीर्यवान असतांही रावणाने हरण केल्यामुळे सीता राक्षसगृहीं रहात आहे हें तुला सहन कसें होतें ? हे निष्पापा रामा, हें दिव्य शिरोरत्न मी फारच जपून ठेविलें होतें; कारण संकटामध्ये तुझें दर्शन झाल्यावर जसा मला आनंद होतो, तसा हें रत्न अवलोकन करून, मला आनंद होत असतो. हें पाण्यांत उत्पन्न झालेलें उत्तम रत्न मी तुझ्याकडे पाठविलें आहे; यामुळे शोकाकुल झालेली मी यापुढे जिवंत राहणें शक्य नाहीं. असह्य दुःखें, मर्मभेदक भाषणें आणि राक्षसामधें राहणें हीं मी तुझ्याकरितां सहन करीत आहें. हे राजपुत्रा, एक महिनाभर मी जीव धरून राहीन. महिन्यानंतर तुझ्यावाचून मी जिवंत राहणार नाहीं. ( ५—१० )

हा राक्षसाधिपति रावण क्रूर आहे. माझ्यावरची याची दृष्टिही चांगली नाहीं. तेव्हां इतकें असून तूंही आणखी इकडे येण्यास उशीर करीत आहेस, हें माझ्या

वैदेह्या वचनं श्रुत्वा करुणं साश्रुभाषितम् ।
अथाब्रवीन्महातेजा हनूमान्मारुतात्मजः ॥ १२
त्वच्छोकविमुखो रामो देवि सत्येन ते शपे ।
रामे शोकाभिभूते तु लक्ष्मणः परितप्यते ॥ १३
दृष्टा कथंचिद्भवती न कालः परिदेवितुम् ।
इमं मुहूर्तं दुःखानामन्तं द्रक्ष्यसि भामिनि ॥ १४
तावुभौ पुरुषव्याघ्रौ राजपुत्रावनिन्दितौ ।
त्वद्दर्शनकृतोत्साहौ लङ्कां भस्मीकरिष्यतः ॥ १५
हत्वा तु समरे क्रूरं रावणं सहबान्धवैः ।
राघवौ त्वां विशालाक्षि स्वां पुरीं प्रति नेष्यतः ॥ १६
यत्तु रामो विजानीयादभिज्ञानमनिन्दिते ।
प्रीतिसंजननं भूयस्तस्य त्वं दातुमर्हसि ॥ १७
साब्रवीद्दत्तमेवाहो मयाभिज्ञानमुत्तमम् ।
एतदेव हि रामस्य दृष्ट्वा यत्नेन भूषणम् ॥ १८

च नावर आलें, म्हणजे मी एक क्षणभरही जिवंत राहू शकणार नाही " डोळ्यांमध्ये अश्रु आणून सीतेने केलेलें हें दीन भाषण श्रवण केल्यावर मोठा तेजस्वी वायुपुत्र हनुमान् तिला म्हणाला " हे देवी, तुझ्या शोकामुळे रामाची मुखचर्या अगदी पालटून गेला आहे आणि राम शोकाकुल झाला असल्यामुळे लक्ष्मणही दुःखित झाला आहे, हें मी तुला शपथपूर्वक खरें सांगतो, परंतु, आता कसा तरी तुझा शोध लागला आहे, तव्हा शोक करण्याचा वेळ अता उरला नाही हे साध्वी, या घटकेलाच तुझ्या दुःखाचा शेवट होईल निंदेला पात्र नसलेले ते उभयता पुरुषश्रेष्ठ राजपुत्र तुझ्या दर्शनाकरिता उत्सुक असल्यामुळे ते लंका भस्म करून टाकतील ( ११—१५ )

हे विशालनयन, युद्धामध्ये रावणाचा कुलासहीत वध करून, ते रामलक्ष्मण तुला आपल्या राजधानीला घेऊन जातील हे निर्दोष सीते, ज्याची रामाला चांगली ओळख पटेल अणे ज्याच्या योगाने त्याला आनंद होईल अशी आपली एक खूण तू रामाला दे " यावर ती म्हणाली " अरे, मी उत्तम खूण

श्रद्धेयं हनुमन्वाक्यं तव वीर भविष्यति ।
स तं मणिवरं गृह्य श्रीमान्प्लवगसत्तमः १९
प्रणम्य शिरसा देवीं गमनायोपचक्रमे ।
तमुत्पातकृतोत्साहमवेक्ष्य हरियूथपम् २०
वर्धमानं महावेगमुवाच जनकात्मजा ।
अश्रुपूर्णमुखी दीना बाष्पगद्गदया गिरा २१
हनूमन्सिंहसंकाशौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ।
सुग्रीवं च सहामात्यं सर्वान्ब्रूया अनामयम् २२
यथा च स महाबाहुर्मां तारयति राघवः ।
अस्माद्दुःखाम्बुसंरोधात्त्वं समाधातुमर्हसि २३
इदं च तीव्रं मम शोकवेगं रक्षोभिरेभिः परिभर्त्सनं च ।
ब्रूयास्तु रामस्य गतः समीपं शिवश्च तेऽध्वास्तु हरिप्रवीर २४
स राजपुत्र्या प्रतिवेदितार्थः कपिः कृतार्थः परिहृष्टचेताः ।

---

दिलेंच आहे. हें भूषण नीट अवलोकन केल्यावर, हे वीर हनुमाना, रामाला तुझें बोलणें विश्वसनीय वाटेल." असें सीतेने सांगितल्यानंतर तें श्रेष्ठ रत्न घेऊन, त्या तेजस्वी वानरश्रेष्ठ हनुमानाने त्या सीतादेवीला मस्तकानें प्रणाम केला आणि तो जाण्यास तयार झाला. तेव्हा उड्डाण करण्यास सिद्ध होऊन वृद्धिंगत होऊं लागलेल्या त्या महावेगवान् वानरसेनाधिपतीकडे पाहिल्यावर त्या दीन सीतेचें मुख अश्रूंनी व्याप्त झालें आणि कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत ती त्याला म्हणाली. ( १९—२१ )

"हे हनुमाना, सिंहासारखे बन्धु रामलक्ष्मण आणि अमात्यांसह सुग्रीव या सर्वांना तूं माझ्या वतीनें आरोग्यविषयक प्रश्न कर आणि तो महापराक्रमी राम या दुःखसागरापासून माझा लवकर उद्धार करील, असा प्रकारचा तूं कांहीं युक्ति योज. हे वानरश्रेष्ठा, तूं रामाजवळ गेल्यावर, हा माझा तीव्र शोक आणि या राक्षसांकडून होत असलेली माझी निर्भर्त्सना तूं त्याला सांग. तुझा मार्ग सुखकर होवो." याप्रमाणे त्या राजकन्येनें निरोप सांगितल्यावर अंतःकरणामध्ये अतिशय आनंदित झालेला तो हनुमान सीतेचा शोध लागल्यामुळें कृतार्थ

तदल्पशेषं प्रसमीक्ष्य कार्यं दिशं ह्युदीचीं मनसा जगाम २५
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चत्वारिंशः सर्गः ॥ ४० ॥

एकचत्वारिंशः सर्गः। [ १०६२ ]

स च वाग्भिः प्रशस्ताभिर्गमिष्यन्पूजितस्तया।
तस्माद्देशादपाक्रम्य चिन्तयामास वानरः १
अल्पशेषमिदं कार्यं दृष्टेयमसितेक्षणा।
त्रीनुपायानतिक्रम्य चतुर्थ इह दृश्यते २
न साम रक्षःसु गुणाय कल्पते न दानमर्थोपचितेषु युज्यते।
न भेदसाध्या बलदर्पिता जनाः पराक्रमस्त्वेष ममेह रोचते ३
न चास्य कार्यस्य पराक्रमादृते विनिश्चयः कश्चिदिहोपपद्यते।
हतप्रवीराश्च रणे तु राक्षसाः कथंचिदीयुर्यदिहाद्य मार्दवम् ४
कार्ये कर्मणि निर्वृत्ते यो बहून्यपि साधयेत्।

मला आणि राहिलेलें कार्य अगदीच थोडें आहे, असें समजून त्यानें उत्तरदिशेकडे जाण्याचें मनामध्यें आणिलें. ( २२-२५ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडातील चाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४० ॥

तो वानर हनुमान् जावयास निघाला असतां, सीतेनें त्याची योग्य शब्दांनी प्रशंसा केली आणि नंतर तेथून निघाल्यावर मारुती मनामध्यें म्हणाला, " कृष्णवर्ण नेत्रांनी युक्त असलेली ही सीता तर दृष्टीस पडली. आतां हें हातीं घेतलेलें कार्य थोडेंसेंच शिल्लक राहिलेलें आहे. या ठिकाणीं पहिल्या तीन उपायांचें अवलंबन न करतां चवथाच मला हितावह वाटत आहे, कारण राक्षसांचें ठिकाणीं सामाचा कांहीं उपयोग होणार नाहीं. ते द्रव्यसंपन्न आहेत, म्हणून त्यांना दान देणेंही योग्य नाहीं, बलाचा गर्व झालेले लोक भेदानें साध्य होणें शक्य नाहीं, तस्मात् या राक्षसांच्या ठिकाणीं पराक्रम हाच उपाय मला नीट दिसत आहे. पराक्रमाचें अवलंबन केल्यावाचून या कार्यसिद्धीला दुसरा कांहींएक निश्चित उपाय येथें लागू पडणार नाहीं. युद्धामध्यें मोठमोठे वीर मरण पावले म्हणजेच कसें तरी हे राक्षस मऊ येतील. ( १-४ )

पूर्वकार्याविरोधेन स कार्यं कर्तुमर्हति ५
न ह्येकः साधको हेतुः स्वल्पस्यापीह कर्मणः ।
यो ह्यर्थं बहुधा वेद स समर्थोऽर्थसाधने ६
इहैव तावत्कृतनिश्चयो ह्यहं व्रजेयमद्य प्लवगेश्वरालयम् ।
परात्मसंमर्दविशेषतत्त्ववित्ततः कृतं स्यान्मम भर्तृशासनम् ७
कथं नु खल्वद्य भवेत्सुखागतं प्रसह्य युद्धं मम राक्षसैः सह ।
तथैव खल्वात्मबलं च सारवत्समानयेन्मां च रणे दशाननः ८
ततः समासाद्य रणे दशाननं समन्त्रिवर्गं सबलं सयायिनम् ।
हृदि स्थितं तस्य मतं बलं च सुखेन मत्वाहमितः पुनर्व्रजे ९
इदमस्य नृशंसस्य नन्दनोपमसुत्तमम् ।
वनं नेत्रमनःकान्तं नानाद्रुमलतायुतम् १०

---

मुख्य कार्य पार पडल्यानंतर, पहिल्या कार्याशीं विरोध न येता जो अनेक कार्यें पार पाडतो, तोच हातीं घेतलेलें काम शेवटास नेण्यास समर्थ होतो. बारीकसारीक जरी कार्य असलें, तरी एकाच उपायानें तें पार पडेल, असें नाहीं. वास्तव, अनेक उपाय योजण्याचें ज्याला माहीत असतें, तोच कार्य शेवटास नेण्यास समर्थ होतो. म्हणून जरी सीतेचा शोध लावणें, एवढेंच कार्य करण्याचा माझा प्रथम निश्चय होता, तरी शत्रूचा व आपला युद्धप्रसंग प्राप्त झाला असता, आपणामध्यें आणि शत्रूमध्यें विशेष काय आहे, हें समजून आल्यानंतर जर मी वानराधिपति सुग्रीवाकडे प्रथमतः गेलों, तर यजमानाच्या आज्ञेप्रमाणें मी काम केल्यासारखें होईल, परंतु, आज या मोठ्या येथें येण्याचा परिणाम अधिक सुखावह कसा होईल? राक्षसाशीं एकदम माझें युद्ध होण्याचा प्रसंग कसा येईल? आणि त्याचप्रमाणें युद्धामध्यें स्वतःचें व माझें सामर्थ्याविषयीं रावणाची चांगल्या रीतीनें खात्री कशी होईल? त्याचा आधीं मला विचार केला पाहिजे हा विचार झाला, म्हणजे संग्राममध्यें सैन्य आणि मन्त्रिवर्ग यासह रावणाची गांठ घेऊन आणि त्याचें बल व त्याच्या मनातील आशय जाणून, मी येथून सुखानें परत जाईन. (५—९)

नेत्रांना व मनाला आनंद देणारें असें हें या दुष्टाचें नाना प्रकारच्या वृक्षांनीं

इदं विध्वंसयिष्यामि शुष्कं वनमिवानलः ।
अस्मिन्भग्ने ततः कोपं करिष्यति स रावणः ॥ ११

ततो महत्साश्वमहारथद्विपं बलं समानेष्यति राक्षसाधिपः ।
त्रिशूलकालायसपट्टिशायुधं ततो महद्युद्धमिदं भविष्यति ॥ १२

अहं च तैः संयति चण्डविक्रमैः समेत्य रक्षोभिरभङ्गविक्रमः ।
निहत्य तद्रावणचोदितं बलं सुखं गमिष्यामि हरीश्वरालयम् ॥ १३

ततो मारुतवत्क्रुद्धो मारुतिर्भीमविक्रमः ।
ऊरुवेगेन महता द्रुमान्क्षेप्तुमथारभत् ॥ १४

ततस्तद्धनुमान्वीरो बभञ्ज प्रमदावनम् ।
मत्तद्विजसमाघुष्टं नानाद्रुमलतायुतम् ॥ १५

तद्वनं मथितैर्वृक्षैर्भिन्नैश्च सलिलाशयैः ।
चूर्णितैः पर्वताग्रैश्च बभूवाप्रियदर्शनम् ॥ १६

नानाशकुन्तविरुतैः प्रभिन्नसलिलाशयैः ।

---

व लतांनी युक्त असलेलें नंदनतुल्य उत्कृष्ट वन आहे तेव्हां शुष्क वन जाळून टाकणाऱ्या अग्नीप्रमाणे मी या वनाचा विध्वंस करून टाकीन आणि याचा नाश झाला, म्हणजे तो रावण रागावेल. त्यानंतर अश्व, मोठे मोठे रथ आणि गज यांनी युक्त असें प्रचंड सैन्य घेऊन राक्षसाधिपति रावण येईल व तो आला असता त्रिशूळ व पोलादी पट्टे यांच्या सहाय्याने मोठें युद्ध सुरू होईल. युद्धामध्ये प्रचंड पराक्रम करणाऱ्या त्या राक्षसांशीं गांठ पडल्यावर आपला पराक्रम मुळींच वाया जाऊं न देतां रावणानें पाठविलेल्या त्या सैन्याचा वध करून मी वानराधिपति सुग्रीवाच्या घराकडे खुशाल चालू लागेन ( १०–१३ )

असा बेत केल्यानंतर वायूप्रमाणे भयंकर पराक्रम करणारा तो मारुति क्रुद्ध झाला व आपल्या मांड्यांच्या मोठ्या तडाक्यानें तो उग्र उलथेपालथे करूं लागला नंतर मत्त पक्ष्यांनीं गजबजलेलें, नाना प्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं भरलेलें आणि अंतःपुरांतील स्त्रियांना विहार करण्यास योग्य असें तें वन वीर हनुमानानें उध्वस्त करून टाकलें त्या वनांतील वृक्षांचा त्यानें विध्वंस करून टाकला जलाशय फोडून टाकले, मनोहर पर्वतशिखराचे नाना प्रकारानें तुकडेतुकडे करून

ताम्रैः किसलयैः क्लान्तैः क्लान्तद्रुमलतायुतैः १७
न बभौ तद्वनं तत्र दावानलहतं यथा ।
व्याकुलावरणा रेजुर्विह्वला इव ता लताः १८
लतागृहैश्चित्रगृहैश्च सादितैर्व्यालैर्मृगैरार्तरवैश्च पक्षिभिः ।
शिलागृहैरुन्मथितैस्तथा गृहैः प्रनष्टरूपं तदभून्महद्वनम् १९
सा विह्वलाशोकलताप्रताना वनस्थली शोच्यलताप्रताना ।
जाता दशास्यप्रमदावनस्य कपेर्बलाद्धि प्रमदावनस्य २०
ततः स कृत्वा जगतीपतेर्महान्महद्व्यलीकं मनसो महात्मनः ।
युयुत्सुरेको बहुभिर्महाबलैः श्रिया ज्वलंस्तोरणमाश्रितः कपिः २१
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे एकचत्वारिंशः सर्गः ॥४१॥
[१७८४]

टाकले, नाना प्रकारचे पक्षी उद्यानामध्ये शब्द करीत असतात, असे जलाशय फोडून टाकले, लाल पालवी त्याने चुरगळून टाकली व शिल्लक राहिलेले वृक्ष आणि लताही त्याने जर्जर करून टाकिल्या. यामुळे तें वन वणवा लागून जळून गेल्या-सारखें दिसूं लागलें आणि त्यांतील लता अस्ताव्यस्त होऊन, शोकाकुल झालेल्या स्त्रियांप्रमाणे भासूं लागल्या. ( १४-१८ )

उध्वस्त झालेलीं लतागृहें, धुळधाण झालेलीं क्रीडागृहें, आक्रोश करूं लागले-ले व्याघ्र-मृग आणि पक्षी, उलथून टाकलेले दगडी बंगले आणि सामान्य घरें यांच्या योगानें तें महावन जमीनदोस्त झाल्यासारखें दिसूं लागलें. रावणाच्या स्त्रियांचे उद्यान रक्षण होत असे, अशा या प्रमदावनांतील चंचल अशोकलतांच्या समुदायांनी युक्त असलेल्या त्या वनभूमीतील लतासमुदायाची स्थिति वानराच्या बळामुळे शोचनीय झाली. याप्रमाणें पृथ्वीपति महात्म्या रावणाच्या मनाला अतिशय लागणारी गोष्ट केल्यानंतर कांतीनें देदीप्यमान असलेला तो प्रचंड वानर अनेक महाबलाढ्य राक्षसांशी एकटा युद्ध करण्याच्या इच्छेनें दरवाजावर चढून बसला. ( १९-२१ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणांतर्गत आदिकाव्यांतील सुंदर-काण्डांतील एकेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४१ ॥

द्विचत्वारिंशः सर्गः ।

ततः पक्षिनिनादेन वृक्षभङ्गस्वनेन च ।
बभूवुस्त्राससंभ्रान्ताः सर्वे लङ्कानिवासिनः १
विद्रुताश्च भयत्रस्ता निपेदुर्मृगपक्षिणः ।
रक्षसां च निमित्तानि क्रूराणि प्रतिपेदिरे २
ततो गतायां निद्रायां राक्षस्यो विकृताननाः ।
तद्वनं ददृशुर्भग्नं तं च वीरं महाकपिम् ३
स ता दृष्ट्वा महाबाहुर्महासत्त्वो महाबलः ।
चकार सुमहद्रूपं राक्षसीनां भयावहम् ४
ततस्तु गिरिसंकाशमतिकायं महाबलम् ।
राक्षस्यो वानरं दृष्ट्वा पप्रच्छुर्जनकात्मजाम् ५
कोऽयं कस्य कुतो वायं किंनिमित्तमिहागतः ।
कथं त्वया सहानेन संवादः कृत इत्युत ६
आचक्ष्व नो विशालाक्षि मा भूत्ते सुभगे भयम् ।
संवादमसितापाङ्गे त्वया किं कृतवानयम् ७

---

नंतर पक्ष्यांच्या स्वराने आणि मोडता मोडता झालेल्या वृक्षांच्या आवाजाने लंकेमध्ये राहणारे सर्व लोक भीतीने गांगरून गेले. भयभीत झालेले काही मृग व पक्षी सैरावैरा धावू लागले आणि काही पार घाबरून गेल्यामुळे जागच्या जागींच बसले. राक्षसांनाही अपशकुन होऊं लागले. इतक्यात अक्राळविक्राळ तोंडांनी युक्त असलेल्या राक्षसी जाग्या होऊन पहातात, तों तें उध्वस्त झालेलें वन आणि तो वीर महाकपि त्यांना दिसला, परंतु त्यांना अवलोकन करताक्षणीं त्या महाधैर्यवान्, महापराक्रमी व महाबलाढ्य हनुमानाने राक्षसींना भयप्रद असें फारच मोठें रूप धारण केलें. नंतर पर्वताप्रमाणे अतिशयच धिप्पाड असलेल्या त्या महाबलवान् वानराला पाहून राक्षसी सीतेला म्हणाल्या, ( १-५ )

"हा कोण? कोणाचा? कोठून आला आहे? कशाकरितां येथे आला आहे? आणि तुझ्याबरोबर त्यानें संभाषण का केलें? हें तू आम्हाला सांग. हे विशालनयने, तू मुळींच भिऊं नकोस. हे [illegible], हे कृष्णनयने, तुझ्याबरोबर

अथाब्रवीत्तदा साध्वी सीता सर्वाङ्गशोभना ।
रक्षसां कामरूपाणां विज्ञाने का गतिर्मम ८
यूयमेवास्य जानीत योऽयं यद्वा करिष्यति ।
अहिरेव अहेः पादान्विजानाति न संशयः ९
अहमप्यतिभीतास्मि नैव जानामि को न्वयम् ।
वेद्मि राक्षसमेवैनं कामरूपिणमागतम् १०
वैदेह्या वचनं श्रुत्वा राक्षस्यो विद्रुता द्रुतम् ।
स्थिताः काश्चिद्गताः काश्चिद्रावणाय निवेदितुम् ११
रावणस्य समीपे तु राक्षस्यो विकृताननाः ।
विरूप वानरं भीमं रावणाय न्यवेदयन् १२
अशोकवनिकामध्ये राजन्भीमवपुः कपिः ।
सीतया कृतसंवादस्तिष्ठत्यमितविक्रमः १३
न च तं जानकी सीता हरिं हरिणलोचना ।

यानें काय संभाषण केलें, हें तूं आम्हाला सांग" याप्रमाणे राक्षसींनी विचारिल्यानंतर ती सर्वांगसुंदरी साध्वी सीता त्यांना म्हणाली "यथेष्ट रूप धारण करणाऱ्या राक्षसांना ओळखण्याइतकें मला बुद्धिसामर्थ्य कोठून असणार? हा कोण आहे आणि काय करणार आहे, याचा तुम्हीच बोध लावा, कारण, सर्पालाच सर्पाची पावलें ओळखतां येतात, यांत संशय नाही. मी तर अतिच भेदरून गेलें असल्यामुळें हा कोण, हें मला मुळींच ओळखतां आलें नाही. इच्छेप्रमाणे रूप धारण करणारा हा कोणीतरी राक्षसच आला असावा, असें मला वाटतें" (८-१०)

सीतेचें हें भाषण श्रवण करताक्षणीं काही राक्षसींनी तावडतोब पळ काढला काही तेथेंच उभ्या राहिल्या आणि काही रावणाला ही हकीकत सांगण्याकरिता निघून गेल्या. अक्राळविक्राळ मुखांनी युक्त असलेल्या त्या राक्षसी रावणाकडे गेल्या आणि कुरूप व भयंकर वानर तेथें आला असल्याचें त्या रावणाला सांगू लागल्या त्या म्हणाल्या, "हे राजा, अशोकवनामध्यें भयंकर शरीराचा एक वानर आला आहे. त्याचा पराक्रम मोठा आहे आणि सीतेशीं संभाषण करून तो तेथेंच बसला आहे मृगनयना सीतेला आम्ही नाना प्रकारांनी विचारून

अस्माभिर्बहुधा पृष्ट निवेदयितुमिच्छति १४
वासवस्य भवेद् दूतो दूतो वैश्रवणस्य वा ।
प्रेषितो वापि रामेण सीतान्वेषणकाङ्क्षया १५
तेनैवाद्भुतरूपेण यत्तत्तव मनोहरम् ।
नानामृगगणाकीर्णं प्रमृष्टं प्रमदावनम् १६
न तत्र कश्चिदुद्देशो यस्तेन न विनाशितः ।
यत्र सा जानकी देवी स तेन न विनाशितः १७
जानकीरक्षणार्थं वा श्रमाद्वा नोपलक्ष्यते ।
अथवा कः श्रमस्तस्य सैव तेनाभिरक्षिता १८
चारुपल्लवपत्राढ्यं यं सीता स्वयमास्थिता ।
प्रवृद्धः शिंशपावृक्षः स च तेनाभिरक्षितः १९

पाहिलें, परंतु तो कोण आहे, हें आम्हाला सांगण्याचा त्या जानकीचा मनम दिसत नाही. तो इंद्राचा दूत असावा अथवा कुबेराचा दूत असावा किंवा सीतेचा शोध लावण्याच्या उद्देशाने रामाने कोणी पाठविलेला असावा, असें आम्हाला वाटतें. ( ११–१५ )

नाना प्रकारच्या मृगांनी गजबजलेलें जें आपलें मनोहर प्रमदावन आहे, त्याची त्या अद्भुत रूप धारण करणाऱ्या वानराने नासाडी करून टाकिली. ज्या ठिकाणी देवी सीता आहे, तें ठिकाण मात्र त्याने उध्वस्त केलें नाही. बाकी त्याने विध्वंस न केलेला असा कोणताही प्रदेश त्या वनामध्ये शिल्लक राहिला नाही. जानकी ज्या प्रदेशात बसली आहे, त्या प्रदेशाचा त्याने तिच्या रक्षणाकरिता विध्वंस केला नाही किंवा इतर सर्व प्रदेशांची धुळधाण करता करता तो थकून गेल्यामुळे त्याच्या तावडीतून तेवढा भाग शाबूत राहिला आहे, हें काहीच आमच्या लक्ष्यात येत नाही, परंतु एवढ्या थोरल्या वनाची धुळधाण उडवून देणाऱ्या त्या वानराला थकवा कोठला येणार? तो प्रदेश सुरक्षित ठेवून त्याने त्या सीतेचेंच रक्षण केलेलें आहे. ( १६–१८ )

मनोहर पल्लव आणि पर्णें यांनी समृद्ध असलेल्या ज्या वृक्षाचा आश्रय करून सीता स्वतः बसली आहे, तो मजबूत शिंशपावृक्षाला मात्र त्याने धक्का लावला

तस्योग्ररूपस्योग्रं त्वं दण्डमाज्ञातुमर्हसि ।
सीता संभाषिता येन वनं तेन विनाशितम् २०
मनःपरिगृहीतां तां तव रक्षोगणेश्वर ।
कः सीतामभिभाषेत यो न स्यात्त्यक्तजीवितः २१
राक्षसीनां वचः श्रुत्वा रावणो राक्षसेश्वरः ।
चिताग्निरिव जज्वाल कोपसंवर्तितेक्षणः २२
तस्य क्रुद्धस्य नेत्राभ्यां प्रापतन्नश्रुबिन्दवः ।
दीप्ताभ्यामिव दीपाभ्यां सार्चिषः स्नेहबिन्दवः २३
आत्मनः सदृशान्वीरान्किङ्करान्नाम राक्षसान् ।
व्यादिदेश महातेजा निग्रहार्थं हनूमतः २४
तेषामशीतिसाहस्रं किङ्कराणां तरस्विनाम् ।
निर्ययुर्भवनात्तस्मात्कूटमुद्गरपाणयः २५
महोदरा महादंष्ट्रा घोररूपा महाबलाः ।
युद्धाभिमनसः सर्वे हनूमद्ग्रहणोन्मुखाः २६

---

नाश. तेव्हां त्या उग्र रूप धारण करणाऱ्या वानराला चांगली कडक शिक्षा देण्याविषयी आपली आज्ञा होऊं द्या, कारण त्याने सीतेचें संरक्षण केलें असून, वनाचाही पार नाश केला आहे हे राक्षसगणाधिपते, आपलें मन जिच्यावर गेलें, त्या सीतेशीं त्यावर उदार झाल्याशिवाय कोण बरें भाषण करील ?" राक्षसींचें भाषण श्रवण करताक्षणीं राक्षसाधिपति रावणाची दृष्टि क्रोधाने चढून गेली आणि चिताग्नीप्रमाणे चोहोंकडून त्याच्या अंगाचा भडका होऊं लागला व प्रज्वलित झालेल्या दिव्यांमधून ज्योतीसह तैलबिंदु पडूं लागतात, त्याचप्रमाणे क्रुद्ध झालेल्या रावणाच्या नेत्रांतून क्रोधाचे अश्रुबिंदु पडूं लागले. (१९-२३)

तदनंतर त्या महातेजस्वी रावणाने हनुमानाला प्रतिबंध करण्याकरितां आपल्या-सारख्या नामवंत किंकरनामक राक्षसांना जाण्याची आज्ञा केली. कूट आणि मुद्गर हीं आयुधें हातांत घेऊन ऐंशीं हजार किंकरनामक बलाढ्य राक्षस त्या राजवाड्या-तून बाहेर पडले. मोठें उदर, प्रचंड दाढा, घोर रूप आणि भयंकर सामर्थ्य यांनी युक्त असलेले ते सर्व राक्षस युद्धाची इच्छा धरून हनुमानाला धरण्यासाठीं पुढे

ते कपिं तं समासाद्य तोरणस्थमवस्थितम् ।
अभिपेतुर्महाभागाः पतङ्गा इव पावकम् २७
ते गदाभिर्विचित्राभिः परिघैः काञ्चनाङ्गदैः ।
आजघ्नुर्वानरश्रेष्ठं शरैरादित्यसंनिभैः २८
मुद्गरैः पट्टिशैः शूलैः प्रासतोमरपाणयः ।
परिवार्य हनूमन्तं सहसा तस्थुरग्रतः २९
हनूमानपि तेजस्वी श्रीमान्पर्वतसंनिभः ।
क्षितावाविध्य लाङ्गूलं ननाद च महाध्वनिम् ३०
स भूत्वा तु महाकायो हनूमान्मारुतात्मजः ।
पुच्छमास्फोटयामास लङ्कां शब्देन पूरयन् ३१
तस्यास्फोटितशब्देन महता चानुनादिना ।
पेतुर्विहङ्गा गगनादुच्चैश्चेदमघोषयत् ३२
जयत्यतिबलो रामो लक्ष्मणश्च महाबलः ।
राजा जयति सुग्रीवो राघवेणाभिपालितः ३३
दासोऽहं कोसलेन्द्रस्य रामस्याक्लिष्टकर्मणः ।

---

झाले कमानीवर बसलेल्या वानराकडे ते आले आणि अग्नीवर उडी घालणाऱ्या पतंगाप्रमाणे ते महाबलाढ्य राक्षस त्याच्या अंगावर चालून गेले. चित्रविचित्र गदा, सुवर्णाच्या पट्ट्यांनी जखडून टाकलेले परिघ व सूर्यासारखे चकचकीत बाण हाती घेऊन, ते राक्षस वानरश्रेष्ठ मारुतीजवळ आले आणि मुद्गर, पट्टे व शूल बरोबर घेऊन आणि त्याचप्रमाणे भाले व तोमर हातात घेऊन ते एकाएकी मारुतीला घेरून उभे राहिले. तेव्हा तेज आणि कांति यांनी युक्त असलेल्या हनुमानानेही भूमीवर शेपूट आपटून मोठा गर्जना केली ( २४–३० )

सारांश, प्रचंड शरीर धारण करून, वायुपुत्र हनुमानाने लंका गर्जनेने दणाणून टाकीत पुच्छ भूमीवर आपटले. तेव्हा प्रतिध्वनींनी युक्त अशा त्या आपटण्याच्या मोठ्या आवाजाने पक्षी आकाशातून खाली पडले व तो हनुमान् मोठ्याने गर्जना करू लागला की, " अतिबलाढ्य राम, महाबलाढ्य लक्ष्मण व रामाने रक्षण केलेला राजा सुग्रीव यांचा विजय असो. महापराक्रमी कोसलदेशाधिपति रामाचा मी

हनुमाञ्छत्रुसैन्यानां निहन्ता मारुतात्मजः ३४
न रावणसहस्रं मे युद्धे प्रतिबलं भवेत् ।
शिलाभिश्च प्रहरतः पादपैश्च सहस्रशः ३५
अर्दयित्वा पुरीं लङ्कामभिवाद्य च मैथिलीम् ।
समृद्धार्थो गमिष्यामि मिषतां सर्वरक्षसाम् ३६
तस्य सन्नादशब्देन तेऽभवन्भयशङ्किताः ।
ददृशुश्च हनूमन्तं सन्ध्यामेघमिवोन्नतम् ३७
स्वामिसन्देशनिःशङ्कास्ततस्ते राक्षसाः कपिम् ।
चित्रैः प्रहरणैर्भीमैरभिपेतुस्ततस्ततः ३८
स तैः परिवृतः शूरैः सर्वतः स महाबलः ।
आससादायसं भीमं परिघं तोरणाश्रितम् ३९
स तं परिघमादाय जघान रजनीचरान् ।
स पन्नगमिवादाय स्फुरन्तं विनतासुतः ४०

दास आहे. माझे नाव हनुमान् आहे आणि मी वायुपुत्र शत्रुसैन्याचा नाश करणारा आहे. हजार रावण जरी आले, तरी युद्धामध्ये हजारो शिला व वृक्ष यांनी प्रहार करणाऱ्या माझ्याशी सामर्थ्यामध्ये बरोबरी करणे त्यांना शक्य होणार नाही. (३१-३५)

सर्व राक्षसांच्या समक्ष लंकानगरीचा विध्वंस करून व सीतेला अभिवादन करून मनोरथ परिपूर्ण झालेला असा मी परत जाईन" या त्याच्या गर्जनेमुळे ते राक्षस भयभीत झाले आणि संध्याकाळच्या मेघाप्रमाणे भव्य असलेल्या हनुमानाकडे पाहू लागले. हनुमानाने आपल्या स्वामीचा उद्घोष केला असल्यामुळे हा कोणाचा योद्धा असावा, याविषयी राक्षसांना शंका उरली नाही व म्हणूनच ते राक्षस भयंकर व अद्भुत शस्त्रास्त्रे बरोबर घेऊन चोहोंकडून त्याच्यावर धावले. परंतु, याप्रमाणे त्या महाबलाढ्य हनुमानाला सर्व बाजूंनी त्या शूर राक्षसांनी वेढून टाकले असता त्याने कमानीपाशी ठेवलेला एक भयंकर लोखंडी परिघ हातामध्ये घेतला आणि तडफड करणारा सर्प हातात धरणाऱ्या गरुडाप्रमाणे तो परिघ हातात घेऊन त्या मारुतीने राक्षसांचा वध केला. (३६-४०)

इति संचिन्त्य हनुमान्मनसा दर्शयन्बलम् ॥ २
चैत्यप्रासादमुत्प्लुत्य मेरुशृङ्गमिवोन्नतम् ।
आरुरोह हरिश्रेष्ठो हनूमान्मारुतात्मजः ॥ ३
आरुह्य गिरिसंकाशं प्रासादं हरियूथपः ।
बभौ स सुमहातेजाः प्रतिसूर्य इवोदितः ॥ ४
संप्रधृष्य तु दुर्धर्षश्चैत्यप्रासादमुन्नतम् ।
हनूमान्प्रज्वलँल्लक्ष्म्या पारियात्रोपमोऽभवत् ॥ ५
स भूत्वा सुमहाकायः प्रभावान्मारुतात्मजः ।
धृष्टमास्फोटयामास लङ्कां शब्देन पूरयन् ॥ ६
तस्यास्फोटितशब्देन महता श्रोत्रघातिना ।
पेतुर्विहङ्गमास्तत्र चैत्यपालाश्च मोहिताः ॥ ७
अस्त्रविज्जयतां रामो लक्ष्मणश्च महाबलः ।
राजा जयति सुग्रीवो राघवेणाभिपालितः ॥ ८
दासोऽहं कोसलेन्द्रस्य रामस्याक्लिष्टकर्मणः ।
हनूमाञ्शत्रुसैन्यानां निहन्ता मारुतात्मजः ॥ ९

करून दाखवितो." याप्रमाणे मनामध्ये आणून, आपले सामर्थ्य दाखवण्याकरिता मेरुपर्वताच्या शिखराप्रमाणे उंच असलेल्या त्या राक्षसांच्या देवालयावर वानरश्रेष्ठ वायुपुत्र हनुमान उडी मारून उभा राहिला, आणि त्या पर्वतासारख्या उंच देवालयावर आरोहण केल्यानंतर तो अत्यंत महातेजस्वी सेनाधिपति हनुमान् उदय पावलेल्या दुसऱ्या सूर्याप्रमाणे दिसूं लागला. (१–४)

ते उंच देवालय मोडून टाकल्यावर कांतीने झळकत असलेला तो अजिंक्य हनुमान् पारियात्रपर्वताप्रमाणे दिसूं लागला आणि पारियात्रपर्वताप्रमाणे फारच मोठें शरीर धारण केल्यानंतर त्या तेजस्वी वायुपुत्र हनुमानाने ध्वनीने लंका दणाणून टाकीत टाकीत निर्भयपणें दंड ठोकले असता, कानठाळ्या बसविणाऱ्या अशा त्या दंड ठोकण्याच्या प्रचंड ध्वनीने पक्षी खाली पडले व देवालयाच्या रक्षकांना मूर्च्छा आली त्यानंतर 'अस्त्रवेत्ता राम, महाबलाढ्य लक्ष्मण आणि रामाने संरक्षण केलेला राजा सुग्रीव यांचा विजय असो (५–८)

न रावणसहस्रं मे युद्धे प्रतिबलं भवेत् ।
शिलाभिश्च प्रहरतः पादपैश्च सहस्रशः १०
धर्षयित्वा पुरीं लङ्कामभिवाद्य च मैथिलीम् ।
समृद्धार्थो गमिष्यामि मिषतां सर्वरक्षसाम् ११
एवमुक्त्वा महाकायश्चैत्यस्थो हरियूथपः ।
ननाद भीमनिर्ह्रादो रक्षसां जनयन्भयम् १२
तेन नादेन महता चैत्यपालाः शतं ययुः १३
गृहीत्वा विविधानस्त्रान्प्रासान्खड्गान्परश्वधान् ।
विसृजन्तो महाकाया मारुतिं पर्यवारयन् १४
ते गदाभिर्विचित्राभिः परिघैः काञ्चनाङ्गदैः ।
आजग्मुर्वानरश्रेष्ठं बाणैश्चादित्यसंनिभैः १५
आवर्त इव गङ्गायास्तोयस्य विपुलो महान् ।
परिक्षिप्य हरिश्रेष्ठं स बभौ रक्षसां गणः १६
ततो वातात्मजः क्रुद्धो भीमरूपं समास्थितः ।

मी कोसलदेशाधिपति महापराक्रमी रामचा दास वायुपुत्र हनुमान् आहें आणि शत्रुसैन्याचा मी नाश करणारा आहें. हजारो शिळांनी व वृक्षांनी मी युद्धामध्ये प्रहार करू लागलों असता, सहस्र रावणही माझ्यासमोर टिकाव धरण्यास समर्थ होणार नाहीत आता मी सर्व राक्षसांसमक्ष लंकानगरीचा विध्वंस करून व सीतेला अभिवंदन करून, कार्य सिद्धीस गेल्यावर परत चालता होईन " असें बोलून भयंकर गर्जना करणाऱ्या त्या धिप्पाड वानरसेनाधिपति हनुमानानें राक्षसांना भय उत्पन्न करण्याकरितां देवालयावर असतानाच गर्जना केली. ती प्रचंड ध्वनि झाल्याबरोबर नाना प्रकारचीं अस्त्रें हातांत घेऊन, देवालयावरील शंभर रक्षक त्याच्यावर धावले आणि ते मोठमोठे धिप्पाड राक्षस आले, तलवारी व कुऱ्हाडी त्यांच्या अंगावर फेकीत फेकीत त्याला वेढून उभे राहिले. ( १—१४)

सुवर्णाच्या पट्ट्यांनी जखडून टाकलेले परिघ, विचित्र गदा आणि सूर्यासारखे तेजस्वी बाण हातांत घेऊन ते राक्षस वानरश्रेष्ठ हनुमानाजवळ आले असतां वानरश्रेष्ठ मारुतीला वेढून उभा राहिलेला तो राक्षसांचा समुदाय गंगाजलाच्या

प्रासादस्य महांस्तस्य स्तम्भं हेमपरिष्कृतम् १७
उत्पाटयित्वा वेगेन हनूमान्मारुतात्मजः ।
ततस्तं भ्रामयामास शतधारं महाबलः १८
तत्र चाग्निः समभवत्प्रासादश्चाप्यदह्यत ।
दह्यमानं ततो दृष्ट्वा प्रासादं हरियूथपः १९
स राक्षसशतं हत्वा वज्रेणेन्द्र इवासुरान् ।
अन्तरिक्षस्थितः श्रीमानिदं वचनमब्रवीत् २०
मादृशानां सहस्राणि विसृष्टानि महात्मनाम् ।
बलिनां वानरेन्द्राणां सुग्रीववशवर्तिनाम् २१
अटन्ति वसुधां कृत्स्नां वयमन्ये च वानराः ।
दशनागबलाः केचित्केचिद्दशगुणोत्तराः २२
केचिन्नागसहस्रस्य बभूवुस्तुल्यविक्रमाः ।
सन्ति चौघबलाः केचित्सन्ति वायुबलोपमाः २३
अप्रमेयबलाः केचित्तत्रासन्हरियूथपाः ।

---

मोठ्या अगाध भोवऱ्याप्रमाणे फिरूं लागला. नंतर वायुपुत्र हनुमानाने क्रुद्ध होऊन, भयंकर रूप धारण केलें. त्या देवालयाचा सुवर्णाने मढविलेला एक खांब त्या वायुपुत्र प्रचंड हनुमानाने जोराने उपटला आणि शंभर कोनांनी युक्त असलेला तो स्तंभ त्या महाबलाढ्य हनुमानाने गरगर फिरविला. फिरवतां फिरवतां दुसऱ्या खांबाशीं घर्षण होऊं लागल्यामुळे तेथे अग्नि उत्पन्न होऊन, तें देवालयही जळून गेलें. तेव्हां देवालय जळत असलेलें पाहिल्यावर वज्राने असुरांचा वध करणाऱ्या इंद्राप्रमाणे मारुतीने त्या शंभर राक्षसांचा त्याच खांबाच्या साहाय्याने वध केला आणि उडी मारून तो तेजस्वी हनुमान् म्हणाला. ( १७-२० )

"सुग्रीवाच्या आज्ञेंत वागणारे असे माझ्यासारखे हजारों महात्मे व बलाढ्य वानराधिपति बाहेर पाठविले आहेत. आम्ही आणि इतरही वानर मिळून सर्व पृथ्वी हिंडत आहोंत. आम्हांपैकी कांहींना दहा हत्तींचे बल आहे, कांहीं त्याच्याही-पेक्षां बलाढ्य आहेत आणि कांहीं तर पराक्रमांत ये हजारो हत्तींची बरोबरी करणारे आहेत. कांहींचे ठिकाणीं हत्तींचे अनेक कळपांइतकें सामर्थ्य आहे, कांहीं

ईदृग्विधैस्तु हरिभिर्वृतो दन्तनखायुधैः २४
शतैः शतसहस्रैश्च कोटिभिश्चायुतैरपि ।
आगमिष्यति सुग्रीवः सर्वेषां वो निषूदनः २५
नेयमस्ति पुरी लङ्का न यूयं न च रावणः ।
यस्य त्विक्ष्वाकुवीरेण बद्धं वैरं महात्मना २६

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वा० आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रिचत्वारिंशः सर्गः ॥ ४३ ॥

चतुश्चत्वारिंशः सर्गः । [१८५४]

संदिष्टो राक्षसेन्द्रेण प्रहस्तस्य सुतो बली ।
जम्बुमाली महादंष्ट्रो निर्जगाम धनुर्धरः १
रक्तमाल्याम्बरधरः स्रग्वी रुचिरकुण्डलः ।
महान्विवृत्तनयनश्चण्डः समरदुर्जयः २
धनुः शक्रधनुःप्रख्यं महद्रुचिरसायकम् ।
विस्फारयाणो वेगेन वज्राशनिसमस्वनम् ३

यांच्यासारखेच बलदंड आहेत आणि बलाचा अंत लागत नाही, असेही काही परसैन्य घेरतील, यांत आहेत दंत आणि नख या आयुधांनी लढणारे आणि याप्रमाणे बलाढ्य असे कोट्यवधि हजारो, लाखो कोडो वानर बरोबर घेऊन तुम्हा सर्वांचा वध करण्याकरिता सुग्रीव येथे येईल आणि तो येथे आला, म्हणजे ही लंकानगरी, तुम्ही आणि महात्मा इक्ष्वाकुवीर रामाशी ज्याने वैर बांधिलें आहे तो रावण, यांपैकी कोणीच राहणार नाही ' ( २१-२६ )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडांतील त्रेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४३ ॥

राक्षसाधिपति रावणाने आज्ञा केली असतां, मोठ्या दाढांचा जंबुमाली धनुष्य हातांत घेऊन बाहेर पडला. या धिप्पाड व प्रचंड जंबुमालीचे डोळे रागानें लाल झाले होते. समरांगणामध्ये त्याचा पराजय होणें कठिण होतें. आरक्तवर्ण पुष्प व वस्त्र, मनोहर कुंडलें आणि माळा यांस धारण केल्या कारणानें इंद्रधनुष्यासारखें मोठें, मनोहर बाणांनी युक्त आणि वज्राप्रमाणें व विद्युल्लतेप्रमाणें गर्जना करणारें

तस्य विस्फारघोषेण धनुषो महता दिशः।
प्रदिशश्च नभश्चैव सहसा समपूर्यत  ४
रथेन खरयुक्तेन तमागतमुदीक्ष्य सः।
हनूमान्वेगसंपन्नो जहर्ष च ननाद च  ५
तं तोरणविटङ्कस्थं हनूमन्तं महाकपिम्।
जम्बुमाली महातेजा विव्याध निशितैः शरैः  ६
अर्धचन्द्रेण वदने शिरस्येकेन कर्णिना।
बाह्वोर्विव्याध नाराचैर्दशभिस्तु कपीश्वरम्  ७
तस्य तच्छुशुभे ताम्रं शरेणाभिहतं मुखम्।
शरदीवाम्बुजं फुल्लं विद्धं भास्कररश्मिना  ८
तत्तस्य रक्तं रक्तेन रञ्जितं शुशुभे मुखम्।
यथाकाशे महापद्मं सिक्तं काञ्चनबिन्दुभिः  ९
चुकोप बाणाभिहतो राक्षसस्य महाकपिः।

---

असें मोठें धनुष्य घेऊन, तो तसा टणत्कार करूं लागला असतां, धनुष्याच्या त्या प्रचंड टणत्काराने दिशा, उपदिशा आणि आकाश हीं एकदम दणाणून गेलीं. इतक्यात गाढव जोडलेल्या रथावर आरूढ होऊन आलेल्या त्या जंबुमालीला अवलोकन करताक्षणीं वेगवान् हनुमानाला हर्ष झाला व तो गर्जना करूं लागला. (१-५)

नंतर कमानीखालच्या दोन खांबावरील आडव्या लाकडावर बसलेल्या त्या महाकपि हनुमानाचा महातेजस्वी जंबुमालीने तीक्ष्ण बाणानीं वेध केला. जंबुमालीनें अर्धचंद्रबाणानें हनुमानाच्या मुखाचे ठिकाणीं वेध केला. एका करणी बाणानें मस्तकाचे ठिकाणीं वेध केला आणि दहा बाणानीं त्या वानराधिपतीच्या बाहूचे ठिकाणीं वेध केला. तेव्हा बाणानीं विद्ध झालेलें तें त्या हनुमानाचें ताम्रवर्ण मुख शरदृतूमध्यें सूर्याच्या किरणानें विद्ध झालेल्या प्रफुल्लित कमलाप्रमाणें दिसूं लागलें. सुवर्णबिंदूंचा ज्याच्यावर अभिषेक झाला आहे, असें आकाशातील एक मोठें कमलच की काय, अशा रीतीनें त्याचें रक्तानें भरलेलें आरक्तवर्ण मुख शोभूं लागलें. राक्षसाचे बाण लागल्यामुळे महाकपि हनुमान् क्रुद्ध झाला

तत: पार्श्वेऽतिविपुलां ददर्श महतीं शिलाम् १०
तरसा तां समुत्पाट्य चिक्षेप जवबद्बली ।
तां शरैर्दशभिः क्रुद्धस्ताडयामास राक्षस ११
विपन्नं कर्म तद्दृष्ट्वा हनूमांश्चण्डविक्रमः ।
सालं विपुलमुत्पाट्य भ्रामयामास वीर्यवान् १२
भ्रामयन्तं कपिं दृष्ट्वा सालवृक्षं महाबलम् ।
चिक्षेप सुबहून्बाणाञ्जम्बुमाली महाबल: १३
सालं चतुर्भिश्चिच्छेद वानरं पञ्चभिर्भुजे ।
उरस्येकेन बाणेन दशभिस्तु स्तनान्तरे १४
स शरैः पूरिततनु: क्रोधेन महता वृत: ।
तमेव परिघं गृह्य भ्रामयामास वेगित: १५
अतिवेगोऽतिवेगेन भ्रामयित्वा महोत्कट: ।
परिघं पातयामास जम्बुमालेर्महोरसि १६
तस्य चैव शिरो नास्ति न बाहू जानुनी न च ।

---

आणि शेजारीच असलेल्या एका अति लाबरुद शिलेवर त्याने आपली दृष्टि फेकली। ( ९–१० )

नतर ती शिळा उपटून वेगाने हनुमानाने ती त्या जबुमालीवर फेकली परतु क्रुद्ध राक्षसाने दहा बाणाना शिळा फोडून टाकली तेव्हा आपले ते कार्य फुकट गेलेले पाहून, प्रचड पराक्रमी, वीर्यवान्, हनुमान् एक मोठा सालवृक्ष उपटून गरगर फिरवू लागला परतु तो महाबलाढ्य वानर सालवृक्ष फिरवीत आहे, असे पाहून महाबलाढ्य जबुमालीने पुष्कळ बाण त्यावर टाकले चार बाणानी त्याने ते सालवृक्ष तोडून टाकिला, आणि पाच बाणाना हाताच ठिकाणी, एका बाणाने उरात आणि दहा बाणाना छातीवर त्या वानराला वेध केला याप्रमाणे बाणानी देह भरून गेला असता तो हनुमान् अतिशय क्रुद्ध झाला आणि तोच परीघ हातात घेऊन मोठ्या वेगाने फिरवू लागला ( ११ १५ )

नतर त्या अतिवेगवान् व महाबलाढ्य हनुमानाने अतिशय वेगाने तो परिघ फिरवून जबुमाली या विशाल छातीवर फेकून मारला, त्या जबुमालीचे

न धनुर्न रथो नाश्वास्तत्रादृश्यन्त नेषवः    १७
स हतस्तरसा तेन जम्बुमाली महारथः ।
पपात निहतो भूमौ चूर्णिताङ्ग इव द्रुमः    १८
जम्बुमालिं सुनिहतं किङ्करांश्च महाबलान् ।
चुक्रोध रावणः श्रुत्वा क्रोधसंरक्तलोचनः    १९
स रोषसंवर्तितताम्रलोचनः प्रहस्तपुत्रे निहते महाबले ।
अमात्यपुत्रानतिवीर्यविक्रमान्समादिदेशाशु निशाचरेश्वरः    २०

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चतुश्चत्वारिंशः सर्गः ४४

पञ्चचत्वारिंशः सर्गः ।    [ १८५४ ]

ततस्ते राक्षसेन्द्रेण चोदिता मन्त्रिणः सुताः ।
निर्ययुर्भवनात्तस्मात्सप्त सप्तार्चिवर्चसः    १
महद्बलपरीवारा धनुष्मन्तो महाबलाः ।
कृतास्त्रास्त्रविदां श्रेष्ठाः परस्परजयैषिणः    २

---

मस्तक, हात, पाय, धनुष्य, रथ, वाहनें आणि बाण यांपैकी काहीच शिल्लक राहिलें नाही परिघाच्या त्या वेगाने महारथी जंबुमाली मरण पावला आणि शाखा व उपशाखा वगैरेंचा चुराडा होऊन पडलेल्या वृक्षाप्रमाणे भूमीवर पडला नंतर महाबलाढ्य सेवक आणि जंबुमाली याचा वध झाल्याचें ऐकून रावण रागावला व रागाने त्याचे नेत्र लाल होऊन गेले महाबलाढ्य प्रहस्तपुत्र जंबुमाली मरण पावला असता निशाचराधिपति रावणाचे डोळे रागाने लाल होऊन गेले आणि त्याने तत्क्षणींच अतिवीर्यवान् व अतिपराक्रमी अमात्यपुत्रांना युद्धाला जाण्याची आज्ञा केली ( १९-२० )

या प्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसत्क आदिकाव्यातील सुंदरकांडातील चव्वेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४४ ॥

त्यानंतर राक्षसाधिपति रावणाने आज्ञा केली असता, ते अग्नीसारखे तेजस्वी सात मंत्रिपुत्र राजवाड्यांतून बाहेर पडले त्यांच्याबरोबर सैन्याचा मोठा परिवार होता, त्यांनी धनुष्यें धारण केलीं होतीं ते मोठे बलाढ्य होते, अस्त्रविद्या त्यांना सुसाध्य होती इतकेच नव्हती तर ते अस्त्रवेत्त्यांमध्ये श्रेष्ठ होते आणि जय प्राप्त करून

हेमजालपरिक्षिप्तैर्ध्वजवद्भिः पताकिभिः ।
तोयदस्वननिर्घोषैर्वाजियुक्तैर्महारथैः ३
तप्तकाञ्चनचित्राणि चापान्यमितविक्रमाः ।
विस्फारयन्तः संहृष्टास्तडिद्वन्त इवाम्बुदाः ४
जनन्यस्तास्ततस्तेषां विदित्वा किङ्करान्हतान् ।
बभूवुः शोकसंभ्रान्ताः सबान्धवसुहृज्जनाः ५
ते परस्परसङ्घर्षास्तप्तकाञ्चनभूषणाः ।
अभिपेतुर्हनूमन्तं तोरणस्थमवस्थितम् ६
सृजन्तो बाणवृष्टिं ते रथगर्जितनिःस्वनाः ।
प्रावृट्काल इवाम्भोदा विचेरुर्नैरृताम्बुदाः ७
अवकीर्णस्ततस्ताभिर्हनूमाञ्शरवृष्टिभिः ।
अभवत्संवृताकारः शैलराडिव वृष्टिभिः ८
स शरान्मोघयामास तेषामाशुचरः कपिः ।
रथवेगांश्च वीराणां विचरन्विमलेऽम्बरे ९
स तैः क्रीडन्धनुष्मद्भिर्व्योम्नि वीरः प्रकाशते ।

पराक्रमाविषयी ते एकमेकाशी चढाओढ करीत होते. सोन्याने मढविलेले ध्वज व पताका यांनी युक्त असलेल्या, अश्व जोडलेल्या आणि मेघाप्रमाणे गर्जना करणाऱ्या मोठ्या मोठ्या रथांवर ते अतुलपराक्रमी मंत्रिपुत्र आरूढ झाले होते आणि आनंदित होऊन, सोन्याने मढविलेल्या धनुष्याचा टणत्कार करूं लागल्यामुळे विद्युल्लतेने युक्त असलेल्या मेघाप्रमाणे ते दिसूं लागले. तदनंतर किंकरांच्या सैन्याचा वध झाल्याचें श्रवण करून, त्या मंत्रिपुत्रांच्या माता, बांधव आणि सुहृज्जन यांचेसह शोक करूं लागल्या व इकडे प्रथम जय प्राप्त करून घेण्याविषयी एकमेकांशी स्पर्धा करीत असलेले आणि उत्सुक सोन्याचीं भूषणें धारण केलेले मंत्रिपुत्र दरवाजावर बसलेल्या हनुमानावर चालून गेले (१-६)

रथघोषाचा मोठा ध्वनि करीत असलेले ते राक्षस बाणवृष्टि करूं लागले असतां, पर्जन्यकाळीं वृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणे दिसूं लागले आणि त्या बाणवृष्टींनी हनुमान् व्याप्त झाला असतां पर्जन्यवृष्टींनी आच्छादित झालेल्या पर्वतराजाप्रमाणे तो दिसूं लागला. राक्षस हनुमानावर बाणवृष्टि करूं लागले, पण

धनुष्मद्भिर्यथा मेघैर्मारुतः प्रभुरम्बरे  १०
स कृत्वा निनदं घोरं त्रासयंस्तां महाचमूम्।
चकार हनुमान्वेगं तेषु रक्षःसु वीर्यवान्  ११
तलेनाभिहनत्कांश्चित्पादैः कांश्चित्परन्तपः।
मुष्टिभिश्चाहनत्कांश्चिन्नखैः कांश्चिद्व्यदारयत्  १२
प्रममाथोरसा कांश्चिदूरुभ्यामपरानपि।
केचित्तस्यैव नादेन तत्रैव पतिता भुवि  १३
ततस्तेष्ववपन्नेषु भूमौ निपतितेषु च।
तत्सैन्यमगमत्सर्वं दिशो दश भयार्दितम्  १४
विनेदुर्विस्वरं नागा निपेतुर्भुवि वाजिनः।
भग्ननीडध्वजच्छत्रैर्भूश्च कीर्णाभवद्रथैः  १५
स्रवता रुधिरेणाथ स्रवन्त्यो दर्शिताः पथि।

---

शीघ्र गतीने युक्त असलेल्या त्या हनुमानाने निर्मल आकाशामध्ये संचार करता करता त्या वीरांचे रथवेग व बाण चुकविण्यास आरंभ केला आणि याप्रमाणे तो समर्थ वीर हनुमान् त्या धनुर्धारी राक्षसांबरोबर युद्धक्रीडा करू लागला असता इंद्रधनुष्यांनी युक्त असलेल्या मेघांशी युद्ध करणाऱ्या वायूप्रमाणे तो दिसू लागला (७-१०)

त्यानंतर त्या प्रचंड सेनेला त्रास देण्यासाठी भयंकर गर्जना करून, तो वीर्यवान् हनुमान् वेगावेगाने त्या राक्षसांवर धावून गेला. त्या शत्रुतापन हनुमानाने कोणाला चपराक मारूनच परलोक दाखविला, कोणाचा वृक्षाच्या योगाने संभावना केला, कोणाला बुक्या मारून मृत्युलोकच्या यातनेतून मुक्त केले आणि कोणाला नखांनी फाडून टाकले वक्षस्थलाने ताडन करून त्याने कोणाचा वध केला, कोणाला तर त्याने लाथा मारूनच परलोकी पाठविले आणि काही त्याच्या गर्जनेमुळे तेथल्या तेथेच भूमीवर पडले याप्रमाणे ते राक्षस काही उलथून पडले असता व काही तसेच भूमीवर पडले असता, भयभीत झालेले ते सर्वही सैन्य वाट फुटेल तिकडे पळून गेले (११-१४)

हत्ती भेसूर गर्जना करू लागले, घोडे भूमीवर पडले आणि ध्वज, छत्र व रथ ही ज्यांची भग्न झाली आहेत, अशा वीरांनी ती रणभूमि आच्छादित

विविधैश्च स्वनैर्लङ्का ननाद विकृतं तदा १६
स तान्प्रवृद्धान्विनिहत्य राक्षसान्महाबलश्चण्डपराक्रमः कपिः ।
युयुत्सुरन्यैः पुनरेव राक्षसैस्तदेव वीरोऽभिजगाम तोरणम् १७
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चचत्वारिंशः सर्गः ॥४५॥

षट्चत्वारिंशः सर्गः । [१८११]

हतान्मन्त्रिसुतान्बुद्ध्वा वानरेण महात्मना ।
रावणः संवृताकारश्चकार मतिमुत्तमाम् १
स विरूपाक्षयूपाक्षौ दुर्धरं चैव राक्षसम् ।
प्रघसं भासकर्णं च पञ्चसेनाग्रनायकान् २
संदिदेश दशग्रीवो वीरान्नयविशारदान् ।
हनूमद्ग्रहणेऽव्यग्रान्वायुवेगसमान्युधि ३
यात सेनाग्रगाः सर्वे महाबलपरिग्रहाः ।
सवाजिरथमातङ्गाः स कपिः शास्यतामिति ४

…ली राक्षसांच्या शरीरातून रक्त वाहू लागल्यामुळे मार्गामध्ये रक्ताच्या नद्याच वाहू लागल्या आणि नाना प्रकारच्या आरोळ्यांनी लंका भेसूर नाद करू लागली. तो महाबलवान व प्रचंड पराक्रमी वीर वानर त्या मत्त राक्षसांचा वध करून इतर राक्षसांशी युद्ध करण्याकरिता पुनरपि त्या द्वाराजवळच जाऊन बसला ( १५–१७ )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणरूप आदिकाव्यातील सुंदरकांडांतील पंचेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४५ ॥

महात्म्या वानराने मंत्रिपुत्रांचा वध केला, असे समजल्यावर अंतःकरण [illegible] गेलेल्या रावणाने आपल्या समजुतीप्रमाणे एक उत्तम विचार मनात आणला. विरूपाक्ष, यूपाक्ष, दुर्धर, प्रघस आणि भासकर्ण असे पाच सेनाध्यक्ष [illegible] सेनाधिपतींना त्या रावणाने हनुमानाला धरण्याविषयी आज्ञा केली. [illegible] सेनाधिपती बुद्धिमान होते आणि युद्धामध्ये वेगाने [illegible] करणारे होते. ते म्हणाला, "हे सेनाधिपतींनो, तुम्ही सर्वही मोठे [illegible] [illegible] रथ व हत्ती घेऊन [illegible] त्या वानराचा [illegible]

यत्नैश्च खलु भाव्यं स्यात्तमासाद्य वनालयम् ।
कर्म चापि समाधेयं देशकालाविरोधितम् ।
नह्यहं तं कपिं मन्ये कर्मणा प्रतितर्कयन् ५
सर्वथा तन्महद्भूतं महाबलपरिग्रहम् ।
वानरोऽयमिति ज्ञात्वा न हि शुद्ध्यति मे मनः [ ६ [illegible] ]
नैवाहं तं कपिं मन्ये यथेयं प्रस्तुता कथा ।
भवेदिन्द्रेण वा सृष्टमस्मदर्थं तपोबलात् ७
सनागयक्षगन्धर्वदेवासुरमहर्षयः ।
युष्माभिः सहितैः सर्वैर्मया सह विनिर्जिताः ८
तैरवश्यं विधातव्यं व्यलीकं किंचिदेव नः ।
तदेव नात्र संदेहः प्रसह्य परिगृह्यताम् ९
यात सेनाग्रगाः सर्वे महाबलपरिग्रहाः ।
सवाजिरथमातङ्गाः स कपिः शास्यतामिति १०
नावमान्यो भवद्भिश्च कपिर्धीरपराक्रमः ।
दृष्टा हि हरयः शीघ्रं मया विपुलविक्रमाः ११

---

वानराची गाठ पडल्यावर तुम्ही दक्षतेने असा आणि देशकालाकडे दृष्टि देऊन, जे काय करावयाचें असेल, तें करा. ( १–५ )

वाली च सह सुग्रीवो जाम्बवांश्च महाबलः ।
नीलः सेनापतिश्चैव ये चान्ये द्विविदादयः १२
नैव तेषां गतिर्भीमा न तेजो न पराक्रमः ।
न मतिर्न बलोत्साहो न रूपपरिकल्पनम् १३
महत्सत्त्वमिदं ज्ञेयं कपिरूपं व्यवस्थितम् ।
प्रयत्नं महदास्थाय क्रियतामस्य निग्रहः १४
कामं लोकास्त्रयः सेन्द्राः ससुरासुरमानवाः ।
भवतामग्रतः स्थातुं न पर्याप्ता रणाजिरे १५
तथापि तु नयज्ञेन जयमाकाङ्क्षता रणे ।
आत्मा रक्ष्यः प्रयत्नेन युद्धसिद्धिर्हि चञ्चला १६
ते स्वामिवचनं सर्वे प्रतिगृह्य महौजसः ।
समुत्पेतुर्महावेगा हुताशसमतेजसः १७
रथैश्च मत्तैर्नागैश्च वाजिभिश्च महाजवैः ।
शस्त्रैश्च निशितैस्तीक्ष्णैः सर्वैश्चोपहिता बले १८

---

त्या महापराक्रमी वानराची तुम्ही उपेक्षा करूं नका. महापराक्रमी वानर मी पुष्कळ पाहिले आहेत. उदाहरणार्थ सुग्रीव, वाली, महाबलाढ्य जांबवान, सेनाधिपति नील आणि द्विविदप्रभृति इतरही वानर मी पाहिले आहेत. परंतु यांच्याप्रमाणे त्यांना भयंकर गति, तेज, पराक्रम, बुद्धि, बल आणि यांच्याप्रमाणे यथेष्ट रूपही धारण करता येत नाही. वानररूपाने हें एक मोठें भूतच उपस्थित झालें आहे, असेंच समजलें पाहिजे, म्हणून मोठ्या यत्नानें तुम्ही त्याला धरा. देव, दैत्य, मानव आणि इंद्र यांसह त्रैलोक्यसुद्धां खरोखर संग्रामामध्ये तुमच्यासमोर टिकाव धरण्यास जरी समर्थ नाही, तरी रणामध्ये जय इच्छिणाऱ्या नीतिज्ञ पुरुषानें स्वतःचें रक्षण प्रयत्नानें केलें पाहिजे. कारण युद्धामध्ये जय कोणाला प्राप्त होणार, हें अनिश्चित असतें " (११–१६)

आपल्या स्वामीचें भाषण मान्य करून, ते सर्वही महाबलाढ्य, महावेगवान आणि अग्नीसारखे तेजस्वी सेनाधिपति तेथून निघाले. रथ, मत्त हत्ती, महावेगवान अश्व, धार लावलेलीं तीक्ष्ण शस्त्रें आणि सर्व प्रकारचीं सैन्यें बरोबर घेऊन,

ततस्तु ददृशुर्वीरा दीप्यमानं महाकपिम्।
रश्मिमन्तमिवोद्यन्तं स्वतेजोरश्मिमालिनम्॥ १९

तोरणस्थं महावेगं महासत्त्वं महाबलम्।
महामतिं महोत्साहं महाकायं महाभुजम्॥ २०

स समीक्ष्यैव ते सर्वे दिक्षु सर्वास्ववस्थिताः।
तैस्तैः प्रहरणैर्भीमैरभिपेतुस्ततस्ततः॥ २१

तस्य पञ्चायसास्तीक्ष्णाः सिताः पीतमुखाः शराः।
शिरस्युत्पलपत्राभा दुर्धरेण निपातिताः॥ २२

स तैः पञ्चभिराविद्धः शरैः शिरसि वानरः।
उत्पपात नदन्व्योम्नि दिशो दश विनादयन्॥ २३

ततस्तु दुर्धरो वीरः सरथः सज्यकार्मुकः।
किरञ्शरशतैर्नैकैरभिपेदे महाबलः॥ २४

स कपिर्वारयामास तं व्योम्नि शरवर्षिणम्।
वृष्टिमन्तं पयोदान्ते पयोदमिव मारुतः॥ २५

---

फार तिकडे गेले असता तो देदीप्यमान् महाकपि त्यांना दिसला. स्वतःचेच
ठिकाणी असलेल्या प्रभेने युक्त असल्यामुळे तो वानर उदयाचलावर येत अस-
लेल्या सूर्याप्रमाणे दिसत होता. प्रचंड वेग, अनुपम धैर्य, अतर्क्य सामर्थ्य,
उत्तरोत्तर बुद्धि, अद्वितीय उत्साह, अनिर्वचनीय देह व अतुल पराक्रम यांनी युक्त
असलेला तो वानर दरवाजावर बसला होता (१७-२०)

त्याला पाहताक्षणी ते सर्व दिशांस उभे असलेले राक्षस नाना प्रकारच्या भयंकर
शस्त्रांचा मारा करीत चोहोंकडून त्याच्या अंगावर धावले. प्रथमतः दुर्धर राक्षसाने
त्याच्या मस्तकावर मुखाशी पीतवर्ण असलेले पांच श्वेतवर्ण व तीक्ष्ण बाण मारले,
परंतु त्याला ते कमलपत्राप्रमाणेच निरुपद्रवी भासले. त्या पांच बाणांनी मारुतीच्या
मस्तकाच ठिकाणी वेध झाला असता गर्जनेने दाही दिशा दणाणून टाकीत
टाकीत तो आकाशामध्ये उड्डाण करी. नंतर धनुष्य सज्ज करून रथावर असले-
ला महाबलाढ्य वीर दुर्धर शेकडो बाण टाकीत टाकीत हनुमंतावर चालून
आला. परंतु वर्षाकाल संपून गेला असता पर्जन्यवृष्टि करणाऱ्या मेघाला ज्या-

अर्द्यमानस्ततस्तेन दुर्धरेणानिलात्मजः ।
चकार निनदं भूयो व्यवर्धत च वीर्यवान् २६
स दूरं सहसोत्पत्य दुर्धरस्य रथे हरिः ।
निपपात महावेगो विद्युद्राशिर्गिराविव २७
ततः स मथिताष्टाश्वं रथं भग्नाक्षकूबरम् ।
विहाय न्यपतद्भूमौ दुर्धरस्त्यक्तजीवितः २८
तं विरूपाक्षयूपाक्षौ दृष्ट्वा निपतितं भुवि ।
तौ जातरोषौ दुर्धर्षावुत्पेततुररिन्दमौ २९
स ताभ्यां सहसोत्प्लुत्य विष्ठितो विमलेऽम्बरे ।
मुद्गराभ्यां महाबाहुर्वक्षस्यभिहतः कपिः ३०
तयोर्वेगवतोर्वेगं निहत्य स महाबलः ।
निपपात पुनर्भूमौ सुपर्ण इव वेगितः ३१

---

प्रमाणे वायु उडवून देतो, त्याप्रमाणे बाणवृष्टि करणाऱ्या त्या दुर्धराला त्या वानराने आकाशामध्ये उडवून दिलें तथापि, दुर्धर पीडा देऊं लागला असता त्या वायुपुत्र वीर्यवान् हनुमन्ताने गर्जना करून आणखीही आपलें शरीर मोठें केलें (२१–२६)

इतकेंच नव्हे, परंतु विजेचा लोट ज्याप्रमाणे पर्वतावर पडतो, त्याप्रमाणे तो महाप्रतापी वानर एकाएकी दुर्धराच्या रथावर पडला. तेव्हा त्या रथाच्या आठही अश्वांचा चुराडा झाला; दांडीही मोडून गेली; कण्याचेही तुकडे तुकडे झाले आणि अशा प्रकारच्या त्या रथांतून तो दुर्धर मरून भूमीवर पडला. याप्रमाणे भूमीवर पडलेल्या त्या दुर्धराला पाहून शत्रूला जेरीस आणणारे ते अजिंक्य विरूपाक्ष व यूपाक्ष क्रुद्ध झाले आणि त्यांनी उड्डाण केलें इतकेंच नव्हे तर एकदम उड्डाण करून त्या राक्षसांनी निर्मल आकाशामध्ये असलेल्या महापराक्रमी हनुमान् वानराच्या वक्षस्थलाचे ठिकाणीं मुद्गराच्या योगाने प्रहारही केला; तव ते त्या महाबलाढ्य वानराने आपल्या वज्रतुल्य वक्षस्थलाने त्या वेगवान् मुद्गरांचा वेग व्यर्थ केला आणि गरुडासारखा वेग धारण करून, त्याने पुनरपि भूमीवर उडी टाकली. (२७–३१)

स सालवृक्षमासाद्य समुत्पाट्य च वानरः।
तावुभौ राक्षसौ वीरौ जघान पवनात्मजः ३२
ततस्तांस्त्रीन्हतान्ज्ञात्वा वानरेण तरस्विना।
अभिगम्य महावेगः प्रहस्य प्रघसो बली ३३
भासकर्णश्च संक्रुद्धः शूलमादाय वीर्यवान्।
एकतः कपिशार्दूलं यशस्विनमवस्थितौ ३४
पट्टिशेन शिताग्रेण प्रघसः प्रत्यपोथयत्।
भासकर्णश्च शूलेन राक्षसः कपिकुञ्जरम् ३५
स ताभ्यां विक्षतैर्गात्रैरसृग्दिग्धतनूरुहः।
अभवद्वानरः क्रुद्धो बालसूर्यसमप्रभः ३६
समुत्पाट्य गिरेः शृङ्गं समृगव्यालपादपम्।
जघान हनुमान्वीरो राक्षसौ कपिकुञ्जरः ३७
गिरिशृङ्गसुनिष्पिष्टौ तिलशस्तौ बभूवतुः ३८
ततस्तेष्ववसन्नेषु सेनापतिषु पञ्चसु।

---

नंतर एका सालवृक्षासमीप जाऊन, तो उपटून त्या वायुपुत्र वानराने त्या उभयता वीर राक्षसांचा वध केला. नंतर त्या तिघा राक्षसांना वेगवान वानराने वध केला, असे जाणून महावेगवान् वेगाढ्य प्रघस हास्य करून एकदम हनुमानाच्या जवळ जाऊन उभा राहिला, आणि क्रुद्ध झालेला वीर्यवान् भासकर्णही हातामध्ये शूल घेऊन, त्या यशस्वी वानरश्रेष्ठाच्या [illegible] उभा राहिला. प्रघसाने आपल्या तीक्ष्ण धारेच्या पट्टिशाने [illegible] हनुमानावर [illegible] केला आणि भासकर्ण राक्षसाने त्याला शूलाने प्रहार केला. ( ३२-३० )

बलं तदवशेषं तु नाशयामास वानरः ३९
सश्वैरश्वान्गजैर्नागान्योधैर्योधान्रथै रथान् ।
स कपिर्नाशयामास सहस्राक्ष इवासुरान् ४०
हयैर्नागैस्तुरङ्गैश्च भग्नाक्षैश्च महारथैः ।
हतैश्च राक्षसैर्भूमी रुद्धमार्गा समन्ततः ४१
ततः कपिस्तान्ध्वजिनीपतीन्रणे निहत्य वीरान्सबलान्सवाहनान् ।
तथैव वीरः परिगृह्य तोरणं कृतक्षणः काल इव प्रजाक्षये ४२

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी॰ आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षट्चत्वारिंश. सर्गः ॥४६॥

सप्तचत्वरिंश. सर्गः । [१९३३]

सेनापतीन्पञ्च स तु प्रमापितान्हनूमता सानुचरान्सवाहनान् ।
निशम्य राजा समरोद्धतोन्मुखं कुमारमक्षं प्रसमैक्षताक्षम् १
स तस्य दृष्ट्यर्पणसंप्रचोदितः प्रतापवान्काञ्चनचित्रकार्मुकः ।

शिल्लक राहिलेल्या त्या राक्षससेनेचा हनुमान् वानराने वध केला. सहस्राक्ष इंद्र ज्याप्रमाणे दैत्यांचा नाश करतो, त्याप्रमाणे त्या कपीने अश्वांच्या योगाने अश्वांचा, हत्तींच्या योगाने हत्तींचा, योद्ध्यांच्या योगाने योद्ध्यांचा आणि रथांच्या योगाने रथांचा नाश करून टाकला, व मरण पावलेले राक्षस, जलद गतीचे अश्व व हत्ती आणि कणे मोडून गेलेले मोठे मोठे रथ यामुळे त्या रणभूमीतील सर्वही मार्ग बंद होऊन गेले. स राजा, याप्रमाणे सेना आणि वाहनें यांसह त्या वीर सेनाधिपतींचा संग्रामामध्ये वध केल्यावर तो वीर हनुमान वानर, प्रजेचा संहार केल्यानंतर विश्रांति घेत असणाऱ्या कालाप्रमाणेच की काय, त्या द्वाराचा आश्रय करून विश्रांति घेत पडला ( ३९–४२ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिरचित श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडापैकी शेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४६ ॥

हनुमानाने वाहनें व अनुयायी यांसह पाचही सेनापतींचा वध केल्याचें ऐकून संग्राममध्ये भयंकर आणि युद्धाविषयी उत्सुक अशा तेथे प्रत्यक्ष असलेल्या अक्ष नावाच्या राक्षसकुमाराला राक्षसराज रावणाने नेत्रसंकेतानें सुचविलें आणि त्या राजाच्या नेत्रसंकेतानें जाण्याची आज्ञा मिळालेला, सुवर्णानें शृंगारलेलें

समुत्पपाताथ सदस्युदीरितो द्विजातिमुख्यैर्हविषेव पावकः २
ततो महान्बालदिवाकरप्रभं प्रतप्तजाम्बूनदजालसन्ततम् ।
रथं समास्थाय ययौ स वीर्यवान्महाहरिं तं प्रति नैर्ऋतर्षभः ३
ततस्तपःसंग्रहसंचयार्जितं प्रतप्तजाम्बूनदजालचित्रितम् ।
पताकिनं रत्नविभूषितध्वजं मनोजवाष्टाश्ववरैः सुयोजितम् ४
सुरासुराधृष्यमसङ्गचारिणं तडित्प्रभं व्योमचरं समाहितम् ।
सतूणमष्टासिनिबद्धबन्धुरं यथाक्रमावेशितशक्तितोमरम् ५
विराजमानं प्रतिपूर्णवस्तुना सहेमदाम्ना शशिसूर्यवर्चसा ।
दिवाकराभं रथमास्थितस्ततः स निर्जगामामरतुल्यविक्रमः ६
स पूरयन्खं च महीं च साचलां तुरङ्गमातङ्गमहारथस्वनैः ।
बलैः समेतैः सह तोरणस्थितं समर्थमासीनमुपागमत्कपिम्

धनुष्य हातात घेऊन तयार असलेला प्रतापी अक्ष, यज्ञमंडपामध्ये ब्राह्मणांनी तुपाने प्रज्वलित केलेला अग्नीच की काय, अशा रीतीने तेथून निघाला. तदनंतर बालसूर्याप्रमाणे ज्याची प्रभा आहे आणि उत्कृष्ट सोन्याच्या अलंकारांनी जो व्याप्त झालेला आहे, अशा रथावर आरूढ होऊन तो प्रचंड राक्षसश्रेष्ठ वीर्यवान् अक्ष त्या महाकपीकडे निघाला. (१-३)

तात्पर्य, तपश्चर्येच्या समृद्धीमुळे जो प्राप्त झाला आहे, उत्कृष्ट सोन्याच्या अलंकारांनी जो शृंगारलेला आहे, पताका, रत्नविभूषित ध्वज आणि मनाप्रमाणे वेगवान् श्रेष्ठ अश्व यांनी जो युक्त आहे, ज्याच्यावर देवदैत्यांचा हल्ला होणे कठिण आहे, ज्याची गति कोठेही अडत नाही, विद्युल्लतेसारखी ज्याची प्रभा आहे, युद्धसामुग्रीने युक्त असून, जो आकाशमार्गाने संचार करणारा आहे, ज्याच्यावर भाते ठेविले आहेत, ज्याच्या आठही बाजूंस तरवारी लटकविलेल्या आहेत, शक्ति व तोमर ही आयुधे ज्यावर योग्य ठिकाणी ठेवलेली आहेत, सोन्याच्या कड्यांना अडकविलेल्या आणि चंद्रसूर्यांप्रमाणे तेजस्वी असलेल्या युद्धोपयोगी वस्तूंनी जो भरलेला आहे आणि सूर्याप्रमाणे ज्याची प्रभा आहे, अशा रथावर आरूढ होऊन, तो देवांसारखा पराक्रमी अक्ष तेथून बाहेर पडला. अश्व, हत्ती आणि मोठमोठे रथ यांच्या ध्वनींनी आकाश-पर्वतांसह पृथ्वी दणाणून टाकीत, तो अक्ष

स तं समासाद्य हरिं हरीक्षणो युगान्तकालाग्निमिव प्रजाक्षये ।
अवस्थितं विस्मितजातसंभ्रमं समैक्षताक्षो बहुमानचक्षुषा ८
स तस्य वेगं च कपेर्महात्मनः पराक्रमं चारिषु रावणात्मजः ।
विचारयन्स्वं च बलं महाबलो युगक्षये सूर्य इवाभिवर्धत ९
स जातमन्युः प्रसमीक्ष्य विक्रमं स्थितः स्थिरः संयति दुर्निवारणम् ।
समाहितात्मा हनुमन्तमाहवे प्रचोदयामास शितैः शरैस्त्रिभिः १०
ततः कपिं तं प्रसमीक्ष्य गर्वितं जितश्रमं शत्रुपराजयोचितम् ।
अवैक्षताक्षः समुदीर्णमानसं सबाणपाणिः प्रगृहीतकार्मुकः ११
स हेमनिष्काङ्गदचारुकुण्डलः समाससादाशुपराक्रम कपिम् ।
तयोर्बभूवाप्रतिमः समागमः सुरासुराणामपि संभ्रमप्रदः १२
ररास भूमिर्न तताप भानुमान्ववौ न वायुः प्रचचाल चाचलः ।

---

राक्षस एकत्र जुळलेल्या सैन्यासह दारावर बसलेल्या त्या समर्थ वानराजवळ गेला. सिंहाप्रमाणे क्रोधदृष्टीने युक्त असलेला तो अक्ष त्या वानराजवळ जाऊन दृष्टीने पाहू लागला. असता, प्रजेच्या संहारानंतर बसलेला प्रलयकालचा अग्नि च की काय, असा तो हनुमान् विस्मयचकित व क्षुब्ध होऊन बसलेला त्याने पाहिला. (७-८)

नंतर शत्रूचे ठिकाणी गाजलेल्या त्या महात्म्या वानराचा पराक्रम आणि वेग व स्वतःचे बल ही लक्षात आणून तो महाबलाढ्य रावणपुत्र अक्ष प्रलयकाली वृद्धिंगत होणाऱ्या सूर्याप्रमाणे वाढला. संग्रामामध्ये निवारण होण्यास अशक्य अशा त्या हनुमानाचा पराक्रम पाहून क्रुद्ध झालेला तो अक्ष स्वस्थ उभा राहिला आणि मनामध्ये धारिष्ट ठेवून न जाता तीक्ष्ण अशा तीन बाणांनी हनुमानाला त्याने युद्धाकरिता आव्हान दिले. नंतर हनुमान् वानर शत्रूचा पराभव करण्यास समर्थ, श्रम जिंकिलेला व गर्विष्ठ आहे, असे पाहून हातामध्ये धनुष्य घेतलेला तो अक्ष क्षुब्ध मनाने इकडेतिकडे पाहू लागला आणि अमोघ पराक्रम करणारा व सौवर्ण उरोभूषणे, बाहुभूषण व मनोहर कुंडले यांनी युक्त असलेला तो अक्ष त्या वानराला जाऊन भिडला. आणि, देवदैत्यांनाही मोठा उत्साह करणारा असा त्या उभयतांमध्ये अप्रतिम द्वंद्वयुद्धाचा सामना झाला. (९-१२)

कपेः कुमारस्य च वीर्यसंयुगं ननाद च द्यौरुदधिश्च चुक्षुभे १३
स तस्य वीरः सुमुखान्पतत्रिणः सुवर्णपुङ्खान्सविषानिवोरगान् ।
समाधिसंयोगविमोक्षतत्त्वविच्छरानथ त्रीन्कपिमूर्ध्न्यताडयत् १४
स तैः शरैर्मूर्ध्नि समं निपातितैः क्षरन्नसृग्दिग्धविवृत्तनेत्रः ।
नवोदितादित्यनिभः शरांशुमान्व्यराजतादित्य इवांशुमालिकः १५
ततः प्लवङ्गाधिपमन्त्रिसत्तमः समीक्ष्य तं राजवरात्मजं रणे ।
उदग्रचित्रायुधचित्रकार्मुकं जहर्ष चापूर्यत चाहवोन्मुखः १६
स मन्दराग्रस्थ इवांशुमाली विवृद्धकोपो बलवीर्यसंवृतः ।
कुमारमक्षं सबलं सवाहनं ददाह नेत्राग्निमरीचिभिस्तदा १७
ततः सबाणासनशक्रकार्मुकः शरप्रवर्षो युधि राक्षसाम्बुदः ।

---

भूमीवरील प्राणी आक्रोश करूं लागले, सूर्याचा प्रकाश पडेनासा झाला; वायु स्तब्ध झाला, पर्वत हालूं लागले आणि कपि व रावणकुमार यांचें तें वीर्यामुळे प्रवृत्त झालेलें युद्ध पाहून स्वर्ग दुमदुमून राहिला व समुद्रही क्षुब्ध होऊन गेला. लक्ष्य, संधान व प्रयोग यांचें तत्त्व जाणणाऱ्या त्या वीर अक्षानें विषयुक्त भुजंगच कीं काय, असे उत्कृष्ट अग्रें व सुवर्णाचीं पिसें यांनी युक्त असलेले तीन बाण वानराच्या मस्तकावर टाकले. तेव्हां एकदम मस्तकावर टाकलेल्या त्या बाणाच्या योगानें ज्याचें शरीर भरून गेलें आहे व ज्याचे नेत्र फिरून गेले आहेत, असा तो बालसूर्यतुल्य तेजस्वी हनुमान् बाणरूप किरणांनीं युक्त झाला असल्यामुळे किरणसमुदाय धारण करणाऱ्या सूर्याप्रमाणें झळकूं लागला. (१३–१५)

नंतर राजाधिराज रावणाचा पुत्र संग्रामामध्ये आपलीं अद्भुत आयुधें व चकित करून सोडणारें धनुष्य सज्ज करून उभा असल्याचें पाहून वानरराज सुग्रीवाचा तो श्रेष्ठ मंत्री हनुमान् आनंदित झाला आणि युद्धविषयीं उत्सुक होऊन वृद्धिंगत होऊं लागला. असो मंदरपर्वताच्या शिखरावर आलेल्या मध्या-ह्नकालच्या सूर्याप्रमाणें ज्याचें कोपरूप तेज वृद्धिंगत झालें आहे आणि बल व वीर्य यांनी जो युक्त आहे, तो हनुमान् डोळ्यांतील अग्नीच्या किरणांनी त्या अक्ष-कुमाराला सैन्य व वाहनें यांसह जाळूं लागला. तदनंतर मेघ ज्याप्रमाणें महा-

तमात्तबाणासनमाहवोन्मुखं खमास्तृणन्तं विविधैः शरोत्तमैः ।
अवैक्षताक्षं बहुमानचक्षुषा जगाम चिन्तां स च मारुतात्मजः २४
ततः शरैर्भिन्नभुजान्तरः कपिः कुमारवर्येण महात्मना नदन् ।
महाभुजः कर्मविशेषतत्त्वविद्विचिन्तयामास रणे पराक्रमम् २५
अबालवद्बालदिवाकरप्रभः करोत्ययं कर्म महान्महाबलः ।
न चास्य सर्वाहवकर्मशालिनः प्रमापणे मे मतिरत्र जायते २६
अयं महात्मा च महांश्च वीर्यतः समाहितश्चातिसहश्च संयुगे ।
असंशयं कर्मगुणोदयादयं सनागयक्षैर्मुनिभिश्च पूजितः २७
पराक्रमोत्साहविवृद्धमानसः समीक्षते मां प्रमुखोऽग्रतः स्थितः ।
पराक्रमो ह्यस्य मनांसि कम्पयेत्सुरासुराणामपि शीघ्रकारिणः २८

---

करिता तो युद्धात भयंकर पराक्रम करणारा व मनाप्रमाणे वेगवान् असलेला वीर हनुमान् आकाशमार्गामध्ये बाण चुकवीत वायूप्रमाणे सत्वर संचार करूं लागला. प्रथमतः धनुष्य घेऊन आणि युद्धाविषयी उत्सुक होऊन, नाना प्रकारच्या उत्कृष्ट बाणांनी आकाश व्यापीत असलेल्या त्या अक्षाकडे ऐटीनें पाहिल्यावर तो वायुपुत्र हनुमान् चिंताक्रांत झाला. ( २०-२४ )

नंतर कुमारश्रेष्ठ महात्म्या अक्षानें बाणाच्या योगानें ज्याचें वक्षस्थल भेदून टाकिलें आहे, अशा त्या गर्जना करणाऱ्या महपराक्रमी आणि पराक्रमाचें विशेष तत्त्व जाणणाऱ्या वानरानें संग्रामामध्यें पराक्रम करण्याचा विचार चालविला. तो म्हणाला, " हा महाबलाढ्य प्रचंड राक्षस बालसूर्याप्रमाणें तेजस्वी असून, प्रौढ वीराप्रमाणें कृति करीत आहे. वास्तव युद्धासंबंधी सर्व प्रकारचे पराक्रम करीत असलेल्या या राक्षसाचा आताच वध करावा, असें मला वाटत नाहीं. हा महात्मा वीर्यानें मोठा असून, दक्ष व संग्रामामध्यें अतिशय सहनशील आहे. म्हणून पराक्रम व गुण यांचे ठिकाणीं स्पर्धा पडत असल्यामुळें नाग आणि यक्ष यांसह मुनि निःसंशय त्याची प्रशंसा करीत असतील. ( २५-२७ )

पराक्रम आणि उत्साह यांच्या योगानें ज्याचें मन विश्राम पावलें आहे, असा हा माझ्यासमोर उभा असलेला राक्षस माझ्याकडे पहात आहे, परंतु या

न खल्वयं नाभिभवेदुपेक्षितः पराक्रमो ह्यस्य रणे विवर्धते।
प्रमापणं ह्यस्य ममाद्य रोचते न वर्धमानोऽग्निरुपेक्षितुं क्षमः २९
इति प्रवेगं तु परस्य तर्कयन्स्वकर्मयोगं च विधाय वीर्यवान्।
चकार वेगं तु महाबलस्तदा मतिं च चक्रेऽस्य वधे तदानीम् ३०
स तस्य तानष्ट वरान्महाहयान्समाहितान्भारसहान्विवर्तने।
जघान वीरः पथि वायुसेविते तलप्रहारैः पवनात्मजः कपिः ३१
ततस्तलेनाभिहतो महारथः स तस्य पिङ्गाधिपमन्त्रिनिर्जितः।
स भग्ननीडः परिवृत्तकूबरः पपात भूमौ हतवाजिरम्बरात् ३२
स तं परित्यज्य महारथो रथं सकार्मुकः खड्गधरः खमुत्पतन्।
ततोऽभियोगादृषिरुग्रवीर्यवान्विहाय देहं मरुतामिवालयम् ३३
कपिस्ततस्तं विचरन्तमम्बरे पतत्रिराजानिलसिद्धसेविते।

---

उरस ही राक्षसाचा पराक्रम देवदैत्यांच्याही मनामध्ये कापरें भरविण्यासारखा आहे याची उपेक्षा केली असता हा आपला पराभव करण्यास कमी करणार नाही, संग्रामामध्ये याचा पराक्रम वाढतच आहे याकरिता आज याचा वध करणें मला बरें दिसतें, कारण प्रदीप्त होत असलेल्या अग्नीची उपेक्षा करणें योग्य नाही " याप्रमाणे शत्रूच्या पराक्रमाचा विचार करून आणि स्वतःचाही पराक्रम मनात आणून त्या महाबलाढ्य वीर्यवान् हनुमानानें अति वेग स्वीकारून त्याच वेळीं त्याचा वध करण्याचा विचार केला ( २८–३० )

प्रथमत त्या वायुपुत्र वीर हनुमानानें आकाशामध्ये असताना केवळाही चाल लाविलें, तरी गोंधळून न जाणाऱ्या व भार सहन करणाऱ्या त्या राक्षसाच्या मोठ्या मोठ्या श्रेष्ठ आठ अश्वांचा तलप्रहारानीं वध केला त्याच्या, तलप्रहाराचा तडाखा बसल्याबरोबर रथातील बसण्याचें ठिकाण मोडून गेलें, दांड्याही उलटा झाल्या आणि अशा रीतीनें वानराधिपति सुग्रीवाच्या मंत्र्याचे हातून भग्न झालेला तो महारथ अश्व मृत झाल्यामुळे आकाशातून भूमीवर पडला. नंतर पाहून धनुष्य व खड्ग धारण करणारा तो महारथी, महावीर्यवान्, अक्ष तो रथ सोडून आकाशामध्ये उड्डाण करूं लागला असता योगसामर्थ्यानें देह त्याग करून स्वर्गारोहण करणारा ऋषीच जणूं काय, असा दिसूं लागला. तदनंतर

समेत्य तं मारुतवेगविक्रमः क्रमेण जग्राह च पादयोर्दृढम् ३४
स तं समाविध्य सहस्रशः कपिर्महोरगं गृह्य इवाण्डजेश्वरः ।
मुमोच वेगात्पितृतुल्यविक्रमो महीतले संयति वानरोत्तमः ३५
स भग्नबाहूरुकटीपयोधरः क्षरन्नसृङ्निर्मथितास्थिलोचनः ।
संभिन्नसंधिः प्रविकीर्णबन्धनो हतः क्षितौ वायुसुतेन राक्षसः ३६
महाकपिर्भूमितले निपीड्य तं चकार रक्षोधिपतेर्महद्भयम् ।
महर्षिभिश्चक्रचरैः समागतैः समेत्य भूतैश्च सयक्षपन्नगैः ।
सुरैश्च सेन्द्रैर्भृशजातविस्मयैर्हते कुमारे स कपिर्निरीक्षितः ३७
निहत्य तं वज्रिसुतोपमं रणे कुमारमक्षं क्षतजोपमेक्षणम् ।
तदेव वीरोऽभिजगाम तोरणं कृतक्षणः काल इव प्रजाक्षये ३८
इत्यार्षे श्रीम० वाल्मी० आदिकाव्ये सुन्दरकाण्डे सप्तचत्वारिंशः सर्गः ॥४७॥[१५७१]

पक्षिराज गरुड, वायु आणि सिद्ध यांनी स्वीकार केलेल्या आकाशामध्ये तो अक्ष संचार करूं लागला असतां, तो वायूसारखा वेगवान् व पराक्रमी वानर त्याच्याशीं जाऊन भिडला आणि नंतर त्यानें त्याचे दोन्ही पाय घट्ट धरिले. ( ३१-३४ )

नंतर मोठा सर्प घेतलेला पक्षिराज गरुडच कीं काय, अशा त्या पितृतुल्य पराक्रमी वानरश्रेष्ठ हनुमानानें त्याला हजारो वेळां रणामध्ये गरगर फिरवून वेगानें भूमीवर टाकिलें, तेव्हां त्याचे हात, पाय, कंबर व छाती यांचा चुराडा होऊन गेला, शरीरांतून रक्तस्राव चालला. हाडें पिचून गेलीं; डोळे फाटले सांधे फुटून गेले, शिराही अस्ताव्यस्त झाल्या आणि अशा रीतीनें तो राक्षस वायुपुत्र हनुमानाच्या हातून भूमीवर मरून पडला. अशो महाकपि हनुमानानें त्याला भूतलावर आपटून राक्षसाधिपति रावणाच्या अंतःकरणांत मोठें भय उत्पन्न केलें आणि कुमाराचा वध झाला असतां एकत्र जुळलेले ग्रह, महर्षि, भूतें, यक्ष, पन्नग, आणि इंद्र यांसह देव अत्यंत विस्मयचकित होऊन त्या वानराकडे पाहूं लागले. याप्रमाणें इंद्रपुत्र जयंताप्रमाणें असलेल्या आणि क्रोधामुळें डोळे लाल झालेल्या त्या कुमार अक्षाचा वध करून, तो वीर हनुमान् प्रजेचा संहार केल्यानंतर दमूनभागून गेलेल्या कालाप्रमाणें त्या दरवाजावर गेला. ( ३४-३८ )

अष्टचत्वारिंशः सर्गः ।

ततस्तु रक्षोधिपतिर्महात्मा हनूमताक्षे निहते कुमारे ।
मनः समाधाय स देवकल्पं समादिदेशेन्द्रजितं सरोषः १
त्वमस्त्रविच्छस्त्रभृतां वरिष्ठः सुरासुराणामपि शोकदाता ।
सुरेषु सेन्द्रेषु च दृष्टकर्मा पितामहाराधनसंचितास्त्रः २
त्वदस्त्रबलमासाद्य ससुराः समरुद्गणाः ।
न शेकुः समरे स्थातुं सुरेश्वरसमाश्रिताः ३
न कश्चित्त्रिषु लोकेषु संयुगे न गतश्रमः ।
भुजवीर्याभिगुप्तश्च तपसा चाभिरक्षितः ।
देशकालप्रधानश्च त्वमेव मतिसत्तमः ४
न तेऽस्त्यशक्यं समरेषु कर्मणां न तेऽस्त्यकार्यं मतिपूर्वमन्त्रणे ।
न सोऽस्ति कश्चित्त्रिषु संग्रहेषु न वेद यस्तेऽस्त्रबलं बलं च ५

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडापैकी सत्तेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४७ ॥

हनुमानाने कुमार अक्षाचा वध केला असल्याची वार्ता ऐकून, त्या महात्म्या राक्षसाधिपति रावणाने मन घट्ट करून, रागाचे भरात देवतुल्य इंद्रजिताला हनुमानावर चालून जाण्याची आज्ञा दिली रावण म्हणाला, "तूं अस्त्रवेत्ता आहेस, शस्त्र धारण करणाऱ्यामध्ये श्रेष्ठ आहेस, देवदैत्यांना भय उत्पन्न करणारा आहेस, इंद्रासह सर्व देवांना तुझा पराक्रम अनुभवास आलेला असून ब्रह्मदेवाची शुश्रूषा करून, तूं शस्त्रविद्या संपादन केली आहेस. तुझ्या अस्त्रसामर्थ्यामुळेच इंद्राचा आश्रय करून राहिलेले मरुद्गणासह सर्व देव संग्रामामध्ये तुझ्यापुढे टिकाव धरण्यास समर्थ झाले नाहीत संग्रामामध्ये तुझ्यावाचून श्रांत न होणारा असा त्रैलोक्यांत दुसरा कोणीही वीर नाही बाहुबलाने व तपाने तूं सुरक्षित आहेस, त्याचप्रमाणे बुद्धिमानामध्येही तूंच श्रेष्ठ आहेस आणि साप्रत तूंच या पृथ्वीमध्ये एकमेव वीर आहेस युद्धप्रसंगी करावयाच्या कर्मांत तुला अशक्य कर्म कोणतेंच नाही. बुद्धिपूर्वक राजकार्याचा विचार करण्याचा समय आला, तरी तुझ्या बुद्धीला गहन अशी कोणतीही गोष्ट नाही आणि तुझें सामर्थ्य व अस्त्रबल न जाणणारा असा

ममानुरूपं तपसो बलं च ते पराक्रमश्चास्त्रबलं च संयुगे ।
न त्वा समासाद्य रणावमर्दे मनः श्रमं गच्छति निश्चितार्थम् ६

निहताः किङ्कराः सर्वे जम्बुमाली च राक्षसः ।
अमात्यपुत्रा वीराश्च पञ्च सेनाग्रगामिनः ७
बलानि सुसमृद्धानि साश्वनागरथानि च ।
महोदरश्च शयितः कुमारोऽक्षश्च सूदितः ८
न तु तेष्वेव मे सारो यस्त्वय्यरिनिषूदन ९

इदं च दृष्ट्वा निहतं महद्बलं कपेः प्रभावं च पराक्रमं च ।
त्वमात्मनश्चापि निरीक्ष्य सारं कुरुष्व वेगं स्वबलानुरूपम् १०
बलावमर्दस्त्वयि संनिकृष्टे यथागते शाम्यति शान्तशत्रुः ।
तथा समीक्ष्यात्मबलं परं च समारभस्वास्त्रभृतां वरिष्ठ ११
न वीर सेना गणशो च्यवन्ति न वज्रमादाय विशालसारम् ।

त्रैलोक्यामध्ये कोणीही नाही. ( १-५ )

संग्रामामध्ये तुझा पराक्रम, अस्त्रबल आणि तप सामर्थ्य हीं सर्व माझ्याप्रमाणे आहेत आणि म्हणूनच निकराचे युद्ध सुरु झालें, तरी जयाविषयी निःसंशय असलेलें माझें मन, तुझा मला आधार असल्यामुळे साशंक होत नाही. सर्व किंकर, जंबुमाली, राक्षस वीर व सेनाधिपति असे पांचही अमात्यपुत्र, अश्व, गज आणि रथ असलेल्या समृद्ध व सुसज्ज सेना, महोदर व कुमार अक्ष या सर्वांचा वध झाला आहे, परंतु हे शत्रुनाशका इंद्रजिता, तुझ्या पराक्रमाची ज्याप्रमाणे मला खात्री आहे, त्याप्रमाणे त्यांची खात्री मला मुळीच नव्हती. आता नाश पावलेलें प्रचंड सैन्य लक्ष्यात आणून, वानराचा प्रभाव आणि पराक्रम याकडे दृष्टि देऊन व आपल्या सामर्थ्याचाही विचार करुन, तूं आपल्या सामर्थ्याला व कीर्तीला योग्य त्या रीतीने त्या वानरावर हल्ला कर. ( ६—१० )

हे अस्त्र धारण करणाऱ्यांमधील श्रेष्ठ इंद्रजिता, तूं युद्ध करण्यासाठी शत्रूपुढे गेलास, म्हणजे आपल्या व शत्रूच्या बलाचा विचार करुन आपल्या सैन्याच्या मान्याने शत्रूचा नाश होईल अशी दृष्टि ठेवून, युद्धाला आरंभ कर. हे वीरा, सेनाचा तेथे कांहीएक उपयोग नाही, कारण सैन्याच्या झुंडीच्या झुंडी जरी हनुमानाकडे

न मारुतस्यास्ति गतिप्रमाणं न चाग्निकल्पः करणेन हन्तुम् १२
तमेवमर्थं प्रसमीक्ष्य सम्यक्स्वकर्मसाम्याद्धि समाहितात्मा।
स्मरंश्च दिव्यं धनुषोऽस्य वीर्यं व्रजाक्षतं कर्म समारभस्व १३
न खल्वियं मतिश्रेष्ठ यत्त्वां संप्रेषयाम्यहम्।
इयं च राजधर्माणां क्षत्रस्य च मतिर्मता १४
नानाशास्त्रेषु सङ्ग्रामे वैशारद्यमरिन्दम।
अवश्यमेव बोद्धव्यं काम्यश्च विजयो रणे १५
ततः पितुस्तद्वचनं निशम्य प्रदक्षिणं दक्षसुतप्रभावः।
चकार भर्तारमतित्वरेण रणाय वीरः प्रतिपन्नबुद्धिः १६
ततस्तैः स्वगणैरिष्टैरिन्द्रजित्प्रतिपूजितः।

---

गेल्या, तरी त्याच्याशीं गाठ पडली की, त्या पकडून जात असतात त्याचप्रमाणे प्रचंड सामर्थ्य असलेल्या वज्राचा काही उपयोग व्हावयाचा नाही, कारण वायुपुत्र हनुमानाचें सामर्थ्य किती आहे, याची अटकळ करता येणें अशक्य आहे आणि तो अग्नितुल्य असल्यामुळे शस्त्रादि साधन नेही याचा वध करता येणें शक्य नाही यासाठी मी सांगितलेल्या गोष्टीचा नीट विचार करून, तुझ्या स्वतःच्या पराक्रमाशीं त्या वानराच्या पराक्रमाचें साम्य असल्यामुळे, तूं आपलें चित्त स्वस्थ ठेव आणि त्या दिव्य धनुष्याचें सामर्थ्य लक्ष्यात घेऊन युद्धास जा आणि शत्रूचा एकही वार अंगावर न घेता त्याचा पराभव करण्याचें काम चालू कर (११–१३)

हे बुद्धिमानांमधील श्रेष्ठ इंद्रजिता, आतांच्या प्रसंगी मी तुला पाठवीत आहें, हा जरी माझा विचार बरोबर नाही, तरी राजधर्म आणि क्षात्रधर्म लक्ष्यात घेऊनच मी हा बेत निश्चित केला आहे हे शत्रुदमना, राजानें नाना प्रकारच्या शास्त्रांमध्ये आणि संग्रामामध्ये नैपुण्य संपादन केलें पाहिजे संग्रामांत जय प्राप्त व्हावा, अशी ज्याला इच्छा असेल, त्यानें नाना प्रकारच्या शास्त्रांचें ज्ञान अवश्य संपादन केलें पाहिजे " हें पित्याचें भाषण ऐकून त्या देवतुल्यपराक्रमी वीर इंद्रजितानें रणांत जाण्याचा निश्चय केला व अतित्वरेनें त्यानें रावणराजाला प्रदक्षिणा केली नंतर स्वतःला योग्य वाटले असे आपले गण बरोबर घेऊन,

युद्धोद्धतकृतोत्साहः सङ्ग्रामं संप्रपद्यत १७
श्रीमान्पद्मविशालाक्षो राक्षसाधिपतेः सुतः ।
निर्जगाम महातेजाः समुद्र इव पर्वणि १८
स पक्षिराजोपमतुल्यवेगैर्व्यालैश्चतुर्भिः स तु तीक्ष्णदंष्ट्रैः ।
रथं समायुक्तमसह्यवेगः समारुरोहेन्द्रजिदिन्द्रकल्पः १९
स रथी धन्विनां श्रेष्ठः शस्त्रज्ञोऽस्त्रविदां वरः ।
रथेनाभिययौ क्षिप्रं हनूमान्यत्र सोऽभवत् २०
स तस्य रथनिर्घोषं ज्यास्वनं कार्मुकस्य च ।
निशम्य हरिवीरोऽसौ संप्रहृष्टतरोऽभवत् २१
इन्द्रजिच्चापमादाय शितशल्यांश्च सायकान् ।
हनूमन्तमभिप्रेत्य जगाम रणपण्डितः २२
तस्मिंस्ततः संयति जातहर्षे रणाय निर्गच्छति बाणपाणौ ।
दिशश्च सर्वाः कलुषा बभूवुर्मृगाश्च रौद्रा बहुधा विनेदुः २३

---

युद्धामध्ये यशस्वी आणि उत्साही असलेला व नांवाजलेला तो इंद्रजित् समरांगणात उतरला. ( १४–१७ )

कमलपत्राप्रमाणे ज्याचे नेत्र विशाल आहेत, आणि पर्वदिवशी वृद्धिगत होणाऱ्या समुद्राप्रमाणे जो वृद्धिगत होत आहे, असा तो राक्षसाधिपति रावणाचा पुत्र, महातेजस्वी व वैभवशाली इंद्रजित् युद्धाकरता बाहेर पडला. पक्षिराज गरुडाप्रमाणे ज्याचा वेग आहे व ज्यांचे दंत तीक्ष्ण आहेत, असे चार गज जोडलेल्या रथात तो शत्रूंवर असह्य हल्ला करणारा इंद्रतुल्य इंद्रजित् जाऊन बसला. धनुर्धरामध्ये श्रेष्ठ व अस्त्रवेत्त्यामध्ये वरिष्ठ असलेला तो रथी व शस्त्रवेत्ता इंद्रजित् रथात बसून हनुमान् होता त्या दिशेस तातडीने निघाला. तेव्हा त्याच्या रथाचा घोष आणि धनुष्याचा व त्याचे दोरीचा टणत्कार ऐकून, वानरवीर हनुमानाला फारच हर्ष झाला. ( १८–२१ )

तो रणपंडित इंद्रजित् फळ धारलेले बाण व धनुष्य घेऊन हनुमानाकडे गेला. हातामध्ये बाण घेऊन तो इंद्रजित् आनंदाने रणाकडे जात असतां सर्व दिशा धुंद होऊन गेल्या आणि अशुभसूचक वनचरप्राणी नाना प्रकारें ओरडू

समागतास्तत्र तु नागयक्षा महर्षयश्चक्रचराश्च सिद्धाः।
नभः समावृत्य च पक्षिसङ्घा विनेदुरुच्चैः परमप्रहृष्टाः २४

आयान्तं सरथं दृष्ट्वा पूर्णमिन्द्रध्वजं कपिः।
ननाद च महानादं व्यवर्धत च वेगवान् २५
इन्द्रजित्स रथं दिव्यमाश्रितश्चित्रकार्मुकः।
धनुर्विस्फारयामास तडिदूर्जितनिःस्वनम् २६

ततः समेतावतितीक्ष्णवेगौ महाबलौ तौ रणनिर्विशङ्कौ।
कपिश्च रक्षोधिपतेस्तनूजः सुरासुरेन्द्राविव बद्धवैरौ २७
स तस्य वीरस्य महारथस्य धनुष्मतः संयति संमतस्य।
शरप्रवेगं व्यहनत्प्रवृद्धश्चचार मार्गे पितुरप्रमेयः २८
ततः शरानायततीक्ष्णशल्यान्सुपत्रिणः काञ्चनचित्रपुङ्खान्।
मुमोच वीरः परवीरहन्ता सुसन्ततान्वज्रसमानवेगान् २९
ततः स तत्स्यन्दननिःस्वनं च मृदङ्गभेरीपटहस्वनं च।

करूं लागले; त्याचप्रमाणे तेथे असलेले नाग व यक्ष, महर्षि, ग्रह, सिद्ध आणि आकाश व्याप्त करून राहिलेले पक्षिगण पराकाष्ठेचे आनंदित होऊन, उच्च स्वराने गर्जना करूं लागले. रथाबरोबर येत असलेला विशाल इंद्रध्वज पाहतांच त्या वेगवान् वानराने मोठी गर्जना करून तो उद्दिगत झाला. हें पाहून त्या दिव्य रथांत बसलेला आणि अद्भुत धनुष्य धारण केलेला तो इंद्रजित् विद्युतेसारखें तेजस्वी व मोठा शब्द करणारें आपलें धनुष्य ओढूं लागला. ( २२-२६ )

नंतर देवदैत्याधिपतीप्रमाणे परस्पराशी वैर बांधून राहिलेले आणि संग्राम संबंधी निःशंक असलेले ते महाबलाढ्य व अत्यंत घोराचे आघात करणारे ते दोघे, वानर व राक्षसाधिपति रावणाचा पुत्र, एकमेकांला जाऊन भिडले संग्रामामध्ये निपुण अशा धनुर्धर महारथी वीर इंद्रजिताने सोडलेल्या बाणांचे वेग त्या वृद्धिगत झालेल्या अतर्क्य हनुमानापुढे निष्फळ झाले आणि तो हनुमान आकाशामध्ये संचार करूं लागला. नंतर दीर्घ व तीक्ष्ण टोक, उत्कृष्ट पंख आणि सुवर्णाचे चित्रविचित्र पुंख व वेगामध्ये वज्राची बरोबरी करणारे असे एकसारखे अनेक बाण त्या शत्रुपक्षीय वीरनाशक वीर इंद्रजिताने हनुमन्ता

विकृष्यमाणस्य च कार्मुकस्य निशम्य घोषं पुनरुत्पपात ३०
शराणामन्तरेष्वाशु व्यावर्तत महाकपिः ।
हरिस्तस्याभिलक्ष्यस्य मोक्षयँल्लक्ष्यसंग्रहम् ३१
शराणामग्रतस्तस्य पुनः समभिवर्तत ।
प्रसार्य हस्तौ हनुमानुत्पपातानिलात्मजः ३२
तावुभौ वेगसंपन्नौ रणकर्मविशारदौ ।
सर्वभूतमनोग्राहि चक्रतुर्युद्धमुत्तमम् ३३
हनूमतो वेद न राक्षसोऽन्तरं न मारुतिस्तस्य महात्मनोऽन्तरम् ।
परस्परं निर्विषहौ बभूवतुः समेत्य तौ देवसमानविक्रमौ ३४
ततस्तु लक्ष्ये स विहन्यमाने शरेष्वमोघेषु च संपतत्सु ।
जगाम चिन्तां महतीं महात्मा समाधिसंयोगसमाहितात्मा ३५

सोडलें; परंतु त्याच्या रथाचा गडगडाट, मृदंग, नौबदी, पडघम याचा घोष आणि आकृष्ट होत असलेल्या धनुष्याचा टणत्कार ऐकून, त्या वानराने पुनरपि उड्डाण केलें. ( २७-३० )

नंतर नेम धरण्यामध्ये पटाईत असलेल्या त्या इंद्रजिताचा नेम चुकविण्याकरता तो महाकपि हनुमान वानर इंद्रजिताने सोडलेल्या बाणाच्या अंतरालामध्ये मोठ्या चलखीने हिंडूं लागला. वायुपुत्र हनुमान त्याच्या बाणांपुढे वारंवार येऊं लागला आणि हात पसरून उड्डाण करूं लागला. युद्धशास्त्रांत निपुण असलेल्या त्या दोघा वेगवान् मारुति व इंद्रजित् यांनी सर्व प्राणिमात्रांना विस्मयचकित करून टाकणारें अद्वितीय असें युद्ध केलें. इंद्रजिताला हनुमानाच्या बलाचा अंदाज लागला नाही व हनुमानालाही त्या प्रचंड राक्षसाच्या सामर्थ्याचा अदमास झाला नाही व ते उभयतांही देवतुल्य पराक्रमी वीर एकमेकांशीं येऊन भिडल्यावर परस्परांवर असह्य आघात करून लढूं लागले. नंतर इंद्रजिताचें लक्ष्याचे स्थानीं असलेला हनुमान् इकडेतिकडे सारखा सचार करीत असल्यामुळे त्याचेवर धरलेला नेम व्यर्थ जाऊन त्याचे अमोघ बाण कोठेतरी पडूं लागले तेव्हा तो महात्मा इंद्रजित् समाधीने एकाग्र चित्त करून सारखा विचार करूं लागला. ( ३१-३५ )

ततो मतिं राक्षसराजसूनुश्चकार तस्मिन्हरिवीरमुख्ये ।
अवध्यतां तस्य कपेः समीक्ष्य कथं निगच्छेदिति निग्रहार्थम् ३६
ततः पैतामहं वीरः सोऽस्त्रमस्त्रविदां वरः ।
संदधे सुमहातेजास्तं हरिप्रवरं प्रति ३७
अवध्योऽयमिति ज्ञात्वा तमस्त्रेणास्त्रतत्त्ववित् ।
निजग्राह महाबाहुं मारुतात्मजमिन्द्रजित् ३८
तेन बद्धस्ततोऽस्त्रेण राक्षसेन स वानरः ।
अभवन्निर्विचेष्टश्च पपात च महीतले ३९
ततोऽथ बुद्ध्वा स तदस्त्रबन्धं प्रभोः प्रभावाद्विगताल्पवेगः ।
पितामहानुग्रहमात्मनश्च विचिन्तयामास हरिप्रवीरः ४०
ततः स्वायंभुवैर्मन्त्रैर्ब्रह्मास्त्रं चाभिमन्त्रितम् ।
हनूमांश्चिन्तयामास वरदानं पितामहात् ४१
न मेऽस्य बन्धस्य च शक्तिरस्ति विमोक्षणे लोकगुरोः प्रभावात् ।

---

नंतर राक्षसराजपुत्र इंद्रजिताने तो अवध्य आहे, असें धर्मबलाने जाणिलें आणि त्याला धोपवून धरता यावा, म्हणून तो वानरवीर काही काळ तरी स्थिर कसा राहील, यासंबंधी मनात विचार करू लागला नंतर अस्त्र वेत्त्यामध्ये श्रेष्ठ असलेले या त्या अत्यंत महातेजस्वी वीर इंद्रजिताने त्या वानरश्रेष्ठ हनुमानावर ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला, परंतु ब्रह्मास्त्रानेही [illegible] अवध्य आहे, असें जाणून त्या अस्त्रतत्त्ववेत्त्या इंद्रजिताने वायुपुत्र महापराक्रमी हनुमानाला त्या अस्त्राने नुसतें बांधून टाकिलें, याप्रमाणे ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून, त्या राक्षसाने त्या वानराला बद्ध केल्यामुळे तो निश्चेष्ट होऊन तत्काळी भूमीवर पडला नंतर ब्रह्मास्त्राने आपणाला बांधून टाकलें आहे, असें समजून आल्यावर वानरश्रेष्ठ हनुमानाने ब्रह्मदेवाचा अनुग्रह मनामध्ये आणला तेव्हा त्या प्रभूच्या कृपाप्रभावामुळे त्या अस्त्रापासून त्याला कांहीसुद्धा इजा झाली नाही ( ३६-४० )

सारांश, ब्रह्मविषयक मंत्रांनी अभिमंत्रण केलेल्या ब्रह्मास्त्राचा बंध आपणांला प्राप्त झाला आहे, हें पाहून हनुमानाने ' माझ्या अस्त्रापासून एक क्षणांत तू मुक्त होशील,' असा जो वर ब्रह्मदेवाने त्याला दिला होता, त्याचें स्मरण केलें.

इत्येवमेवं विहितोऽस्त्रबन्धो मयात्मयोनेरनुवर्तितव्यः ४२
स वीर्यमस्त्रस्य कपिर्विचार्य पितामहानुग्रहमात्मनश्च ।
विमोक्षशक्तिं परिचिन्तयित्वा पितामहाज्ञामनुवर्तते स ४३
अस्त्रेणापि हि बद्धस्य भयं मम न जायते ।
पितामहमहेन्द्राभ्यां रक्षितस्यानिलेन च ४४
ग्रहणे चापि रक्षोभिर्महन्मे गुणदर्शनम् ।
राक्षसेन्द्रेण संवादस्तस्माद्गृह्णन्तु मां परे ४५
स निश्चितार्थः परवीरहन्ता समीक्ष्यकारी विनिवृत्तचेष्टः ।
परैः प्रसह्याभिगतैर्निगृह्य ननाद तैस्तैः परिभर्त्स्यमानः ४६
ततस्ते राक्षसा दृष्ट्वा विनिश्चेष्टमरिन्दमम् ।
बबन्धुः शणवल्कैश्च द्रुमचीरैश्च संहतैः ४७

"ब्रह्मास्त्रानें बंधातून ब्रह्मदेवाच्या प्रभावानें मुक्त होण्याचें मला सामर्थ्य नाहीं, असें समजून इंद्रजिताने जो ब्रह्मदेवाचा अस्त्रबंध योजिला आहे, तो मला निरस्त केला पाहिजे," असें हनुमानानें ठरवलें याप्रमाणें अस्त्राचें सामर्थ्य, त्याबद्दल ब्रह्मदेवाचा आपणावर झालेला अनुग्रह आणि अस्त्रबंध तोडण्याची अपली शक्ति, या सर्वांचा विचार करून त्या वानरानें एक क्षणभर ब्रह्मदेवाचीच आज्ञा पाळावयाचें ठरवलें. तो मनात म्हणाला, "ब्रह्मा, इंद्र आणि वायु यानी माझें रक्षण केलें असल्यामुळें या अस्त्रानें जरी मी बद्ध झालों आहें, तरी मला त्याची भीति नाहीं, परंतु राक्षसानी मला बाधून नेलें तर राक्षसराज रावणाशीं मला बोलता येईल, हा एक मोठाच लाभ आपणाला होणार आहे यासाठी शत्रु मला खुशाल अस्त्रानें बांधून नेऊ देत. (४१-४५)

यात्रमाणें कोणतेंही कृत्य विचारपूर्वक करणारा, तो शत्रुपक्षीय वीरनाशक हनुमान् वरीलप्रमाणें मनाचा निश्चय करून तसाच निश्चेष्ट पडून राहिला, तेव्हा शत्रूंनी सर्व बाजूंनी हल्ला करून, त्याला धरलें आणि ते त्याची निर्भर्त्सना करूं लागले, तेव्हा तो गर्जना करूं लागला इंद्रजितानें ब्रह्मास्त्राचा प्रयोग केल्यानंतर तो शत्रुदमन करणारा वानर निश्चेष्ट पडला आहे, असें अवलोकन करून, त्या राक्षसानी झाडाच्या एकत्र केलेल्या सालींनी व तागाच्या दोऱ्यानी त्याला बांधलें.

स रोचयामास परैश्च बन्धं प्रसह्य वीरैरभिगर्हणं च ।
कौतूहलान्मां यदि राक्षसेन्द्रो द्रष्टुं व्यवस्येदिति निश्चितार्थः ४८
स बद्धस्तेन वल्केन विमुक्तोऽस्त्रेण वीर्यवान् ।
अस्त्रबन्धः स चान्यं हि न बन्धमनुवर्तते ४९
अथेन्द्रजित्तं द्रुमचीरबद्धं विचार्य वीरः कपिसत्तमं तम् ।
विमुक्तमस्त्रेण जगाम चिन्तामन्येन बद्धोऽप्यनुवर्ततेऽस्त्रम् ५०
अहो महत्कर्म कृतं निरर्थं न राक्षसैर्मन्त्रगतिर्विमृष्टा ।
पुनश्च नास्त्रे विहतेऽस्त्रमन्यत्प्रवर्तते संशयिताः स्म सर्वे ५१
अस्त्रेण हनुमान्मुक्तो नात्मानमवबुध्यते ।
कृष्यमाणस्तु रक्षोभिस्तैश्च बन्धैर्निपीडितः ५२

तेव्हा ' माझा पराक्रम ऐकून व मजविषयींच्या उत्सुकतेमुळे राक्षसराज रावण मला एकदा तरी पाहण्याचें मनात आणील, " असा मनामध्ये निश्चय करून, शत्रुपक्षीय वीर राक्षसानी बलात्काराने केलेलें बंधन आणि निर्भर्त्सना हीं त्याने सहन केली असो तो वीर्यवान् हनुमान् झाडाच्या सालींनी वगैरे बांधला गेल्यामुळे त्या अस्त्राच्या बंधातून आपोआप मुक्त झाला कारण दुसरा बंध प्राप्त झाला असता तो ब्रह्मास्त्राचा अस्त्रबंध कायम रहात नाहीं, असा नियम आहे नंतर झाडाच्या सालींनी वगैरे तो वानर बांधला गेल्यामुळे आपल्या अस्त्रबंधांतून मुक्त झाला आहे, असें पाहून आणि इतर बंधाने बद्ध असतानाही आपण अस्त्रबंधानेच बद्ध झाल्यासारखें तो दाखवीत आहे, हेंही लक्ष्यात घेऊन तो वीर इंद्रजित् चिंता करू लागला ( ४६-५० )

तो म्हणाला, " अहो, मी केलेलें एवढें मोठं काम त्या राक्षसानी व्यर्थ करून टाकलें कारण याला बांधताना त्या राक्षसानी मंत्रसामर्थ्यांचा विचार केला नाही इतरांचा बंध प्राप्त झाला, तर ब्रह्मास्त्राने झालेला बंध नाहींसा होतो, हें त्यांना समजलें नाही आणि अस्त्राचा व्यर्थ झाल्यावर पुन कोणताहि अस्त्रप्रयोग चालत नाहीं तेव्हा आता आपणाला जय कसा मिळेल, याबद्दल मनात संशय येत आहे " हनुमान् ब्रह्मास्त्रापासून मुक्त झाला होता, तरी त्याने तसें दर्शविलें नाही, व ते राक्षस मारीने वगैरे बांधून त्याला फारसा त्रास

हन्यमानस्ततः क्रूरै राक्षसैः कालमुष्टिभिः ।
समीपं राक्षसेन्द्रस्य प्राकृष्यत स वानरः ५३
अथेन्द्रजित्तं प्रसमीक्ष्य मुक्तमस्त्रेण बद्धं द्रुमचीरसूत्रैः ।
व्यदर्शयत्तत्र महाबलं तं हरिप्रवीरं सगणाय राज्ञे ५४
तं मत्तमिव मातङ्गं बद्धं कपिवरोत्तमम् ।
राक्षसा राक्षसेन्द्राय रावणाय न्यवेदयन् ५५
कोऽयं कस्य कुतो वापि किं कार्यं कोऽभ्युपाश्रयः ।
इति राक्षसवीराणां दृष्ट्वा संजज्ञिरे कथाः ५६
हन्यतां दह्यतां वापि भक्ष्यतामिति चापरे ।
राक्षसास्तत्र संक्रुद्धाः परस्परमथाब्रुवन् ५७
अतीत्य मार्गं सहसा महात्मा स तत्र रक्षोऽधिपपादमूले ।
ददर्श राज्ञः परिचारवृद्धान्गृहं महारत्नविभूषितं च ५८
स ददर्श महातेजा रावणः कपिसत्तमम् ।

देऊन रावणाकडे ओढून नेऊं लागले. नंतर काळाप्रमाणे ज्यांच्या मुठी भयंकर आहेत, असे ते क्रूर राक्षस मारीत मारीत त्या वानराला राक्षसराज रावणाकडे घेऊन गेले. नंतर झाडाचे सालींनी व दोऱ्यांनी बद्ध झालेला तो हनुमान्, अस्त्र-बंधापासून मुक्त झाल्याचें पाहिल्यावर, तेथें आपल्या अनुयायांसह बसलेल्या रावणराजाला इंद्रजिताने तो महाबलाढ्य वानरश्रेष्ठ दाखविला. ( ५१-५४ )

मत्त गजाप्रमाणे बद्ध झालेला तो वानरश्रेष्ठ, हनुमान् आणल्याचें राक्षसांनी राक्षसाधिपति रावणाला सांगितलें, तेव्हा " हा कोण ? कोणाचा पुत्र ? कोठून आला ? त्याचें काय कार्य आहे ? आणि याला कोणाचा आश्रय आहे ? " अशा गोष्टी त्याला पाहिल्यावर राक्षसवीरांमध्ये सुरू झाल्या आणि "याला मारा, जाळा, खाऊन टाका. " अशा प्रकारें त्याच्या संबंधाने वेगळे वेगळे राक्षस क्रुद्ध होऊन एकमेकांशीं बोलूं लागले. ( ५५-५७ )

मधील मार्गाचें एकदम आक्रमण करून, तेथें गेल्यावर राक्षसाधिपति रावणाच्या पायाशीं बसलेले त्या राजाचे वृद्ध सेवक आणि मोठ्या मोठ्या रत्नांनी भूषित केलेलें रावणाचें गृह मारुतीने पाहिलें व अक्राळविक्राळ रूपें असलेले

रक्षोभिर्विकृताकारैः कृष्यमाणमितस्ततः ५९
राक्षसाधिपतिं चापि ददर्श कपिसत्तमः ।
तेजोबलसमायुक्तं तपन्तमिव भास्करम् ६०
स रोषसंवर्तिततामृदृष्टिर्दशाननस्तं कपिमन्ववेक्ष्य ।
अथोपविष्टान्कुलशीलवृद्धान्समादिशत्तं प्रतिमुख्यमन्त्रीन् ६१
यथाक्रमं तैः स कपिश्च पृष्टः कार्यार्थमर्थस्य च मूलमादौ ।
निवेदयामास हरीश्वरस्य दूतः सकाशात्किमागतोऽस्मि ६२

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डेऽष्टचत्वारिंशः सर्गः ॥४८॥

एकोनपञ्चाशः सर्गः । [ २०३३ ]

ततः स कर्मणा तस्य विस्मितो भीमविक्रमः ।
हनूमान्क्रोधताम्राक्षो रक्षोधिपमवैक्षत १
भ्राजमानं महार्हेण काञ्चनेन विराजता ।
मुक्ताजालवृतेनाथ मुकुटेन महाद्युतिम् २
वज्रसंयोगसंयुक्तैर्महार्हमणिविग्रहैः ।

राक्षस ज्याला इकडून तिकडे ओढीत आहेत, अशा त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला त्या महातेजस्वी रावणाने पाहिलें व त्या कपिश्रेष्ठ हनुमानानेही सूर्याप्रमाणे प्रकाशत असलेल्या त्या तेजस्वी व बलाढ्य राक्षसाधिपतीला पाहिलें. त्या वानराला पहाताच, क्रोधानें नेत्र लाल होऊन गेलेल्या त्या रावणानें तेथें बसलेल्या व कुलानें व शीलानें श्रेष्ठ अशा मुख्य मंत्र्यांना त्याची चौकशी करण्याविषयीं आज्ञा केली. त्यांनीं त्याचा उद्देश काय आहे व तो लंकेत येण्याचें कारण काय, हें त्या वानराला प्रथम अनुक्रमें विचारलें व त्यानेही " वानरराज सुग्रीव याचा मी दूत आहें व तेथूनच मी येथें आलों आहें, " असें त्यांना सांगितलें ( ५८-६२ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकी अठ्ठेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४८ ॥

इंद्रजिताच्या त्या कर्मानें विस्मयचकित झालेल्या त्या भयंकर पराक्रमी हनुमानाचे नेत्र लाल झाले आणि तो राक्षसाधिपति रावणाकडे पाहू लागला. महातेजस्वी रावण मोत्यांच्या घोसांनीं भरलेल्या व चकाकत असलेल्या मौल्य-

हैमैराभरणैश्चित्रैर्मनसेव प्रकल्पितैः ३
महार्हक्षौमसंवीतरक्तचन्दनरूषितम् ।
स्वनुलिप्तं विचित्राभिर्विविधाभिश्च भक्तिभिः ४
विचित्रं दर्शनीयैश्च रक्ताक्षैर्भीमदर्शनैः ।
दीप्ततीक्ष्णमहादंष्ट्रं प्रलम्बं दशनच्छदैः ५
शिरोभिर्दशभिर्वीरो भ्राजमानं महौजसम् ।
नानाव्यालसमाकीर्णैः शिखरैरिव मन्दरम् ६
नीलाञ्जनचयप्रख्यं हारेणोरसि राजता ।
पूर्णचन्द्राभवक्त्रेण सबालार्कमिवाम्बुदम् ७
बाहुभिर्बद्धकेयूरैश्चन्दनोत्तमरूषितैः ।
भ्राजमानाङ्गदैर्भीमैः पञ्चशीर्षैरिवोरगैः ८
महति स्फाटिके चित्रे रत्नसंयोगचित्रिते ।
उत्तमास्तरणास्तीर्णे सूपविष्टं वरासने ९

मूल्यवान् सुवर्णमुकुटाने झळकत होता, हिरे बसविलेल्या आणि मुख्य दर्शना आगावर मेठीं-माठीं रालें जडवलेल्या अद्भुत सुवर्णभूषणानी तो देदीप्यमान दिसत होता व ती भूषणें जशीं काही मन कल्पितच होतीं त्याने मोठा मूल्यवान शेला पांघरला होता, त्याच्या शरीराला रक्तचदनाची उटी लाविलेली होती अणि नाना प्रकारच्या चित्रविचित्र आकृतींनी त्याचें शरीर भरून गेले होतें दात, तीक्ष्ण व प्रचड दाढा असलेल्या त्या राक्षसाधिपताची मुद्रा ओठानी आणि लालचुद घ दिसण्यातही भयकर, अशा डोळ्यानी फार विचित्र दिसत होती ( १-५ )

नाना प्रकारची श्वापदें भरलेल्या शिखरानी चमकणारा दुसरा मदरपर्वतच की काय, असा तो महाबलाढ्य वर रावण दहा मस्तकांच्या योगाने झळकत होता तो कज्जलाच्या राशीप्रमाणे दिसत होता, त्याचे वक्ष स्थलावर हार चकाकत होते आणि पूर्ण चद्रासारखें अल्हाददायक त्याचें मुख असल्यामुळे तो बाल-सूर्यासह असलेल्या मेघाप्रमाणे दिसत होता पाच फणाच भयकर नागच की काय, अशा प्रकारचे त्याचे हात होत आणि दंडाम ये केयूर व अगद हीं भूषणें त्याने घातलीं होतीं वर जडावाचें काम केलें असल्यामुळे अद्भुत दिसणाऱ्या

अलंकृताभिरत्यर्थं प्रमदाभिः समन्ततः ।
वालव्यजनहस्ताभिरारात्समुपसेवितम् १०
दुर्धरेण प्रहस्तेन महापार्श्वेन रक्षसा ।
मन्त्रिभिर्मन्त्रतत्त्वज्ञैर्निकुम्भेन च मन्त्रिणा ११
उपोपविष्टं रक्षोभिश्चतुर्भिर्बलदर्पितम् ।
कृत्स्नं परिवृतं लोकं चतुर्भिरिव सागरैः १२
मन्त्रिभिर्मन्त्रतत्त्वज्ञैरन्यैश्च शुभदर्शिभिः ।
आश्वास्यमानं सचिवैः सुरैरिव सुरेश्वरम् १३
अपश्यद्राक्षसपतिं हनूमानतितेजसम् ।
वेष्टितं मेरुशिखरे सतोयमिव तोयदम् १४
स तैः संपीड्यमानोऽपि रक्षोभिर्भीमविक्रमैः ।
विस्मयं परमं गत्वा रक्षोधिपमवैक्षत १५
भ्राजमानं ततो दृष्ट्वा हनूमान्राक्षसेश्वरम् ।
मनसा चिन्तयामास तेजसा तस्य मोहितः १६

---

आणि उत्कृष्ट आस्तरणें असलेल्या एका स्फटिकाच्या मोठ्या अद्भुत सिंहासनावर तो बसलेला होता. अनेक प्रकारचे अलंकार घातलेल्या तरुण स्त्रिया हातामध्ये पंखे घेऊन त्याचे सभोवती त्याला वारा घालीत उभ्या होत्या. दुर्धर, प्रहस्त आणि महापार्श्व नावाचे राक्षस हे मंत्रतत्त्वज्ञ मंत्री आणि निकुंभ नामक मंत्री हे चार राक्षस रावणाचे शेजारी बसले होते. यामुळे बलाविषयी गर्व वाहणारा तो रावण चार सागरांनी चहूं बाजूंनी वेढलेल्या संपूर्ण भूमंडलाप्रमाणे दिसत होता. ( ६-१२ )

देव ज्याप्रमाणे इंद्राला सल्ला देऊन धीर देत असतात, त्याप्रमाणे मंत्रतत्त्वज्ञ मंत्री आणि इतरही चांगला विचार करणारे सचिव त्याला धीर देत होते. अशा प्रकारें सर्व बाजूंस मंत्री असलेल्या त्या अतितेजस्वी राक्षसाधिपति रावणाला हनुमानाने पाहिले, तेव्हा त्याला तो मेरुपर्वताच्या शिखरावरील सजल मेघाप्रमाणे वाटला. हनुमानाला ते भयंकर पराक्रमी राक्षस जरी त्रास देत होते, तरी तो अतिशय विस्मयचकित होऊन त्या राक्षसाधिपतीकडेच तसाच पहात होता.

अहो रूपमहो धैर्यमहो सत्त्वमहो द्युतिः ।
अहो राक्षसराजस्य सर्वलक्षणयुक्तता १७
यद्यधर्मो न बलवान्स्यादयं राक्षसेश्वरः ।
स्यादयं सुरलोकस्य सशक्रस्यापि रक्षिता १८
अस्य क्रूरैर्नृशंसैश्च कर्मभिर्लोककुत्सितैः ।
सर्वे बिभ्यति खल्वस्माल्लोकाः सामरदानवाः ॥
अयं ह्युत्सहते क्रुद्धः कर्तुमेकार्णवं जगत् १९
इति चिन्तां बहुविधामकरोन्मतिमान्कपिः ।
दृष्ट्वा राक्षसराजस्य प्रभावममितौजसः २०

इत्यार्षे श्रीमद्वा० वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे एकोनपञ्चाशः सर्गः ॥४९॥

पञ्चाश० सर्गः । [२०५३]

तमुद्वीक्ष्य महाबाहुः पिङ्गाक्षं पुरतः स्थितम् ।
रोषेण महताविष्टो रावणो लोकरावणः १

याप्रमाणे स्वतेजाने चमकत असलेल्या त्या रावणाला पाहून त्याच्या तेजानें हनुमान् दिपून गेला व मनामध्यें म्हणाला, "अहा हा ! काय हो हें रूप ! काय हो हें धैर्य ! काय हो हें बल ! काय हो ही कांति आणि काय हो तरी ही या राक्षसराजाची सर्वलक्षणसंपन्नता ! याचे ठिकाणीं जर हा एक मोठा अधर्म नसता, तर हा राक्षसाधिपति इंद्रासह देवलोकाचाही रक्षक होण्यास योग्य झाला असता, हें निश्चित. लोकांच्या दृष्टीनें निंद्य अशा याच्या क्रूर व घातकी कर्मांमुळें देवदैत्यवगैरे सर्व लोक यास भीत आहेत आणि हा क्रोधवश झालेला रावण सर्व जगत् रसातलाला नेण्याची मनापासून इच्छा करीत आहे." याप्रमाणें तें बलाढ्य रावण, त्याचें वैभव व तेज पाहून त्या बुद्धिमान हनुमानाचे मनांत नानाप्रकारचे विचार येऊं लागले. ( १७-२० )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकांडांतील एकूणपन्नासावा सर्ग समाप्त झाला. ॥ ४९ ॥

पुढें बसलेला पिंगटवर्ण नेत्रांचा वानर पाहतांच सर्व लोकांत भय उत्पन्न करणारा तो महापराक्रमी रावण अतिशय रागावला आणि त्याचें मन सशंक

शङ्काहतात्मा दध्यौ स कपीन्द्रं तेजसावृतम् ।
किमेष भगवान्नन्दी भवेत्साक्षादिहागतः २
येन शप्तोऽस्मि कैलासे मया प्रहसिते पुरा ।
सोऽयं वानरमूर्तिः स्यात्किंस्विद्बाणोऽपि वासुरः ३
स राजा रोषताम्राक्षः प्रहस्तं मन्त्रिसत्तमम् ।
कालयुक्तमुवाचेदं वचो विपुलमर्थवत् ४
दुरात्मा पृच्छ्यतामेष कुतः किं वास्य कारणम् ।
वनभङ्गे च कोऽस्यार्थो राक्षसानां च तर्जने ५
मत्पुरीमप्रधृष्यां वै गमने किं प्रयोजनम् ।
आयोधने वा किं कार्यं पृच्छ्यतामेष दुर्मतिः ६
रावणस्य वचः श्रुत्वा प्रहस्तो वाक्यमब्रवीत् ।
समाश्वसिहि भद्रं ते न भीः कार्या त्वया कपे ७
यदि तावत्त्वमिन्द्रेण प्रेषितो रावणालयम् ।

झाल्यामुळे तो आपल्याशीच त्या तेजस्वी वानराधिपतीसंबंधी असा विचार करू लागला– " अरे, हा प्रत्यक्ष भगवान् नंदीच येथे आला आहे की काय ? कारण, पूर्वी मी कैलासपर्वतावर त्याला एकदा हसल्यामुळे माझ्यासारखें त्याचें रूप आहे, अशाच्या हातून तुझा नाश होईल, म्हणून त्याने मला शाप दिला होता. अथवा नंदीने पाठविलेला हा बाणासुरच वानररूप धारण करून येथें आला आहे की काय कोण जाणे !" याप्रमाणे मनामध्ये शंका आल्यानंतर क्रोधानें डोळे लाल झालेला तो रावणराजा आपल्या मंत्रिश्रेष्ठ प्रहस्ताशी त्या समयाला अनुरूप, गंभीर आणि अर्थपूर्ण असें भाषण करू लागला. तो म्हणाला "अरे, या दुरात्म्याला विचारा की, तू येथें कां आलास ? याला येथे येण्याचें कारण काय ? वन चा विध्वंस करण्यात आणि राक्षसांचा नाश करण्यात याचा काय उद्देश होता ? या माझ्या नगरावर कोणाचाही हल्ला होणे शक्य नाही, असें असून तू येथे कशाकरिता आला ? आणि याने कशाकरिता युद्ध केलें ? हें सर्व या दुष्ट दुरात्म्या वानराला विचारा " ( १–६ )

हें रावणाचें भाषण ऐकून प्रहस्त हनुमानाला म्हणाला, " हे वानरा, तू त्या

तत्त्वमाख्याहि मा ते भूद्भयं वानर मोक्ष्यसे ८
यदि वैश्रवणस्य त्वं यमस्य वरुणस्य च ।
चारुरूपमिदं कृत्वा प्रविष्टो नः पुरीमिमाम् ९
विष्णुना प्रेषितो वापि दूतो विजयकाङ्क्षिणा ।
न हि ते वानरं तेजो रूपमात्रं तु वानरम् १०
तत्त्वतः कथयस्वाद्य ततो वानर मोक्ष्यसे ।
अनृतं वदतश्चापि दुर्लभं तव जीवितम् ११
अथ वा यन्निमित्तस्ते प्रवेशो रावणालये ।
एवमुक्तो हरिवरस्तदा रक्षोगणेश्वरम् १२
अब्रवीन्नास्मि शक्रस्य यमस्य वरुणस्य च ।
धनदेन न मे सख्यं विष्णुना नास्मि चोदितः १३
जातिरेव मम त्वेषा वानरोऽहमिहागतः ।
दर्शने राक्षसेन्द्रस्य तदिदं दुर्लभं मया १४

ऐस. तुझें कल्याण असो. तूं भिऊं नकोस. तुला जर इंद्राने रावणाच्या निवासस्थानाकडे पाठविलें असेल, तर तें सारें तूं खरें खरें सांग, म्हणजे तुझी सुटका होईल. तुला संकटात पाडावें, अशी आमची इच्छा नाही. कुबेर, यम आणि वरुण यांपैकी एकाचें मनोहर रूप धारण करून, तूं आमच्या या नगरीमध्ये शिरलास की काय ? किंवा विजयेच्छु विष्णूने पाठविलेला तूं त्याचा दूत आहेस की काय ? तुझें रूप जरी वानरासारखें दिसत आहे, तरी तुझें तेज वानराचें नव्हे. यासाठीं हे वानरा, काय असेल तें आज खरें खरें सांग. म्हणजे तुझी सुटका होईल; परंतु तूं जर खोटें भाषण करशील, तर तुला जिवंत राहतां येणार नाही. (७-११)

तेव्हा रावणाच्या निवासस्थानात तुझा शिरावयाचें कारण काय, हें तूं सांग." याप्रमाणे प्रहस्त बोलला, तेव्हा तो वानरश्रेष्ठ हनुमान् राक्षसकुलाधिपति रावणाला म्हणाला, "इंद्राचें, यमाचें अथवा वरुणाचें रूप धारण करून मी आलों नाहीं; कुबेराशीं माझें सख्य नाही आणि विष्णूनेही मला पाठविलें नाहीं. वानर ही माझी जातिच आहे आणि मी वानरच येथे राक्षसराजाच्या दर्शनाकरिता

वनं राक्षसराजस्य दर्शनार्थे विनाशितम् ।
ततस्ते राक्षसाः प्राप्ता बलिनो युद्धकाङ्क्षिणः १५
रक्षणार्थं च देहस्य प्रतियुद्धा मया रणे ।
अस्त्रपाशैर्न शक्योऽहं बद्धुं देवासुरैरपि १६
पितामहादेष वरो ममापि हि समागतः ।
राजानं द्रष्टुकामेन मयास्त्रमनुवर्तितम् १७
विमुक्तोऽप्यहमस्त्रेण राक्षसैस्त्वभिवेदितः ।
केनचिद्रामकार्येण आगतोऽस्मि तवान्तिकम् १८
दूतोऽहमिति विज्ञाय राघवस्यामितौजसः ।
श्रूयतामेव वचनं मम पथ्यमिदं प्रभो १९

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चाश: सर्गः ॥ ५० ॥

एकपञ्चाशः सर्गः । [२०७१]

तं समीक्ष्य महासत्त्वं सत्त्ववान्हरिसत्तमः ।
वाक्यमर्थवदव्यग्रस्तमुवाच दशाननम् १

---

आलों आहें. रावणाचें दर्शन मला दुर्लभ आहे, असें समजून, त्याचें दर्शनाकरिताच मी राक्षसराजाच्या वनाचा विध्वंस केला. नंतर ते बलाढ्य राक्षस युद्धाची इच्छा धरून माझ्या अंगावर आले, तेव्हा स्वसंरक्षणार्थ मी त्यांच्याशी उलट युद्ध केलें. देवदैत्यांच्या हातूनही मी अस्त्रपाशानी बद्ध होणें शक्य नाही. कारण ब्रह्मदेवापासून तसा वरच मला प्राप्त झाला आहे. राजाच्या दर्शनाकरिता मी या अस्त्राला मान दिला आणि म्हणूनच वास्तविक जरी मी त्या अस्त्रापासून मुक्त झालों आहें, तरी अस्त्राने बद्ध करून मला आणल्याचें राक्षसांनी तुला कळविलें आहे. काही विशेष रामकार्याकरिता मी तुझ्याकडे आलों आहें यास्तव त्या अतुलसामर्थ्यवान् रामाचा मी दूत आहें, असें समजून, हे प्रभो, माझें हें तुझ्या हिताचें भाषण नीट ऐकून घे. " ( १२—१९ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण संज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडापैकी पन्नासावा सर्ग समाप्त झाला. ॥ ५० ॥

नंतर तो स्वकर्तव्यचतुर, सत्वशील, वानरश्रेष्ठ हनुमान् रावणाकडे पाहून

अहं सुग्रीवसंदेशादिह प्राप्तस्तवान्तिके ।
राक्षसेश हरीशस्त्वां भ्राता कुशलमब्रवीत् २
भ्रातुः शृणु समादेशं सुग्रीवस्य महात्मनः ।
धर्मार्थसहितं वाक्यमिह चामुत्र च क्षमम् ३
राजा दशरथो नाम रथकुञ्जरवाजिमान् ।
पितेव बन्धुर्लोकस्य सुरेश्वरसमद्युतिः ४
ज्येष्ठस्तस्य महाबाहुः पुत्रः प्रियतरः प्रभुः ।
पितुर्निदेशान्निष्क्रान्तः प्रविष्टो दण्डकावनम् ५
लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया सह भार्यया ।
रामो नाम महातेजा धर्म्यं पन्थानमाश्रितः ६
तस्य भार्या जनस्थाने भ्रष्टा सीतेति विश्रुता ।
वैदेहस्य सुता राज्ञो जनकस्य महात्मनः ७
मार्गमाणस्तु तां देवीं राजपुत्रः सहानुजः ।
ऋष्यमूकमनुप्राप्तः सुग्रीवेण च सङ्गतः ८

अर्थयुक्त शब्दांनी त्याला म्हणाला " हे राक्षसाधिपते, सुग्रीवाच्या आज्ञेने मी तुझ्याकडे दूत म्हणून आलों आहें व तुला भ्राता वानराधिपति सुग्रीवाने कुशल प्रश्न केला आहे. आता धर्म व अर्थ यांना अनुसरून असलेला आणि इहलोकीं व परलोकीं तुला हितावह होणारा असा महात्म्या भ्रात्या सुग्रीवाचा निरोप तू ऐकून घे. रथ, गज व अश्व यांनी संपन्न, इंद्रासारखा तेजस्वी व प्रजेवर पित्याप्रमाणे प्रेम करणारा दशरथनामक एक राजा होऊन गेला त्याचा महापराक्रमी, समर्थ व धर्ममार्गाचें अवलंबन केलेला ज्येष्ठ पुत्र, महातेजस्वी राम त्याला अतिशय प्रिय होता. तो पित्याच्या आज्ञेने भ्राता लक्ष्मण व आपली भार्या सीता यांचे-सह दंडकारण्यांत आला. ( १—६ )

विदेहदेशाधिपति महात्म्या जनकराजाची सीता या नावाने प्रसिद्ध असलेली कन्या त्याची भार्या आहे व ती जनस्थानामध्ये असताना नाहींशी झाली आहे त्या देवीला शोधता शोधता राजपुत्र राम आपल्या कनिष्ठ भ्रात्यासह ऋष्यमूक पर्वतावर आला तेव्हा सुग्रीवाची व त्याची भेट झाली तेव्हा सीतेचा शोध

तस्य तेन प्रतिज्ञातं सीतायाः परिमार्गणम् ।
सुग्रीवस्यापि रामेण हरिराज्यं निवेदितुम् ९
ततस्तेन मृधे हत्वा राजपुत्रेण वालिनम् ।
सुग्रीवः स्थापितो राज्ये हर्यृक्षाणां गणेश्वरः १०
त्वया विज्ञातपूर्वश्च वाली वानरपुङ्गवः ।
स तेन निहतः सङ्ख्ये शरेणैकेन वानरः ११
स सीतामार्गणेऽव्यग्रः सुग्रीवः सत्यसङ्गरः ।
हरीन्संप्रेषयामास दिशः सर्वा हरीश्वरः १२
तां हरीणां सहस्राणि शतानि नियुतानि च ।
दिक्षु सर्वासु मार्गन्ते ह्यधश्चोपरि चाम्बरे १३
वैनतेयसमाः केचित्केचित्तत्रानिलोपमाः ।
असङ्गगतयः शीघ्रा हरिवीरा महाबलाः १४
अहं तु हनुमान्नाम मारुतस्यौरसः सुतः ।
सीतायास्तु कृते तूर्णं शतयोजनमायतम् १५
समुद्रं लङ्घयित्वैव त्वां दिदृक्षुरिहागतः ।

---

लावण्याचें त्या सुग्रीवाने त्याला वचन दिलें व रामानेही सुग्रीवाला वानरराज्य अर्पण करण्याचें अभिवचन दिलें. नंतर त्या राजपुत्र रामाने युद्धामध्ये वालीचा वध करून वानर व ऋक्ष योद्ध्या समाजाचा अधिपति जो सुग्रीव त्याला राज्य-पदावर बसविलें. तुला पूर्वीपासूनच पूर्णपणें माहीत असलेल्या वानरश्रेष्ठ वालीचा त्या रामाने एकाच बाणाने संग्रामांत वध केला. ( ७–११ )

नंतर स्वकर्तव्याविषयी सदैव दक्ष असलेल्या त्या सत्यवचनी वानराधिपति सुग्रीवाने सीतेच्या शोधाकरितां सर्व दिशांना वानर पाठवून दिले व ते शेकडों, हजारों, लाखों वानर सर्व दिशेस, वर आकाशामध्ये आणि अधोभागीं पाताळांत तिला शोधीत आहेत. शीघ्र गतीने फिरणाऱ्या त्या महाबलाढ्य वानरवीरांची गति केव्हांही कुंठित होत नाहीं. त्यांतील कांहीं वानर वेगामध्ये गरुडाची बरोबरी करणारे असून कांहीं वायूची बरोबरी करणारे आहेत. मी वायूचा औरस पुत्र हनुमान् वानर असून, केवळ सीतेच्या शोधासाठीं शंभर योजनें लांब समु-

भ्रमता च मया दृष्टा गृहे ते जनकात्मजा १६
तद्भवान्दृष्टधर्मार्थस्तपःकृतपरिग्रहः ।
परदारान्महाप्राज्ञ नोपरोद्धुं त्वमर्हसि १७
न हि धर्मविरुद्धेषु बह्वपायेषु कर्मसु ।
मूलघातिषु सज्जन्ते बुद्धिमन्तो भवद्विधाः १८
कश्च लक्ष्मणमुक्तानां रामकोपानुवर्तिनाम् ।
शराणामग्रतः स्थातुं शक्तो देवासुरेष्वपि १९
न चापि त्रिषु लोकेषु राजन्विद्येत कश्चन ।
राघवस्य व्यलीकं यः कृत्वा सुखमवाप्नुयात् २०
तत्त्रिकालहितं वाक्यं धर्म्यमर्थानुयायि च ।
मन्यस्व नरशार्दूल जानकी प्रतिदीयताम् २१
दृष्टा हीयं मया देवी लब्धं यदिह दुर्लभम् ।
उत्तरं कर्म यच्छेषं निमित्तं तत्र राघवः २२

---

एका क्षणात ओलांडून तुला पाहण्याकरितां येथें आलों आहें व येथें हिंडतां हिंडतां तुझ्या घरीं असलेली जनककन्या सीता ही माझ्या दृष्टीसही पडली आहे (१२–१६)

हे महामान्य रावणा, परस्त्रीला अडकवून ठेवणें तुला योग्य नाहीं; कारण, धर्म व अर्थ यांच्या प्रभावाचा अनुभव तुला आलेला आहे आणि तपश्चर्येमुळें तुझ्याकडे धनधान्यादिकांची समृद्धि झालेली आहे. जें कर्म केलें तर स्वतःला मोठाच अपाय होतो व ज्यामुळें समूळ नाशच होतो, असें कर्म करण्यास तुमच्यासारखे विचारी पुरुष कधींच तयार होत नाहीत. अरे, रामाच्या कोपाचें अनुकरण करणाऱ्या लक्ष्मणाचे हातून सुटलेल्या बाणापुढे टिकाव धरण्यास देवदैत्यांमध्यें तरी कोणता वीर समर्थ आहे? हे राजा, रामाचा अपराध करून पुन्हा सुखानें राहील, असा त्रैलोक्यामध्येंही कोणी पुरुष नाहीं. यासाठीं रामाची भार्या जानकी त्या पुरुषश्रेष्ठ रामाला परत द्यावी, हें माझें धर्म व अर्थ यांना अनुसरून असलेलें व सर्व कालीं हितावह होणारें भाषण, तू लक्ष्यांत ठेव. सर्वांत दुर्लभ असणारी गोष्ट मला मिळाली, ती म्हणजे ही सीतादेवी माझ्या नजरीं

लक्षितेयं मया सीता तथा शोकपरायणा ।
गृहे यां नाभिजानासि पञ्चास्यामिव पन्नगीम् २३
नेयं जरयितुं शक्या सा सुरैरमरैरपि ।
विषसंसृष्टमत्यर्थं भुक्तमन्नमिवौजसा २४
तपःसन्तापलब्धस्ते सोऽयं धर्मपरिग्रहः ।
न स नाशयितुं न्याय्य आत्मप्राणपरिग्रहः २५
अवध्यतां तपोभिर्यां भवान्समनुपश्यति ।
आत्मनः सासुरैर्देवैर्हेतुस्तत्राप्ययं महान् २६
सुग्रीवो न च देवोऽयं न यक्षो न च राक्षसः ।
मानुषो राघवो राजन्सुग्रीवश्च हरीश्वरः ॥
तस्मात्प्राणपरित्राणं कथं राजन्करिष्यसि २७
न तु धर्मोपसंहारमधर्मफलसंहितम् ।
तदेव फलमन्वेति धर्मश्चाधर्मनाशनः २८
प्राप्तं धर्मफलं तावद्भवता नात्र संशयः ।

---

पडली. आता यापुढचें अवशिष्ट राहिलेलें जे कर्म तें राम येथे आला म्हणजे पूर्ण होईल. ( १७—२२ )

पंचमुखी नागिणीप्रमाणे घरीं असलेली ती सीता तूं पूर्णपणें ओळखीत नाहींस ती सीता देवी शोक करीत असलेली मा प्रत्यक्ष पाहिली आहे. विषयुक्त असलेलें अन्न अतिशय भक्षण केलें, तरी तें बलाचे जोरावर ज्याप्रमाणे पचत नाहीं त्याचप्रमाणे ती ही सीता देवदैत्यांपैकीं कोणालाही पचणें शक्य नाहीं. हें धर्मसाध्य ऐश्वर्य व दीर्घ आयुष्य तुला तपश्चर्या करून प्राप्त झालें आहे, त्याचा तूं अधर्माच्या योगानें नाश करून टाकणें तुला योग्य नाहीं. तुझ्या तपामुळे देव व असुर यांचेकडून जी अवध्यता प्राप्त झाली आहे, तिचें कारण तरी हें तुझें धर्माचरण होय. हा सुग्रीव देव नव्हे, यक्ष नव्हे व राक्षसही नव्हे. हे राजा, सुग्रीव वानरांचा अधिपति आहे आणि राम मनुष्य आहे यासाठीं हे भूपते, त्या सुग्रीवापासून तूं आपलें प्राणरक्षण कसें करशील ? ( २३—२७ )

धर्माचें फल सुख आहे. अधर्माचें फल जें दुःख, त्यानें कधींही सुख मिळत

फलमस्याप्यधर्मस्य क्षिप्रमेव प्रपत्स्यसे　　२९
जनस्थानवधं बुद्ध्वा वालिनश्च वधं तथा ।
रामसुग्रीवसख्यं च बुध्यस्व हितमात्मनः　　३०
कामं खल्वहमप्येकः सवाजिरथकुञ्जराम् ।
लङ्कां नाशयितुं शक्तस्तस्यैष तु न निश्चयः　　३१
रामेण हि प्रतिज्ञातं हर्यृक्षगणसंनिधौ ।
उत्सादनममित्राणां सीता यैस्तु प्रधर्षिता　　३२
अपकुर्वन्हि रामस्य साक्षादपि पुरंदरः ।
न सुखं प्राप्नुयादन्यः किं पुनस्त्वद्विधो जनः　　३३
यां सीतेत्यभिजानासि येयं तिष्ठति ते गृहे ।
कालरात्रीति तां विद्धि सर्वलङ्काविनाशिनीम्　　३४
तदलं कालपाशेन सीताविग्रहरूपिणा ।
स्वयं स्कन्धावसक्तेन क्षेममात्मनि चिन्त्यताम्　　३५
सीतायास्तेजसा दग्धां रामकोपप्रदीपिताम् ।

---

नाही धर्म केला असता धर्माचें फल जें सुख तेंच प्राप्त होत असतें आणि अधर्म केला तर अधर्माचें फल जें दुःख तेंच प्राप्त होतें शिवाय धर्म हा अधर्मनाशक आहे आजपर्यंत धर्माचें फल तुला प्राप्त झालें आहे, यात संशयच नाही, आता या अधर्माचें फलहि लवकरच तुला भोगावें लागेल अश्व, रथ आणि गज यासह लंकेचा नाश करण्यास मी एकटाही समर्थ आहें परंतु, त्या रामाचा हा विचार नाही, कारण, ज्यानी सीतेचा अपहार केलेला आहे, त्या शत्रूंचा नाश करण्याची प्रतिज्ञा वानरगण व ऋक्षगण याचे समक्ष रामाने केली आहे अरे रामाला अपकार करणाऱ्या प्रत्यक्ष इंद्रालाही सुख होणार नाही, मग तुझ्यासारख्या य:कश्चित् सामान्य जनाची गोष्ट कशाला पाहिजे ? (२८-३३)

जिला तू सीता असें समजत आहेस आणि जी ही सांप्रत तुझ्या घरामध्ये रहात आहे, ती सर्व लंकेचा नाश करणारी कालरात्रिच आहे, हें तूं समजून ठेव यासाठी स्वतःच खांद्यावर टाकलेला हा सीताशरीररूपी कालपाश तू आता सोडून दे व आपल्या कल्याणाचा तू आता काही तरी विचार कर नाही तर

दह्यमानामिमां पश्य पुरीं साट्टप्रतोलिकाम् ३६
स्वानि मित्राणि मन्त्रींश्च ज्ञातीन्भ्रातॄन्सुतान्हितान्।
भोगान्दारांश्च लङ्कां च मा विनाशमुपानय ३७
सत्यं राक्षसराजेन्द्र शृणुष्व वचनं मम।
रामदासस्य दूतस्य वानरस्य विशेषतः ३८
सर्वांल्लोकान्सुसंहृत्य स भूतान्सचराचरान्।
पुनरेव तथा स्रष्टुं शक्तो रामो महायशाः ३९
देवासुरनरेन्द्रेषु यक्षरक्षोरगेषु च।
विद्याधरेषु नागेषु गन्धर्वेषु मृगेषु च ४०
सिद्धेषु किंनरेन्द्रेषु पतत्रिषु च सर्वतः।
सर्वत्र सर्वभूतेषु सर्वकालेषु नास्ति सः ४१
यो रामं प्रतियुध्येत विष्णुतुल्यपराक्रमम् ४२
सर्वलोकेश्वरस्येह कृत्वा विप्रियमीदृशम्।
रामस्य राजसिंहस्य दुर्लभं तव जीवितम् ४३
देवाश्च दैत्याश्च निशाचरेन्द्र गन्धर्वविद्याधरनागयक्षाः।

रामाच्या कोपाने प्रदीप्त आणि सीतेच्या तेजाने अधीच दग्ध झालेली ही लंका नगरी, तिच्यातील मार्ग व इमारती यासह जळत असलेली पाहण्याचा दुर्धर प्रसंग येईल. स्वतःचे मित्र, मंत्री, जातभाई, भ्राते, पुत्र, हितावह भोग्य वस्तु, भार्या आणि लंका यांचा तूं नाश करून घेऊ नकोस हे राक्षसराजाधिराज, या रामदासाचें आणि विशेषतः वानरदूताचें भाषण तू नीट ऐकून घे (३४–३८)

तो महाकीर्तिमान् राम स्थावरजंगमात्मक प्राण्यांचा व पंचमहाभूतांसह सर्व लोकांचा संहार करण्यास व पुन्हा त्यांना उत्पन्न करण्यासही समर्थ आहे देव, असुर व मनुष्य यांचे अधिपति, यक्ष, राक्षस, उरग, विद्याधर, नाग, गंधर्व, मृग, सिद्ध, किन्नराधिपति, सर्व पक्षी, किंबहुना कोणत्याही वेळीं कोणत्याही ठिकाणचे कोणतेही प्राणी, यामध्ये त्या विष्णुतुल्य पराक्रमी रामाशीं सामना करणारा कोणी ही नाही सर्वलोकाधिपति नृपश्रेष्ठ रामाचा तूं आपल्या कृत्याने अपराध केला आहेस, म्हणून तुझें जीवित सुरक्षित राहणें अशक्य आहे हे राक्षसाधिपते, देव, दैत्य,

रामस्य लोकत्रयनायकस्य स्थातुं न शक्ताः समरेषु सर्वे ॥ ४४
ब्रह्मा स्वयंभूश्चतुराननो वा रुद्रस्त्रिनेत्रस्त्रिपुरान्तको वा ।
इन्द्रो महेन्द्रः सुरनायको वा स्थातुं न शक्ता युधि राघवस्य ॥ ४५
स सौष्ठवोपेतमदीनवादिनः कपेर्निशम्याप्रतिमोऽप्रियं वचः ।
दशाननः कोपविवृत्तलोचनः समादिशत्तस्य वधं महाकपेः ॥ ४६

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे एकपञ्चाशः सर्गः ॥ ५१ ॥

द्विपञ्चाशः सर्गः ।　　[ २११८ ]

स तस्य वचनं श्रुत्वा वानरस्य महात्मनः ।
आज्ञापयद्वधं तस्य रावणः क्रोधमूर्च्छितः ॥ १
वधे तस्य समाज्ञप्ते रावणेन दुरात्मना ।
निवेदितवतो दौत्यं नानुमेने विभीषणः ॥ २
तं रक्षोधिपतिं क्रुद्धं तच्च कार्यमुपस्थितम् ।
विदित्वा चिन्तयामास कार्यं कार्यविधौ स्थितः ॥ ३

---

गंधर्व, विद्याधर, नाग आणि यक्ष हे सर्व एकत्र झाले तरी ते संग्रामामध्ये त्रैलोक्याधिपति रामापुढें टिकाव धरू शकणार नाहीत (३६-४४)

स्वयंभु चतुर्मुख ब्रह्मदेव, त्रिपुरनाशक त्रिलोचन रुद्र, विष्णु अथवा देवाधिपति इंद्र हे सुद्धां युद्धामध्यें रामापुढें टिकाव धरण्यास समर्थ नाहीत " याप्रमाणें कोठेंहि दीनवाणीचा शब्द न उच्चारतां केलेलें त्या वानराचें तें सयुक्तिक परंतु अप्रिय भाषण ऐकल्यावर त्या अतुल पराक्रमी रावणाचे नेत्र कोपानें लाल होऊन गेले आणि त्यानें त्या महाकपीचा वध करण्याची आज्ञा दिली. (४५-४६)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणांतर्गत आदिकाव्यांतील सुंदरकांडापैकीं एकावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५१ ॥

महात्म्या वानराचें भाषण ऐकल्यावर क्रोधवश झालेल्या रावणानें त्याच्या वधाची आज्ञा केली, परंतु दुरात्म्या रावणानें आपलें दूतकर्म योग्य रीतीनें बजावणाऱ्या त्या हनुमानाच्या वधाची आज्ञा दिली तरी तिला बिभीषणानें मनानें अनुमोदन दिलें नाहीं तेव्हां योग्य तेंच कार्य करावयाचें असा निश्चय केलेल्या विभीषण, त्या क्रोधवश झालेल्या रावणाकडे व सर्वांपुढें उपस्थित झालेल्या

निश्चितार्थस्ततः साम्ना पूज्यं शत्रुजिदग्रजम् ।
उवाच हितमत्यर्थं वाक्यं वाक्यविशारदः ४
क्षमस्व रोषं त्यज राक्षसेन्द्र प्रसीद मे वाक्यमिदं शृणुष्व ।
वधं न कुर्वन्ति परावरज्ञा दूतस्य सन्तो वसुधाधिपेन्द्राः ५
राजधर्मविरुद्धं च लोकवृत्तेश्च गर्हितम् ।
तव चासदृशं वीर कपेरस्य प्रमापणम् ६
धर्मज्ञश्च कृतज्ञश्च राजधर्मविशारदः ।
परावरज्ञो भूतानां त्वमेव परमार्थवित् ७
गृह्यन्ते यदि रोषेण त्वादृशोऽपि विचक्षणाः ।
ततः शास्त्रविपश्चित्त्वं श्रम एव हि केवलम् ८
तस्मात्प्रसीद शत्रुघ्न राक्षसेन्द्र दुरासद ।
युक्तायुक्तं विनिश्चित्य दूतदण्डो विधीयताम् ९

---

दूतवधाच्या कार्याकडे लक्ष देऊन, या प्रसंगीं आपण काय करावें, याचा विचार करूं लागला आणि मनाचा निश्चय ठाम झाल्यानंतर, तो संभाषणपटु शत्रुविजयी बिभीषण आपल्या पूज्य श्रेष्ठ भ्रात्याशीं अत्यंत सौम्य रीतीनें, अत्यंत हितकारक असें भाषण करूं लागला. ( १-४ )

तो म्हणाला, " हे राक्षसाधिपते, क्षमा असावी; आपण क्रोध सोडून द्या आणि कृपा करून मी काय म्हणतों तें नीट ऐकून घ्या. सन्मार्गानें वागणारे सदसद्विचारी राजाधिराज दूताचा वध करीत नाहीत म्हणून हे वीर राजा, या वानराचा वध करणें, हें कृत्य धर्माला विरुद्ध असून लोकव्यवहारातही निंद्य मानलेलें आहे आणि आपणाला तें अयोग्य आहे आपण उत्कृष्ट गोष्ट कोणती हें जाणणारे आहात; कारण आपण प्राणिमात्राचें सर्व कांहीं बरें-वाईट जाणणारे असून धर्मज्ञ, कृतज्ञ व राजधर्मामध्यें निपुण असे आहात, तेव्हां आपणांसारखे ज्ञानी क्रोधाच्या तावडींत सांपडूं लागले, तर शास्त्रामध्यें पांडित्य संपादन करणें म्हणजे व्यर्थ खटपट व प्रयास करणें होय, असें समजलें पाहिजे. हे अजिंक्य, हे शत्रुनाशक, हे राक्षसाधिपते, आपण कृपा करा आणि या वेळीं योग्य कोणतें व अयोग्य कोणतें, याचा निश्चय करून, मग या दूताला दंड करा. " ( ५-९ )

विभीषणवचः श्रुत्वा रावणो राक्षसेश्वरः ।
कोपेन महताविष्टो वाक्यमुत्तरमब्रवीत् १०
न पापानां वधे पापं विद्यते शत्रुसूदन ।
तस्मादिमं वधिष्यामि वानरं पापकारिणम् ११
अधर्ममूलं बहुदोषयुक्तमनार्यजुष्टं वचनं निशम्य ।
उवाच वाक्यं परमार्थतत्त्वं विभीषणो बुद्धिमतां वरिष्ठः १२
प्रसीद लङ्केश्वर राक्षसेन्द्र धर्मार्थतत्त्वं वचनं शृणुष्व ।
दूता न वध्याः समयेषु राजन्सर्वेषु सर्वत्र वदन्ति सन्तः १३
असंशयं शत्रुरयं प्रवृद्धः कृतं ह्यनेनाप्रियमप्रमेयम् ।
न दूतवध्यां प्रवदन्ति सन्तो दूतस्य दृष्टा बहवो हि दण्डाः १४
वैरूप्यमङ्गेषु कशाभिघातो मौण्ड्यं तथा लक्षणसंनिपातः ।
एतान्हि दूते प्रवदन्ति दण्डान्वधस्तु दूतस्य न नः श्रुतोऽस्ति १५
कथं च धर्मार्थविनीतबुद्धिः परावरप्रत्ययनिश्चितार्थः ।

---

हें विभीषणाचें भाषण ऐकून तो राक्षसाधिपति अतिशयच क्रुद्ध झाला आणि म्हणाला " हे शत्रुनाशका, पाप्याचा वध करण्यात पातक नाहीं; म्हणूनच मी पापी वानराचा वध करीत आहें. " अनेक दोषांनी भरलेलें, दुष्टानाच शोभणारें आणि अधर्माचें मूळ असणारें असें हें भाषण ऐकून बुद्धिमानामध्ये श्रेष्ठ असलेला विभीषण उत्कृष्ट तत्त्वें भरलेलें भाषण त्याच्याशीं करूं लागला. तो म्हणाला " हे लंकाधिपते, हे राक्षसराज, धर्म आणि अर्थ यांच्या तत्त्वाला अनुसरून असलेलें माझें भाषण आपण ऐकून घ्या. हे राजा, दूत आपलें कर्तव्य करीत असताना कोणत्याही वेळीं त्याचा वध करतां कामा नये, असें सर्व ठिकाणीं सज्जन म्हणत असतात. हा शत्रु निःसंशय प्रबल झाला असून यानें आपला पराकाष्ठेचा अपराध केला आहे; परंतु दूताचा वध सज्जनांनी सांगितलेला नाहीं. दूताला दुसरे पुष्कळ दंड सांगितलेले आहेत. गात्रांचे ठिकाणीं विरूपता, चाबकाचा मार व मुंडन यांपैकी एकेक अथवा एका वेळीं हे सगळे दंड दूताला सज्जनांनी सांगून ठेविलेले आहेत. दूताचा वध आमच्या ऐकण्यांत नाहीं. ( १०-१५ )

धर्मशास्त्र व अर्थशास्त्र यांचे आपल्या बुद्धीला संस्कार झालेले आहेत आणि

भवद्विधः कोपवशे हि तिष्ठेत्कोपं न गच्छन्ति हि सत्त्ववन्तः १६
न धर्मवादे न च लोकवृत्ते न शास्त्रबुद्धिग्रहणेषु चापि ।
विद्येत कश्चित्तव वीर तुल्यस्त्वं ह्युत्तमः सर्वसुरासुराणाम् १७
न चाप्यस्य कपेर्घाते कञ्चित्पश्याम्यहं गुणम् ।
तेष्वयं पात्यतां दण्डो यैरयं प्रेषितः कपिः १८
साधुर्वा यदि वासाधुः परैरेष समर्पितः ।
ब्रुवन्परार्थं परवान्न दूतो वधमर्हति १९
अपि चास्मिन्हते नान्यं राजन्पश्यामि खेचरम् ।
तस्मान्नास्य वधे यत्नः कार्यः परपुरञ्जय ।
भवान्सेन्द्रेषु देवेषु यत्नमास्थातुमर्हति २०
अस्मिन्विनष्टे न हि भूतमन्यं पश्यामि यस्तौ नरराजपुत्रौ ।
युद्धाय युद्धप्रिय दुर्विनीतावुद्योजयेद्वै भवता विरुद्धौ २१
पराक्रमोत्साहमनस्विनां च सुरासुराणामपि दुर्जयेन ।

उत्कृष्ट कोणते हे आपणास कळत असल्यामुळे कर्तव्याकर्तव्य जाणून योग्य तेंच
निश्चित करणारा असा आपणासारखा पुरुष कोपाच्या कसा अध न होईल ? हे
वीरा, धर्मवाद, लोकवर्तन आणि शास्त्र सिद्धांत ग्रहण करणें यामध्यें आपली बरो-
बरी करणारा दुसरा कोणीही नाही आपणच सर्व देवदैत्यामध्ये श्रेष्ठ आहात
तेव्हा मला या वानराचा वध करण्यात काहीएक अर्थ दिसत नाही. ज्यांनी या
वानराला दूत म्हणून येथे पाठविलें त्याच्यावर या शिक्षेचा अमल होऊ दे हा
बरा असो अथवा वाईट असो, दुसऱ्यांनी त्याला पाठविलें आहे आणि म्हणूनच
दुसऱ्याचा निरोप सांगणारा हा पराधीन दूत असल्यामुळे वधास पात्र नाही
शिवाय, हे शत्रुसमुदायविजयी राजा, याचा वध झाला तर आकाशमार्गाने येथे
येणारा मला दुसरा कोणी पुरुष दिसत नाही यासाठी याच्या वधाविषयी आपण
यत्न करू नये आपण इंद्रादि सर्व देवासंबंधी यत्न करणें योग्य आहे (१५--२०)
हे युद्धप्रिय, हा दूत नाहीसा झाल्यावर, तुझ्याविरुद्ध असलेल्या त्या उद्दाम
राजपुत्रांना युद्धाचे भरीस घालणारा दुसरा कोणी प्राणी मला दिसत नाही
पराक्रम, उत्साह आणि बुद्धि असलेल्या देवदैत्यानाही पण अजिंक्य आहा,

त्वया मनोनन्दन नैर्ऋतानां युद्धाय निर्नाशयितुं न युक्तम् २२
हिताश्च शूराश्च समाहिताश्च कुलेषु जाताश्च महागुणेषु ।
मनस्विनः शस्त्रभृतां वरिष्ठाः कोपप्रशस्ताः सुभृताश्च योधाः २३
तदेकदेशेन बलस्य तावत्केचित्तवादेशकृतोऽद्य यान्तु ।
तौ राजपुत्रावुपगृह्य मूढौ परेषु ते भावयितुं प्रभावम् २४
निशाचराणामधिपोऽनुजस्य विभीषणस्योत्तमवाक्यनिष्ठम् ।
जग्राह बुद्ध्या सुरलोकशत्रुर्महाबलो राक्षसराजमुख्यः २५
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे द्विपञ्चाशः सर्गः ॥५२॥

त्रिपञ्चाशः सर्गः ।   [ २१४३ ]

तस्य तद्वचनं श्रुत्वा दशग्रीवो महात्मनः ।
देशकालहितं वाक्यं भ्रातुरुत्तरमब्रवीत् १
सम्यगुक्तं हि भवता दूतवध्या विगर्हिता ।

तरी हे राक्षसांना आनंद देणाऱ्या युद्धाकरिता उद्युक्त झालेल्या मनाचा भग करणें तुला योग्य नाही. आज आपणापाशी असलेले योद्धे मोठया गुणवान् कुलामध्ये उत्पन्न झालेले आहेत; ते हित करणारे आहेत; शूर आहेत; कर्तव्य-विषयी दक्ष आहेत, विचारी आहेत; तूं त्यांचें उत्तम रीतीनें पोषण केलेलें आहेस आणि अपमान सहन न करण्याविषयी त्यांची प्रसिद्धी आहे, म्हणून थोडेसें सैन्य बरोबर घेऊन, आपल्या आज्ञेप्रमाणे वागणारे काही योद्धे शत्रूंचे प्रदेशात आपला प्रभाव दाखवण्याकरता आज जाऊं दे आणि त्या मूढ राजपुत्रांना त्यांना येथे घेऊन येऊं देत. " याप्रमाणे रावणाच्या धाकट्या भावानें, बिभीषणानें रावणास उत्कृष्ट शब्दांत केलेला उपदेश त्या मुख्य राक्षसराज व निशाचराधिपति महाबलाढ्य देवशत्रु रावणास मनापासून आवडला व त्यानें त्याप्रमाणे वागण्याचे ठरवलें ( २१–२५ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदर-काण्डांपैकी बावनावा सर्ग समाप्त झाला ॥ ५२ ॥

महात्म्या बिभीषणाचे भाषण ऐकल्यावर रावणानें देशकालाला अनुरूप अशा शब्दांनी आपल्या भ्रात्याला उत्तर दिलें. तो म्हणाला " तूं यांबद्दल चांगलें

अवश्यं तु वधायान्यः क्रियतामस्य निग्रहः २
कपीनां किल लाङ्गूलमिष्टं भवति भूषणम् ।
तदस्य दीप्यतां शीघ्रं तेन दग्धेन गच्छतु ३
ततः पश्यन्त्वमुं दीनमङ्गवैरूप्यकर्शितम् ।
सुमित्रज्ञातयः सर्वे बान्धवाः ससुहृज्जनाः ४
आज्ञापयद्राक्षसेन्द्रः पुरं सर्वं सचत्वरम् ।
लाङ्गूलेन प्रदीप्तेन रक्षोभिः परिणीयताम् ५
तस्य तद्वचनं श्रुत्वा राक्षसाः कोपकर्कशाः ।
वेष्टन्ते तस्य लाङ्गूलं जीर्णैः कार्पासिकैः पटैः ६
संवेष्ट्यमाने लाङ्गूले व्यवर्धत महाकपिः ।
शुष्कमिन्धनमासाद्य वनेष्विव हुताशनम् ७
तैलेन परिषिच्याथ तेऽग्निं तत्रोपपादयन् ।
लाङ्गूलेन प्रदीप्तेन राक्षसांस्तानताडयत् ८

घेतलास दूताचा वध निंद्य मानिला आहे परंतु वधाच्याच तोडीचा काही प्रकार करण्याकरिता याला अणखी एखदा अवश्य बांधून टाकावें पुच्छ हें खरोखर वानरांना मोठें प्रिय व भूषण वाटत असतें; यासाठी याचें तें पुच्छच तुम्ही सत्वर पेटवून द्या, त्या दग्ध झालेल्या पुच्छासह त्याला परत जाऊं द्या आणि नंतर याच्याशी मित्रत्वाने वागणारे जातभाई, बांधव आणि सुहृज्जन या या सर्वांना याला दीन आणि शरीराच्या विरूपतेमुळे कृश झालेला असा दिसू द्या " ( १-४ )

याप्रमाणें सांगितल्यानंतर राक्षसाधिपति रावणानें या वानराचें पुच्छ पेटवून द्यावें व याला राक्षसांनी चवाठ्यावरून फिरवावें " अशी आज्ञा केली. तेव्हां त्याचें तें भाषण ऐकल्यावर कोपानें गर्जना करूं लागलेले ते राक्षस त्याच्या पुच्छाला चिंध्या गुंडाळूं लागले, आणि वाळलेलें लाकूड व अग्नि यांचे संयोगानें ज्याप्रमाणें वनामध्ये अग्नि वाढत जातो, त्याप्रमाणें राक्षस चिंध्या गुंडाळूं लागले असतां, तो महाकपि हनुमान वृद्धिंगत होऊं लागला. नंतर त्या चिंध्यावर तेल ओतून त्या राक्षसांनी त्याला आग लाविली व त्या प्रदीप्त

रोषामर्षपरीतात्मा बालसूर्यसमाननः ।
स भूयः सङ्गतैः क्रूरै राक्षसैर्हरिपुङ्गवः ९
सहस्त्रीबालवृद्धाश्च जग्मुः प्रीतिं निशाचराः ।
निबद्धः कृतवान्वीरस्तत्कालसदृशीं मतिम् १०
कामं खलु न मे शक्ता निबद्धस्यापि राक्षसाः ।
छित्त्वा पाशान्समुत्पत्य हन्यामहमिमान्पुनः ११
यदि भर्तृहितार्थाय चरन्तं भर्तृशासनात् ।
निबध्नन्ते दुरात्मानो न तु मे निष्कृतिः कृता १२
सर्वेषामेव पर्याप्तो राक्षसानामहं युधि ।
किं तु रामस्य प्रीत्यर्थं विषहिष्येऽहमीदृशम् १३
लङ्का चारयितव्या मे पुनरेव भवेदिति ।
रात्रौ न हि सुदृष्टा मे दुर्गकर्मविधानतः १४

झालेल्या पुच्छाने हनुमानाने त्या राक्षसांना झोडपून काढलें; तेव्हां त्या क्रूर राक्षसांनी एकत्र जुळून बालसूर्यतुल्य तेजस्वी मुख असलेल्या आणि क्रोध व असहिष्णुता यांचे आहारीं गेलेल्या त्या वानरश्रेष्ठाला अधिकच आवळून टाकिलें आणि स्त्रिया, बाल व वृद्ध यांसह ते सर्वही राक्षस आनंदित झाले. राक्षसांनी करकचून बांधलें त्या वेळीं त्या समयाला योग्य असा विचार त्या वीरानें मनामध्यें आणिला. ( ५-१० )

तो म्हणाला " मी जरी बद्ध झालों असलों, तरी राक्षसांचें खरोखर माझ्यापुढें कांहीं एक चालावयाचें नाहीं; मी हे पाश तोडून टाकून एका उड्डाणाबरोबर यांना मारून टाकीन. स्वामींचें हित करण्याकरितां आपल्या मालकाच्या आज्ञेनें हे दुरात्मे येथें संचार करणाऱ्या मला जरी बांधून टाकीत आहेत, तरी मी जें येथें नुकसान केलें आहे, त्याची भरपाई यांच्या हातून होणार नाहीं. संग्रामामध्यें या सर्व राक्षसांचा समाचार घेण्यास मी एकटा पुरें आहें; परंतु रामाचें कल्याणासाठीं हा अशा प्रकारचा अपमान मला सहन केला पाहिजे. शिवाय मला पुनरपि एकदां लंकेमध्यें संचारही करावयाचा आहेच, कारण येथें ठिकठिकाणीं दुर्गम स्थळें बांधून ठेविलीं असल्यामुळें, रात्रीं ही लंकानगरी

अवश्यमेव द्रष्टव्या मया लङ्का निशाक्षये ।
कामं बध्नन्तु मे भूयः पुच्छस्योद्दीपनेन च १५
पीडां कुर्वन्ति रक्षांसि न मेऽस्ति मनसः श्रमः १६
ततस्ते संवृताकारं सत्त्ववन्तं महाकपिम् ।
परिगृह्य ययुर्हृष्टा राक्षसाः कपिकुञ्जरम् १७
शङ्खभेरीनिनादैश्च घोषयन्तः स्वकर्मभिः ।
राक्षसाः क्रूरकर्माणश्चारयन्ति स्म तां पुरीम् १८
अन्वीयमानो रक्षोभिर्ययौ सुखमरिंदमः ।
हनुमांश्चारयामास राक्षसानां महापुरीम् १९
यथापश्यद्विमानानि विचित्राणि महाकपिः ।
संवृतान्भूमिभागांश्च सुविभक्तांश्च चत्वरान् २०
रथ्याश्च गृहसंबाधाः कपिः शृङ्गाटकानि च ।
तथा रथ्योपरथ्याश्च तथैव च गृहान्तरान् २१
चत्वरेषु चतुष्केषु राजमार्गे तथैव च ।

मला चांगलीशी पहावयास सांपडली नाहीं. रात्र उजाडल्यावर मला लंका पूर्णपणें अवश्य पाहिलीच पाहिजे मला हे खुशाल बांधोत. माझें पुच्छ प्रदीप्त करून हे राक्षस मला पीडा देत असले, तरी त्यामुळे माझ्या मनाला खेद होत नाहीं. ( ११—१६ )

याप्रमाणे हनुमानानें विचार केला व आपलें स्वरूप गुप्त ठेवलेल्या त्या बलाढ्य वानरश्रेष्ठ महाकपीला ते राक्षस आनंदानें घेऊन गेले, नंतर शंख व नगारे यांच्या ध्वनींनीं आपला पराक्रम गाजवीत गाँजवीत ते क्रूरकर्मी राक्षस त्या हनुमानाला नगरीतून हिंडवूं लागले. राक्षस मागें लागले असतांना शत्रूंना जर्जर करणारा तो हनुमान् निःशंकपणें पुढे चालला आणि अशा रीतीनें त्या राक्षसांच्या महानगरीमध्यें तो पुष्कळ हिंडला. वाटेनें जातां जातां त्या महाकपीनें अद्भुत वाडे, इमारती असलेला भूप्रदेश, सुव्यवस्थितपणें राखिलेले चौक, घरांनीं गजबजून गेलेले रस्ते, चवाठे, लहानमोठे मार्ग आणि घरांमधील मोकळे प्रदेश पाहिले ( १७—२१ )

घोषयन्ति कपिं सर्वे चार इत्येव राक्षसाः २२
दीप्यमाने ततस्तस्य लाङ्गूलाग्रे हनूमतः ।
राक्षस्यस्ता विरूपाक्ष्यः शंसुर्देव्यास्तदप्रियम् २३
यस्त्वया कृतसंवादः सीते ताम्रमुखः कपिः ।
लाङ्गूलेन प्रदीप्तेन स एष परिणीयते २४
श्रुत्वा तद्वचनं क्रूरमात्मापहरणोपमम् ।
वैदेही शोकसंतप्ता हुताशनमुपागमत् २५
मङ्गलाभिमुखी तस्य सा तदासीन्महाकपेः ।
उपतस्थे विशालाक्षी प्रयता हव्यवाहनम् २६
यद्यस्ति पतिशुश्रूषा यद्यस्ति चरितं तपः ।
यदि वा त्वेकपत्नीत्वं शीतो भव हनूमतः २७
ततस्तीक्ष्णार्चिरव्यग्रः प्रदक्षिणशिखोऽनलः ।
जज्वाल मृगशावाक्ष्याः शंसन्निव शुभं कपेः २८

चौकांतून, चवाटयांवरून आणि राजमार्गांवरून जात असता ते सर्वही राक्षस "हेर" असें म्हणत म्हणत त्या वानराची दवंडी पिटूं लागले. असो. त्या हनुमानाच्या पुच्छाचें टोंक पेटूं लागलें, तेव्हां कुरूप नेत्र असलेल्या भेसूर राक्षसस्त्रिया सीतादेवीला ती अप्रिय वार्ता सांगू लागल्या. त्या म्हणाल्या, "हे सीते, ज्या ताम्रमुखी वानराने तुझ्याशीं भाषण केलें, त्याच या वानराला त्याचें पुच्छ पेटवून देऊन सर्व बाजूंनी हिंडवीत आहेत." हें आपल्या अपहाराप्रमाणेच दुःखदायक असलेलें भयंकर भाषण ऐकून सीतेस फार दुःख झालें व ती अग्नीचें ध्यान करूं लागली. त्या महाकपीचें कल्याणाची इच्छा मनात ठेवून, त्या विशालनयना जितेंद्रिय सीतेनें "मी जर पतीची शुश्रूषा केली असेल, जर कांहीं तप केलें असेल, अथवा माझे ठिकाणीं जर पातिव्रत्य असेल तर हे अग्ने, तूं हनुमानाला शीतल असा भासमान हो" अशी अग्नीची प्रार्थना केली. (२२-२७)

तेव्हां तीक्ष्ण तेजाचा आणि कर्तव्याविषयी दक्ष असलेला तो अग्नि, वानराचें 'क्षेम-क्षेम' त्या विशालनयना सीतेला सुचवत सुचवीत, प्रदक्षिणेकडे ज्वाला जाईल, अशा रीतीनें पेट घेऊं लागला. त्या हनुमानाचें पुच्छ अग्नीनें पेटलें-

हनूमज्जनकश्चैव पुच्छानलयुतोनिलः।
ववौ स्वास्थ्यकरो देव्याः प्रालेयानिलशीतलः २९
दह्यमाने च लाङ्गूले चिन्तयामास वानरः।
प्रदीप्तोऽग्निरयं कस्मान्न मां दहति सर्वतः ३०
दृश्यते च महाज्वालः करोति च न मे रुजम्।
शिशिरस्येव संपातो लाङ्गूलाग्रे प्रतिष्ठितः ३१
अथवा तदिदं व्यक्तं यद्दृष्टं प्लवता मया।
रामप्रभावादाश्चर्यं पर्वतः सरितां पतौ ३२
यदि तावत्समुद्रस्य मैनाकस्य च धीमतः।
रामार्थं संभ्रमस्तादृक्किमग्निर्न करिष्यति ३३
सीतायाश्चानृशंस्येन तेजसा राघवस्य च।
पितुश्च मम सख्येन न मां दहति पावकः ३४
भूयः स चिन्तयामास मुहूर्तं कपिकुञ्जरः।

असूनसुद्धा, त्याचा पिता वायु बर्फाच्या प्रदेशावरील वायूप्रमाणे शीतल वाहूं लागल्यामुळेही सीतादेवीच्या मनाला स्वस्थता वाटू लागली. इकडे पुच्छ जळू लागलें, तेव्हा तो वानर मनामध्ये म्हणाला, "हा अग्नि प्रदीप्त झाला असूनही सर्व प्रकारें हा मला दग्ध का करून टाकीत नाही? याची ज्वाला तर मोठी दिसत आहे परंतु हा मला मुळींच त्रास कसा देत नाही? हा अग्नि माझ्या पुच्छाच्या शेवटीं बर्फाच्या गोळ्याप्रमाणे आहे, असें मला भासतें. अथवा रामाच्या प्रभावामुळे, आकाशमार्गाने उड्डाण करीत असता समुद्रामध्ये ज्याप्रमाणे मला पर्वतरूपाने आश्चर्य दृष्टीस पडलें, त्याप्रमाणे ही एक उघड उघड आश्चर्यचकित करणारी दुसरी गोष्ट मला आढळून आली आहे. समुद्र आणि विचारी मैनाक पर्वत यांचीही जर रामाकरिता अत्यंत गडबड उडून गेली होती, तर रामाकरिता अग्नि तरी काय करणार नाही! (२८–३३)

सीतेचें दयाळुपण, रामाचें तेज आणि माझ्या पित्याशीं असलेलें अग्नीचें सख्य, हीं लक्षात घेऊनच अग्नि मला दग्ध करीत नाही." यानंतर पुनः तो वानरश्रेष्ठ आपल्या मनाशीं म्हणाला, "हे अधम राक्षस या ठिकाणीं मारुन टाकण्यास

कथमस्मद्विधस्येह बन्धनं राक्षसाधमैः ॥
प्रतिक्रियास्य युक्ता स्यात्सति मह्यं पराक्रमे ३५
ततश्छित्त्वा च तान्पाशान्वेगवान्वै महाकपिः ।
उत्पपाताथ वेगेन ननाद च महाकपिः ३६
पुरद्वारं ततः श्रीमाञ्शैलशृङ्गमिवोन्नतम् ।
विभक्तरक्षःसंबाधमाससादानिलात्मजः ३७
स भूत्वा शैलसंकाशः क्षणेन पुनरात्मवान् ।
ह्रस्वतां परमां प्राप्तो बन्धनान्यवशातयत् ३८
विमुक्तश्चाभवच्छ्रीमान्पुनः पर्वतसंनिभः ।
वीक्षमाणश्च ददृशे परिघं तोरणाश्रितम् ३९
स तं गृह्य महाबाहुः कालायसपरिष्कृतम् ।
रक्षिणस्तान्पुनः सर्वान्सूदयामास मारुतिः ४०
स तान्निहत्वा रणचण्डविक्रमः समीक्षमाणः पुनरेव लङ्काम् ।
प्रदीप्तलाङ्गूलकृतार्चिमाली प्रकाशितादित्य इवार्चिमाली ४१
इत्यार्षे श्रीमद्वा० वाल्मी० आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रिपञ्चाशः सर्गः ॥५३॥[२१८८]

---

बांधण्याचें काम कशासाठीं करीत आहेत ? माझ्या अंगांत भरपूर पराक्रम आहे, म्हणून तूं त्यांना अडथळा आणून आपलें सामर्थ्य दाखविण्याचें कार्य केलें तरी तें योग्यच होणार आहे." नंतर त्या वेगवान् महाकपीनें ते पाश तोडून आकाशांत मोठ्या वेगानें उड्डाण केलें आणि गर्जनाही केली. नंतर राक्षसांची ज्या ठिकाणीं गर्दी नव्हती अशा व पर्वतशिखराप्रमाणें उंच असलेल्या नगरद्वारावर तो श्रीमान् वायुपुत्र जाऊन बसला. तो मनोनिग्रही हनुमान् पर्वतप्राय बनून पुनः एका क्षणांत अतिशय लहान झाला आणि अशा रीतीनें त्यानें आपलीं सर्व बंधनें दूर केलीं. अशा रीतीनें सर्व बंधनांतून मुक्त झाल्यावर, पुनः तो श्रीमान् हनुमान् पर्वतप्राय बनून आपल्या त्या दरवाज्यावरील परिघाकडे पहात आहे, असा दिसूं लागला आणि लोखंडानें मढविलेला तो परिघ हातीं घेऊन त्या महापराक्रमी मारुतीनें पुनः तेथील सर्वही रक्षकांचा वध केला. याप्रमाणें रणामध्यें भयंकर पराक्रम करणाऱ्या हनुमाननें सर्व रक्षकांचा वध केला व तो लंकेकडे पहूं

चतुःपञ्चाशः सर्गः ।

वीक्षमाणस्ततो लङ्कां कपिः कृतमनोरथः ।
वर्धमानसमुत्साहः कार्यशेषमचिन्तयत् १
किं नु खल्ववशिष्टं मे कर्तव्यमिह सांप्रतम् ।
यदेषां रक्षसां भूयः संतापजननं भवेत् २
वनं तावत्प्रमथितं प्रकृष्टा राक्षसा हताः ।
बलैकदेशः क्षपितः शेषं दुर्गविनाशनम् ३
दुर्गे विनाशिते कर्म भवेत्सुखपरिश्रमम् ।
अल्पयत्नेन कार्येऽस्मिन्मम स्यात्सफलः श्रमः ४
यो ह्ययं मम लाङ्गूले दीप्यते हव्यवाहनः ।
अस्य संतर्पणं न्याय्यं कर्तुमेभिर्गृहोत्तमैः ५
ततः प्रदीप्तलाङ्गूलः सविद्युदिव तोयदः ।

---

लागला; या वेळीं प्रदीप्त झालेल्या पुच्छामुळे त्याचे सर्वांगावर प्रकाश किरणें पडून तो उदय पावणाऱ्या तेजोनिधि सूर्यासारखा दिसूं लागला. ( ३४-४१ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकाडांपैकीं त्रेपन्नावा सर्ग समाप्त झाला. ॥ ५३ ॥

नंतर सर्व मनोरथ सिद्धीस गेलेला तो वानर लंकेकडे पाहूं लागला, तसा त्याचा उत्साह उत्तरोत्तर वृद्धिंगत होऊं लागला आणि मनामध्ये शिल्लक राहिलेल्या कार्याविषयी तो विचार करूं लागला तो मनामध्ये म्हणाला " या राक्षसांना आणखीही संताप उत्पन्न होईल असें आणखी कोणतें मोठें कार्य करावयाचें शिल्लक राहिलें आहे ? प्रथम येथील वनाचा तर मी विध्वंस केला, प्रबल राक्षसांचा वध केला आणि थोडकेंसें सैन्यही नाहींसें केलें. आतां किल्ल्याचा नाश करणें तेवढें शिल्लक राहिलें आहे याप्रमाणे येथल्या किल्ल्याचा नाश झाला म्हणजे आतपर्यंत त्या प्रयत्नाचा व केलेल्या परिश्रमाचाही परिहार होईल आणि या कार्यामध्ये जे कांही मला श्रम पडले, तेही थोडक्याच यत्नाने सफल होतील. ( १-४ )

माझ्या पुच्छाचे अग्रभागीं प्रदीप्त झालेल्या अग्नीला हीं उत्तम गृहें देऊन तृप्त करणेंच योग्य आहे " असा विचार करून तो पुच्छ प्रदीप्त झालेला आणि

भवनाग्रेषु लङ्काया विचचार महाकपिः ६
गृहाद्गृहं राक्षसानामुद्यानानि च वानरः ।
वीक्षमाणो ह्यसंत्रस्तः प्रासादांश्च चचार सः ७
अवप्लुत्य महावेगः प्रहस्तस्य निवेशनम् ।
अग्निं तत्र विनिक्षिप्य श्वसनेन समो बली ८
ततोऽन्यत्पुप्लुवे वेश्म महापार्श्वस्य वीर्यवान् ।
मुमोच हनुमानग्निं कालानलशिखोपमम् ९
वज्रदंष्ट्रस्य च तथा पुप्लुवे स महाकपिः ।
शुकस्य च महातेजाः सारणस्य च धीमतः १०
तथा चेन्द्रजितो वेश्म ददाह हरियूथपः ।
जम्बुमालेः सुमालेश्च ददाह भवनं ततः ११
रश्मिकेतोश्च भवनं सूर्यशत्रोस्तथैव च ।
ह्रस्वकर्णस्य दंष्ट्रस्य रोमशस्य च रक्षसः १२
युद्धोन्मत्तस्य मत्तस्य ध्वजग्रीवस्य रक्षसः ।
विद्युज्जिह्वस्य घोरस्य तथा हस्तिमुखस्य च । १३

---

म्हणूनच विद्युल्लतेसह असलेल्या मेघाप्रमाणे दिसत असलेला महाकपि हनुमान् लंकेंतील घरावरून स्वैरपणें फिरूं लागला. मनामध्यें कांहीं एक भीति न बाळगतां इकडे तिकडे पहात पहात तो वानर राक्षसांच्या घरावरून त्या घरावर, बागांतून आणि वाड्यांवरून संचार करूं लागला. वायूप्रमाणे बलाढ्य असलेल्या त्या महावेगवान् हनुमानानें प्रथमतः प्रहस्ताच्या घरावर उडी मारून तेथे आग लावली; नंतर दुसऱ्यानें महापार्श्वाच्या घरावर उडी मारली आणि तेथेंही त्या बलवान् हनुमानानें प्रलयकालच्या अग्नीसारख्या ज्वाला असलेला अग्नि ठेवून दिला. नंतर वज्रदंष्ट्र, शुक आणि विचारी सारण यांच्याही घरांवर त्या महाकपि वानरानें उड्डाण केलें. नंतर इंद्रजिताचें घर त्या वानरसेनाधिपतीनें हनुमानानें जाळून टाकलें आणि नंतर जंबुमालीचें व सुमालीचेंही घर त्यानें दग्ध केलें. ( ७—११ )

नंतर, रश्मिकेतु, सूर्यशत्रु, ह्रस्वकर्ण, दंष्ट्र, रोमश राक्षस, युद्धोन्मत्त, मत्त,

करालस्य विशालस्य शोणिताक्षस्य चैव हि ।
कुम्भकर्णस्य भवनं मकराक्षस्य चैव हि १४
नरान्तकस्य कुम्भस्य निकुम्भस्य महात्मनः ।
यज्ञशत्रोश्च भवनं ब्रह्मशत्रोस्तथैव च १५
वर्जयित्वा महातेजा विभीषणगृहं प्रति ।
क्रममाणः क्रमेणैव ददाह हरिपुङ्गवः १६
तेषु तेषु महार्हेषु भवनेषु महायशाः ।
गृहेष्वृद्धिमतामृद्धिं ददाह कपिकुञ्जरः १७
सर्वेषां समतिक्रम्य राक्षसेन्द्रस्य वीर्यवान् ।
आससादाथ लक्ष्मीवान्रावणस्य निवेशनम् १८
ततस्तस्मिन्गृहे मुख्ये नानारत्नविभूषिते ।
मेरुमन्दरसंकाशे नानामङ्गलशोभिते १९
प्रदीप्तमग्निमुत्सृज्य लाङ्गूलाग्रे प्रतिष्ठितम् ।
ननाद हनुमान्वीरो युगान्तजलदो यथा २०
श्वसनेन च संयोगादतिवेगो महाबलः ।
कालाग्निरिव जज्वाल प्रावर्धत हुताशनः २१

ध्वजग्रीव राक्षस, विद्युज्जिह्व, घोर, हस्तिमुख, कराल, विशाल, शोणिताक्ष, कुंभकर्ण, मकराक्ष, नरांतक, कुंभ, महात्मा निकुंभ, यज्ञशत्रु, ब्रह्मशत्रु इ० राक्षसांची गृहें, एक बिभीषणाचें गृह तेवढें वर्ज्य करून, त्या महातेजस्वी वानरश्रेष्ठ हनुमानानें फिरत फिरता क्रमाक्रमानें जाळून टाकलीं. अशा रीतीनें ठिकठिकाणच्या सर्व श्रीमंत राक्षसांच्या त्या महामूल्यवान् घरांतील संपत्ति त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें जाळून नाहींशी केली आणि याप्रमाणें सर्वांच्या घरावरून फिरल्यानंतर तो शोभायुक्त व बलाढ्य हनुमान् रावणाच्या वाड्यावर येऊन बसला. नंतर नानाप्रकारच्या रत्नांनीं सुशोभित केलेल्या, नाना प्रकारच्या मंगलकारक वस्तूंनीं शोभा आणलेल्या आणि मेरुमंदराप्रमाणें उंच अशा त्या मुख्य वाड्यावर हनुमानानें आपल्या शेपटाचे अग्रभागीं पेटलेला अग्नि सोडून दिला व तो वीर हनुमान् प्रलयकालच्या मेघाप्रमाणें गर्जना करूं लागला (१२—२०)

प्रदीप्तमग्निं पवनस्तेषु वेश्मसु चारयन् ।
तानि काञ्चनजालानि मुक्तामणिमयानि च २२
भवनान्यवशीर्यन्त रत्नवन्ति महान्ति च ।
तानि भग्नविमानानि निपेतुर्वसुधातले २३
भवनानीव सिद्धानामम्बरात्पुण्यसंक्षये ।
संजज्ञे तुमुलः शब्दो राक्षसानां प्रधावताम् २४
स्वे स्वे गृहपरित्राणे भग्नोत्साहोज्झितश्रियाम् ।
नूनमेषोऽग्निरायातः कपिरूपेण हा इति २५
क्रन्दन्त्यः सहसा पेतुः स्तनन्धयधराः स्त्रियः ।
काश्चिदग्निपरीताङ्ग्यो हर्म्येभ्यो मुक्तमूर्धजाः २६
पतन्त्यो रेजिरेऽभ्रेभ्यः सौदामन्य इवाम्बरात् ।
वज्रविद्रुमवैदूर्यमुक्तारजतसंहतान् २७
विचित्रान्भवनाद्धातून्स्यन्दमानान्ददर्श सः ।

---

वायूची जोड मिळाल्यामुळे तो अतिवेगवान् व महाबलाढ्य अग्नि पसरू लागला आणि प्रलयकालच्या अग्नीप्रमाणे प्रज्वलित होऊं लागला. त्या घरावर वायूचे सहाऱ्याने अग्नि जाऊं लागला, तेव्हा सुवर्णजाल, मोत्यें आणि हिरे यानी खच्चून भरलेली व रत्नानी समृद्ध असलेलीं तीं मोठमोठीं घरें जमीनदोस्त झालीं, आणि घरचे मजले मोडून तीं घरें भूतलावर कोसळून पडलीं, तेव्हा पुण्यक्षय झाल्यामुळे आकाशातून पडत असलेलीं सिद्धाचीं घरेंच का काय, अशी तीं घरें दिसू लागलीं नंतर आपआपल्या घराचें सरक्षण करण्यात त्या राक्षसाचा उत्साहभग झाला, त्याचें तेज नाहीसें झालें व ते इकडेतिकडे धावधाव करूं लागले व त्याच्यामध्ये मोठा गल्गा सुरुं झाला "वानररूपाने प्रत्यक्ष अग्निच येथे आला आहे" असें ओरडत ओरडत राक्षसस्त्रिया, स्तनपान करणारीं मुलें जवळ असताहि एकाएकी जमिनीवर पडल्या. सर्वांगाला आग लागलेल्या व केस मोकळे सोडलेल्या कांहीं स्त्रिया वाड्यातून बाहेर पडूं लागल्या, त्या आकाशातून व मेघापासून पडणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणे दिसू लागल्या नतर हिरे, पोंवळीं, वैडूर्यमणि, मोत्यें आणि रुपें असलेल्या आश्चर्यकारक धातु घरातून गळून पडताना त्या

नाग्निस्तृप्यति काष्ठानां तृणानां च यथा तथा २८
हनूमान्राक्षसेन्द्राणां वधे किंचिन्न तृप्यति।
न हनूमद्विशस्तानां राक्षसानां वसुंधरा २९
हनूमता वेगवता वानरेण महात्मना।
लङ्कापुरं प्रदग्धं तद्रुद्रेण त्रिपुरं यथा ३०
ततः स लङ्कापुरपर्वताग्रे समुत्थितो भीमपराक्रमोऽग्निः।
प्रसार्य चूडावलयं प्रदीप्तो हनूमता वेगवतोपसृष्टः ३१
युगान्तकालानलतुल्यरूपः स मारुतोऽग्निर्ववृधे दिविस्पृक्।
विधूमरश्मिर्भवनेषु सक्तो रक्षःशरीराज्यसमर्पितार्चिः ३२
आदित्यकोटीसदृशः सुतेजा लङ्कां समस्तां परिवार्य तिष्ठन्।
शब्दैरनेकैरशनिप्ररूढैर्भिन्दन्निवाण्डं प्रबभौ महाग्निः ३३
तत्राम्बरादग्निरतिप्रवृद्धो रूक्षप्रभः किंशुकपुष्पचूडः।

---

हनुमानाने पाहिल्या अग्नि ज्याप्रमाणे काष्ठें व तृण यांना जाळूनही तृप्त होत नाही त्याप्रमाणे राक्षसश्रेष्ठांचा वध करूनही हनुमान् तृप्त झाला नाही आणि हनुमानाने मारलेल्या राक्षसांना ती लंकाभूमिही पुरेशी झाली नाही ( २९-२९ )

रुद्राने ज्याप्रमाणे त्रिपुर दग्ध केलें, त्याप्रमाणे महात्म्या वेगयुक्त हनुमान् वानराने अशा रीतीने ती लंकानगरी दग्ध केली. नंतर वेगवान् मारुतीच्या हनुमानाने पेटविलेला आणि लंकानगरूपी पर्वताच्या शिखरावर उसळलेला तो भयंकर अग्नि आपल्या ज्वालांचे लोट चोहोंकडे पसरून, अधिकच उसळू लागला; प्रलयकालच्या कालाग्निसारखें स्वरूप धारण केलेला, राक्षसांची शरीरें हें हवि पडून त्यांच्या ज्वाळा उत्पन्न झालेल्या, व धूर मुळीच नसलेला व राक्षसमंदिरांना धरून राहिलेला तो अग्नि, त्याला वायूचें सहाय्य मिळाल्यामुळें, स्वर्गास स्पर्श करील, इतका मोठा होऊं लागला. कोटि सूर्यांप्रमाणे दिसत असलेल्या त्या महातेजस्वी अग्नीने सर्व लंकानगरी व्यापून टाकली आणि विद्युत्पातासारखे अनेक ध्वनि त्यांतून निघूं लागले. तेव्हां सर्व ब्रह्मांडाचा विध्वंस करण्यास उद्युक्त झालेला हा प्रचंड प्रलयाग्नीच की काय असें वाटूं लागलें ( ३०-३३ )

अतिशय मोठा वाढलेला तो अग्नि आकाशापर्यंत जाऊं लागला; त्याचें हनी

निर्वाणधूमाकुलराजयश्च नीलोत्पलाभाः प्रचकाशिरेऽभ्राः ३४
वज्री महेन्द्रस्त्रिदशेश्वरो वा साक्षाद्यमो वा वरुणोऽनिलो वा।
रौद्रोऽग्निरर्को धनदश्च सोमो न वानरोऽयं स्वयमेव कालः ३५
किं ब्रह्मणः सर्वपितामहस्य लोकस्य धातुश्चतुराननस्य।
इहागतो वानररूपधारी रक्षोपसंहारकरः प्रकोपः ३६
किं वैष्णवं वा कपिरूपमेत्य रक्षोविनाशाय परं सुतेजः।
अचिन्त्यमव्यक्तमनन्तमेकं स्वमायया सांप्रतमागतं वा ३७
इत्येवमूचुर्बहवो विशिष्टा रक्षोगणास्तत्र समेत्य सर्वे।
सप्राणिसङ्घां सगृहां सवृक्षां दग्धां पुरीं तां सहसा समीक्ष्य ३८
ततस्तु लङ्का सहसा प्रदग्धा सराक्षसा साश्वरथा सनागा।
सपक्षिसङ्घा समृगा सवृक्षा रुरोद दीना तुमुलं सशब्दम् ३९
हा तात हा पुत्रक कान्त मित्र हा जीवितेशाङ्ग हतं सुपुण्यम्।

---

धूर दिसूं लागलें, ज्वाला पलाशपुष्पाप्रमाणें लाल दिसू लागल्या आणि जळलेल्या वाडम सर्वत्र पसरून आकाश व्यापून टाकणारे प्रचंड धुराचे लोट नीलकमल-सारख्या कांतीचे असल्यामुळे, मेघासारखे दिसूं लागले, तेव्हा " हा वानर नव्हे. हा स्वर्गाधिपति वज्रपाणि इंद्र असेल; प्रत्यक्ष यमच असेल, वरुण असेल, वायु असेल, प्रलयकालचा भयंकर अग्नि असेल, सूर्य असेल, कुबेर असेल, चंद्र असेल अथवा प्रत्यक्ष कालच असेल किंवा हें जगत् निर्माण करणारा, सर्वांचा मूळपुरुष, चतुर्मुख ब्रह्मदेव, त्याचा हा, राक्षसांचा संहार करणारा कोपच वानराचें रूप घेऊन येथे प्रकट झाला असावा. अथवा अचिंत्य, अव्यक्त, अनंत व अद्वितीय असें विष्णूचें अत्यंत उज्ज्वल तेज, तें राक्षसांचा नाश करण्यासाठी मायेनें वानररूप घेऊन सांप्रत येथें आलें की काय, ते समजत नाही याप्रमाणे अनेक महाबलाढ्य राक्षस उद्गार काढूं लागले, अनेक प्राणी, घरें व झाडें यांसुद्धा जळून गेलेली ती नगरी पाहून सर्व राक्षसगण एकत्र जुळून, तशाच प्रकारचे उद्गार काढूं लागले. ( ३४-३८ )

अशा रीतीनें अकस्मात् जळून खाक झालेली लंकानगरी, तिच्यांतील राक्षस, अश्व, रथ, गज, पक्षि, मृग आणि वृक्ष यांसुद्धा दीन होऊन व एकमारस्या

रक्षोभिरेवं बहुधा ब्रुवद्भिः शब्दः कृतो घोरतरः सुभीमः ४०
हुताशनज्वालसमावृता सा हतप्रवीरा परिवृत्तयोधा ।
हनूमतः क्रोधबलाभिभूता बभूव शापोपहतेव लङ्का ४१
ससंभ्रमं त्रस्तविषण्णराक्षसां समुज्ज्वलज्ज्वालहुताशनाङ्किताम् ।
ददर्श लङ्कां हनुमान्महामनाः स्वयम्भुरोषोपहतामिवावनिम् ४२
भङ्क्त्वा वनं पादपरत्नसंकुलं हत्वा तु रक्षांसि महान्ति संयुगे ।
दग्ध्वा पुरीं तां गृहरत्नमालिनीं तस्थौ हनूमान्पवनात्मजः कपिः ४३
स राक्षसांस्तान्सुबहूंश्च हत्वा वनं च भङ्क्त्वा बहुपादपं तत् ।
विसृज्य रक्षोभवनेषु चाग्निं जगाम रामं मनसा महात्मा ४४
ततस्तु तं वानरवीरमुख्यं महाबलं मारुततुल्यवेगम् ।
महामतिं वायुसुतं वरिष्ठं प्रतुष्टुवुर्देवगणाश्च सर्वे ४५

---

आक्रोश करून रडू लागली " हे तात, हे पुत्रा, हे कांत, हे मित्रा, हे प्राणनाथ, आपलें पुण्य व्यर्थ गेलें, " अशा प्रकारचे करुणोद्गार काढून, राक्षसांनी भीतीनें अति भयंकर आक्रोश केला. हनुमानाचा क्रोध व बल यांचा तडाखा बसून अग्नीच्या ज्वालांनी भरून गेल्यामुळे, आतील वीरांचा वध झाल्यामुळे आणि योद्ध्यांची दाणादाण उडून गेल्यामुळे ती लंकानगरी शापदग्ध झाल्यासारखी दिसू लागली. असो. जिच्यातील राक्षस गोंधळून जाऊन त्रस्त व हताश झाले आहेत व घर गेलेल्या व सर्वत्र फैलावणाऱ्या अग्नीच्या ज्वाला जेथे स्पष्टपणें दिसत आहेत, अशी ती लंकानगरी त्या उदारबुद्धि हनुमानास महादेवाच्या क्रोधानलामुळे दग्ध झालेली दुसरी पृथ्वीच की काय, अशा स्थितीत असलेली दिसून आली. उत्कृष्ट वृक्षांनी गजबजलेलें वन मोडून, मोठमोठ्या राक्षसांचा संग्रामामध्ये वध करून आणि उत्कृष्ट घरांच्या रांगा असलेली ती नगरी जाळून वायुपुत्र हनुमान् वानर स्वस्थ उभा राहिला. याप्रमाणे असंख्य राक्षसांचा वध करून, विपुल वृक्ष असलेलें तें वन मोडून आणि राक्षसांच्या घरांना आग लावून, त्या महात्म्या हनुमानाने रामाचें स्मरण केलें. ( ३९–४४ )

नंतर वायूप्रमाणे वेग असलेल्या व वानरवीरांतील मुख्य अशा त्या महाबुद्धिमान व महाबलवान श्रेष्ठ वायुपुत्राची सर्व देवगण स्तुति करूं लागले, कारण सर्व

देवाश्च सर्वे मुनिपुङ्गवाश्च गन्धर्वविद्याधरपन्नगाश्च।
भूतानि सर्वाणि महान्ति तत्र जग्मुः परां प्रीतिमतुल्यरूपाम् ४३
भङ्क्त्वा वनं महातेजा हत्वा रक्षांसि संयुगे।
दग्ध्वा लङ्कापुरीं भीमां रराज स महाकपिः ४७
गृहाग्र्यशृङ्गाग्रतले विचित्रे प्रतिष्ठितो वानरराजसिंहः।
प्रदीप्तलाङ्गूलकृतार्चिमाली व्यराजतादित्य इवार्चिमाली ४८
लङ्कां समस्तां संपीड्य लाङ्गूलाग्निं महाकपिः।
निर्वापयामास तदा समुद्रे हरिपुङ्गवः ४९
ततो देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः।
दृष्ट्वा लङ्कां प्रदग्धां तां विस्मयं परमं गताः ५०

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वा० आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चतुःपञ्चाशः सर्गः ॥ ५४ ॥

पञ्चपञ्चाशः सर्गः। [२२३४]

संदीप्यमानां विध्वस्तां त्रस्तरक्षोगणां पुरीम्।
अवेक्ष्य हनुमाँल्लङ्कां चिन्तयामास वानरः १

---

देव, श्रेष्ठ ऋषि, गंधर्व, विद्याधर, पन्नग आणि इतरही सर्व मोठे मोठे प्राणी यांना हनुमानाच्या या कृत्याने पराकाष्ठेचा अनुपम आनंद झाला होता. याप्रमाणे वनाचा भंग करून, संग्रामात राक्षसांचा वध करून व भयंकर लङ्कानगरी दग्ध करून तो महाकपि ऐटीने मिरवूं लागला. आणि एका उंच वाड्याच्या शेवटच्या अद्भुत गच्चीवर बसलेला तो श्रेष्ठ वनराधिपति हनुमान-सभोंवती प्रदीप्त झालेल्या पुच्छाच्या ज्वाला पसरल्या असल्यामुळे किरणसमुदाय पसरत असलेल्या सूर्याप्रमाणे दिसूं लागला. याप्रमाणे सर्व लंकानगरी दग्ध केल्यावर, त्या वानरश्रेष्ठ महाकपि हनुमानाने समुद्रामध्ये आपल्या पुच्छाचा अग्नि विझविला. नंतर गंधर्व, देव, सिद्ध आणि महर्षि यांनी ती लंका दग्ध झाल्याचें पाहिलें व त्यांच्या मनास विस्मय वाटला !!! (४५-५०)

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडांपैकी चोपनावा सर्ग समाप्त झाला. ॥ ५४ ॥

जी लंकानगरी जळून जाऊन तेथील राक्षस त्रस्त झालेले आहेत व जळत

तस्याभूत्सुमहांस्त्रासः कुत्सा चात्मन्यजायत ।
लङ्कां प्रदहता कामं किंस्वित्कृतमिदं मया २
धन्याः खलु महात्मानो ये बुद्ध्या कोपमुत्थितम् ।
निरुन्धन्ति महात्मानो दीप्तमग्निमिवाम्भसा ३
क्रुद्धः पापं न कुर्यात्कः क्रुद्धो हन्याद्गुरूनपि ।
क्रुद्धः परुषया वाचा नरः साधूनधिक्षिपेत् ४
वाच्यावाच्यं प्रकुपितो न विजानाति कर्हिचित् ।
नाकार्यमस्ति क्रुद्धस्य नावाच्यं विद्यते क्वचित् ५
यः समुत्पतितं क्रोधं क्षमयैव निरस्यति ।
यथोरगस्त्वचं जीर्णां स वै पुरुष उच्यते ६
धिगस्तु मां सुदुर्बुद्धिं निर्लज्जं पापकृत्तमम् ।
अचिन्तयित्वा तां सीतामग्निदं स्वामिघातकम् ७
यदि दग्धा त्वियं सर्वा नूनमार्यापि जानकी ।

असता जेथे सर्वत्र एरच हलकल्लोळ उडून गेला आहे, अशी ती नगरी पाहून हनुमान् मनामध्ये विचार करूं लागला, तेव्हा त्याला अतिशय त्रास होऊन आपल्या हातून एक वाईट कृत्य झाले, असे त्यास वाटलें. तो मनात म्हणाला, " मन मानेल तशी लंकानगरी जाळून मी काय बरें मिळवलें ? प्रदीप्त झालेला अग्नि ज्याप्रमाणे उदकाने विझवून टाकतात, त्याप्रमाणे मनात उत्पन्न झालेला क्रोध जे महात्मे आपल्या बुद्धीने आवरून धरतात, ते खरोखर धन्य होत. क्रुद्ध झालेला कोणता बरें पुरुष पाप करणार नाही ? क्रुद्ध पुरुष गुरुचा ही वध करील आणि मर्मभेदक वचनाने साधूंची ही निंदा करील. ( १-४ )

बोलावें कोणते, आणि न बोलावें कोणतें हें क्रुद्ध झालेल्या पुरुषाला मुळीच समजत नाही. सारांश, क्रुद्ध पुरुषाला अकार्य अशी कोणतीही गोष्ट नाही आणि अवाच्य असेंही काही एक नसतें. सर्प ज्याप्रमाणे आपली जीर्ण त्वचा —कात— टाकून देतो, त्याप्रमाणे मनात उत्पन्न झालेला क्रोध जो आपल्या क्षमेच्या बळावर बाहेर फेकून देतो, त्यालाच 'पुरुष' असें म्हणतात. म्हणून त्या मतिच्या गुणाचा विचार न करतो आग लावणाऱ्या आणि अर्थातच स्वामिनीचा घात करणाऱ्या या अधम

दग्धा तेन मया भर्तुर्हतं कार्यमजानता ८
यदर्थमयमारम्भस्तत्कार्यमवसादितम् ।
मया हि दहता लङ्कां न सीता परिरक्षिता ९
ईषत्कार्यमिदं कार्यं कृतमासीन्न संशयः ।
तस्य क्रोधाभिभूतेन मया मूलक्षयः कृतः १०
विनष्टा जानकी व्यक्तं न ह्यदग्धः प्रदृश्यते ।
लङ्कायाः कश्चिदुद्देशः सर्वा भस्मीकृता पुरी ११
यदि तद्विहतं कार्यं मया प्रज्ञाविपर्ययात् ।
इहैव प्राणसंन्यासो ममापि ह्यद्य रोचते १२
किमग्नौ निपताम्यद्य आहोस्विद्वडवामुखे ।
शरीरमिह सत्त्वानां दद्मि सागरवासिनाम् १३
कथं नु जीवता शक्यो मया द्रष्टुं हरीश्वरः ।
तौ वा पुरुषशार्दूलौ कार्यसर्वस्वघातिना १४

दुर्बुद्धि, निर्लज्ज व अत्यंत पाप्याला धिक्कार असो ! अहो ! ही सर्व लंकाच जर दग्ध झाली आहे, तर खरोखर साध्वी जानकीही दग्ध होणारच, पण लंका जाळताना या गोष्टीचा विचार न केल्यामुळे मी आपल्या यजमानाच्या कार्याचा घात मात्र केला आहे. अरेरे ! ज्या कार्याकरिता हा एवढा खटाटोप केला, त्या कार्याचाच माझ्या हातून घात झाला ! अरे ! लंका दग्ध करताना मी सीतेचे रक्षण केले नाही ! ( ५–९ )

माझ्या हातून लंका जाळणें, हें खरोखर अगदीच क्षुल्लक कार्य झालें आहे, परंतु क्रोधवश झाल्यामुळे, त्या रामचंद्राच्या मात्र मी समूळ नाश केला आहे. जानकीचा नाश झाला, हें स्पष्टच आहे, कारण, लंकेतील कोणताही भाग जळल्यावाचून राहिलेला दिसत नाही. सर्व नगरी जळून खाक झाली आहे यासाठी माझी बुद्धीच विपरीत झाल्यामुळे त्या रामकार्याचा जर माझ्या हातून नाश झालेला आहे, तर येथल्या येथेच प्राणत्याग करावा, हेंच आज मला योग्य वाटत आहे. यासाठी मी अग्नीमध्ये उडी घालूं ? किंवा वडवानलामध्ये जाऊन पडूं, अथवा समुद्रनिवासी प्राण्यांना आपलें शरीर अर्पण करूं ? स्वीकृत कार्याचा सर्व

मया खलु तदेवेदं रोषदोषात्प्रदर्शितम् ।
प्रथितं त्रिषु लोकेषु कपित्वमनवस्थितम् १५
धिगस्तु राजसं भावमनीशमनवस्थितम् ।
ईश्वरेणापि यद्रागान्मया सीता न रक्षिता १६
विनष्टायां तु सीतायां तावुभौ विनशिष्यतः ।
तयोर्विनाशे सुग्रीवः सबन्धुर्विनशिष्यति १७
एतदेव वचः श्रुत्वा भरतो भ्रातृवत्सलः ।
धर्मात्मा सहशत्रुघ्नः कथं शक्ष्यति जीवितुम् १८
इक्ष्वाकुवंशे धर्मिष्ठे गते नाशमसंशयम् ।
भविष्यन्ति प्रजाः सर्वाः शोकसंतापपीडिताः १९
तदहं भाग्यरहितो लुप्तधर्मार्थसंग्रहः ।
रोषदोषपरीतात्मा व्यक्तं लोकविनाशनः २०

प्रकारें घात करणारा मी, यापुढे जिवंत राहिलों, तरी मला वानराधिपति सुग्रीवाचें अथवा त्या पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मणाचें दर्शन होणें शक्य आहे का ? ( १०–१४ )

क्रोधरूप दोषामुळे मी खरोखर त्रैलोक्यामध्ये प्रसिद्ध असलेला वानराचा अव्यवस्थितपणा मात्र दर्शविला. मी इतका सामर्थ्यशाली असूनही ज्या अर्थी रजोगुणमूलक क्रोधाच्या आहारीं जाऊन सीतेचें संरक्षण करण्यास पुढे झालों नाहीं, त्या अर्थी सत्कार्याला अयोग्य आणि अव्यवस्थित अशा या माझ्या अंगातील राजसस्वभावाला धिक्कार असो. सीतेचा नाश झाला असल्यामुळे, आता अर्थातच त्या उभयता रामलक्ष्मणाचा अंत होणार आणि त्याचा अंत झाला, म्हणजे सुग्रीवाचाही बांधवासह नाश होणार, हें ठरलेंच आहे. इतकेंच नव्हे तर ही वार्ता ऐकताक्षणीं भ्रातृवत्सल धर्मात्मा भरत व शत्रुघ्न तरी जिवंत राहणें कसें शक्य आहे ? यामुळे इक्ष्वाकुवंशाधिपति धर्मशील राम नाहीसा झाल्यावर, तेथील सर्व प्रजा शोक व संताप यांचे आहारीं जाईल, यात संशय नाही. सारांश, धर्म व अर्थ यांचा सर्वस्वी माझ्या हातून लोप झालेला आहे. मी भाग्यहीन आहें आणि रोषरूप दोषानें माझें मन बिघडून गेलें असल्यामुळे मी हनुमान् उघड उघड या जगताचा नाशकर्ता ठरलों आहें " ( १५–२० )

इति चिन्तयतस्तस्य निमित्तान्युपपेदिरे ।
पूर्वमप्युपलब्धानि साक्षात्पुनरचिन्तयत् २१
अथ वा चारुसर्वाङ्गी रक्षिता स्वेन तेजसा ।
न नशिष्यति कल्याणी नाग्निरग्नौ प्रवर्तते २२
न हि धर्मात्मनस्तस्य भार्याममिततेजसः ।
स्वचरित्राभिगुप्तां तां स्प्रष्टुमर्हति पावकः २३
नूनं रामप्रभावेण वैदेह्याः सुकृतेन च ।
यन्मां दहनकर्मायं नादहद्धव्यवाहनः २४
त्रयाणां भरतादीनां भ्रातॄणां देवता च या ।
रामस्य च मनःकान्ता सा कथं विनशिष्यति २५
यद्वा दहनकर्मायं सर्वत्र प्रभुरव्ययः ।
न मे दहति लाङ्गूलं कथमार्यां प्रधक्ष्यति २६
पुनश्चाचिन्तयत्तत्र हनूमान्विस्मितस्तदा ।

याप्रमाणे तो विचार करूं लागला, तेव्हा पूर्वी मनात न आलेली अशी दुसरी काही, वरील विचाराविरुद्ध कारणें त्याला सुचलीं आणि पुनरपि तो मनाशीं विचार करूं लागला. तो म्हणाला, स्वतःच्या तेजोबलानें सर्वांगसुंदरी सीतेनें रक्षण केलें असल्यामुळे, ती कल्याणी नाश पावणार नाही, कारण अग्नीला अग्नि जाळण्यास कधी प्रवृत्त होत नाही. त्या अतुल तेजस्वी धर्मात्म्या रामाची भार्या, स्वतःच्या सच्छील वर्तनामुळे सुरक्षित आहे व म्हणून अग्नि तिला स्पर्श करण्यास समर्थ होणार नाही. दग्ध करून टाकणें, हेंच ज्याचें स्वाभाविक कर्म आहे, अशा अग्नीनेंही मला रामाचा प्रभाव आणि वैदेहीचें पुण्य यांच्या योगानें जर मुळीच दग्ध केलें नाही, तर भरतप्रभृति तिन्ही भ्रात्यांची जी देवता आणि मनाप्रमाणे असलेली जी रामाची कांता, ती कशी नाश पावेल? फार कशाला? दहन करणें हेंच ज्याचें स्वाभाविक कर्म आहे, असा अक्षय्य अग्नि सर्वत्र आपलें कर्म करण्यास समर्थ असूनही त्यानें जर माझें पुच्छ दग्ध केलें नाही, तर साध्वी सीतेला तो कसा दग्ध करील? ( २१-२६ )

असा विचार केल्यानंतर त्याला जलामध्ये दृष्टीस पडलेल्या हिरण्यनाभ

हिरण्यनाभस्य गिरेर्जलमध्ये प्रदर्शनम् २७
तपसा सत्यवाक्येन अनन्यत्वाच्च भर्तरि ।
असौ विनिर्दहेदग्निं न तामग्निः प्रधक्ष्यति २८
स तथा चिन्तयंस्तत्र देव्या धर्मपरिग्रहम् ।
शुश्राव हनुमांस्तत्र चारणानां महात्मनाम् २९
अहो खलु कृतं कर्म दुर्विगाहं हनूमता ।
अग्निं विसृजता तीक्ष्णं भीमं राक्षससद्मनि ३०
प्रपलायितरक्षःस्त्रीबालवृद्धसमाकुला ।
जनकोलाहलाध्माता क्रन्दतीवाद्रिकन्दरैः ३१
दग्धेयं नगरी लङ्का साट्टप्राकारतोरणा ।
जानकी न च दग्धेति विस्मयोऽद्भुत एव नः ३२
इति शुश्राव हनुमान्वाचं ताममृतोपमाम् ।
बभूव चास्य मनसो हर्षस्तत्कालसंभवः ३३
स निमित्तैश्च दृष्टार्थैः कारणैश्च महागुणैः ।

---

पर्वताचें स्मरण झालें आणि विस्मयचकित होऊन तो मनाशींच म्हणाला, "तप, सत्य भाषण आणि भर्त्याचे ठिकाणी अनन्य प्रेम या गुणामुळे ही सीताच अग्नीला जाळून टाकील, परंतु अग्नि तिला दग्ध करण्यास समर्थ होणार नाही" याप्रमाणें सीतादेवीच्या धर्माचरणाचा तो हनुमान् विचार करूं लागला, तोंच महात्म्या चारणांचें भाषण त्यानें असें ऐकलें ( २७-२९ )

"अहो, राक्षसाच्या गृहावर तीक्ष्ण व भयंकर अग्नि सोडणाऱ्या हनुमानानें, खरोखर हें फारच दुर्घट कर्म केलें आहे. अहो, पळत सुटलेल्या आबालवृद्ध स्त्रीपुरुषांनी भरून गेलेली व लोकांच्या हलकल्लोळांनी दुमदुमून गेल्यामुळें पर्वतगुहारूपी मुखांनी जशी काही आक्रोशच करीत असलेली ही लंका तिच्यातील गच्च्या, कोट व वेशी यांसह समूळ दग्ध झाली असताही जानकी दग्ध झाली नाही, हा अद्भुत चमत्कार पाहून, आम्हांला खरोखर विस्मयच वाटत आहे!" ( ३०-३२ )

याप्रमाणें ती अमृततुल्य वाणी कानीं पडताक्षणीं त्या हनुमानाच्या मनाला

ऋषिवाक्यैश्च हनुमानभवत्प्रीतमानसः ३४
ततः कपिः प्राप्तमनोरथार्थस्तामक्षतां राजसुतां विदित्वा ।
प्रत्यक्षतस्तां पुनरेव दृष्ट्वा प्रतिप्रयाणाय मतिं चकार ३५

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चपञ्चाशः सर्गः ॥५५॥

षट्पञ्चाशः सर्गः । [२२६९]

ततस्तु शिंशपामूले जानकीं पर्युपस्थिताम् ।
अभिवाद्याब्रवीद्दिष्ट्या पश्यामि त्वामिहाक्षताम् १
ततस्तं प्रस्थितं सीता वीक्षमाणा पुनः पुनः ।
भर्तुः स्नेहान्वितं वाक्यं हनूमन्तमभाषत २
यदि त्वं मन्यसे तात वसैकाहमिहानघ ।
क्वचित्सुसंवृते देशे विश्रान्तः श्वो गमिष्यसि ३
मम चैवाल्पभाग्यायाः सांनिध्यात्तव वानर ।
शोकस्यास्याप्रमेयस्य मुहूर्तं स्यादपि क्षयः ४

---

हर्ष झाला आणि त्याचा प्रत्यय आलेला आहे, असे चांगले शकुन पाहून व रामप्रभावादि इतर मोठमोठी कारणे लक्ष्यात आणून व आकाशामध्ये झालेल्या ऋषिवाक्याकडे लक्ष देऊन हनुमानाचें मन प्रसन्न झालें. याप्रमाणे सर्व मनोरथ परिपूर्ण झालेल्या त्या कपीने त्या राजकन्येला कोठेही धक्का लागलेला नाही, असे जाणून व तिला पुन्हा एकदा प्रत्यक्ष पाहून, परत जाण्याचें ठरविलें ( ३३-३५ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणमहाकाव्यांतील सुंदरकांडांपैकी पंचावनावा सर्ग समाप्त झाला ॥ ५५ ॥

शिंशपावृक्षाखाली बसलेल्या जानकीला अभिवंदन करून, हनुमान तिला म्हणाला, " सुदैवाने मी आज तुला कोठेही दुखापत वगैरे झाली नाही, अशी पहात आहे " इतकें बोलून परत चालू लागलेल्या त्या हनुमानाकडे सीता वारंवार पहूं लागली आणि भर्त्याचे ठिकाणी अनुपम प्रेम असलेली ती सीता हनुमानाला म्हणाली, " वा निष्पापा, हनुमाना, तुझी मर्जी असेल, तर कोठेतरी चांगल्याशा गुप्त प्रदेशामध्ये तूं आजच्या दिवस विश्रांति घे व उद्या जा कारण, हे वानरा,

गते हि हरिशार्दूल पुनः संप्राप्तये त्वयि ।
प्राणेष्वपि न विश्वासो मम वानरपुङ्गव ५
अदर्शनं च ते वीर भूयो मां दारयिष्यति ।
दुःखाद्दुःखतरं प्राप्तां दुर्मनःशोककर्शिताम् ६
अयं च वीर संदेहस्तिष्ठतीव ममाग्रतः ।
सुमहत्सु सहायेषु हर्यृक्षेषु महाबलः ७
कथं नु खलु दुष्पारं संतरिष्यन्ति सागरम् ।
तानि हर्यृक्षसैन्यानि तौ वा नरवरात्मजौ ८
त्रयाणामेव भूतानां सागरस्यातिलङ्घने ।
शक्तिः स्याद्वैनतेयस्य तव वा मारुतस्य वा ९
तदत्र कार्यनिर्बन्धे समुत्पन्ने दुरासदे ।
किं पश्यसि समाधानं त्वं हि कार्यविशारदः १०
काममस्य त्वमेवैकः कार्यस्य परिसाधने ।

---

तू जवळ असलेला पाहून या भाग्यहीन स्त्रीला होत असलेल्या अनुपम दुःखाचा क्षणभर तरी विसर पडेल हे वानरश्रेष्ठा, तू एकदा गेल्यावर पुन तुझी भेट होईल, म्हणावें तर, तोंपर्यंत हे वानराधिपते, माझे प्राण राहतीलच, असा मला विश्वास वाटत नाही. ( १-५ )

हे वीरा, तूं दिसेनासा झालास, म्हणजे पूर्वीच्या अनुभवलेल्या दुःखाहूनही मला अधिक दुःख होईल आणि खेद व शोक यानी मी अगदी जर्जर होऊन गेले असल्यामुळे माझें हृदय शतशः विदीर्ण होऊन जाईल. शिवाय हे वीरा, माझ्या डोळ्यासमोर हा एक फारच मोठा संशय दत्त म्हणून उभा आहे अरे, रामाला अति प्रचंड वानर व ऋक्ष जरी सहाय्य करणारे असले, तरी तीं ऋक्षवानराचीं सैन्यें अथवा ते राजपुत्र रामलक्ष्मण मार्गातला दुस्तर सागर तरून येण्यास कसे समर्थ होतील ? कारण सागराचें उल्लंघन करण्यास तीनच प्राण्यात सामर्थ्य आहे ते तिघे म्हणजे गरुड, तू अथवा वायु तेव्हा हें आपलें कार्य पार पडण्याचें मार्गात ही दुस्तर अडचण आली असताना, तुला काय बरें उपाय सुचत आहे ? हाती घेतलेलें कार्य पार पाडण्यामध्ये तू तरबेज आहेस हे शत्रुपक्षीय वीर-



लंकादहन ( सुंदर० स ५४ श्लो ४७ )

पर्याप्तः परवीरघ्न यशस्यस्ते बलोदयः ११
बलैस्तु संकुलां कृत्वा लङ्कां परबलार्दनः ।
मां नयेद्यदि काकुत्स्थस्तत्तस्य सदृशं भवेत् १२
तद्यथा तस्य विक्रान्तमनुरूपं महात्मनः ।
भवत्याहवशूरस्य तथा त्वमुपपादय १३
तदर्थोपहितं वाक्यं प्रश्रितं हेतुसंहितम् ।
निशम्य हनुमान्वीरो वाक्यमुत्तरमब्रवीत् १४
देवि हर्यृक्षसैन्यानामीश्वरः प्लवतां वरः ।
सुग्रीवः सत्त्वसंपन्नस्तवार्थे कृतनिश्चयः १५
स वानरसहस्राणां कोटीभिरभिसंवृतः ।
क्षिप्रमेष्यति वैदेहि सुग्रीवः प्लवगाधिपः १६
तौ च वीरौ नरवरौ सहितौ रामलक्ष्मणौ ।
आगम्य नगरीं लङ्कां सायकैर्विधमिष्यतः १७
सगणं राक्षसं हत्वा न चिराद्रघुनन्दनः ।
त्वामादाय वरारोहे स्वां पुरीं प्रति यास्यति १८

नाशका, हें कार्य सिद्धीस नेण्यास खरोखर तूंच एकटा समर्थ आहेस व तुझ्या बलाचाव प्रभाव यशदायी होणारा आहे. तथापि, शत्रुसैन्याचा नाश करणारा ककुत्स्थकुलोत्पन्न राम आपल्या सैन्यासह येऊन, लंकेमध्ये दाणादाण उडवून देऊन, जर मला परत घेऊन जाईल, तर तें त्याला साजेसें होईल. म्हणून त्या महात्म्या रणशूर रामाला शोभेल, असा पराक्रम त्याच्या हातून होईल, अशी तूं तजवीज कर." ( ६-१३ )

अर्थ, विनय आणि हेतु असलेलें सीतेचें हें भाषण ऐकून वीर हनुमान् तिला म्हणाला "हे देवि, वानर आणि ऋक्ष यांच्या सैन्याचा अधिपति सुग्रीव बलवान् आहे आणि तुझ्या कार्याविषयी त्याचा निश्चय कायम झालेला आहे हे वैदेहि, तो वानराधिपति सुग्रीव हजारो वानरांचीं कोट्यवधि सैन्यें बरोबर घेऊन, सत्वरच इकडे येईल. ते पुरुषश्रेष्ठ वीर रामलक्ष्मणही त्याचेबरोबर येऊन बाणांनीं लंकानगरी उध्वस्त करतील आणि रावणाचा, त्याच्या ज्ञातिगणांसह, लवकरच वध

समाश्वासिहि भद्रं ते भव त्वं कालकाङ्क्षिणी।
क्षिप्रं द्रक्ष्यसि रामेण निहतं रावणं रणे १९
निहते राक्षसेन्द्रे च सपुत्रामात्यबान्धवे।
त्वं समेष्यसि रामेण शशाङ्केनेव रोहिणी २०
क्षिप्रमेष्यति काकुत्स्थो हर्यृक्षप्रवरैर्युतः।
यस्ते युधि विनिर्जित्य शोकं व्यपनयिष्यति २१
एवमाश्वास्य वैदेहीं हनुमान्मारुतात्मजः।
गमनाय मतिं कृत्वा वैदेहीमभ्यवादयत् २२
राक्षसान्प्रवरान्हत्वा नाम विश्राव्य चात्मनः।
समाश्वास्य च वैदेहीं दर्शयित्वा परं बलम् २३
नगरीमाकुलां कृत्वा वञ्चयित्वा च रावणम्।
दर्शयित्वा बलं घोरं वैदेहीमभिवाद्य च २४
प्रतिगन्तुं मनश्चक्रे पुनर्मध्येन सागरम्।
ततः स कपिशार्दूलः स्वामिसंदर्शनोत्सुकः २५

करील व हे सुंदरी, तुला बरोबर घेऊन रघुनंदन राम आपल्या राजधानीला परत जाईल. तुझें कल्याण असो. तू धैर्य धर आणि योग्य वेळेची वाट पहात रहा. संग्रामामध्ये रामाच्या हातून वध पावलेल्या स्थितींत रावणाला तूं लवकरच पाहशील आणि राक्षसाधिपति रावणाचा पुत्र, अमात्य व बांधव यांचा वध झाल्यावर, चंद्राशीं भेट होणाऱ्या रोहिणीप्रमाणें तुझी लवकरच रामाशीं भेट होईल खरोखर, श्रेष्ठ श्रेष्ठ वानर व ऋक्ष बरोबर घेऊन ककुत्स्थकुलोत्पन्न राम सत्वर इकडे येईल आणि युद्धामध्ये राक्षसांना जिंकून तुझा शोक नाहींसा करील." (१४-२१)

याप्रमाणें सीतेला धीर देऊन व परत जाण्याचें मनांत ठरवून वायुपुत्र हनुमानानें तिला अभिवंदन केलें. अशा रीतीनें लंकेतील श्रेष्ठ श्रेष्ठ राक्षसांचा वध करून, आपलें नांव गाजवून, सीतेला आश्वासन देऊन, आपलें उत्तम सामर्थ्य प्रगट करून, लंकानगरीची दाणादाण उडवून देऊन, रावणाला फसवून, भयंकर बल प्रगट करून आणि सीतेला अभिवंदन करून हनुमानानें पुन: समुद्राचें उल्लंघन

आरुरोह गिरिश्रेष्ठमरिष्टमरिमर्दनः ।
तुङ्गपद्मकजुष्टाभिर्नीलाभिर्वनराजिभिः २६
सोत्तरीयमिवाम्भोदैः शृङ्गान्तरविलम्बिभिः ।
बोध्यमानमिव प्रीत्या दिवाकरकरैः शुभैः २७
उन्मिषन्तमिवोद्धूतैर्लोचनैरिव धातुभिः ।
तोयौघनिःस्वनैर्मन्द्रैः प्राधीतमिव सर्वतः २८
प्रगीतमिव विस्पष्टं नानाप्रस्रवणस्वनैः ।
देवदारुभिरुद्धूतैरूर्ध्वबाहुमिव स्थितम् २९
प्रपातजलनिर्घोषैः प्राक्रुष्टमिव सर्वतः ।
वेपमानमिव श्यामैः कम्पमानैः शरद्घनैः ३०
वेणुभिर्मारुतोद्धूतैः कूजन्तमिव कीचकैः ।

---

परून परत जाण्याचें मनामध्ये आणलें. सीतेला अभिवंदन केल्यानंतर स्वामिदर्शनाविषयी उत्सुक झालेला तो शत्रुनाशक वानरश्रेष्ठ हनुमान् अरिष्टनामक उंच पर्वतावर जाऊन बसला. उंच उंच पद्मकवृक्ष असलेल्या नीलवर्ण वनपंक्ति त्याच्यावर असल्यामुळे त्यानें नीलवस्त्र नेसलें आहे कीं काय, असें दिसत होतें. शिखरावरून लोंबणाऱ्या मेघामुळें तो जणु कांहीं उत्तरीय वस्त्रच परिधान केल्यासारखा दिसत होता. सूर्याचीं सुखदायी किरणें प्रेमानें त्याला जागेंच करीत आहेत कीं काय, असें दिसत होतें. इकडेतिकडे उडालेल्या धातू पाहून तो जसा कांहीं डोळेच उघडीत आहे, असें दिसत होतें. जलप्रवाहाचे गंभीर स्वराच्या योगानें त्याच्यावर जसें कांहीं चोहोंकडे वेदाध्ययनच चाललें आहे, असा भास होत होता. ( २२-२८ )

खुळखुळ वाहणाऱ्या अनेक जलप्रवाहांचे स्वर ऐकून, त्याच्यावर स्पष्टपणें गायनच चाललें आहे, असें भासत होतें, उंच उंच देवदारुवृक्षामुळें तो पर्वत हात वर करूनच उभा राहिल्यासारखा दिसत होता. तेथें चाललेल्या धबधब्याच्या ध्वनीमुळें, त्या प्रदेशावर सर्व बाजूंनी आरडाओरडा चालल्याचा भास होत होता. शरदृतूंतील श्यामवर्णाचे वृक्ष हालत असल्यामुळें, तो पर्वत जणु काय कंपित होणारसा दिसत होता, आत वारा भरलेल्या कीचक नावाच्या कळकामुळें

निःश्वसन्तमिवामर्षाद्घोरैराशीविषोत्तमैः ३१
नीहारकृतगम्भीरैर्ध्यायन्तमिव गह्वरैः ।
मेघपादनिभैः पादैः प्रक्रान्तमिव सर्वतः ३२
जृम्भमाणमिवाकाशे शिखरैरभ्रमालिभिः ।
कूटैश्च बहुधाकीर्णं शोभितं बहुकन्दरैः ३३
सालतालैश्च कर्णैश्च वंशैश्च बहुभिर्वृतम् ।
लतावितानैर्विततैः पुष्पवद्भिरलंकृतम् ३४
नानामृगगणैः कीर्णं धातुनिष्पन्दभूषितम् ।
बहुप्रस्रवणोपेतं शिलासंचयसङ्कटम् ३५
महर्षियक्षगन्धर्वकिंनरोरगसेवितम् ।
लतापादपसंबाधं सिंहाधिष्ठितकन्दरम् ३६
व्याघ्रादिभिः समाकीर्णं स्वादुमूलफलद्रुमम् ।

तो अल्गुजेंच वाजवीत बसल्यासारखा दिसत होता, मोठ्या मोठ्या घोर सर्पांच्या योगाने तो सुस्कारे टाकीत असल्याचा भास होत होता, दंव पडल्यामुळे गंभीर झालेल्या दऱ्या पाहून तो ध्यानस्थ बसल्यासारखा दिसत होता मेघाच्या पाया-प्रमाणे असलेल्या भोंवतालच्या लहानलहान टेकड्या या जशा काही त्याच्यावरून चालून जाण्यासच प्रवृत्त झाल्या आहेत, असें दिसत होतें, मेघपटलानी युक्त असलेल्या शिखराच्या योगाने तो पर्वत आकाशामध्ये जाभयाच देत असल्या सारखा दिसत होता, शिखरामुळे तो नाना प्रकारानी गजबजलेला होता अनेक दऱ्यानी त्याला शोभा आलेली होती. साल, ताल, कर्ण आणि वंश या असंख्य वृक्षानी तो गच्च भरून गेलेला होता, त्याचेवर पसरलेल्या पुष्पयुक्त लतांमुळे तो घर चादवे पसरून शृंगारल्यासारखा दिसत होता ( २९–३४ )

नानाप्रकारच्या मृगगणानी तो गजबजून गेलेला होता, धातूंच्या स्रावानी तो भूषित झालेला होता, अनेक जलप्रवाह त्याच्यावरून वहात होते, दगडाच्या राशींची त्याच्यावर अगदी खेचाखेच झालेली होती, महर्षि, यक्ष, गंधर्व, किंनर आणि उरग यानी त्याचा आश्रय घेतलेला होता; लता व वृक्ष याची त्यावर गर्दी उडालेली होती, सिंह त्याच्या गुहांचा आश्रय घेऊन रहात होते, व्याघ्र

आरुरोहानिलसुतः पर्वतं प्लवगोत्तमः ३७
रामदर्शनशीघ्रेण प्रहर्षेणाभिचोदितः ।
तेन पादतलक्रान्ता रम्येषु गिरिसानुषु ३८
सघोषाः समशीर्यन्त शिलाश्चूर्णीकृतास्ततः ।
स तमारुह्य शैलेन्द्रं व्यवर्धत महाकपिः ३९
दक्षिणादुत्तरं पारं प्रार्थयँल्लवणाम्भसः ।
अधिरुह्य ततो वीरः पर्वतं पवनात्मजः ४०
ददर्श सागरं भीमं भीमोरगनिषेवितम् ।
स मारुत इवाकाशं मारुतस्यात्मसंभवः ४१
प्रपेदे हरिशार्दूलो दक्षिणादुत्तरां दिशम् ।
स तदा पीडितस्तेन कपिना पर्वतोत्तमः ४२
ररास विविधैर्भूतैः प्राविशद्वसुधातलम् ।
कम्पमानैश्च शिखरैः पतद्भिरपि च द्रुमैः ४३

---

श्वापदांनी तो भरलेला होता आणि मधुर मुळें व फळें असलेले वृक्ष त्यावर होते अशा प्रकारच्या त्या अरिष्ट पर्वतावर तो वायुपुत्र वानरश्रेष्ठ हनुमान् जाऊन बसला, कारण रामदर्शन होणार, म्हणून त्याला अतिशय हर्ष झाला असून, त्यामुळें त्याला जास्तीच उत्साह आला होता तो हनुमान् पर्वतावर चालू लागला, तेव्हा त्या पर्वताच्या रमणीय शिखरावरील ज्या ज्या शिलांवर त्याचे पाय पडले, त्या त्या शिलांचा मोठा आवाज होऊन त्या अगदी पीठ होईपर्यंत फुटून गेल्या याप्रमाणे त्या पर्वतराजावर आरूढ झाल्यानंतर महाकपि हनुमानानें आपलें शरीर जास्तच फुगवलें समुद्राच्या दक्षिण तीरापासून निघून उत्तर तीराला येण्याच्या उद्देशाने तो वायुपुत्र वीर पर्वतावर आरूढ झाला, तेव्हा भयंकर सर्पांचें आश्रयस्थान असलेला प्रचंड सागर त्याच्या दृष्टीस पडला नंतर आकाशामध्ये शिरणाऱ्या वायुप्रमाणे तो वायुपुत्र वानरश्रेष्ठ हनुमान दक्षिण दिशेपासून निघून उत्तर दिशेस गेला याप्रमाणे त्या वानराने त्या श्रेष्ठ पर्वताला चिरडलें असताना तेथल्या नाना प्रकारच्या प्राण्यांच्या द्वारें तो आक्रोश करू लागला आणि भूतलामध्ये जाऊनच घुसू लागला, त्याचप्रमाणे त्याचें

तस्योरुवेगोन्मथिताः पादपाः पुष्पशालिनः ।
निपेतुर्भूतले भग्नाः शक्रायुधहता इव ४४
कन्दरोदरसंस्थानां पीडितानां महौजसाम् ।
सिंहानां निनदो भीमो नभो भिन्दन्हि शुश्रुवे ४५
स्रस्तव्याविद्धवसना व्याकुलीकृतभूषणाः ।
विद्याधर्यः समुत्पेतुः सहसा धरणीधरात् ४६
अतिप्रमाणा बलिनो दीप्तजिह्वा महाविषाः ।
निपीडितशिरोग्रीवा व्यवेष्टन्त महाहयः ४७
किंनरोरगगन्धर्वयक्षविद्याधरास्तथा ।
पीडितं तं नगवरं त्यक्त्वा गगनमास्थिताः ४८
स च भूमिधरः श्रीमान्बलिना तेन पीडितः ।
सवृक्षशिखरोदग्रः प्रविवेश रसातलम् ४९
दशयोजनविस्तारस्त्रिंशद्योजनमुच्छ्रितः ।
धरण्यां समतां यातः स बभूव धराधरः ५०

शिखरें कापूं लागलीं आणि वृक्ष कोसळून पडूं लागले ( ३५—४३ )

त्या हनुमानाच्या मांड्यांच्या धक्क्यानें उपटले गेलेले प्रफुल्लित वृक्ष इंद्राच्या वज्राचा तडाखा बसल्यासारखे कडाकड मोडून भूमीवर पडले दर्‍यांतून राहिले ल्या महाबलाढ्य सिंहांना त्रास होऊं लागल्यामुळे त्यांची आकाश दुमदुमून सोडणारी भयंकर गर्जना कानीं येऊं लागली. मन त्रस्त झाल्यामुळे ज्यांचीं वस्त्रें अस्ताव्यस्त होऊन अंगावरील भूषणांचाही गोंधळ उडून गेलेला आहे, अशा विद्याधरस्त्रिया एकाएकीं पर्वतावरून खालीं पडल्या ( ४४—४६ )

शरीरानें फारच मोठे, बलाढ्य व प्रदीप्त जिह्वा आणि जालीम विष असलेले प्रचंड सर्प मस्तक व मान चेपल्यामुळें वेटोळीं घालूं लागले. किंनर, उरग, गंधर्व, यक्ष आणि विद्याधर हे चुरडून गेलेला तो श्रेष्ठ पर्वत सोडून आकाशांत निघून गेले आणि वृक्ष व शिखरें यांनीं उन्नत असलेला तो भव्य पर्वत त्या बलाढ्य वानरामुळे चेपला जाऊन खालीं खोल रसातळाला गेला. सारांश, चाळीस कोस रुंद, एकशेवीस कोस उंच असलेला तो पर्वत जमीनदोस्त होऊन गेला

स लिलङ्घयिषुर्भीमं सलिलं लवणार्णवम्।
कल्लोलास्फालवेलान्तमुत्पपात नभो हरिः ५१

इत्यार्षे श्रीम० वाल्मी० आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षट्पञ्चाशः सर्गः ॥५६॥ [२३२०]

सप्तपञ्चाशः सर्गः।

आप्लुत्य च महावेगः पक्षवानिव पर्वतः।
भुजङ्गयक्षगन्धर्वप्रबुद्धकमलोत्पलम् १
सचन्द्रकुमुदं रम्यं सार्ककारण्डवं शुभम्।
तिष्यश्रवणकादम्बमभ्रशैवलशाद्वलम् २
पुनर्वसुमहामीनं लोहिताङ्गमहाग्रहम्।
ऐरावतमहाद्वीपं स्वातीहंसविलासितम् ३
वातसंघातजालोर्मिचन्द्रांशुशिशिराम्बुमत्।
हनूमानपरिश्रान्तः पुप्लुवे गगनार्णवम् ४

---

आणि नंतर ज्याच्या लाटा तीरावर तडाके मारीत आहेत, अशा तो भयंकर सागर उल्लंघून जाण्याकरिता त्या वानराने आकाशामध्ये उड्डाण केलें (४४-५१)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडापैकी छप्पनावा सर्ग समाप्त झाला. ॥ ५६ ॥

पंख असलेल्या पर्वताप्रमाणे असलेल्या त्या महावेगवान् हनुमानाने उड्डाण करून आकाशरूपी समुद्रामध्ये पोहण्यास आरंभ केला. त्या सागरातील भुजंग, यक्ष आणि गंधर्व हीं उमललेलीं कमलें होतीं, तो आकाशरूपी शुभ्र सागर चंद्ररूपी श्वेत कमलें आणि सूर्यरूपी कारंडवपक्षी यानी युक्त असल्यामुळे रमणीय दिसत होता. पुष्य आणि श्रवण नावाचीं नक्षत्रें हींच त्याच्यातील बदकें होतीं, मेघ हेंच त्यातील शेवाळें व हिरवें गवत होतें, पुनर्वसु–नक्षत्राचे तारे हे त्यातील मोठे मत्स्य होते व मंगळ हाच त्यातील मोठा नक्र होता, ऐरावत हाच त्याच्यातील महागज होता; स्वाती नक्षत्ररूपी हंसाचा तेथे विलास चाललेला होता. त्यातील वावटळींचे समुदाय या लाटा होत्या आणि चंद्रकिरणें हेंच त्यातील उदक होतें. अशा प्रकारच्या आकाशरूपी सागरामध्ये हनुमान् दम न घेता एकसारखा पोहूं लागला (१-४)

भ्रममाण इवाकाशं ताराधिपमिवोल्लिखन् ।
हरन्निव सनक्षत्रं गगनं सार्कमण्डलम् ५
अपारमपरिश्रान्तश्चाम्बुधिं समगाहत ।
हनूमान्मेघजालानि विकर्षन्निव गच्छति ६
पाण्डुरारुणवर्णानि नीलमाञ्जिष्ठकानि च ।
हरितारुणवर्णानि महाभ्राणि चकाशिरे ७
प्रविशन्नभ्रजालानि निष्क्रमंश्च पुनःपुनः ।
प्रकाशश्चाप्रकाशश्च चन्द्रमा इव दृश्यते ८
विविधाभ्रघनापन्नगोचरो धवलाम्बरः ।
दृश्यादृश्यतनुर्वीरस्तथा चन्द्रायतेऽम्बरे ९
तार्क्ष्यायमाणो गगने स बभौ वायुनन्दनः १०
दारयन्मेघबृन्दानि निष्पतंश्च पुनःपुनः ।
मदन्नादेन महता मेघस्वनमहास्वनः ११

आकाश गिळून टाकीत आहे की काय, ताराधिपति चंद्राला नखानी ओरबडीतच आहे की काय आणि सूर्यमंडळ व नक्षत्रें या सर्वांसुद्धा आकाश हरणच करीत आहे की काय, असें भासवणारा तो हनुमान न दमता त्या अपार समुद्राचें उल्लंघन करूं लागला. तो हनुमान्, मेघपटलाना ओढीतच की काय, जाऊं लागला असता, पांढरे, तांबूस, निळे, लाल, हिरवे आणि अरुण वर्णाचे मोठे मोठे मेघ त्याच्या मागोमाग ओढले जात आहेत, असें दिसूं लागलें. उड्डाण करीत पुढे चालला, तेव्हा वारंवार अभ्रपटलामध्ये प्रवेश करीत असलेला व त्यातून बाहेर पडत असलेला तो हनुमान प्रकाशयुक्त व प्रकाशरहित होणाऱ्या चंद्राप्रमाणे दिसूं लागला. नाना प्रकारच्या मेघावलींतून जात असल्यामुळे आणि त्या वीर हनुमानाने शुभ्र वस्त्र परिधान केलें असल्यामुळे, वारंवार दृश्य व अदृश्य होत असलेला तो वीर आकाशामध्ये चंद्रासारखा दिसूं लागला. तो वायुपुत्र हनुमान् आकाशामध्ये गरुडासारखा भासूं लागला. मेघसमुदाय वरंवार भेदून टाकणारा आणि पुनरपि त्यातून बाहेर पडत असलेला व मेघाप्रमाणे गंभीर स्वर असलेला हनुमान् उच्च स्वराने गर्जना करीत करीत चालला. ( ५–११ )

प्रवराग्रक्षसान्हत्वा नाम विश्राव्य चात्मनः ।
आकुलां नगरीं कृत्वा व्यथयित्वा च रावणम् १२
अर्दयित्वा महावीरान्वैदेहीमभिवाद्य च ।
आजगाम महातेजाः पुनर्मध्येन सागरम् १३
पर्वतेन्द्रं सुनाभं च समुपस्पृश्य वीर्यवान् ।
ज्यामुक्त इव नाराचो महावेगोऽभ्युपागमत् १४
स किंचिदारात्संप्राप्तः समालोक्य महागिरिम् ।
महेन्द्रमेघसंकाशो ननाद स महाकपिः १५
स पूरयामास कपिर्दिशो दश समन्ततः ।
नदन्नादेन महता मेघस्वनमहास्वनः १६
स तं देशमनुप्राप्तः सुहृद्दर्शनलालसः ।
ननाद सुमहानादं लाङ्गूलं चाप्यकम्पयत् १७
तस्य नानद्यमानस्य सुपर्णाचरिते पथि ।
फलतीवास्य घोषेण गगनं सार्कमण्डलम् १८

---

अशा रीतीने लंकेतील बलाढ्य राक्षसांचा वध करून, आपलें नाव गाजवून, त्या नगरीत सर्वांची दाणादाण उडवून देऊन, रावणाला भीति उत्पन्न करून, मोठ्या वीर योद्ध्यांना पीडा देऊन आणि सीतेला अभिवंदन करून, तो महातेजस्वी हनुमान् परत सागराच्या मध्यभागी आला. नंतर त्या पर्वतराज वसुनाभ मैनाकाला स्पर्श करून, तो वीर्यवान् व महावेगवान हनुमान् धनुष्याचे दोरीपासून सुटलेल्या नाराच बाणाप्रमाणे वेगाने पुढे चालता झाला. त्या इंद्रमेघतुल्य महाकपीने प्रथमतः थोडा जवळ आल्यावर, त्या महापर्वताला पाहून मोठी गर्जना केली व उच्च स्वराने गर्जना करता करता मेघतुल्य गंभीर स्वर असलेल्या हनुमानाने आपल्या भोवतालच्या दशदिशा दणाणून टाकल्या ( १२-१६ )

याप्रमाणे सुहृदांचें दर्शन घेण्याविषयी उत्सुक झालेला तो हनुमान्, त्या प्रदेशावर येताक्षणी उच्च स्वराने गर्जना करून आपलें पुच्छ हालवूं लागला. अशा रीतीने गरुडाने स्वीकारलेल्या आकाशमार्गाने जात असतां तो गर्जना करूं लागला व त्याच्या गर्जनेने सूर्यमंडलासुद्धां सर्व आकाश विदीर्णच होत आहे

ये तु तत्रोत्तरे कूले समुद्रस्य महाबलाः ।
पूर्वं संविष्ठिताः शूरा वायुपुत्रदिदृक्षवः १९
महतो वायुनुन्नस्य तोयदस्येव निःस्वनम् ।
शुश्रुवुस्ते तदा घोषमूरुवेगं हनूमतः २०
ते दीनमनसः सर्वे शुश्रुवुः काननौकसः ।
वानरेन्द्रस्य निर्घोषं पर्जन्यनिनदोपमम् २१
निशम्य नदतो नादं वानरास्ते समन्ततः ।
बभूवुरुत्सुकाः सर्वे सुहृद्दर्शनकाङ्क्षिणः २२
जाम्बवान्स हरिश्रेष्ठः प्रीतिसंहृष्टमानसः ।
उपामन्त्र्य हरीन्सर्वानिदं वचनमब्रवीत् २३
सर्वथा कृतकार्योऽसौ हनूमान्नात्र संशयः ।
न ह्यस्याकृतकार्यस्य नाद एवंविधो भवेत् २४
तस्य बाहूरुवेगं च निनादं च महात्मनः ।
निशम्य हरयो हृष्टाः समुत्पेतुर्यतस्ततः २५
ते नगाग्रान्नगाग्राणि शिखराच्छिखराणि च ।

की काय, असा भास होऊ लागला. पूर्वी जे महाबलाढ्य व शूर वानर वायुपुत्राची मार्गप्रतीक्षा करीत समुद्राच्या उत्तरतीरावर बसले होते, त्या ठिकाणी त्यांना वायूसह होणाऱ्या महामेघाच्या गर्जनेप्रमाणे प्रचंड वेगाचा हनुमानाचा सिंहनाद ऐकू गेला. प्रथमतः सर्वही निराश होऊन बसलेले ते वानर गर्जना करणाऱ्या वानराधिपति हनुमानाचा मेघासारखा गंभीर सिंहनाद ऐकताच आपल्या बांधवाला भेटण्यास सर्व जण सर्वतोपरी उत्सुक झाले आणि ज्याच्या मनाला अतिशय हर्ष झालेला आहे, असा तो वानरश्रेष्ठ जाम्बवान् सर्व वानरांना हाक मारून म्हणाला–( १७–२३ )

" हा हनुमान् सर्वस्वी कार्य सिद्ध करून आला आहे, यात संशय नाही कारण, कार्यसिद्धि झाल्याशिवाय अशा प्रकारचा सिंहनाद त्याच्याकडून होण्याचा संभव नाही " जाम्बवानाने हें सांगितल्यानंतर त्या महात्म्या हनुमानाच्या हात पायाचा वेग व सिंहनाद लक्ष्यात आणून ते वानर आनंदित होऊन इकडे तिकडे

प्रहृष्टाः समपद्यन्त हनूमन्तं दिदृक्षवः २६
ते प्रीताः पादपाग्रेषु गृह्य शाखामवस्थिताः ।
वासांसि च प्रकाशानि समाविध्यन्त वानराः २७
गिरिगह्वरसंलीनो यथा गर्जति मारुतः ।
एवं जगर्ज बलवान्हनूमान्मारुतात्मजः २८
तमभ्रघनसंकाशमापतन्तं महाकपिम् ।
दृष्ट्वा ते वानराः सर्वे तस्थुः प्राञ्जलयस्तदा २९
ततस्तु वेगवान्वीरो गिरेर्गिरिनिभः कपिः ।
निपपात गिरेस्तस्य शिखरे पादपाकुले ३०
हर्षेणापूर्यमाणोऽसौ रम्ये पर्वतनिर्झरे ।
छिन्नपक्ष इवाकाशात्पपात धरणीधरः ३१
ततस्ते प्रीतमनसः सर्वे वानरपुङ्गवाः ।
हनूमन्तं महात्मानं परिवार्योपतस्थिरे ३२
परिवार्य च ते सर्वे परां प्रीतिमुपागताः ।

उड्या मारूं लागले हनुमानाला पाहण्याकरिता उत्सुक झालेले ते वानर आनंदाने या वृक्षाचे शेंड्यावरून त्या वृक्षाचे शेंड्यावर आणि या पर्वतशिखरावरून दुसऱ्या पर्वतशिखरावर उड्या मारू लागले. नंतर आनंदित होऊन वृक्षाचे शेंड्यावरील शाखा धरून राहिलेले ते वानर आपली भडक वस्त्रें हालवू लागले (२४-२७)

इतक्यात पर्वताच्या गुहेमध्ये लीन होऊन फिरणारा वायु ज्याप्रमाणे गर्जना करतो, त्याप्रमाणे वायुपुत्र बलाढ्य हनुमान गर्जना करू लागला आणि अतिशय उच्च असलेल्या व मेघपटलाप्रमाणे श्वेत असलेल्या त्या महाकपीला पाहून, ते सर्व वानर हात जोडून उभे राहिले. इतक्यात अरिष्ट पर्वतापासून निघालेला तो पर्वतप्राय, वेगवान्, वीर हनुमान वानर त्या वृक्षांनी गजबजलेल्या महेंद्रपर्वताच्या शिखरावर येऊन धडकला. सारांश, हर्षाने चित्त उचंबळत असलेला तो हनुमान् जलप्रवाहांनी युक्त अशा रम्य पर्वतशिखरावर पक्ष तुटलेल्या पर्वताप्रमाणे अंतराळातून पडला. तेव्हां मनामध्ये प्रसन्न झालेले ते सर्वही वानरश्रेष्ठ महात्म्या हनुमानाभोंवतीं गराडा देऊन उभे राहिले. (२८-३२)

प्रहृष्टवदनाः सर्वे तमागतमुपागमन् ३३
उपायनानि चादाय मूलानि च फलानि च।
प्रत्यर्चयन्हरिश्रेष्ठं हरयो मारुतात्मजम् ३४
विनेदुर्मुदिताः केचित्केचित्किलकिलां तथा।
हृष्टाः पादपशाखाश्च आनिन्युर्वानरर्षभाः ३५
हनूमांस्तु गुरून्वृद्धाञ्जाम्बवत्प्रमुखांस्तदा।
कुमारमङ्गदं चैव सोऽवन्दत महाकपिः ३६
स ताभ्यां पूजितः पूज्यः कपिभिश्च प्रसादितः।
दृष्टा देवीति विक्रान्तः संक्षेपेण न्यवेदयत् ३७
निषसाद च हस्तेन गृहीत्वा वालिनः सुतम्।
रमणीये वनोद्देशे महेन्द्रस्य गिरेस्तदा ३८
हनूमानब्रवीत्पृष्टस्तदा तान्वानरर्षभान्।
अशोकवनिकासंस्था दृष्टा सा जनकात्मजा ३९
रक्ष्यमाणा सुघोराभी राक्षसीभिरनिन्दिता।

---

तात्पर्य, तो हनुमान तेथे आला तेव्हा त्याच्याभोवती अत्यंत आनंदित झालेले ते सर्वही वानर जमले आणि हर्षित मुद्रेने अगदी त्याच्याजवळ येऊं लागले. नंतर नजराण्यादाखल मुळें व फळे आणून वायुपुत्र वानरश्रेष्ठ हनुमानाचा त्या वानरांनी आदरसत्कार केला. काही जण आनंदित झाले, काही किलकिल शब्द करूं लागले आणि आनंदित झालेले काही वानरश्रेष्ठ वृक्षाच्या शाखा घेऊन त्याच्याकडे आले नंतर त्या महाकपि हनुमानाने जांबवान्वगैरे वृद्ध व गुरुतुल्य वानरांना आणि राजकुमार अंगदाला वंदन केलें व त्या उभयतांनी त्या पूज्य वानराचा सत्कार केल्यावर आणि इतर वानरांनीही त्याला प्रसन्न केल्यावर त्या पराक्रमी हनुमानाने "देवी दृष्टीस पडली," एवढें थोडक्यांतच सांगून टाकिलें नंतर वालिपुत्र अंगदाचा हात धरून तो हनुमान् महेंद्रपर्वताच्या वनप्रदेशावर बसला. ( ३३–३८ )

नंतर वानरांनी प्रश्न केल्यावर तो त्या वानरश्रेष्ठांना म्हणाला, " ती जनककन्या सीता अशोकवनामध्ये बसलेली अशी माझ्या दृष्टीस पडली. त्या निर्दोष

एकवेणीधरा बाला रामदर्शनलालसा ४०
उपवासपरिश्रान्ता मलिना जटिला कृशा ।
ततो दृष्टेति वचनं महार्थममृतोपमम् ४१
निशम्य मारुतेः सर्वे मुदिता वानराभवन् ।
क्ष्वेडन्त्यन्ये नदन्त्यन्ये गर्जन्त्यन्ये महाबलाः ४२
चक्रुः किलकिलामन्ये प्रतिगर्जन्ति चापरे ।
केचिदुच्छ्रितलाङ्गूलाः प्रहृष्टाः कपिकुञ्जराः ४३
आयताञ्चितदीर्घाणि लाङ्गूलानि प्रविव्यधुः ।
अपरे तु हनूमन्तं श्रीमन्तं वानरोत्तमम् ४४
आप्लुत्य गिरिशृङ्गेषु संस्पृशन्ति स्म हर्षिताः ।
उक्तवाक्यं हनूमन्तमङ्गदस्तु तदाब्रवीत् ४५
सर्वेषां हरिवीराणां मध्ये वाचमनुत्तमाम् ।
सत्त्वे वीर्ये न ते कश्चित्समो वानर विद्यते ४६

सीतेच्या बंदोबस्ताला अतिभयंकर राक्षसी आहेत तिची नुसती एक वेणी आहे आणि ती बाला रामदर्शनाकरिता उत्सुक झालेली आहे उपवास करून करून ती अगदी थकली आहे, मलिन झालेली आहे आणि ती जटिल सीता कृश झालेली आहे " परंतु " दृष्टीस पडली " हे महत्त्वाच्या अर्थाचे अमृततुल्य शब्द मारुतीच्या मुखातून ऐकताच सर्वही वानर आनंदित झाले काही जण क्रीडा करू लागले, काही सामान्य शब्द करू लागले, काही महाबलाढ्य वानर गर्जना करू लागले, काही जण किलकिल शब्द करू लागले, काही जण इतरांनी गर्जना केल्यावर, आपण त्याच्यावर ताण करण्याकरिता त्याहून मोठी गर्जना करू लागले आणि आनंदित व म्हणूनच पुच्छ वर उभारून काही वानरश्रेष्ठ रोमांचयुक्त अशी आपली स्थूल व दीर्घ पुच्छें हलवू लागले, व काही वानर त्या उदार वानरश्रेष्ठ हनुमानाला पर्वतशिखरावर उड्डाण करून आनंदाने स्पर्श करू लागले हें हनुमानाचें भाषण झाल्यानंतर, सर्व वानरवीरामध्ये श्रेष्ठ असलेला अंगद अनुपम वाणीने त्याला म्हणाला " हे वानरा, धैर्य आणि पराक्रम यामध्ये तुझी बरोबरी करणारा कोणही नाही, कारण एक

यदवप्लुत्य विस्तीर्णं सागरं पुनरागतः ।
जीवितस्य प्रदाता नस्त्वमेको वानरोत्तम ४७
त्वत्प्रसादात्समेष्यामः सिद्धार्था राघवेण ह ।
अहो स्वामिनि ते भक्तिरहो वीर्यमहो धृतिः ४८
दिष्ट्या दृष्टा त्वया देवी रामपत्नी यशस्विनी ।
दिष्ट्या त्यक्ष्यति काकुत्स्थः शोकं सीतावियोगजम् ४९
ततोऽङ्गदं हनूमन्तं जाम्बवन्तं च वानराः ।
परिवार्य प्रमुदिता भेजिरे विपुलाः शिलाः ५०
उपविष्टा गिरेस्तस्य शिलासु विपुलासु ते ।
श्रोतुकामाः समुद्रस्य लङ्घनं वानरोत्तमाः ५१
दर्शनं चापि लङ्कायाः सीतायां रावणस्य च ।
तस्थुः प्राञ्जलयः सर्वे हनुमद्वदनोन्मुखाः ५२
तस्थौ तत्राङ्गदः श्रीमान्वानरैर्बहुभिर्वृतः ।
उपास्यमानो विबुधैर्दिवि देवपतिर्यथा ५३

---

उड्डाणाबरोबर एवढा विस्तीर्ण सागर उल्लंघन करून पुन परत आलास आणि म्हणूनच हे वानरश्रेष्ठा, आम्हाला जीवदान देणारा असा, तूच एक आहेस तुझ्या कृपेमुळे आमचे मनोरथ परिपूर्ण झाले असल्यामुळे रघुवंशज रामाला आता आम्ही भेटूं काय रे ही तुझी स्वामिभक्ति ! काय हें तेज ! आणि काय हें धैर्य ! यशस्विनी रामपत्नी सीतादेवी तुझ्या दृष्टीस पडली, ही फार उत्तम गोष्ट झाली आता सुदैवाने ककुत्स्थकुलोत्पन्न राम सीतेच्या वियोगामुळे झालेल्या दु खाचा त्याग करील ” ( ३९-४९ )

नतर आनदित झालेले वानर, अगद, हनुमान् व जांबवान् यांना गराडा देऊन तेथील मोठ्या मोठ्या शिळावर बसले तात्पर्य, समुद्राचें उल्लंघन हनुमानाने कसें केलें आणि लका, सीता व रावण हीं त्याच्या कशी दृष्टीं पडलीं, हें ऐकण्याकरिता त्या महेंद्रपर्वताच्या विस्तीर्ण शिळावर, हनुमानाच्या मुखाकडे पहात पहात, ते सर्वही वानर हात जोडून बसले. नाना प्रकारचे देव ज्याच्या शुश्रूषेंत तत्पर आहेत, असा देवराज इंद्र ज्याप्रमाणे स्वर्गामध्ये वसतो, त्याप्रमाणे अनेक वा-

हनूमता कीर्तिमता यशस्विना तथाङ्गदेनाङ्गदनद्धबाहुना ।
मुदा तदाध्यासितमुन्नतं महन्महीधराग्रं ज्वलितं श्रियाभवत् ५४

इत्यार्षे श्रीमद्वा० वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे सप्तपञ्चाश. सर्ग. ॥ ५७ ॥

अष्टपञ्चाश सर्ग । [२३७४]

ततस्तस्य गिरेः शृङ्गे महेन्द्रस्य महाबलाः ।
हनुमत्प्रमुखाः प्रीतिं हरयो जग्मुरुत्तमाम् १
प्रीतिमत्सूपविष्टेषु वानरेषु महात्मसु ।
तं ततः प्रतिसंहृष्टः प्रीतियुक्तं महाकपिम् २
जाम्बवान्कार्यवृत्तान्तमपृच्छदनिलात्मजम् ।
कथं दृष्टा त्वया देवी कथं वा तत्र वर्तते ३
तस्यां चापि कथं वृत्तः क्रूरकर्मा दशाननः ।
तत्त्वतः सर्वमेतन्नः प्रब्रूहि त्वं महाकपे ४
संमार्गिता कथं देवी किं च सा प्रत्यभाषत ।
श्रुतार्थाश्चिन्तयिष्यामो भूयः कार्यविनिश्चयम् ५

---

रानी परिवेष्टित असलेला श्रीमान् अगद तेथे बसला आणि याप्रमाणे कीर्तिमान् हनुमान् व दत्तरूप बाहुभूषणें हातामध्ये घातलेला यशस्वी अंगद हे आनंदाने त्या पर्वताच्या शिखरावर बसले, तेव्हा तें अत्युच्च पर्वतशिखर त्यांच्या कातीन तेजस्वी दिसू लागलें (५०–५४)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणरूपक आदिकाव्यांतील सुदर-कांडांतील सत्तावन्न वा सर्ग समाप्त झाला ॥ ५७ ॥

नंतर त्या महेंद्रपर्वताच्या शिखरावर एकत्र जुळलेले ते हनुमान् वगैरे महा-बलाढ्य वानर अत्यंत आनंदित झाले याप्रमाणे ते महात्म वानर आनंदाने तेथे बसले असता, हर्षित झालेला जांबवान् त्या महाकपि वायुपुत्र हनुमानाला हाती घेतलेल्या कार्याविषयींचा वृत्तांत विचारू लागला तो म्हणाला, “हे हनुमाना, सीतादेवी तुझ्या कशी दृष्टीस पडली? ती तेथ कशी काय आहे? आणि तिच्याशी तो क्रूरकर्मा रावण कसा वागत आहे? ही सर्व माहिती, हे महाकपे, तू आम्हाला खरी खरी सांग व देवी सीतेचा तू शोध कसा लाविलास? आणि ती तुला काय

यथार्थस्तत्र वक्तव्यो गतैरस्माभिरात्मवान् ।
रक्षितव्यं च यत्तत्र तद्भवान्व्याकरोतु नः ६
स नियुक्तस्ततस्तेन संप्रहृष्टतनूरुहः ।
नमस्यञ्शिरसा देव्यै सीतायै प्रत्यभाषत ७
प्रत्यक्षमेव भवतां महेन्द्राग्रात्खमाप्लुतः ।
उदधेर्दक्षिणं पारं काङ्क्षमाणः समाहितः ८
गच्छतश्च हि मे घोरं विघ्नरूपमिवाभवत् ।
काञ्चनं शिखरं दिव्यं पश्यामि सुमनोहरम् ९
स्थितं पन्थानमावृत्य मेने विघ्नं च तं नगम् ।
उपसंगम्य तं दिव्यं काञ्चनं नगमुत्तमम् १०
कृता मे मनसा बुद्धिर्भेत्तव्योऽयं मयेति च ।
प्रहतस्य मया तस्य लाङ्गूलेन महागिरेः ११
शिखरं सूर्यसंकाशं व्यशीर्यत सहस्रधा ।

---

म्हणाली " हेंही तू आम्हाला सांग म्हणजे खरा काय वृत्तांत आहे, तो आम्हाला समजला म्हणजे पुढे काय करावयाचें, याचा निश्चय करता येईल. शिवाय, तेथे गेल्यावर स्वत संबधाने आम्ही रामाला काय सांगावयाचें आणि काय गुप्त ठेवावयाचें, हेंही तू आम्हाला स्पष्ट सांग " ( १–६ )

याप्रमाणे जाबवनाने विचारिलें असतां, हर्षाने ज्याच्या अंगावर रोमांच उठले आहेत असा तो हनुमान्, सीतादेवीला मस्तकाने प्रणाम करून, त्या वानरांना म्हणाला, " सागराच्या दक्षिण तीरास जाण्याचा उद्देश मनात धरून मी स्वस्थ चित्ताने तुमच्या समक्षच महेंद्रपर्वताच्या शिखरावरून उड्डाण केलें जाता जाता प्रथमत मला एक घोर विघ्नच आल्यासारखें वाटलें, कारण एक सुवर्णाचें मनोहर दिव्य शिखर माझ्या दृष्टीं पडलें, ( ७–९ )

तेव्हा मधल्या मार्गं आडवून राहिलेला तो पर्वत एक विघ्नच आहे, असें मला वाटलें नंतर त्या उत्कृष्ट व दिव्य सुवर्णपर्वत समीप गेल्यावर तो फोडून टाकावा, असा मी मनामध्ये निश्चय केला आणि एक पुच्छाचा तडाखाही त्याला दिला तेव्हा त्या महापर्वताच्या एका सूर्यासारख्या तेजस्वी शिखराचे हजारो तुकडे

व्यवसायं च तं बुद्ध्वा स होवाच महागिरिः १२
पुत्रेति मधुरां वाणीं मनः प्रह्लादयन्निव ।
पितृव्यं चापि मां विद्धि सखायं मातरिश्वनः १३
मैनाकमिति विख्यातं निवसन्तं महोदधौ ।
पक्षवन्तः पुरा तत्र बभूवुः पर्वतोत्तमाः १४
छन्दतः पृथिवीं चेरुर्बाधमानाः समन्ततः ।
श्रुत्वा नगानां चरितं महेन्द्रः पाकशासनः १५
वज्रेण भगवान्पक्षौ चिच्छेदैषां सहस्रशः ।
अहं तु मोचितस्तस्मात्तव पित्रा महात्मना १६
मारुतेन तदा वत्स प्रक्षिप्तो वरुणालये ।
राघवस्य मया साह्ये वर्तितव्यमरिन्दम १७
रामो धर्मभृतां श्रेष्ठो महेन्द्रसमविक्रमः ।
एतच्छ्रुत्वा मया तस्य मैनाकस्य महात्मनः १८
कार्यमावेद्य च गिरेरुद्धतं वै मनो मम ।
तेन चाहमनुज्ञातो मैनाकेन महात्मना १९

---

झाले हा माझा पराक्रम पाहून तो महापर्वत मधुरवाणीने माझ्या मनाला आल्हाद देण्यासाठी म्हणाला, " हे पुत्रा, " मी वायूचा मित्र असल्यामुळे तुझा चुलता आहें, असें तूं समज मी मैनाक या नावाने प्रसिद्ध असून, या महासागरांत वास्तव्य करीत असतों. पूर्वी श्रेष्ठ पर्वतांना पक्ष होते आणि ते आपल्या इच्छेप्रमाणे पृथ्वीवर संचार करीत असत व संचार करता करता त्यांचे मार्गांत जें काही येईल, त्याला पीडा देत असत. हें पर्वतांचे वर्तन पाहून पाकशासन भगवान् महेंद्राने वज्राने त्यांच्या पक्षांचे हजारो तुकडे केले त्या वेळी तुझ्या महात्म्या पित्याने इंद्रापासून माझी मुक्तता केली ( १०-१६ )

हे वत्सा, वायूने त्या वेळीं मला सागरांत येऊन फेकून दिलें यासाठी हे शत्रुदमना, रघुवंशज रामाला मी सहाय्य केलें पाहिजे, कारण राम धर्मनिष्ठांमध्ये श्रेष्ठ आहे आणि महेंद्रासारखाच त्याचा पराक्रम आहे हें त्या महात्म्या मैनाकाचें भाषण ऐकून व त्या पर्वताचा उद्देश जाणून, माझ्या मनाला धीर आला

स चाप्यन्तर्हितः शैलो मानुषेण वपुष्मता ।
शरीरेण महाशैलः शैलेन च महोदधौ २०
उत्तमं जवमास्थाय शेषमध्वानमास्थितः ।
ततोऽहं सुचिरं कालं जवेनाभ्यगमं पथि २१
ततः पश्याम्यहं देवीं सुरसां नागमातरम् ।
समुद्रमध्ये सा देवी वचनं चेदमब्रवीत् २२
मम भक्ष्यः प्रदिष्टस्त्वममरैर्हरिसत्तम ।
ततस्त्वां भक्षयिष्यामि विहितस्त्वं हि मे सुरैः २३
एवमुक्तः सुरसया प्राञ्जलिः प्रणतः स्थितः ।
विवर्णवदनो भूत्वा वाक्यं चेदमुदीरयन् २४
रामो दाशरथिः श्रीमान्प्रविष्टो दण्डकावनम् ।
लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया च परन्तपः २५
तस्य सीता हृता भार्या रावणेन दुरात्मना ।
तस्याः सकाशं दूतोऽहं गमिष्ये रामशासनात् २६

---

आणि नंतर त्या महात्म्या मैनाकाने मला जाण्याची आज्ञा दिली. अशा वेळे-क्षणी मोठें मनुष्यरूप धारण केलेला तो महापर्वत पुन: पाषाणरूप घेऊन, समुद्रामध्ये गुप्त झाला (१७-२०)

नंतर आपला वेग पराकाष्ठेने वाढवून, मी अवशिष्ट राहिलेला मार्ग उल्लंघन करूं लागलों, त्या वेगाने जातांना बराच वेळपर्यंत त्याच प्रकारचें मार्गक्रमण केलें. नंतर नागमाता देवी सुरसा समुद्रामध्ये माझ्या दृष्टीस पडली व ती देवी मला म्हणाली, " हे वानरश्रेष्ठ, देवांनी तुला माझें भक्ष्य ठरवलें आहे. यास्तव मी तुला भक्षण करतें, कारण देवांनीच तुझी माझ्याकरितां अशी योजना केलेली आहे " याप्रमाणे सुरसेने सांगितलें, तेव्हां मी हात जोडून नम्रपणें उभा राहिलों. माझें मुख निस्तेज झालें आणि मी तिला म्हणालों. (२१-२४)

"दशरथपुत्र, शत्रुतापन, श्रीमान् राम, भ्राता लक्ष्मण व सीता यांसह दंडकारण्यामध्ये आला असतांना दुरात्म्या रावणाने त्याची भार्या सीता हरण करून नेली आहे आणि रामाच्या आज्ञेवरून तिच्याकडे दूत या नात्याने मी जात आहें

कर्तुमर्हसि रामस्य साहाय्यं विषये सति ।
अथवा मैथिलीं दृष्ट्वा रामं चाक्लिष्टकारिणम् २७
आगमिष्यामि ते वक्त्रं सत्यं प्रतिशृणोमि ते ।
एवमुक्ता मया सा तु सुरसा कामरूपिणी २८
अब्रवीन्नातिवर्तेत कश्चिदेष वरो मम ।
एवमुक्तः सुरसया दशयोजनमायतः २९
ततोऽर्धगुणविस्तारो बभूवाहं क्षणेन तु ।
मत्प्रमाणाधिकं चैव व्यादितं तु मुखं तया ३०
तद् दृष्ट्वा व्यादितं त्वास्यं ह्रस्वं ह्यकरवं पुनः ।
तस्मिन्मुहूर्ते च पुनर्बभूवाङ्गुष्ठसंमितः ३१
अभिपत्याशु तद्वक्त्रं निर्गतोऽहं ततः क्षणात् ।
अब्रवीत्सुरसा देवी स्वेन रूपेण मां पुनः ३२
अर्थसिद्ध्यै हरिश्रेष्ठ गच्छ सौम्य यथासुखम् ।
समानय च वैदेहीं राघवेण महात्मना ३३

---

यासाठीं हा प्रदेश जर रामाच्या आज्ञेंतील असेल, तर तूं त्याला साहाय्य कर अथवा तसें नसेल, तर सीतेचा शोध लावून आणि तो वृत्तांत निवेदन करण्याकरितां पापापासून परावृत्त असलेल्या रामाची भेट घेऊन मी पुनः तुझ्या मुखीं जाण्यासाठीं परत येईन; हें मी तुला प्रतिज्ञापूर्वक सत्य सांगतों." याप्रमाणें मी तिला सांगितलें असतांना, इच्छेप्रमाणें रूप धारण करणारी ती सुरसा मला म्हणाली, " मला प्राप्त झालेला हा वर निष्फल करण्यास कोणीही समर्थ नाहीं." याप्रमाणें सुरसेनें मला सांगितलें, तेव्हां मी दहा योजनें उंच आणि पांच योजनें रुंद असा एका क्षणामध्यें विशाल झालों; परंतु माझ्याहीपेक्षा तिनें आपला मोठा जबडा जास्त मोठा केला. तेव्हां तो आ पसरलेला पाहून, मी पुनः अत्यंत लहान रूप घेतलें आणि तत्क्षणींच अगदीं आंगठ्याएवढा लहान झालों. ( २५-३१ )

नंतर सत्वर तिच्या मुखामध्यें प्रवेश करून, मी तत्क्षणींच बाहेर पडलों. नंतर आपलें स्वाभाविक रूप धारण करून, ती सुरसा देवी मला म्हणाली, "हे विनत-

सुखी भव महाबाहो प्रीतास्मि तव वानर।
ततोऽहं साधुसाध्वीति सर्वभूतैः प्रशंसितः ३४
ततोऽन्तरिक्षं विपुलं प्लुतोऽहं गरुडो यथा।
छाया मे निगृहीता च न च पश्यामि किंचन ३५
सोऽहं विगतवेगस्तु दिशो दश विलोकयन्।
न किंचित्तत्र पश्यामि येन मे विहता गतिः ३६
अथ मे बुद्धिरुत्पन्ना किंनाम गमने मम।
ईदृशो विघ्न उत्पन्नो रूपमत्र न दृश्यते ३७
अधोभागे तु मे दृष्टिः शोचतः पतिता तदा।
तत्राद्राक्षमहं भीमां राक्षसीं सलिलेशयाम् ३८
प्रहस्य च महानादमुक्तोऽहं भीमया तया।
अवस्थितमसंभ्रान्तमिदं वाक्यमशोभनम् ३९
क्वासि गन्ता महाकाय क्षुधिताया ममेप्सितः।

---

संपन्न वानरश्रेष्ठा, कार्यसिद्धीकरितां तूं खुशाल जा आणि महात्म्या राघवाकडे सीतेला घेऊन ये हे महापराक्रमी वानरा, तूं सुखी हो, मी तुजवर प्रसन्न झालें आहे" तदनंतर " शाबास, शाबास " म्हणून सर्व प्राण्यांनी माझी प्रशंसा केली यानंतर विस्तीर्ण अंतरिक्षामध्ये मी गरुडाप्रमाणे उड्डाण केलें, तोंच छायेच्या योगानें मला कोणीतरी आकर्षण केलें, परंतु मला कोण आकर्षण करीत आहे, हें मात्र काहींच दिसेना. माझी गति नाहींशी झाल्यामुळे मी दशदिशा पाहूं लागलों, तथापि, ज्या कारणामुळे माझी गति कुंठित झाली होती, तें काहींच माझ्या दृष्टीस पडेना हें पाहून मी मनामध्ये म्हणालों, " अरे, आकाशामध्ये अशा प्रकारचें मोठें विघ्न उत्पन्न झालें आहे आणि विघ्न उत्पन्न करणाराचें प्रत्यक्ष रूप तर मला कांहींच दिसत नाहीं, याचा अर्थ काय ? " ( ३२–३७ )

अशा प्रकारें काळजी करीत आहे, तोंच अधोभागीं माझी दृष्टि गेली, व उदकामध्ये वास्तव्य करणारी एक भयंकर राक्षसी मी पाहिली तेव्हां ती भयंकर राक्षसी हास्यपूर्वक उच्च स्वरानें, निश्चेष्ट परंतु निर्भय असलेल्या मला, अशुभ शब्दांनी म्हणाली, "हे धटिंगणा, तूं आतां कोठें जाणार रे ? मला भूक लागलेली

भक्षः प्रीणय मे देहं चिरमाहारवर्जितम् ४०
बाढमित्येव तां वाणीं प्रत्यगृह्णामहं ततः।
आस्यप्रमाणादधिकं तस्याः कायमपूरयम् ४१
तस्याश्चास्यं महद्भीमं वर्धते मम भक्षणे।
न तु मां सा नु बुबुधे मम वा विकृतं कृतम् ४२
ततोऽहं विपुलं रूपं संक्षिप्य निमिषान्तरात्।
तस्या हृदयमादाय प्रपतामि नभस्थलम् ४३
सा विसृष्टभुजा भीमा पपात लवणाम्भसि।
मया पर्वतसंकाशा निकृत्तहृदया सती ४४
शृणोमि खगतानां च वाचः सौम्या महात्मनाम्।
राक्षसी सिंहिका भीमा क्षिप्रं हनुमता हता ४५
तां हत्वा पुनरेवाहं कृत्यमात्ययिकं स्मरन्।
गत्वा च महदध्वानं पश्यामि नगमण्डितम् ४६
दक्षिणं तीरमुदधेर्लङ्का यत्र गता पुरी।

---

असून, तूं माझें भक्ष्यच ठरलें गेलें आहेस. आता पुष्कळ वेळपर्यंत मी कांहीं खाल्लेलें नसल्यामुळे हा माझा देह तूं तृप्त कर." ( ३८-४० )

यावर "ठीक आहे," असें म्हणून, मी तिच्या म्हणण्याला मान दिला आणि तिच्या मुखापेक्षाही आपलें शरीर मोठें केलें; परंतु मला भक्षण करण्याकरितां तिचेंही भयंकर मुख फारच वाढूं लागलें. तथापि, तिनें मला ओळखिलें नाहीं व तिच्यापासून मला कांहीं इजाही झाली नाहीं. नंतर आपलें विशाल रूप एका निमिषांत मी संकुचित केलें आणि तिचें हृदय घेऊनच आकाशामध्यें उड्डाण केलें. तेव्हां मी तिचें हृदय तोडून नेल्यामुळे ती पर्वतप्राय भयंकर राक्षसी हातपाय आपटित समुद्रामध्यें पडली. हें झाल्याबरोबर " भयंकर सिंहिका राक्षसीचा हनुमानानें तडकाफडकी वध करून टाकिला" असे अंतरिक्षामध्यें संचार करणाऱ्या महात्म्यांचे सौम्य शब्द माझ्या कानीं आले. ( ४१-४५ )

याप्रमाणें सिंहिकेचा वध केल्यावर आपल्या कार्याला विलंब होत आहे, हें मनांत आणून मी बराच रस्ता उल्लंघून गेलों व पर्वतानें मंडित असें समुद्राचें दक्षिण तीर

भूमिशय्या विवर्णाङ्गी पद्मिनीव हिमागमे ६०
रावणाद्विनिवृत्तार्था मर्तव्ये कृतनिश्चया ।
कथंचिन्मृगशावाक्षी तूर्णमासादिता मया ६१
तां दृष्ट्वा तादृशीं नारीं रामपत्नीं यशस्विनीम् ।
तत्रैव शिंशपावृक्षे पश्यन्नहमवस्थितः ६२
ततो हलहलाशब्दं काञ्चीनूपुरमिश्रितम् ।
शृणोम्यधिकगम्भीरं रावणस्य निवेशने ६३
ततोऽहं परमोद्विग्नः स्वरूपं प्रत्यसंहरम् ।
अहं च शिंशपावृक्षे पक्षीव गहने स्थितः ६४
ततो रावणदाराश्च रावणश्च महाबलः ।
तं देशमनुसंप्राप्तो यत्र सीताभवत्स्थिता ६५
तं दृष्ट्वाथ वरारोहा सीता रक्षोगणेश्वरम् ।
संकुच्योरू स्तनौ पीनौ बाहुभ्यां परिरभ्य च ६६

नुसती एकच वेणी बांधलेली होती, ती भूमीवर शयन करीत होती हिंवाळा आला असतां निस्तेज होणाऱ्या कमलिनीप्रमाणे तिचें शरीर निस्तेज झालेलें होतें आणि रावणामुळे तिचें सुख नाहीसें झालें असे यामुळे, ती मनातून मरण्याविषयींचा निश्चय करून बसली होती अशा दीन अवस्थेमध्ये असलेल्या त्या मृगनयना सीतेजवळ मी तावडतोब गेलों आणि तशा प्रकारची ती स्त्री म्हणजे यशस्विनी राजपत्नी, सीता आहे हे पाहून तसाच अवलोकन करीत करीत मी त्या शिंशवीच्या वृक्षावर बसलों (५७-६२)

तों इतक्यांत कमरपट्टा व तोरड्या यांचा ध्वनि संमिश्रित झालेला अतिच प्रचंड हलहला शब्द, रावणाच्या वाड्याजवळ मला ऐकू आला तेव्हां मी अत्यंत उद्विग्न झालों व आपलें स्वरूप सूक्ष्म केलें आणि त्या शिंशपावृक्षावर पानांनी गजबजून गेलेल्या एका भागांत पक्ष्याप्रमाणे मी दडून बसलों नंतर ज्या ठिकाणी सीता होती, तेथें आपल्या स्त्रियांसह तो महाबलाढ्य रावण आला तो राक्षसगणाधिपति रावण आल्याचें समजतांक्षणीं, सुंदरी सीतेने आपले पाय वस्त्राच्या आंत सावरून घेतले आणि पुष्ट स्तन बाहूंनी अगदीं झांकून टाकिले नंतर अतिशय

वित्रस्तां परमोद्विग्नां वीक्षमाणामितस्ततः ।
त्राणं कंचिदपश्यन्तीं वेपमानां तपस्विनीम् ६७
तामुवाच दशग्रीवः सीतां परमदुःखिताम् ।
अवाक्शिराः प्रपतितो बहुमन्यस्व मामिति ६८
यदि चेत्त्वं तु मां दर्पान्नाभिनन्दसि गर्विते ।
द्विमासानन्तरं सीते पास्यामि रुधिरं तव ६९
एतच्छ्रुत्वा वचस्तस्य रावणस्य दुरात्मनः ।
उवाच परमक्रुद्धा सीता वचनमुत्तमम् ७०
राक्षसाधम रामस्य भार्याममिततेजसः ।
इक्ष्वाकुवंशनाथस्य स्नुषां दशरथस्य च ७१
अवाच्यं वदतो जिह्वा कथं न पतिता तव ।
किंस्विद्वीर्यं तवानार्य यो मां भर्तुरसंनिधौ ७२
अपहृत्यागतः पाप तेनादृष्टो महात्मना ।
न त्वं रामस्य सदृशो दास्येऽप्यस्य न युज्यसे ७३

---

त्रस्त व अत्यंत उद्विग्न होऊन इकडेतिकडे पहात असलेल्या आणि रक्षण करणारा जवळ कोणी दृष्टी पडत नसल्यामुळे थरथर कापत असलेल्या त्या अत्यंत दु:खी, तपस्विनी सीतेला मान खाली घालून प्रणिपातपूर्वक रावण म्हणाला, " माझ्या म्हणण्याला बहुमान दे हे गर्विष्ठ सीते, गर्वाने जर तूं माझें म्हणणें मान्य केलें नाहीस, तर तुमारें दोन महिन्यानंतर मी तुझें रक्त प्राशन करीन. " ( ६३-६९ )

त्या दुरात्म्या रावणाचे हे शब्द ऐकून, अत्यंत क्रुद्ध झालेली सीता अगदी सौम्य शब्दात त्याला म्हणाली, " हे राक्षसाधमा, अतुल तेजस्वी रामाच्या भार्येशीं आणि इक्ष्वाकुवंशाधिपति दशरथाच्या स्नुषेशीं असे अनुच्चारणीय शब्द उच्चारीत असताना तुझी जिह्वा कशी रे झडून पडली नाही ! हे दुष्टा, हे पाप्या, माझा भर्ता संनिध नसताना, त्या महात्म्याच्या दृष्टी न पडता, तूं मला लबाडीने हरण करून इकडे घेऊन आला आहेस, यात तुझा पुरुषार्थ तो काय ? तूं राम-च्या तोडीचा नाहीस, इतकेंच नव्हे तर, त्याचा दास होण्याचीही तुझी योग्यता

अजेयः सत्यवाक्शूरो रणश्लाघी च राघवः।
जानक्या परुषं वाक्यमेवमुक्तो दशाननः ७४
जज्वाल सहसा कोपाच्चितास्थ इव पावकः।
विवृत्य नयने क्रूरे मुष्टिमुद्यम्य दक्षिणम् ७५
मैथिलीं हन्तुमारब्धः स्त्रीभिर्हाहाकृतं तदा।
स्त्रीणां मध्यात्समुत्पत्य तस्य भार्या दुरात्मनः ७६
वरा मन्दोदरी नाम तया स प्रतिषेधितः।
उक्तश्च मधुरां वाणीं तया स मदनार्दितः ७७
सीतया तव किं कार्यं महेन्द्रसमविक्रम।
मया सह रमस्वाद्य मद्विशिष्टा न जानकी ७८
देवगन्धर्वकन्याभिर्यक्षकन्याभिरेव च।
सार्धं प्रभो रमस्वेति सीतया किं करिष्यसि ७९
ततस्ताभिः समेताभिर्नारीभिः स महाबलः।
उत्थाप्य सहसा नीतो भवनं स्वं निशाचरः ८०
याते तस्मिन्दशग्रीवे राक्षस्यो विकृताननाः।

---

नाही युद्धकर्माविषयी विख्यात असलेला सत्यवचनी व शूर राम अजिंक्य आहे ' याप्रमाणे जानकीने रावणाला अनुलक्षून असें कठोर भाषण केलें ( ७०-७४ )

सीतेचे हे शब्द ऐकून तो रावण चितेवरील अग्नीप्रमाणे एकाएकी क्रोधाने जळफळूं लागला आणि आपले क्रूर डोळे वटारून व उजव्या हाताची मूठ उगारून तो त्या सीतेला मारण्यास धावला, तेव्हा त्याचे भोवतालच्या स्त्रियांनी हाहाकार केला तेव्हा स्त्रियांमधून त्या दुरात्म्याची मंदोदरी नामक श्रेष्ठ भार्या लगबगीने उठली आणि तिने त्याला आवरून धरलें नंतर मदनाने व्याकुल झालेल्या रावणाला ती मधुर वाणीने म्हणाली, " हे महेंद्रतुल्य पराक्रमी नाथ, आपणाला सीतेशीं काय कर्तव्य आहे ? आज आपण माझ्याशीं रममाण व्हा जानकी कांहीं माझ्यापेक्षा अधिक नाहीं देव, गंधर्व आणि यक्ष यांच्या कन्यांशीं, हे प्रभो, आपण रममाण व्हा सीतेशीं आपल्याला काय करावयाचें आहे ? " (७५-७९)

इतकें झाल्यानंतर त्या महाबलाढ्य रावणाला एकदम तेथून उठवून, स्वत -

सीतां निर्भर्त्सयामासुर्वाक्यैः क्रूरैः सुदारुणैः ८१
तृणवद्भाषितं तासां गणयामास जानकी ।
गर्जितं च तथा तासां सीतां प्राप्य निरर्थकम् ८२
वृथागर्जितनिश्चेष्टा राक्षस्यः पिशिताशनाः ।
रावणाय शशंसुस्ताः सीताव्यवसितं महत् ८३
ततस्ताः सहिताः सर्वा विहताशा निरुद्यमाः ।
परिक्लिश्य समस्तास्ता निद्रावशमुपागताः ८४
तासु चैव प्रसुप्तासु सीता भर्तृहिते रता ।
विलप्य करुणं दीना प्रशुशोच सुदुःखिता ८५
तासां मध्यात्समुत्थाय त्रिजटा वाक्यमब्रवीत् ।
आत्मानं खादत क्षिप्रं न सीतामसितेक्षणाम् ८६
जनकस्यात्मजां साध्वीं स्नुषां दशरथस्य च ।
स्वप्नो ह्यद्य मया दृष्टो दारुणो रोमहर्षणः ८७

त्या घरीं घेऊन गेल्या. रावण निघून गेल्यानंतर अक्राळविक्राळ मुद्रेच्या त्या राक्षसी सीतेची क्रूर व अत्यंत भयंकर शब्दांनी निर्भर्त्सना करूं लागल्या; परंतु सीतेनें त्यांचें भाषण कस्पटाप्रमाणे मानलें व त्यामुळे सीतेवरची त्यांची ती गर्जना फोल झाली. याप्रमाणे त्या मांसभक्षक राक्षसस्त्रियांची गर्जना व तडफड व्यर्थ झालेली पाहून, त्यांनी सीतेने मरण्याविषयी केलेला भयंकर निश्चय रावणाला कळवला. नंतर हताश झालेल्या आणि म्हणूनच सीतेचें मन वळविण्याचा प्रयत्न सोडून दिलेल्या त्या सर्वही राक्षसी दमून गेल्यामुळे एकदम गाढ निद्रिस्थ झाल्या. ( ८०-८४ )

याप्रमाणे त्या गाढ निद्रिस्थ झाल्या, तेव्हा भर्त्याच्या हिताविषयी तत्पर असलेली, अत्यंत दुःखित व दीन झालेली ती सीता करुण स्वराने विलाप करून शोक करूं लागली. तेव्हा त्या राक्षसींमधून एक त्रिजटानामक राक्षसी उठली आणि त्या राक्षसींना म्हणाली, " तुम्ही आता स्वतःलाच सत्वर खाऊन टाका; जनकाची कन्या आणि दशरथाची स्नुषा, जी ही कृष्णनयना साध्वी सीता, तिला तुम्ही भक्षण करूं शकणार नाही; कारण आज मला अंगावर काटा

रक्षसां च विनाशाय भर्तुरस्या जयाय च।
अलमस्मात्परित्रातुं राघवाद्राक्षसीगणम् ८८
अभियाचाम वैदेहीमेतद्धि मम रोचते।
यदि ह्येवंविधः स्वप्नो दुःखितायाः प्रदृश्यते ८९
सा दुःखैर्विविधैर्मुक्ता सुखमाप्नोत्यनुत्तमम्।
प्रणिपातप्रसन्ना हि मैथिली जनकात्मजा ९०
अलमेषा परित्रातुं राक्षस्यो महतो भयात्।
ततः सा ह्रीमती बाला भर्तुर्विजयहर्षिता ९१
अवोचद्यदि तत्तथ्यं भवेयं शरणं हि वः।
तां चाहं तादृशीं दृष्ट्वा सीताया दारुणां दशाम् ९२
चिन्तयामास विश्रान्तो न च मे निर्वृतं मनः।
संभाषणार्थे च मया जानक्याश्चिन्तितो विधिः ९३
इक्ष्वाकुकुलवंशस्तु स्तुतो मम पुरस्कृतः।

---

भेण्याजोगें एक भयंकर स्वप्न पडलें आहे त्यावरून राक्षसांचा नाश व हिच्या भर्त्याचा जय होणार आहे ही सीताच फक्त या आपल्या राक्षसींच्या समुदायाचें रामापासून रक्षण करण्यास समर्थ आहे यासाठी आपण सीतेची प्रार्थना करूं या, हेंच मला बरें दिसतें दुःखमग्न झालेल्या सीतेसंबंधी अशा प्रकारचें स्वप्न दृष्टी पडत आहे, तेव्हां ही नाना प्रकारच्या दुःखांतून मुक्त होईल आणि तिला अनुपम सुख प्राप्त होईल म्हणून, हे राक्षसस्त्रियांनो, आपण नुसता प्रणिपात करून जर जनककन्या मैथिली प्रसन्न केली, तर पुढील महाभयापासून ती आपलें संरक्षण करण्यास समर्थ आहे." हें त्रिजटेचें भाषण ऐकल्यानंतर, भर्त्याचा विजय होणार, म्हणून हर्ष झालेली, ती विनयसंपन्न बाला सीता म्हणाली (८८–९१)

"तुम्ही म्हणतां हें जर खरें असेल, तर मी तुमचें खात्रीनें रक्षण करीन." सीतेची ती तशा प्रकारची भयंकर अवस्था पाहिल्यावर मी काळजींत पडलों आणि सीता दृष्टी पडली, म्हणून मला प्रथमतःच जरी श्रमाचें सार्थक झाल्यासारखें वाटत होतें, तरी तिची ती तशी अवस्था पाहून, माझ्या मनाला बरें वाटेना. नंतर तिच्याशीं संभाषण करण्याचा उपाय मनामध्यें आणून, मी माझ्या

श्रुत्वा तु गदितां वाचं राजर्षिगणभूषिताम् ९४
प्रत्यभाषत मां देवी बाष्पैः पिहितलोचना ।
कस्त्वं केन कथं चेह प्राप्तो वानरपुङ्गव ९५
का च रामेण ते प्रीतिस्तन्मे शंसितुमर्हसि ।
तस्यास्तद्वचनं श्रुत्वा अहमप्यब्रुवं वचः ९६
देवि रामस्य भर्तुस्ते सहायो भीमविक्रमः ।
सुग्रीवो नाम विक्रान्तो वानरेन्द्रो महाबलः ९७
तस्य मां विद्धि भृत्यं त्वं हनूमन्तमिहागतम् ।
भर्त्रा संप्रहितस्तुभ्यं रामेणाक्लिष्टकर्मणा ९८
इदं तु पुरुषव्याघ्रः श्रीमान्दाशरथिः स्वयम् ।
अङ्गुलीयमभिज्ञानमदात्तुभ्यं यशस्विनि ९९
तदिच्छामि त्वयाज्ञप्तं देवि किं करवाण्यहम् ।
रामलक्ष्मणयोः पार्श्वं नयामि त्वां किमुत्तरम् १००
एतच्छ्रुत्वा विदित्वा च सीता जनकनन्दिनी ।

---

डोळ्यापुढे असलेल्या इक्ष्वाकुवंशाची स्तुति केली तेव्हा राजर्षिपरंपरेच्या वर्णनाने भूषित अशी मी उच्चारिलेली वाणी ऐकूं येताच, अश्रूंनी नेत्र भरून गेलेली ती देवी मला म्हणाली, "हे वानरश्रेष्ठा, तूं कोण आहेस? येथे कसा आलास? आणि रामाशीं तुझें प्रेम कसें झालें? हें मला नीट सांग." हें तिचें भाषण श्रवण करून मीही तिला म्हणालों (९२-९६)

"हे देवी, तुझ्या भर्त्या रामाचा एक महापराक्रमी सहाय्यकर्ता सुग्रीव नावाचा एक महाबलाढ्य व शूर वानराधिपति आहे त्याचा सेवक मी हनुमान् येथे आलों आहे, असें तूं समज. पापकर्मापासून परावृत्त असलेला तुझा भर्ता जो राम, त्यानें मला तुझ्याकडे पाठविलें आहे आणि, हे यशस्विनी, पुरुषश्रेष्ठ श्रीमान् दाशरथि रामानें खुणेकरिता ही आंगठीही तुला दिली आहे, म्हणून हे देवि, तुझी कोणती आज्ञा मी शेवटास न्यावी, हें समजण्याची माझी इच्छा आहे. रामलक्ष्मणाजवळ तर मी तुला घेऊन जाईनच, परंतु याशिवाय दुसरी काय आज्ञा आहे, ती मला कळूं दे" (९७-१००)

आह रावणमुत्पाट्य राघवो मां नयत्विति १०१
प्रणम्य शिरसा देवीमहमार्यामनिन्दिताम् ।
राघवस्य मनोह्लादमभिज्ञानमयाचिषम् १०२
अथ मामब्रवीत्सीता गृह्यतामयमुत्तमः ।
मणिर्येन महाबाहू रामस्त्वां बहु मन्यते १०३
इत्युक्त्वा तु वरारोहा मणिप्रवरमुत्तमम् ।
प्रायच्छत्परमोद्विग्ना वाचा मां संदिदेश ह १०४
ततस्तस्यै प्रणम्याहं राजपुत्र्यै समाहितः ।
प्रदक्षिणं परिक्रामामिहाभ्युद्गतमानसः १०५
उत्तरं पुनरेवाह निश्चित्य मनसा तदा ।
हनूमन्मम वृत्तान्तं वक्तुमर्हसि राघवे १०६
यथा श्रुत्वैव न चिरात्तावुभौ रामलक्ष्मणौ ।
सुग्रीवसहितौ वीरावुपेयातां तथा कुरु १०७
यदन्यथा भवेदेतद्द्वौ मासौ जीवितं मम ।

हे भाषण ऐकून व ती खूण ओळखून जनककन्या सीता मला म्हणाली, "रावणाचा समूळ नाश करून, रामानेच मला येथून घेऊन जावें," असें तिने सांगितल्यानंतर, त्या साध्वी अनिंदित सीतादेवीला मी मस्तक लववून प्रणाम केला आणि जी पाहून राघवाच्या मनाला आनंद होईल, अशी खूणही मी तिच्यापाशी मागितली. तेव्हा सीता मला म्हणाली, " हा उत्कृष्ट मणि घे या मण्याच्या योगाने महापराक्रमी राम तुझा योग्य आदरसत्कार करील " असें बोलून त्या सुंदरीने ते उत्कृष्ट व श्रेष्ठ रत्न माझ्या स्वाधीन केलें आणि अत्यंत उद्विग्न होऊन, तिने काही रामाला खूण पटण्यासारिखा वृत्तांतही मला सविस्तर सांगितला (१०१-१०४)

नंतर स्वस्थ चित्ताने मी त्या राजकन्येला प्रणाम केला आणि इकडे परत येण्याच्या हेतूने तिला प्रदक्षिणाही केली. हे पाहून मनाचा पूर्ण निश्चय करून, पुनरपि ती मला आणखीही म्हणाली, " हे हनुमाना, राघवाला तू माझा वृत्तांत निवेदन कर आणि तो ऐकताच ते उभयता वीर रामलक्ष्मण सुग्रीवासहवर्तमान इकडे लवकरच येतील, असें कार्य तू कर यात जर अंतर पडेल, तर आता

न मां द्रक्ष्यति काकुत्स्थो म्रिये साहमनाथवत् १०८
तद्गत्वा करुणं वाक्यं क्रोधो मामभ्यवर्तत ।
उत्तरं च मया दृष्टं कार्यशेषमनन्तरम् १०९
ततोऽवर्धत मे कायस्तदा पर्वतसंनिभः ।
युद्धाकाङ्क्षी वनं तस्य विनाशयितुमारभे ११०
तद्भग्नं वनखण्डं तु भ्रान्तत्रस्तमृगद्विजम् ।
प्रतिबुद्ध्य निरीक्षन्ते राक्षस्यो विकृताननाः १११
मां च दृष्ट्वा वने तस्मिन्समागम्य ततस्ततः ।
ताः समभ्यागताः क्षिप्रं रावणायाचचक्षिरे ११२
राजन्वनमिदं दुर्गं तव भग्नं दुरात्मना ।
वानरेण ह्यविज्ञाय तव वीर्यं महाबल ११३
तस्य दुर्बुद्धिता राजंस्तव विप्रियकारिणः ।
वधमाज्ञापय क्षिप्रं यथासौ न पुनर्व्रजेत् ११४

---

माझें जीवित दोनच महिने शेष राहिलें आहे; त्यानंतर मी ककुत्स्थकुलोत्पन्न रामाच्या दृष्टीस पडणें शक्य नाही एवढ्या मुदतींत जर तो लवकर न येईल, तर मी अनाथाप्रमाणे येथेच मग्न जाईन." ( १०५-१०८ )

हें तिचें दीन भाषण ऐकताच तिला अनादर अशा क्रोधानें घेरून टाकलें आणि सीतादर्शनानंतर आपलें अवशिष्ट कार्य काय राहिलें आहे, तें मी मनामध्ये आणलें, तेव्हा माझें शरीर पर्वतासारखें वाढलें आणि मनांत युद्धाची इच्छा धरून, मी त्या रावणाच्या वनाचा नाश करण्याला आरंभ केला. तें वन मोडिलें, तेव्हा त्यांतील मृग व पक्षी त्रस्त होऊन, गोंधळून गेले आणि तेथील अक्राळविक्राळ मुद्रा असलेल्या राक्षसस्त्रिया जाग्या होऊन इकडेतिकडे पाहूं लागल्या. त्या वनामध्ये मला पाहिल्यावर त्या चोहोंकडून येऊन एकत्र जमल्या आणि त्या सर्वांनी मिळून रावणाला तो वृत्तांत सत्वर निवेदन केला (१०९-११२)

त्या म्हणाल्या, "हे महाबल त्या राजा, आपल्या सामर्थ्याचा विचार न करता एका दुरात्म्या वानराने हें आपलें गहन वन मोडून टाकलें आहे. यास्तव, हे राजा, आपला अपराध करणाऱ्या त्या वानराला दुर्बुद्धि आठवली आहे.

तच्छ्रुत्वा राक्षसेन्द्रेण विसृष्टा बहुदुर्जयाः ।
राक्षसाः किङ्करा नाम रावणस्य मनोनुगाः ११५
तेषामशीतिसाहस्रं शूलमुद्गरपाणिनाम् ।
मया तस्मिन्वनोद्देशे परिघेण निषूदितम् ११६
तेषां तु हतशिष्टा ये ते गता लघुविक्रमाः ।
निहतं च मया सैन्यं रावणायाचचक्षिरे ११७
ततो मे बुद्धिरुत्पन्ना चैत्यप्रासादमुत्तमम् ।
तत्रस्थान्राक्षसान्हत्वा शतं स्तम्भेन वै पुनः ११८
ललामभूतो लङ्काया मया विध्वंसितो रुषा ।
ततः प्रहस्तस्य सुतं जम्बुमालिनमादिशत् ११९
राक्षसैर्बहुभिः सार्धं घोररूपैर्भयानकैः ।
तमहं बलसंपन्नं राक्षसं रणकोविदम् १२०
परिघेणातिघोरेण सूदयामि सहानुगम् ।
तच्छ्रुत्वा राक्षसेन्द्रस्तु मन्त्रिपुत्रान्महाबलान् १२१

याकरितां त्याचा वध करण्याबद्दल सत्वर आज्ञा द्या, म्हणजे पुनः य ला येथे येता येणार नाही " हें भाषण ऐकून घेऊन, त्या राक्षसाधिपति रावणानें आपल्या मर्जीप्रमाणें वागणारे असे किंकर नावाचे अत्यंत दुर्जय राक्षस माझ्यावर पाठवून दिले, परंतु शूल व मुद्गल हातांत घेऊन आलेल्या त्या ऐंशी हजार राक्षसांचा मी गदेच्या योगानें त्या वनप्रदेशामध्येच वध केला ( ११३–११६ )

तथापि, त्याच्यापैकीं जे राक्षस शिल्लक राहिले होते, ते सत्वर तेथून निघाले आणि मी तें सारें सैन्य मारल्याचें त्यांनीं रावणाला कळविलें नंतर मोठा सुन्दर रावणाचा उत्कृष्ट राजवाडा मोडून टाकावा, असें माझ्या मनांत आल्यामुळें तेथील शंभर राक्षसांचा वध करून मी तेथील लंकानगरीला भूषण होऊन राहिलेल्या त्या राजवाड्याचा रागारागानें विध्वंस केला नंतर रावणानें प्रहस्तपुत्र जंबुमालीला, घोर रूप धारण करणारे असंख्य व भयंकर राक्षस घेऊन माझ्यावर जाण्याची आज्ञा केली; परंतु त्या बलाढ्य संग्रामवेत्या राक्षसाचा त्याच्या अनुयायांसह मी अति घोर गदेनें नाश केला. हें ऐकून राक्ष-

पदातिबलसंपन्नान्प्रेषयामास रावणः ।
परिघेणैव तान्सर्वान्नयामि यमसादनम् १२२
मन्त्रिपुत्रान्हतान्छ्रुत्वा समरे लघुविक्रमान् ।
पञ्च सेनाग्रगाञ्छूरान्प्रेषयामास रावणः १२३
तानहं सहसैन्यान्वै सर्वानेवाभ्यसूदयम् ।
ततः पुनर्दशग्रीवः पुत्रमक्षं महाबलम् १२४
बहुभी राक्षसैः सार्धं प्रेषयामास संयुगे ।
तं तु मन्दोदरीपुत्रं कुमारं रणपण्डितम् १२५
सहसा खं समुद्यन्तं पादयोश्च गृहीतवान् ।
तमासीनं शतगुणं भ्रामयित्वा व्यपेषयम् १२६
तमक्षमागतं भग्नं निशम्य स दशाननः ।
ततश्चेन्द्रजितं नाम द्वितीयं रावणः सुतम् १२७
व्यादिदेश सुसंक्रुद्धो बलिनं युद्धदुर्मदम् ।
तच्चाप्यहं बलं सर्वं तं च राक्षसपुङ्गवम् १२८

---

साधिपति रावणाने पायदळसैन्य बरोबर देऊन महाबलाढ्य मंत्रिपुत्रांना हुकूम केला. तथापि मी आपल्या गदेच्याच योगाने त्या सर्वांना यमलोका पाठवून दिलें ( ११७—१२२ )

याप्रमाणे युद्धामध्ये झटपट पराक्रम करणाऱ्या मंत्रिपुत्रांचा वध झाल्याचें ऐकून रावणाने पुन माझ्यावर पाच शूर सेनाधिपति पाठवून दिले; परंतु त्याही सर्वांचा सैन्यासह मी वध केला नंतर दशानन रावणाने आपला महाबलाढ्य-पुत्र अक्ष पुष्कळ राक्षस बरोबर देऊन माझ्याशी युद्ध करण्यासाठी पाठवून दिला. त्याप्रमाणे तो मंदोदरीपुत्र रणशूर कुमार अक्ष एकाएकी आकाशामध्ये आला, त्या वेळीं मी त्याचे पाय धरले आणि त्यास शंभर वेळा गरगर फिरवून, त्याचें चूर्ण करून टाकलें. ( १२३—१२६ )

याप्रमाणे अक्षाचा वध झाल्याचें ऐकून दशानन रावण तर अतिशयच क्रुद्ध झाला आणि युद्धामध्ये अजिंक्य व बलाढ्य अशा आपल्या इंद्रजित् नावाच्या प्रसिद्ध पुत्राला त्याने लढाईची आज्ञा केली. तेव्हा त्या राक्षसश्रेष्ठाला आणि

नष्टौजसं रणे कृत्वा परं हर्षमुपागतः ।
महतापि महाबाहुः प्रत्यनेन महाबलः १२९
प्रहितो रावणेनैव सह वीरैर्मदोद्धतैः ।
सोऽविषह्यं हि मां बुद्ध्वा स्वसैन्यं चावमर्दितम् १३०
ब्रह्मणोऽस्त्रेण स तु मा प्रबद्ध्वा चातिवेगितः ।
रज्जुभिश्चापि बध्नन्ति ततो मां तत्र राक्षसाः १३१
रावणस्य समीपं च गृहीत्वा मामुपागमन् ।
दृष्ट्वा संभाषितश्चाहं रावणेन दुरात्मना १३२
पृष्टश्च लङ्कागमनं राक्षसानां च तं वधम् ।
तत्सर्वं च रणे तत्र सीतार्थमुपजल्पितम् १३३
तस्यास्तु दर्शनाकाङ्क्षी प्राप्तस्त्वद्भवनं विभो ।
मारुतस्यौरसः पुत्रो वानरो हनुमानहम् १३४
रामदूतं च मां विद्धि सुग्रीवसचिवं कपिम् ।
सोऽहं दौत्येन रामस्य त्वत्सकाशमिहागतः १३५

त्याच्यावरोवर आलेल्या सर्व सैन्याला संग्राममध्ये सामर्थ्यहीन केल्यावर मला पराक्रमाचा हर्ष झाला. रणांगणात मोठे आशा मनात धरून, मदमत्त वीरांसह या महापराक्रमी व महाबलाढ्य पुत्राला रावणाकडे पाठविले होते. मी अजिंक्य आहें, असे जाणून आणि आपल्या सैन्याचा नाश झाला, हें लक्षांत आणून त्याने मला अतिवेगवान् ब्रह्मास्त्राने बांधून टाकिलें व नंतर इतर राक्षसांनीही मला दोरांनी आवळून टाकलें व ते मला रावणसमीप घेऊन गेले. मला पाहिल्यावर त्या दुरात्म्या रावणाचें व माझें संभाषण सुरू झालें (१२७—१३२)

'लंकेमध्ये येण्याचें व राक्षसांशी संग्राम करून, त्यांचा वध करण्याचें कारण काय?' म्हणून त्याने विचारिलें, तेव्हा मी त्याला 'तें सर्व सीतेकरिता आहे' म्हणून सांगतलें मी त्याला म्हणालों, "हे विभो, त्या सीतेच्या दर्शनाकरिता मी तुझ्या घरीं आलों आहें आणि मी वायूचा औरस पुत्र हनुमान् वानर आहें. याशिवाय मी, वानर सुग्रीवाचा मंत्री व रामाचा दूत आहें असें तूं समज.

शृणु चापि समादेशं यदहं प्रब्रवीमि ते।
राक्षसेश हरीशस्त्वां वाक्यमाह समाहितम् १३६
सुग्रीवश्च महाभाग स त्वां कौशलमब्रवीत्।
धर्मार्थकामसहितं हितं पथ्यमुवाच ह १३७
वसतो ऋष्यमूके मे पर्वते विपुलद्रुमे।
राघवो रणविक्रान्तो मित्रत्वं समुपागतः १३८
तेन मे कथितं राजन्भार्या मे रक्षसा हृता।
तत्र साहाय्यहेतोर्मे समयं कर्तुमर्हसि १३९
वालिना हृतराज्येन सुग्रीवेण सह प्रभुः।
चक्रेऽग्निसाक्षिकं सख्यं राघवः सहलक्ष्मणः १४०
तेन वालिनमाहत्य शरेणैकेन संयुगे।
वानराणां महाराजः कृतः संप्लवतां प्रभुः १४१
तस्य साहाय्यमस्माभिः कार्यं सर्वात्मना त्विह।
तेन प्रस्थापितस्तुभ्यं समीपमिह धर्मतः १४२

थोडक्यात म्हणजे रामासंबंधी काही निरोप घेऊन मी तुझ्याकडे येथे आलो आहे हे राक्षसाधिपते, तो मुख्य त्याचा निरोप मी तुला सांगतो, तो तू ऐक वानराधिपति सुग्रीवाने तुला स्वस्थ चित्ताने निरोप सांगितला आहे हे महाभाग्यवान रावणा, त्या सुग्रीवाने प्रथमतः तुला कुशल प्रश्न विचारून धर्म, अर्थ आणि काम यांना अनुसरून असलेला व तुला हितकर व पथ्यकारक निरोप सांगितला आहे तो असा— (१३३-१३७)

क्षिप्रमानीयतां सीता दीयतां राघवस्य च ।
यावन्न हरयो वीरा विधमन्ति बलं तव १४३
वानराणां प्रभावोऽयं न केन विदितः पुरा ।
देवतानां सकाशं च ये गच्छन्ति निमन्त्रिताः १४४
इति वानरराजस्त्वामाहेत्यभिहितो मया ।
मामैक्षत ततो रुष्टश्चक्षुषा प्रदहन्निव १४५
तेन वध्योऽहमाज्ञप्तो रक्षसा रौद्रकर्मणा ।
मत्प्रभावमविज्ञाय रावणेन दुरात्मना १४६
ततो बिभीषणो नाम तस्य भ्राता महामतिः ।
तेन राक्षसराजस्त्वं याचितो मम कारणात् १४७
नैवं राक्षसशार्दूल त्यज्यतामेष निश्चयः ।
राजशास्त्रव्यपेतो हि मार्गः संलक्ष्यते त्वया १४८
दूतवध्या न दृष्टा हि राजशास्त्रेषु राक्षस ।

---

असदी मनापासून सहाय्य करणें आमचें कर्तव्य आहे आणि त्यानेच धर्मबुद्धि मनात ठेवून, मला तुझ्याकडे पाठविलें आहे. ( १३८–१४२ )

" या वीर वानरांनी तुझ्या सैन्याचा नाश केला नाही, तोंच सीतेला लवकर परत आणून रामाच्या स्वाधीन कर. वानराच्या पराक्रमाचा हा प्रभाव पूर्वीपासून कोणाला बरें माहीत झालेला नाही ? देवसभेंत ते निमंत्रित असल्यामुळे, ते देवतांच्याही समीप जात असतात. " याप्रमाणे वानरराज सुग्रीवाने तुला निरोप सांगितला आहे; असें म्हणून मी त्याला हें सर्व सांगितलें, तेव्हा दृष्टीने मला दग्ध करीतच की काय असा तो रावण क्रुद्ध होऊन, माझ्याकडे पाहूं लागला आणि माझा प्रभाव न समजून त्या क्रूरकर्मा दुरात्म्या रावण राक्षसाने माझा वध करण्याविषयीही राक्षसांना आज्ञा केली. ( १४३–१४६ )

तेव्हा बिभीषण म्हणून त्याचा एक महाविचारी भ्राता आहे, त्याने माझ्याकरिता त्या राक्षसराजाची प्रार्थना केली. तो म्हणाला, " हे राक्षसश्रेष्ठा, हा आग्रह आपण सोडा. आपण राजनीतीला सोडून असलेल्या मार्गाचें अवलंबन करीत आहा. हे राक्षसा, राजनीतिशास्त्रामध्ये दूताचा वध कोठें सांगितलेला

दूतेन वेदितव्यं च यथाभिहितवादिना १४९
सुमहत्यपराधेऽपि दूतस्यातुलविक्रम ।
विरूपकरणं दृष्टं न वधोऽस्ति हि शास्त्रतः १५०
बिभीषणेनैवमुक्तो रावणः संदिदेश तान् ।
राक्षसानेतदेवास्य लाङ्गूलं दह्यतामिति १५१
ततस्तस्य वचः श्रुत्वा मम पुच्छं समन्ततः ।
वेष्टितं शाणवल्कैश्च पट्टैः कार्पासकैस्तथा १५२
राक्षसाः सिद्धसंनाहास्ततस्ते चण्डविक्रमाः ।
तदादीप्यन्त मे पुच्छं हनन्तः काष्ठमुष्टिभिः १५३
बद्ध्वा बहुभिः पाशैर्यन्त्रितस्य च राक्षसैः ।
न मे पीडाऽभवत्काचिद्दिदृक्षोर्नगरीं दिवा १५४
ततस्ते राक्षसाः शूरा बद्धं मामग्निसंवृतम् ।
अघोषयन्राजमार्गे नगरद्वारमागताः १५५

नाही. जसें असेल तसें भाषण करणाऱ्या दूताने आपला निरोप सांगितला पाहिजे. हे अतुलपराक्रमी रावणा, मोठा अपराध जरी दूताच्या हातून घडला, तरी त्याला विद्रूप करावें, एवढेंच फार तर शास्त्रामध्ये सांगितलें आहे. शास्त्रात कोठेही त्याचा वध सांगितलेला नाही." (१४७-१५०)

याप्रमाणे बिभीषणाने प्रार्थना केल्यावर "हें याचें पुच्छ आजच्या आजच पेटवून टाका" म्हणून रावणाने त्या राक्षसांना आज्ञा केली. नंतर त्याचें भाषण श्रवण केल्यावर राक्षसांनी माझ्या पुच्छाला तागाचीं चिरगुटें व तागाचीं वस्त्रें गुंडाळलीं आणि युद्धाची तयारी करून सज्ज झालेल्या त्या प्रचंड पराक्रमी राक्षसांनी काठ्या व बुक्क्या यांचे प्रहार करीत करीत, माझें पुच्छ पेटवून दिलें, परंतु राक्षसांनी जरी मला जखडून बांधलें होतें आणि अनेक पाशांनी जरी मला बांधिलें होतें, तरी लंकानगरी दिवसा पहावयास सापडावी, अशी माझी इच्छा असल्यामुळे मला काहीएक त्रास झाला नाही. नंतर त्या शूर राक्षसांनी मला बांधून, अग्नीने प्रदीप्त केलेल्या माझ्या शेपटासह मला फिरवीत, माझ्या-संबंधी राजमार्गामध्ये दवंडी पिटविली आणि नगराच्या द्वाराशीं मला ते घेऊन

ततोऽहं सुमहद्रूपं संक्षिप्य पुनरात्मनः।
विमोचयित्वा तं बन्धं प्रकृतिस्थः स्थितः पुनः १५६
आयसं परिघं गृह्य तानि रक्षांस्यसूदयम्।
ततस्तन्नगरद्वारं वेगेन प्लुतवानहम् १५७
पुच्छेन च प्रदीप्तेन तां पुरीं साट्टगोपुराम्।
दहाम्यहमसंभ्रान्तो युगान्ताग्निरिव प्रजाः १५८
विनष्टा जानकी व्यक्तं न ह्यदग्धः प्रदृश्यते।
लङ्कायाः कश्चिदुद्देशः सर्वा भस्मीकृता पुरी १५९
दहता च मया लङ्कां दग्धा सीता न संशयः।
रामस्य च महत्कार्यं मयेदं विफलीकृतम् १६०
इति शोकसमाविष्टश्चिन्तामहमुपागतः।
ततोऽहं वाचमश्रौषं चारणानां शुभाक्षराम् १६१
जानकी न च दग्धेति विस्मयोदन्तभाषिणाम्।
ततो मे बुद्धिरुत्पन्ना श्रुत्वा तामद्भुतां गिरम् १६२

आलें तेव्हा आपलें तें प्रचंड रूप मी पुनरपि संकुचित केलें आणि तीं बंधन सोडून टाकून पुनः मी नेहमीप्रमाणेच झालों. लोखंडाची गदा घेऊन मी त्या राक्षसांचा वध केला व मोठ्या वेगानें मी त्या नगराच्या द्वारावर उडी मारली आणि नंतर आपल्या प्रदीप्त झालेल्या पुच्छाच्या योगानें मी अगदी निर्भयपणें प्रलयकालीं प्रजा दग्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें गच्च्या व बुरुज यांसुद्धां लंका-नगरी दग्ध करूं लागलों ( १५१-१५८ )

या वेळीं "सर्व लंकानगरी जळून खाक झाली आहे. लंकेंतील कोणताही प्रदेश न जळलेला शिल्लक राहिलेला नाहीं, तेव्हां जानकीचा निःसंशय नाश झालाच असेल. लंकेची जाळपे[illegible] करतांना माझ्या हातून सीताही निःसंशय दग्ध झाली आणि यामुळें रामाचें हें मोठें कार्य मी अगदीं निष्फळ केलें" अशा प्रकारची मला काळजी पडली व मी अगदी शोकग्रस्त झालों. नंतर आश्चर्यचकित करून टाकणारी वार्ता सांगणाऱ्या चारणांची "जानकी दग्ध झाली नाहीं" अशी शुभ शब्दयुक्त असलेली वाणी मी ऐकली. तेव्हां ती अद्भुत वाणी श्रवण करून मलाही

अदग्धा जानकीत्येव निमित्तैश्चोपलक्षितम् ।
दीप्यमाने तु लाङ्गूले न मां दहति पावकः    १५३
हृदयं च प्रहृष्टं मे वाताः सुरभिगन्धिनः ।
तैर्निमित्तैश्च दृष्टार्थैः कारणैश्च महागुणैः    १५४
ऋषिवाक्यैश्च दृष्टार्थैरभवं हृष्टमानसः ।
पुनर्दृष्ट्वा च वैदेहीं विसृष्टश्च तया पुनः    १५५
ततः पर्वतमासाद्य तत्रारिष्टमहं पुनः ।
प्रतिप्लवनमारेभे युष्मद्दर्शनकाङ्क्षया    १५६
ततः पवनचन्द्रार्कसिद्धगन्धर्वसेवितम् ।
पन्थानमहमाक्रम्य भवतो दृष्टवानिह    १५७
राघवस्य प्रभावेन भवतां चैव तेजसा ।
सुग्रीवस्य च कार्यार्थं मया सर्वमनुष्ठितम्    १५८
एतत्सर्वं मया तत्र यथावदुपपादितम् ।
तत्र यन्न कृतं शेषं तत्सर्वं क्रियतामिति    १५९

इत्यार्षे श्रीमद्रामा० वाल्मी० आदिकाव्ये सुन्दरकाण्डेऽष्टपञ्चाशः सर्गः ॥ ५८ ॥

[ २५६३ ]

एकोनषष्टितमः सर्गः ।

एतदाख्याय तत्सर्वं हनूमान्मारुतात्मजः ।
भूयः समुपचक्राम वचनं वक्तुमुत्तरम् १
सफलो राघवोद्योगः सुग्रीवस्य च संभ्रमः ।
शीलमासाद्य सीताया मम च प्रीणितं मनः २
आर्यायाः सदृशं शीलं सीतायाः प्लवगर्षभाः ।
तपसा धारयेल्लोकान्क्रुद्धा वा निर्दहेदपि ३
सर्वथातिप्रकृष्टोऽसौ रावणो राक्षसेश्वरः ।
यस्य तां स्पृशतो गात्रं तपसा न विनाशितम् ४
न तदग्निशिखा कुर्यात्संस्पृष्टा पाणिना सती ।
जनकस्य सुता कुर्याद्यत्क्रोधकलुषीकृता ५
जाम्बवत्प्रमुखान्सर्वाननुज्ञाप्य महाकपीन् ।
अस्मिन्नेवगते कार्ये भवतां च निवेदिते ॥

---

झालेलें व शिल्लक राहिलेलें कार्य, शेवटास नेण्याची तुम्ही तजवीज करा ' (१६६–१६९)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसप्तक आदिकाव्यांतील सुंदर-काण्डापैकी अठ्ठावन्नावा सर्ग समाप्त झाला. ॥ ५८ ॥

त्यांना हें सर्व सांगितल्यानंतर वायुपुत्र हनुमान् आणखी ह्या त्यांना म्हणाला, " रामाचा उद्योग आणि सुग्रीवाची त्वरा, यांचें सार्थक झालें आहे आणि सीतेचें शील पाहून, माझ्याही मनाला आनंद झाला आहे. हे वानरश्रेष्ठहो, अशा प्रकारचें शील त्या साध्वी सीतेलाच योग्य आहे. आपल्या तपोबलावर ती त्रैलोक्याचें रक्षण करील आणि क्रुद्ध झाली, तर ती त्रैलोक्य दग्धही करून टाकील. ज्या अर्थी सीतेच्या शरीराला स्पर्श केला, असूनही तिच्या तपाच्या योगानें रावणाचा नाश झाला नाही, त्या अर्थी तो राक्षसाधिपति महातपस्वीच असला पाहिजे. जनककन्या सीता क्रुद्ध झाली असतां जें करील, तें हस्तस्पर्श झाला असतां प्रत्यक्ष अग्नीच्या ज्वालाही करूं शकणार नाहीं. आतां जांबवान् आदि सर्व महाकपींची अनुज्ञा घेतल्यानंतर, सीताशुद्धीचें कार्य येथपर्यंत

न्याय्यं स्म सह वैदेह्या द्रष्टुं तौ पार्थिवात्मजौ ६
अहमेकोऽपि पर्याप्तः सराक्षसगणां पुरीम् ।
तां लङ्कां तरसा हन्तुं रावणं च सराक्षसम् ७
किं पुनः सहितो वीरैर्बलवद्भिः कृतात्मभिः ।
कृतास्त्रैः प्लवगैः शक्तैर्भवद्भिर्विजयैषिभिः ८
अहं तु रावणं युद्धे ससैन्यं सपुरःसरम् ।
सहपुत्रं वधिष्यामि सहोदरयुतं युधि ९
ब्राह्ममस्त्रं च रौद्रं च वायव्यं वारुणं तथा १०
यदि शक्रजितोऽस्त्राणि दुर्निरीक्ष्याणि संयुगे ।
तान्यहं निहनिष्यामि विधमिष्यामि राक्षसान् ११
भवतामभ्यनुज्ञातो विक्रमो मे रुणद्धि तम् ।
मयातुला विसृष्टा हि शैलवृष्टिर्निरन्तरा १२
देवानपि रणे हन्यात्किं पुनस्तान्निशाचरान् ।
भवतामननुज्ञातो विक्रमो मे रुणद्धि माम् १३
सागरोऽप्यतियाद्वेलां मन्दरः प्रचलेदपि ।

---

त्याचें मी आपणास सांगितलें आहे म्हणून आता सीतेसह त्या राजकुमार रामलक्ष्मणाचें आपणाला दर्शन होणें शक्य आहे (१-६)

राक्षसगणासुद्धा ती लंकानगरी आणि इतर राक्षसांसह तो रावण याचा स्वसामर्थ्यानें वध करण्यास मी एकटाही समर्थ आहें मग वीर, बलाढ्य, सुशिक्षित, अस्त्रसंपन्न, शक्तिमान् आणि विजयेच्छु असलेल्या तुमची गोष्ट कशाला पाहिजे ? मी त्या रावणाचें सैन्य, पुढारी, पुत्र व सहोदर भ्राते यांसुद्धा रावणाचा युद्धामध्ये वध करीन. ब्राह्म, रौद्र, वायव्य आणि वारुण हीं संग्रामामध्ये शत्रूंची दृष्टि दिपवून टाकणारीं अस्त्रें इंद्रजिताजवळ असलीं, तरी मी त्या सर्वांचा नाश करून राक्षसांचा वध करीन तुमची अनुज्ञा झाली असता रावणाला बांधून टाकण्यास माझा एकट्याचा पराक्रमच पुरे होईल. मी एकसारखी अतुलनीय पाषाणवृष्टि सुरू केली, तर ती संग्रामामध्ये देवांचाही वध करील. मग त्या निशाचरांची कथा काय ? परंतु जोपर्यंत तुमची अनुज्ञा झाली नाही, तोपर्यंत मला

न जाम्बवन्तं समरे कम्पयेदरिवाहिनी ॥ १४
सर्वराक्षससङ्घानां राक्षसा ये च पूर्वजाः ।
अलमेकोऽपि नाशाय वीरो वालिसुतः कपिः ॥ १५
प्लवगस्योरुवेगेन नीलस्य च महात्मनः ।
मन्दरोऽप्यवशीर्येत किं पुनर्युधि राक्षसाः ॥ १६
सदेवासुरयक्षेषु गन्धर्वोरगपक्षिषु ।
मैन्दस्य प्रतियोद्धारं शंसत द्विविदस्य वा ॥ १७
अश्विपुत्रौ महावेगावेतौ प्लवगसत्तमौ ।
एनयोः प्रतियोद्धारं न पश्यामि रणाजिरे ॥ १८
मयैव निहता लङ्का दग्धा भस्मीकृता पुरी ।
राजमार्गेषु सर्वेषु नाम विश्रावितं मया ॥ १९
जयत्यतिबलो रामो लक्ष्मणश्च महाबलः ।
राजा जयति सुग्रीवो राघवेणाभिपालितः ॥ २०
अहं कोसलराजस्य दासः पवनसंभवः ।

---

पराभव करता येत नाही. मर्यादेचें उल्लंघन समुद्रही करील आणि कदाचित् मंदरपर्वतही स्थानापासून चळेल, परंतु संग्रामामध्ये जाम्बवन्ताला जेरीस आणण्यास शत्रूंची सेना समर्थ होणार नाही (७–१४)

एकंदर सर्व राक्षससमुदायाचा आणि त्यांच्या पूर्वज राक्षसांचा नाश करण्यास मी एकटाही पुरें आहे अथवा वालिपुत्र वीर अंगदही ते करण्यास समर्थ आहे. महात्म्या नीलवानराच्या प्रचंड आघाताने मंदरपर्वतही विशीर्ण होऊन जाईल, मग युद्धामध्ये राक्षसांची गोष्ट कशाला पाहिजे ? मैंदाशीं अथवा द्विविदाशीं सामना करणारा देव, असुर, यक्ष, गंधर्व, उरग आणि पक्षी यांमध्ये एखादा कोणी आहे का तें सांगा पाहूं ? हे महावेगवान वानरश्रेष्ठ अश्विनीकुमाराचे पुत्र आहेत. यांच्याशीं संग्रामामध्ये सामना करणारा मला कोणीही दिसत नाही. लंकानगरींतील मोठमोठ्या राक्षसांचा वध करून मी ती दग्ध करून टाकली आणि सर्व राजमार्गांमध्ये माझें नाव गाजविलें. "अतिबलाढ्य रामाचा व महाबलाढ्य लक्ष्मणाचा जयजयकार असो. राघवानें रक्षण केलेल्या सुग्रीवराजाचा विजय असो.

हनूमानिति सर्वत्र नाम विश्रावितं मया ॥ २१
अशोकवनिकामध्ये रावणस्य दुरात्मनः ।
अधस्ताच्छिंशपामूले साध्वी करुणमास्थिता ॥ २२
राक्षसीभिः परिवृता शोकसंतापकर्शिता ।
मेघलेखापरिवृता चन्द्रलेखेव निष्प्रभा ॥ २३
अचिन्तयन्ती वैदेही रावणं बलदर्पितम् ।
पतिव्रता च सुश्रोणी अवष्टब्धा च जानकी ॥ २४
अनुरक्ता हि वैदेही रामे सर्वात्मना शुभा ।
अनन्यचित्ता रामेण पौलोमीव पुरन्दरे ॥ २५
तदेकवासःसंवीता रजोध्वस्ता तथैव च ।
सा मया राक्षसीमध्ये तर्ज्यमाना मुहुर्मुहुः ॥ २६
राक्षसीभिर्विरूपाभिर्दृष्टा हि प्रमदावने ।
एकवेणीधरा दीना भर्तृचिन्तापरायणा ॥ २७
अधःशय्या विवर्णाङ्गी पद्मिनीव हिमोदये ।

---

मी वायुपुत्र हनुमान् कोसलदेशाधिपति रामाचा दास आहें." असें सर्व ठिकाणीं आपलें नाव गाजविलें आहे. (१८–२१)

दुरात्म्या रावणाच्या अशोकवनात एका शिसवीच्या झाडाखालीं साध्वी सीता दीनपणानें बसली आहे, राक्षसींनी तिला घेरून टाकिलें आहे, शोक व संताप यांनी ती कृश झाली असल्यामुळे, मेघपटलानें आच्छादित झालेल्या चंद्रकलेप्रमाणें ती निस्तेज दिसत आहे, परंतु बलामुळे मत्त झालेल्या रावणाला तिच्या खिजगणतीतही नाही, कारण तेथे अडकून टाकिलेली ती सुंदरी जानकी पतिव्रता आहे; रामावाचून मनामध्ये ती दुसऱ्या कशाचेही चिंतन करीत नाही आणि इंद्राणी ज्याप्रमाणे इंद्राचे ठिकाणी अनुरक्त आहे, त्याप्रमाणे ती रामाचे ठिकाणीं अनुरक्त आहे. तिच्या अंगावर धूळ उडालेली आहे. प्रमदावनात राक्षसींमध्ये असलेल्या त्या सीतेला अक्राळविक्राळ राक्षसी एकसारख्या धमकी देत आहेत, असे मी पाहिले आहें. भर्त्याचाच ध्यास घेऊन बसलेल्या त्या दीन सीतेनें केसांची एक वेणी बांधलेली आहे, ती भूमीवर शयन करीत आहे,

रावणाद्विनिवृत्तार्था मर्तव्यकृतनिश्चया ॥ २८
कथंचिन्मृगशावाक्षी विश्वासमुपपादिता ।
ततः संभाषिता चैव सर्वमर्थं प्रकाशिता ॥ २९
रामसुग्रीवसख्यं च श्रुत्वा प्रीतिमुपागता ।
नियतः समुदाचारो भक्तिर्भर्तरि चोत्तमा ॥ ३०
यन्न हन्ति दशग्रीवं स महात्मा दशाननः ।
निमित्तमात्रं रामस्तु वधे तस्य भविष्यति ॥ ३१
सा प्रकृत्यैव तन्वङ्गी तद्वियोगाच्च कर्शिता ।
प्रतिपत्पाठशीलस्य विद्येव तनुतां गता ॥ ३२
एवमास्ते महाभागा सीता शोकपरायणा ।
यदत्र प्रतिकर्तव्यं तत्सर्वमुपकल्प्यताम् ॥ ३३

इत्यार्षे श्रीमद्रामा० वाल्मी० आदिकाव्ये सुन्दरकाण्डे एकोनषष्टितम सर्ग ॥५९॥
[ २५७६ ]

हिंवाळा आला असता ज्याप्रमाणे कमलिनीची कांति पालटते, त्याप्रमाणे तिची कांति पालटून गेलेली आहे आणि रावणाच्या हातून सुटका होण्याविषयी निराश झाल्यामुळे यापुढे मरणाचाच निश्चय तिने केलेला आहे ( २२—२८ )

हरणाच्या पाडसाप्रमाणे जिचे डोळे आहेत, अशा त्या सीतेला मी कसातरी धीर दिला आणि तिच्याशीं संभाषण करून, मी सर्व कांहीं निवेदन केलें राम आणि सुग्रीव या उभयतामध्ये सख्य झाल्याचें ऐकताच तिला आनंद झाला. तिचें दृढ पातिव्रत्य एकसारखें टिकलेलें आहे आणि भर्त्याचे ठिकाणीं तिचा अनुपम भक्ति आहे इतकें असूनही सीतेच्या हातून रावणाचा वध होत नाहीं, यावरून तो रावण खरोखर महातपस्वी असला पाहिजे. तथापि सीतेला दुःख दिल्याच्या पातकानें तो आपोआप मृतप्रायच झालेला आहे अता राम त्याचा वध होण्याला निमित्त मात्र होईल ती सीता जातीचीच सडपातळ असून, त्या रामाच्या वियोगानें अधिकच कृश झालेली आहे आणि यामुळे प्रतिपदेचे दिवशीं अध्ययन करणाऱ्याच्या विद्येप्रमाणे ती अतिच बारीक झाली आहे सारांश, ती महाभाग्यवती सीता याप्रमाणे एकसारखा शोक करीत बसली आहे तेव्हा

षष्टितमः सर्गः ।

तस्य तद्वचनं श्रुत्वा वालिसूनुरभाषत ।
अश्विपुत्रौ महावेगौ बलवन्तौ प्लवङ्गमौ     १
पितामहवरोत्सेकात्परमं दर्पमास्थितौ ।
अश्विनोर्माननार्थं हि सर्वलोकपितामहः     २
सर्वावध्यत्वमतुलमनयोर्दत्तवान्पुरा ।
वरोत्सेकेन मत्तौ च प्रमथ्य महतीं चमूम्     ३
सुराणाममृतं वीरौ पीतवन्तौ महाबलौ ।
एतावेव हि संक्रुद्धौ सवाजिरथकुञ्जराम्     ४
लङ्कां नाशयितुं शक्तौ सर्वे तिष्ठन्तु वानराः ।
अहमेकोऽपि पर्याप्तः सराक्षसगणां पुरीम्     ५
तां लङ्कां तरसा हन्तुं रावणं च महाबलम् ।
किं पुनः सहितो वीरैर्बलवद्भिः कृतात्मभिः     ६

याला काय उपाय करावयाचा असेल, तो लवकर करण्याची तुम्ही सारे जण तजवीज करा. ( २९-३३ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यातील सुंदरकांडपैकी एकूणसाठावा सर्ग समाप्त झाला. ॥ ५९ ॥

तें त्या हनुमानाचें भाषण ऐकून घेतल्यावर वालिपुत्र अंगद म्हणाला, " हे महावेगवान् अश्विनीकुमारपुत्र मैंद व द्विविद वानर बलाढ्य आहेत, आणि ब्रह्मदेवाच्या वराने ते पराकाष्ठेचे गर्विष्ठ झालेले आहेत. अश्विनीकुमाराना मान देण्याकरिता सर्व लोकाधिपति ब्रह्मदेवाने पूर्वी याना " तुम्हाला कोणापासूनही पीडा होणार नाही, " असा अतुल वर दिला होता. त्या वराने मत्त होऊन व प्रचंड सेनेचा पराजय करून या महाबलाढ्य वीर वानरानी देवाचे अमृत प्राशन केलें. आता सर्व वानर स्वस्थ बसू द्या. क्रुद्ध झाले असता हेच उभयता अश्व, रथ व गज यासुद्धा लंकेचा नाश करण्यास समर्थ आहेत. अथवा तेथील राक्षसगणासह ती लंकानगरी आणि तेथला एकटा तो महाबलाढ्य रावण, याचा स्वसामर्थ्याने नाश करण्यास मी एकटाही पुरेसा आहें, मग बलवान्, वीर, सुशिक्षित, अस्त्रवेत्ते, समर्थ आणि विजयशाली असलेल्या तुमचें साहाय्य असल्यावर,

तमेवं कृतसंकल्पं जाम्बवान्हरिसत्तमः ।
उवाच परमप्रीतो वाक्यमर्थवदर्थवित् १४
नैषा बुद्धिर्महाबुद्धे यद्ब्रवीषि महाकपे ।
विचेतुं वयमाज्ञप्ता दक्षिणां दिशमुत्तमाम् १५
नानेतुं कपिराजेन नैव रामेण धीमता ।
कथंचिन्निर्जितां सीतामस्माभिर्नाभिरोचयेत् १६
राघवो नृपशार्दूलः कुलं व्यपदिशन्स्वकम् ।
प्रतिज्ञाय स्वयं राजा सीताविजयमग्रतः १७
सर्वेषां कपिमुख्यानां कथं मिथ्या करिष्यति ।
विफलं कर्म च कृतं भवेत्तुष्टिर्न तस्य च १८
वृथा च दर्शितं वीर्यं भवेद्वानरपुङ्गवाः ।
तस्माद्गच्छाम वै सर्वे यत्र रामः सलक्ष्मणः ।
सुग्रीवश्च महातेजाः कार्यस्यास्य निवेदने १९

---

वानर, लक्ष्मण, सुग्रीव व राम यांची भेट घ्यावी, हें बरें " ( ७-१३ )

याप्रमाणें वालिपुत्र अंगदाचें बोलणें ऐकल्यानंतर, त्याच्या भाषणाचें तत्त्व जाणणारा व नरश्रेष्ठ जांबवान् अतिशय संतुष्ट झाला आणि म्हणाला, " हे महाबुद्धिमान् श्रेष्ठ वानरा, तूं म्हणतोस तें खरें, परंतु हा विचार येथें उपयोगाचा नाही. कारण, दक्षिणदिशेमध्यें त्या श्रेष्ठ सीतादेवीचा शोध करण्याविषयींच फक्त आपणाला आज्ञा झालेली आहे " तिला घेऊन या " अशी वानरराज सुग्रीवानें अथवा विचारी रामानें आपणाला आज्ञा केलेली नाही शिवाय आपल्या कुळाचा अभिमान बाळगणाऱ्या नृपश्रेष्ठ रघुवंशज रामाला आपणच सीतेला जिंकून आणिलें, तर त्यांना हें बरें वाटणार नाही. या शिवाय सर्व व नरश्रेष्ठांसमक्ष रावणाला जिंकून स्वतः सीतेला आणावयाची असें त्या राजानें प्रतिज्ञा केली आहे, तर त्याची प्रतिज्ञा मिथ्या होणें योग्य कसें होईल? सारांश, हे वानरश्रेष्ठ हो, असें झालें असतां, आपला पराक्रम मात्र व्यर्थ जाईल आणि त्यालाही संतोष होणार नाही. हे वानरश्रेष्ठो, असें कार्य केल्यानें आपला पराक्रम मात्र व्यर्थ दर्शविल्यासारिखें होणार आहे, म्हणून हें झालेलें कार्य निवेदन करण्याकरितां लक्ष्मणासह राम आणि

न तावदेषा मतिरक्षमा नो यथा भवान्पश्यति राजपुत्र ।
यथा तु रामस्य मतिर्निविष्टा तथा भवान्पश्यतु कार्यसिद्धिम् २०
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे षष्टितमः सर्गः ॥६०॥

एकषष्टितमः सर्गः । [ २५९६ ]

ततो जाम्बवतो वाक्यमगृह्णन्त वनौकसः ।
अङ्गदप्रमुखा वीरा हनूमांश्च महाकपिः १
प्रीतिमन्तस्ततः सर्वे वायुपुत्रपुरःसराः ।
महेन्द्राग्रात्समुत्पत्य पुप्लुवुः प्लवगर्षभाः २
मेरुमन्दरसंकाशा मत्ता इव महागजाः ।
छादयन्त इवाकाशं महाकाया महाबलाः ३
सभाज्यमानं भूतैस्तमात्मवन्तं महाबलम् ।
हनूमन्तं महावेगं वहन्त इव दृष्टिभिः ४
राघवे चार्थनिर्वृत्तिं कर्तुं च परमं यशः ।
समाधाय समृद्धार्थाः कर्मसिद्धिभिरुन्नताः ५

महातेजस्वी सुग्रीव, हे जिकडे आहेत, तिकडे आपण सर्व जाऊं. हे राजपुत्र अंगदा, आमच्यासंबंधी झालेला आपला विचार अयोग्य आहे, असें नाही परंतु रामाचा विचार ज्याप्रमाणे ठरलेला आहे, त्याप्रमाणेच कार्यसिद्धि करून घेण्याकडे आपण लक्ष पुरवलें पाहिजे." ( १४–२० )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदरकाण्डापैकी साठावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६० ॥

नंतर अंगदप्रभृति वानरवीर आणि महाकपि हनुमान् यांनी जांबवानाचें म्हणणें कबूल केलें आणि वायुपुत्र हनुमानाला पुढें घालून, ते सर्वेही आनंदित झालेले वानरश्रेष्ठ महेंद्रपर्वताच्या शिखरापासून उड्या टाकीत–टाकीत पुढें निघाले शरीरानें धिप्पाड असल्यामुळे मेरुमंदरपर्वतासारखे आणि मोठ्या मोठ्या मत्त गजासारखे दिसणारे ते महाबलाढ्य वानर, जसें काही आकाशच आच्छादित करूं लागले आकाशामध्ये वसतव्य करणारे सिद्धप्रभृति भूतगण त्या महावेगवान् व महाबलाढ्य हनुमानाची प्रशंसा करूं लागले. या वेळीं ते वानरश्रेष्ठ दृष्टीनें

प्रियाख्यानोन्मुखाः सर्वे सर्वे युद्धाभिनन्दिनः ।
सर्वे रामप्रतीकारे निश्चितार्था मनस्विनः ६
प्लवमानाः समाप्लुत्य ततस्ते काननौकसः ।
नन्दनोपममासेदुर्वनं द्रुमशतायुतम् ७
यत्तन्मधुवनं नाम सुग्रीवस्याभिरक्षितम् ।
अधृष्यं सर्वभूतानां सर्वभूतमनोहरम् ८
यद्रक्षति महावीरः सदा दधिमुखः कपिः ।
मातुलः कपिमुख्यस्य सुग्रीवस्य महात्मनः ९
ते तद्वनमुपागम्य बभूवुः परमोत्कटाः ।
वानरा वानरेन्द्रस्य मनःकान्तं महावनम् १०
ततस्ते वानरा हृष्टा दृष्ट्वा मधुवनं महत् ।
कुमारमभ्ययाचन्त मधूनि मधुपिङ्गलाः ११

---

त्याला वाहूनच नेत आहेत की काय, अशा रीतीने ते त्याच्याकडे एकसारखे पाहूं लागले रामाची कार्यसिद्धि करण्याचा आणि पराकाष्ठेची कीर्ति गाजविण्याचा निश्चय करून चाललेले ते वानर सीतादर्शन, लंकादहन वगैरे कार्यांनी आनंदित झाले होते आणि पुढे काय करावयाचें, हेंही त्यानी ठरविलें होतें. प्रिय वार्ता कळविण्याविषयी ते सर्वही उत्सुक झाले होते, सर्वही युद्धाचे अभिनंदन करणारे होते आणि रामाच्या हातूनच रावणाचा प्रतिकार व्हावा, य विषयी त्या सर्वही विचारी वानराचा निश्चय कायम झालेला होता. ( १-६ )

आकाश व्यापून ते वानर उड्या टाकीत टाकीत जाऊ लागले. नंतर ते दोघडो वृक्ष असलेल्या एका नंदनतुल्य वनामध्ये येऊन पोचले तें सुग्रीवाचें मोठ्या दक्षतेने रक्षण करून ठेविलेलें मधुवन होतें तें मधुवन प्राणिमात्राच्या मनाला आल्हाद देणारें होतें आणि आज्ञेशिवाय कोणत्याही प्राण्याचा त्यांत प्रवेश होणें शक्य नव्हतें. वानरश्रेष्ठ महात्म्या सुग्रीवाचा मामा, दधिमुख नांवाचा महावीर वानर, त्याचें अहोरात्र रक्षण करीत असे वानरराज सुग्रीवाच्या मनाला आनंद देणाऱ्या त्या मधुवनासमीप गेल्यानंतर, ते वानर मधुपान करण्याला अतिशय उत्सुक झाले होते. असें तें मोठें मधुवन पाहून, ते वानर आनंदित झाले

तत. कुमारस्तान्वृद्धाञ्जाम्बवत्प्रमुखान्कपीन् ।
अनुमान्य ददौ तेषां निसर्गं मधुभक्षणे १२
ते निसृष्टा· कुमारेण धीमता वालिसूनुना ।
हरय समपद्यन्त द्रुमान्मधुकराकुलान् १३
भक्षयन्त सुगन्धीनि मूलानि च फलानि च ।
जग्मु प्रहर्षं ते सर्वे बभूवुश्च मदोत्कटा· १४
ततश्चानुमता· सर्वे सुसंहृष्टा वनौकस· ।
मुदिताश्च ततस्ते च प्रनृत्यन्ति ततस्तत· १५
गायन्ति केचित्प्रहसन्ति केचिन्नृत्यन्ति केचित्प्रणमन्ति केचित् ।
पठन्ति केचित्प्रचरन्ति केचित्प्लवन्ति केचित्प्रलपन्ति केचित् १६
परस्परं केचिदुपाश्रयन्ति परस्परं केचिदतिब्रुवन्ति ।
द्रुमाद्द्रुमं केचिदभिद्रवन्ति क्षितौ नगाग्रान्निपतन्ति केचित् १७
महीतलात्केचिदुदीर्णवेगा महाद्रुमाग्राण्यभिसंपतन्ति ।
गायन्तमन्य· प्रहसन्नुपैति रुदन्तमन्य प्ररुदन्नुपैति १८

आणि मधासारखा पिंगट वर्ण असलेल्या त्या वानराला मधुपान करण्याला परवानगी देण्याविषयी कुमार अंगदाची प्रार्थना केली नंतर कुमार अंगदाने, त्या जांबवान वगैरे वृद्ध वानरांचें अनुमोदन घेऊन, मधुपान करण्याविषयी त्यांना परवानगी दिली त्या वालिपुत्र, विचारी कुमार अंगदाची आज्ञा होताच ते वानर मधुमक्षिकांनी भरलेल्या वृक्षावर गेले तेथलीं त्यांना मुळें व सुगंधी फळें भक्षण केलीं आणि ते सर्वही आनंदित झाले व तर्र होऊन गेले ( ७–१४ )

अशा रीतीने अंगदाचें अनुमोदन मिळाल्यावर, सर्वही वानरांना अतिशय हर्ष झाला आणि आनंदित होऊन ते ठिकठिकाणी नाचू लागले काहीजण गाऊ लागले, काही हसू लागले काही नाचू लागले, कांही प्रणाम करू लागले, काही पठण करू लागले, कांही हिंडू लागले, काही उड्या मारू लागले, काही समापग करू लागले; काही एकमेकाकडे जाऊ लागले, कांही बाल्यामध्ये एकमेकावर ताण घेऊ लागले काही या वृक्षावरून त्या वृक्षावर उड्या मारू लागले, कांही वृक्षाग्रावरून भूमिवर उड्या टाकू लागले आणि कांही महावेगवान् वानर भूतलावरून मोठ्या मोठ्या वृक्षांच्या शेंड्यावर एकदम उड्या मारू लागले कोणी गाऊ

तुदन्तमन्यः प्रणुदन्नुपैति समाकुलं तत्कपिसैन्यमासीत् ।
न चात्र कश्चिन्न बभूव मत्तो न चात्र कश्चिन्न बभूव दृप्तः ॥ १९
ततो वनं तत्परिभक्ष्यमाणं द्रुमांश्च विध्वंसितपत्रपुष्पान् ।
समीक्ष्य कोपाद्दधिवक्त्रनामा निवारयामास कपिः कपींस्तान् ॥ २०
स तैः प्रवृद्धैः परिभर्त्स्यमानो वनस्य गोप्ता हरिवृद्धवीरः ।
चकार भूयो मतिमुग्रतेजा वनस्य रक्षां प्रति वानरेभ्यः ॥ २१
उवाच कांश्चित्परुषाण्यभीतमसक्तमन्यांश्च तलैर्जघान ।
समेत्य कैश्चित्कलहं चकार तथैव साम्नोपजगाम कांश्चित् ॥ २२
स तैर्मदात्प्रतिवार्यवेगैर्बलाच्च तेन प्रतिवार्यमाणैः ।
प्रधर्षणे त्यक्तभयैः समेत्य प्रकृष्यते चाप्यनवेक्ष्य दोषम् ॥ २३

लागला की, दुसरा हसत हसत त्याच्याकडे जाऊं लागे, कोणी रडूं लागला की, दुसराही थट्टेने रडत रडत त्याच्याकडे जाई. कोणी कुचाळी काढूं लागला, तर दुसराही त्याची कुचाळी काढण्याकरिता त्याच्याकडे जाऊं लागे. अशा रीतीने त्या वानरसेनेमध्ये एकच गोंधळ उडून गेला. या वेळीं मधुपान करून सर्व न झालेला आणि स्वसामर्थ्याबद्दल गर्व न चढलेला असा एकही वानर त्या सैन्यामध्ये राहिला नव्हता. ( १५–१९ )

याप्रमाणे तेथे जमलेले सर्व वानर सर्व प्रकारे त्या वनातील पदार्थ भक्षण करून टाकीत आहेत आणि वृक्षावरील पत्राचा व पुष्पाचा त्यानीं विध्वंस केला आहे, असें आढळून आल्यावर तो दधिमुख वानर रागारागाने त्या वानरांना परावृत्त करूं लागला; परंतु मद चढलेले ते वानर उलट त्याचीच निर्भर्त्सना करूं लागले. उग्र तेजाने युक्त असलेल्या त्या वनरक्षक वृद्ध वानरवीराने त्या वानरापासून वनाचें संरक्षण करण्याचे आणखी एकदा मनामध्ये आणिलें व काही काही वानराना तो निर्भयपणें कठोर शब्द बोलूं लागला; कांहींना, मुळींच उपेक्षा न करता, तो चपराका मारूं लागला; कांहींच्या जवळ येऊन तो बाचाबाची करूं लागला आणि कांहींनीं सामोपचारानेच वळवूं लागला; परंतु, मद चढल्यामुळे त्या वानराच्या लीला थोपवणें अशक्य प्राय होणें आणि तो आपल्या आड येईल, त्याच्यावर हल्ला करण्यामध्ये त्यांना मुळींच भय वाटेनासे

*

नखैस्तुदन्तो दशनैर्दशन्तस्तलैश्च पादैश्च समापयन्तः ।
मदात्कपिं ते कपयः समन्तान्महावनं निर्विषयं च चक्रुः २४

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वा० आदि० सुन्दरकाण्डे एकषष्टितमः सर्गः ॥६१॥[ २६२०]

द्विषष्टितमः सर्गः ।

तानुवाच हरिश्रेष्ठो हनूमान्वानरर्षभः ।
अव्यग्रमनसो यूयं मधु सेवत वानराः १
अहमावर्जयिष्यामि युष्माकं परिपन्थिनः ।
श्रुत्वा हनूमतो वाक्यं हरीणां प्रवरोऽङ्गदः २
प्रत्युवाच प्रसन्नात्मा पिबन्तु हरयो मधु ।
अवश्यं कृतकार्यस्य वाक्यं हनुमतो मया ३
अकार्यमपि कर्तव्यं किमङ्ग पुनरीदृशम् ।
अङ्गदस्य मुखाच्छ्रुत्वा वचनं वानरर्षभाः ४

---

झालें होतें. त्या वानरांना तो रक्षक आपल्या सामर्थ्याचे जोरावर परावृत्त करूं लागला, तेव्हा यत्किंचितही दोष मनामध्ये न आणतां ते वानर एकत्र जुळून उलट त्याला ओढूं लागले. कांहींनी नखांनी त्याचे ओचकारे काढले; कांहीजण दातांनी त्याला चावूं लागले आणि कांहीजण थपराकांनी व लाथांनी त्याला मृतप्राय करूं लागले. अशा रीतीने मद चढल्यामुळे त्या वानरांनी त्या सर्व महावनांतील कोणतीही भोग्य वस्तु शिल्लक ठेविली नाही. ( २०–२४)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदर-कांडापैकी एकसष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६१ ॥

त्या वानरांना प्रथमतः कपिश्रेष्ठ वानरोत्तम हनुमान् म्हणाला, ' हे वानर हो, तुम्ही स्वस्थ मनानें मध सेवन करा. तुम्हांला आड येणाऱ्याचें मी निवारण करीन. '' हें हनुमानाचें भाषण ऐकून, वानरश्रेष्ठ अंगद प्रसन्न मनानें म्हणाला, ' वानरांना मध सेवन करूं द्या. स्वीकृत कार्य पुरें करून आलेल्या वानराचें म्हणणें जरी अयोग्य असलें, तरीसुद्धा मला तें अवश्य सेवटास नेलें पाहिजे, मग अशाच्या अशा म्हणण्याची तर गोष्ट पाहिजे कशाला ? '' अंगदाच्या मुखांतून हें भाषण ऐकून, ते वानरश्रेष्ठ आनंदित होऊन, '' शाबास, शाबास. ''

साधुसाध्विति संहृष्टा वानराः प्रत्यपूजयन्।
पूजयित्वाङ्गदं सर्वे वानरा वानरर्षभम् ५
जग्मुर्मधुवनं यत्र नदीवेग इव द्रुतम्।
ते प्रविष्टा मधुवनं पालानाक्रम्य शक्तितः ६
अतिसर्गाच्च पटवो दृष्ट्वा श्रुत्वा च मैथिलीम्।
पपुः सर्वे मधु तदा रसवत्फलमाददुः ७
उत्पत्य च ततः सर्वे वनपालान्समागतान्।
ते ताडयन्तः शतशः सक्ता मधुवने तदा ८
मधूनि द्रोणमात्राणि बाहुभिः परिगृह्य ते।
पिबन्ति कपयः केचित्सङ्घशस्तत्र हृष्टवत् ९
घ्नन्ति स्म सहिताः सर्वे भक्षयन्ति तथापरे।
केचित्पीत्वापविध्यन्ति मधूनि मधुपिङ्गलाः १०
मधूच्छिष्टेन केचिच्च जघ्नुरन्योन्यमुत्कटाः।
अपरे वृक्षमूलेषु शाखा गृह्य व्यवस्थिताः ११

म्हणून त्याची प्रशंसा करूं लागले आणि वानरश्रेष्ठ अंगदाची प्रशंसा केल्यावर ते सर्वही वानर वृक्षावरून जाणाऱ्या नदीच्या वेगाप्रमाणे मधुवनाच्या मार्गाने चालूं लागले व आपल्या सामर्थ्याचे जोरावर रक्षकांना जमिनीवर लोळवून ते मधुवनामध्ये शिरले. हनुमानाला सीतेचें दर्शन झाल्यामुळे आणि इतरांना तिची वार्ता समजल्यामुळे ते निर्भय झालेले सर्वही वानर अंगदाच्या आज्ञेने मध पिऊं लागले आणि रसाने भरलेली फळेंही तोडूं लागले. (१-७)

वनरक्षक त्यांच्याकडे आले, तेव्हां उड्या मारून ते सर्वही वानर त्यांनाच मारूं लागले आणि शेंकडो टोळ्या करून ते मधुवनामध्ये मध प्राशन करण्याकरितां ठिकठिकाणीं एकमेकांस बिलगून उभे राहूं लागले. एक रांग करून शेर शेर मध हातामध्ये घेऊन, कांहीं वानर आनंदाने मध पिऊं लागले. कांहींजण मिळून एकदम वनरक्षकांना मारूं लागले, कांहीं भक्षण करण्यामध्ये गुंतले आणि मधासारखा पिंगट वर्ण असलेले कांहीं वानर मध पिऊन, पेळी फेकूनही देऊं लागले. कित्येक जण मद चढल्यामुळे एकमेकांला मधानेच मारूं लागले

अत्यर्थं च मदग्लानाः पर्णान्यास्तीर्य शेरते ।
उन्मत्तवेगाः प्लवगा मधुमत्ताश्च हृष्टवत् १२
क्षिपन्त्यपि तथान्योन्यं स्खलन्ति च तथापरे ।
केचित्क्ष्वेडान्प्रकुर्वन्ति केचित्कूजन्ति हृष्टवत् १३
हरयो मधुना मत्ताः केचित्सुप्ता महीतले ।
धृष्टाः केचिद्धसन्त्यन्ये केचित्कुर्वन्ति चेतरत् १४
कृत्वा केचिद्वदन्त्यन्ये केचिद्बुध्यन्ति चेतरत् । १५
येऽप्यत्र मधुपालाः स्युः प्रेष्या दधिमुखस्य तु ।
तेऽपि तैर्वानरैर्भीमैः प्रतिषिद्धा दिशो गताः १६
जानुभिश्च प्रधृष्टाश्च देवमार्गं च दर्शिताः ।
अब्रुवन्परमोद्विग्ना गत्वा दधिमुखं वचः १७
हनूमता दत्तवरैर्हतं मधुवनं बलात् ।

---

आणि काहीजण शाखा धरून वृक्षावर स्वस्थ बसूं लागले. मदानें अतिशय ग्लानि आल्यानंतर काहीजण पानें पसरून वर पडूं लागले आणि मध पिऊन मत्त झालेले काही वानर उन्मत्त पुरुषाप्रमाणे हसत-हसत एकमेकांत दांडगाई करू लागले ( ८-१२ )

काहीजण एकमेकाला ढकलूं लागले, काहीजण चालतां चालतां अडखळूं लागले, काही गर्जना करूं लागले आणि काही आनंदाने मंजुळ शब्द करूं लागले. मद्याने मत्त झालेले काही वानर जमिनीवरच गाढ झोपी गेले. काही धीट होते, ते हसूं लागले आणि काही रडूंही लागले. काही जण हाताने एक करून, तोंडाने भलतेंच बोलूं लागले आणि काही जण एक सांगितलें असतां भलतेंच समजूं लागले. ( १३-१५ )

त्या वनामध्ये दधिमुखाच्या हाताखालचे जे मधुरक्षक होते, त्यांचा त्या भयंकर वानरांशी हवे तें बोलून निषेध केला, त्यामुळे ते वाट फुटेल तिकडे निघून गेले त्यांपैकी काहींचे वानरांनी गुडघे धरून फरफटत ओढून नेलें आणि काहींना धरून आकाशामध्ये उंच फेकूनही दिलें. तेव्हां अतिशय भयभीत झालेले ते वन-रक्षक दधिमुखाकडे जाऊन म्हणाले, " हनुमानाने परवानगी दिलेल्या वानरांनी,

वयं च जानुभिर्घृष्टा देवमार्गं च दर्शिताः १८
तदा दधिमुखः क्रुद्धो वनपस्तत्र वानरः।
हतं मधुवनं दृष्ट्वा सान्त्वयामास तान्हरीन् १९
एतागच्छत गच्छामो वानरानतिदर्पितान्।
बलेनावारयिष्यामि प्रभुञ्जानान्मधूत्तमम् २०
श्रुत्वा दधिमुखस्येदं वचनं वानरर्षभाः।
पुनर्वीरा मधुवनं तेनैव सहिता ययुः २१
मध्ये चैषां दधिमुखः सुप्रगृह्य महातरुम्।
समभ्यधावन्वेगेन सर्वे ते च प्लवङ्गमाः २२
ते शिलाः पादपांश्चैव पाषाणानपि वानराः।
गृहीत्वाभ्यागमन्क्रुद्धा यत्र ते कपिकुञ्जराः २३
बलान्निवारयन्तश्च आसेदुर्हरयो हरीन्।
संदष्टोष्ठपुटाः क्रुद्धा भर्त्सयन्तो मुहुर्मुहुः २४
अथ दृष्ट्वा दधिमुखं क्रुद्धं वानरपुङ्गवाः।

---

बळजबरीने मधुवनाचा विध्वंस केला आमचे गुडघे धरून त्यांनी फरफटीत नेलें आणि उत्तर फेकूनही दिलें " हें ऐकून घेऊन वनरक्षक दधिमुख वानर रागवला आणि मधुवनाचा विध्वंस झालेला पाहून, त्यांना धीर देण्याकरिता तो म्हणाला, " चला या, आपण तिकडे जाऊं गर्वानें अतिशय चढून जाऊन अनुपम मध पीत असलेल्या त्या वानरांचें मी स्वतःच आपल्या सामर्थ्यानें निवारण करीन." ( १६ २० )

हें दधिमुखाचें भाषण ऐकून, ते वीर वानरश्रेष्ठ पुनरपि त्याच्याचबरोबर मधुवनामध्यें गेले दधिमुख त्यांच्यामध्यें राहून व एक महावृक्ष हातात घेऊन, वेगानें तिकडे धावूं लागला व त्याच्याबरोबर ते सर्वही वानर धावू लागले ते वानरश्रेष्ठ जिकडे सोध्या करीत होते, तिकडे हे दधिमुखाबरोबरचे वानर शिळा, वृक्ष आणि पाषाण घेऊन रागारागानें गेले आणि आपआपल्या सामर्थ्याप्रमाणें त्यांचें निवारण करण्याकरिता तेथील वानरांच्या समीप येऊन पोचल्यावर, रागानें दात ओठ खाऊन ते वारंवार त्यांची निर्भर्त्सना करूं लागले नंतर क्रुद्ध झालेल्या

अभ्यधावन्त वेगेन हनुमत्प्रमुखास्तदा ॥ २५
सवृक्षं तं महाबाहुमापतन्तं महाबलम् ।
वेगवन्तं विजग्राह बाहुभ्यां कुपितोऽङ्गदः ॥ २६
मदान्धो न कृपां चक्रे आर्यकोऽयं ममेति सः ।
अथैनं निष्पिपेषाशु वेगेन वसुधातले ॥ २७
स भग्नबाहूरुमुखो विह्वलः शोणितोक्षितः ।
प्रमुमोह महावीरो मुहूर्तं कपिकुञ्जरः ॥ २८
स कथंचिद्विमुक्तस्तैर्वानरैर्वानरर्षभः ।
उवाचैकान्तमागत्य स्वान्भृत्यान्समुपागतान् ॥ २९
एतागच्छत गच्छामो भर्ता नो यत्र वानरः ।
सुग्रीवो विपुलग्रीवः सह रामेण तिष्ठति ॥ ३०
सर्वं चैवाङ्गदे दोषं श्रावयिष्याम पार्थिवे ।
अमर्षी वचनं श्रुत्वा घातयिष्यति वानरान् ॥ ३१
इष्टं मधुवनं ह्येतत्सुग्रीवस्य महात्मनः ।

---

दधिमुखाला पाहताच हनुमप्रभृति वानरश्रेष्ठ मोठ्या त्वेषाने त्याच्या अंगावर धावून गेले (२१—२०)

तो महाबलाढ्य व महापराक्रमी वेगवान् दधिमुख वृक्ष घेऊन अंगावर येऊं लागला, तेव्हां क्रुद्ध झालेल्या अंगदाने हातांनीच त्याला आवळून धरिलें इतकेंच नव्हे तर मदांध झाल्यामुळे " हा मला पूज्य आहे, " असा विचार मनामध्ये न आणतां करुणेने त्याच्यावर दया न करतां अंगदाने त्याला वेगानें एकदम जमिनीवर आपटलें तेव्हां त्याचे हात, पाय व मुख ही फुटून रक्तानें भरून गेलीं व तो वानरश्रेष्ठ महावीर दधिमुख विव्हल झाला आणि एक मुहूर्तपर्यंत त्याला मूर्च्छाही आली नंतर कसातरी त्या वानरांच्या हातून सुटल्यावर, तो वानरश्रेष्ठ दधिमुख एकीकडे येऊन जवळ आलेल्या आपल्या सेवकांना म्हणाला (२५–२९)

' चला या, विशाल कंठ असलेला आपला राजा सुग्रीव वानर रामसह जिकडे आहे, तिकडे आपण जाऊं आणि हा सर्व अंगदाचा दोष आहे, असें आपण राजाला सांगूं म्हणजे हें वचन ऐकून तो रागीट सुग्रीव या दुष्ट वानरांचा

पितृपैतामहं दिव्यं देवैरपि दुरासदम् ३२
स वानरानिमान्सर्वान्मधुलुब्धान्गतायुषः।
घातयिष्यति दण्डेन सुग्रीवः ससुहृज्जनान् ३३
वध्या ह्येते दुरात्मानो नृपाज्ञापरिपन्थिनः।
अमर्षप्रभवो रोषः सफलो मे भविष्यति ३४
एवमुक्त्वा दधिमुखो वनपालान्महाबलः।
जगाम सहसोत्पत्य वनपालैः समन्वितः ३५
निमेषान्तरमात्रेण स हि प्राप्तो वनालयः।
सहस्रांशुसुतो धीमान्सुग्रीवो यत्र वानरः ३६
रामं च लक्ष्मणं चैव दृष्ट्वा सुग्रीवमेव च।
समप्रतिष्ठां जगतीमाकाशान्निपपात ह ३७
स निपत्य महावीरः सर्वैस्तैः परिवारितः।
हरिर्दधिमुखः पालैः पालानां परमेश्वरः ३८
स दीनवदनो भूत्वा कृत्वा शिरसि चाञ्जलिम्।

---

वध करील, कारण देवानाही मिळण्यास अशक्य, असं हें वाडवडिलापासून चालत आलेलें दिव्य मधुवन महत्त्वा सुग्रीवाला प्रिय आहे, यामुळे तो वानर सुहृज्जनांसह या सर्वही आसन्नमरण झालेल्या मधुलुब्ध वानरांना बाधून, मृत्यूचेच शिक्षा देईल आणि असें झालें, म्हणजे असहिष्णुतेमुळे उत्पन्न झालेला माझा राग शांत होईल, कारण हे दुरात्मे, मदांध वानर राजाज्ञा अमान्य करणारे आहेत" (३०-३४)

याप्रमाणे वनपालांना सांगितल्यावर तो महाबलाढ्य दधिमुख आपल्या सर्व वनपालांसह एकदम उड्डाण करून चालता झाला व एका निमिषामध्ये तो दधिमुख वनचर सूर्यपुत्र विचारी सुग्रीव वानर वसला होता, तिकडे गेला राम, लक्ष्मण व सुग्रीव यांना पाहिल्यावर तो आकाशातून सपाट भूमीवर खाली उतरला अशा प्रकारें ते सर्व वनपाल वानर चहूंभोवतीं असलेला तो वनपालाधिपति महावीर दधिमुख वानर आकाशातून खाली उतरला व त्याने दीन वदन करून

सुग्रीवस्याशु तौ मूर्ध्ना चरणौ प्रत्यपीडयत् ३९

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे द्विषष्टितमः सर्गः ॥६२॥

त्रिषष्टितमः सर्गः । [२६५९]

ततो मूर्ध्ना निपतितं वानरं वानरर्षभः ।
दृष्ट्वैवोद्विग्नहृदयो वाक्यमेतदुवाच ह १
उत्तिष्ठोत्तिष्ठ कस्मात्त्वं पादयोः पतितो मम ।
अभयं ते प्रदास्यामि सत्यमेवाभिधीयताम् २
किं संभ्रमाद्धितं कृत्स्नं ब्रूहि यद्वक्तुमर्हसि ।
कच्चिन्मधुवने स्वस्ति श्रोतुमिच्छामि वानर ३
स समाश्वासितस्तेन सुग्रीवेण महात्मना ।
उत्थाय स महाप्राज्ञो वाक्यं दधिमुखोऽब्रवीत् ४
नैवर्क्षजरसा राजन्न त्वया न च वालिना ।
वनं निसृष्टपूर्वं ते नादितं तत्तु वानरैः ५

---

त्याने मस्तकी दोन्ही हात जोडले आणि सुग्रीवाच्या चरणावर एकदम मस्तक ठेविलें ( ३५-३९ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणांतर्गत आदिकाव्यांतील सुन्दरकांडापैकी बासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६२ ॥

नंतर पायावर मस्तक ठेविलेल्या त्या दधिमुख वानराला पाहताक्षणी वानरश्रेष्ठ सुग्रीवाचें हृदय उद्विग्न झालें व तो त्याला म्हणाला, "ऊठ, ऊठ, तू माझ्या पाया कां पडला आहेस? या वेळीं जें सत्य असेल तें सांग। म्हणजे मी तुला अभय देईन. कोणत्या भीतीमुळें तूं येथे आला आहेस? जें कांहीं हित- प्रद असें असेल, तें सर्व तू मला सांग. हे वानरा, तुझ्याकडून निवेदन ऐक- ण्याची माझी इच्छा आहे. मधुवनामध्ये सर्व क्षेमकुशल आहे ना?" याप्रमाणें त्या महात्म्या सुग्रीवानें आश्वासन दिल्यावर तो महाबुद्धिमान दधिमुख उठला आणि म्हणाला. ( १-४ )

"हे राजा, ऋक्षरजानें, आपण अथवा वालीनें वानरांना यथेच्छ उपभोग घेण्याकरितां आजपर्यंत मधुवन कधींही देऊन टाकलेलें नाहीं. परंतु त्या वनाचा

न्यवारयमहं सर्वान्सहैभिर्वनचारिभिः ।
अचिन्तयित्वा मां हृष्टा भक्षयन्ति पिबन्ति च ६
एभिः प्रधर्षणायां च वारितं वनपालकैः ।
मामप्यचिन्तयन्देव भक्षयन्ति वनौकसः ७
शिष्टमत्रापविध्यन्ति भक्षयन्ति तथापरे ।
निवार्यमाणास्ते सर्वे भ्रुकुटिं दर्शयन्ति हि ८
इमे हि संरब्धतरास्तदा तैः संप्रधर्षिताः ।
निवार्यन्ते वनात्तस्मात्क्रुद्धैर्वानरपुङ्गवैः ९
ततस्तैर्बहुभिर्वीरैर्वानरैर्वानरर्षभाः ।
संरक्तनयनैः क्रोधाद्धरयः संप्रधर्षिताः १०
पाणिभिर्निहताः केचित्केचिज्जानुभिराहताः ।
प्रकृष्टाश्च तदा कामं देवमार्गं च दर्शिताः ११
एवमेते हताः शूरास्त्वयि तिष्ठति भर्तरि ।

आज वानरांनी विध्वंस केला. माझ्या या वनचरासह मी त्या सर्वांचें निवारण केलें; परंतु मला न जुमानितां ते आनंदाने मध प्राशन करीत आहेत व फळें भक्षण करीत आहेत. याप्रमाणे त्यांनी विध्वंस आरंभिला असतां वनपालांनी त्यांचें निवारण केलें; परंतु मलाही पर्वा न करतां, हे राजा, त्या वानरांनी खाण्याचा सपाटा चालविलाच आहे. खाऊन खाऊन अवशिष्ट राहिलेला मध ते कांही फेकून देत आहेत; कांही फळें भक्षण करीत आहेत आणि कोणी आडवाटी कहूं लागला असतां ते सर्वही क्रोधाने आपल्या भिवया चढवून भीति दाखवीत आहेत. ( ५-८ )

या वनपालांनी त्यांचें निवारण करण्याची अगदी शिकस्त केली आणि त्यांनी यांच्यावर हल्ला केला, तेव्हा हे क्रुद्ध वानरश्रेष्ठ त्यांना त्या वनांतून हाकून-ही देऊं लागले; परंतु क्रोधाने नेत्र लाल झालेल्या त्या असंख्य वीर वानरांनी या सर्व वनरक्षक वानरश्रेष्ठांचा पराभव केला. यांपैकी कांहींना चपराका बसल्या, कांहींना गुडघ्यांचे तडाखे बसले, कांहींना त्यांनी फरफर ओढीत नेलें आणि कांहींना आकाशामध्ये भिरकावून देऊन देवमार्गही त्यांनी दर्शन करविलें.

कृत्स्नं मधुवनं चैव प्रकामं तैश्च भक्ष्यते १२
एवं विज्ञाप्यमानं तं सुग्रीवं वानरर्षभम् ।
अपृच्छत्तं महाप्राज्ञो लक्ष्मणः परवीरहा १३
किमयं वानरो राजन्वनपः प्रत्युपस्थितः ।
किं चार्थमभिनिर्दिश्य दुःखितो वाक्यमब्रवीत् १४
एवमुक्तस्तु सुग्रीवो लक्ष्मणेन महात्मना ।
लक्ष्मणं प्रत्युवाचेदं वाक्यं वाक्यविशारदः १५
आर्य लक्ष्मण संप्राह वीरो दधिमुखः कपिः ।
अङ्गदप्रमुखैर्वीरैर्भक्षितं मधु वानरैः १६
नैषामकृतकार्याणामीदृशः स्याद्व्यतिक्रमः ।
वनं यदभिपन्नास्ते साधितं कर्म तद्ध्रुवम् १७
वारयन्तो भृशं प्राप्ताः पाला जानुभिराहताः ।
तथा न गणितश्चायं कपिर्दधिमुखो बली १८

---

अशा रीतीने आपण अधिपति विद्यमान असताना याप्रमाणे या वानरांनी मार बसला आहे आणि सर्व मधुवन ते वानर यथेष्ट भक्षण करीत आहेत." (९–१२)

याप्रमाणे वर्तमान दधिमुख त्या वानरश्रेष्ठ सुग्रीवाला सांगू लागला, तेव्हा शत्रुवीरनाशक महाबुद्धिमान लक्ष्मण सुग्रीवाला विचारू लागला, " हे राजा, हा वनपाल वानर कशाकरता येथे आला आहे ! आणि कशाकरिता हा दुःखित होऊन भाषण करीत आहे ? " याप्रमाणे महात्म्या लक्ष्मणाने सुग्रीवाला विचारिलें असता, संभाषण करण्यामध्ये निपुण असलेला तो सुग्रीव लक्ष्मणाला म्हणाला, " आर्या लक्ष्मणा, अंगदप्रभृति वीर वानरांनी मध भक्षण करून टाकल्याचें वृत्त वीर दधिमुख वानराने सांगितलें तथापि कार्यसिद्धि झाल्यावाचून त्यांच्या हातून असा अतिक्रम होणार नाही, हें खास. त्यांनी त्या अर्थी वनावर धाड घातली आहे, त्या अर्थी हातीं घेतलेलें तें कार्य त्यांनी निःसंशय पार पाडलें आहे. अहो, त्या वानरांना पराङ्मुख करण्याकरिता, हे वनपाल त्यांच्याकडे गेले असतां, उलट त्यांनीच यांना गुडघ्यांनी अतिशयच ताडन केलें आणि या बलवान दधिमुख वानरालाही त्यांनी जुमानिलें नाही. आम्ही स्वतः सारा वनाचा अधिपति म्हणून

पतिर्मम वनस्यायमस्माभिः स्थापितः स्वयम् ।
दृष्टा देवी न संदेहो न चान्येन हनूमता १९
न ह्यन्यः साधने हेतुः कर्मणोऽस्य हनूमतः ।
कार्यसिद्धिर्हनुमति मतिश्च हरिपुङ्गवे २०
व्यवसायश्च वीर्यं च श्रुतं चापि प्रतिष्ठितम् ।
जाम्बवान्यत्र नेता स्यादङ्गदश्च महाबलः २१
हनूमांश्चाप्यधिष्ठाता न तस्य गतिरन्यथा ।
अङ्गदप्रमुखैर्वीरैर्हतं मधुवनं किल २२
विचित्य दक्षिणामाशामागतैर्हरिपुङ्गवैः ।
आगतैश्च प्रहृष्टं तद्यथा मधुवनं हि तैः २३
धर्षितं च वनं कृत्स्नमुपयुक्तं तु वानरैः ।
पातिता वनपालास्ते तदा जानुभिराहताः २४
एतदर्थमयं प्राप्तो वक्तुं मधुरवागिह ।
नाम्ना दधिमुखो नाम हरिः प्रख्यातविक्रमः २५
दृष्टा सीता महाबाहो सौमित्रे पश्य तत्त्वतः ।

नेमिलें आहे. तेव्हा, सीतादेवी दृष्टीस पडली, यात संदेहच नाही, परंतु हनुमानावाचून ती दुसऱ्या कोणाच्या दृष्टीस पडली नाही, हें निश्चित. ( १३–१९ )

कारण, हें कार्य सिद्धीस नेण्यासारखा हनुमानावाचून दुसरा कोणीही समर्थ नाही. वानरश्रेष्ठ हनुमानाचे ठिकाणी कार्यसिद्धि, बुद्धि, उद्योग, सामर्थ्य आणि विद्या हें सर्व कांहीं आहे. जाम्बवान्, महाबलाढ्य अंगद आणि हनुमान् हे जेथे पुढारी आहेत, तेथे कार्यसिद्धीवाचून दुसरें कांही होणें शक्यच नाही. अंगदप्रभृति वीर वानरांनी खरोखर मधुवनाचा फडशा पाडला. दक्षिणदिशा शोधून, ते वानरश्रेष्ठ परत आले आणि ते आनंदाने मधुवनामध्ये परत आल्यावर त्यांनी वनावर हल्ला करून, तें सर्व खाऊनही टाकलें. त्यांनी वनपालांना उचलून फेकून दिलें आणि त्यांना जानूंनी तडाखेहि दिले. हें सांगण्याकरिता हा मधुर भाषण करणारा व पराक्रमाविषयी प्रख्यात असलेला दधिमुखनामक वानर येथे आला आहे. हे महापराक्रमी सुमित्रानंदना, सीता खरोखर दृष्टीस पडली. कारण, पहा हे

प्रीतिस्फीताक्षौ संप्रहृष्टौ कुमारौ दृष्ट्वा सिद्धार्थौ वानराणां च राजा।
अङ्गैः प्रहृष्टैः कार्यसिद्धिं विदित्वा बाह्वोरासन्नामतिमात्रं ननन्द॥३३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रिषष्टितमः सर्गः॥६३॥

चतुःषष्टितमः सर्गः। [२६६२]

सुग्रीवेणैवमुक्तस्तु हृष्टो दधिमुखः कपिः।
राघवं लक्ष्मणं चैव सुग्रीवं चाभ्यवादयत् १
स प्रणम्य च सुग्रीवं राघवौ च महाबलौ।
वानरैः सहितः शूरैर्दिवमेवोत्पपात ह २
स यथैवागतः पूर्वं तथैव त्वरितं गतः।
निपत्य गगनाद्भूमौ तद्वनं प्रविवेश ह ३
स प्रविष्टो मधुवनं ददर्श हरियूथपान्।
विमदानुद्धतान्सर्वान्मेहमानान्मधूदकम् ४
स तानुपागमद्वीरो बद्ध्वा करपुटाञ्जलिम्।

---

विषयी त्यानी केलेला प्रयत्न ऐकण्याची इच्छा आहे." आनंदामुळे ज्यांचे नेत्र विकसित झाले आहेत, असे ते राजकुमार रामलक्ष्मण आपले मनोरथ सिद्धीस गेल्याप्रमाणे आनंदित झालेले पाहून, आणि आपल्या शरीरावर आनंदाने उठलेल्या रोमांचावरून आपलें अंगीकृत कार्य सिद्धीस जाण्याची वेळ अगदीं जवळच आली असल्याचें जाणून, त्या वानरराज सुग्रीवाला अतिशय हर्ष झाला. (२८—३३)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडांतील त्रेसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६३ ॥

सुग्रीवाने असें सांगितल्यानंतर, आनंदित झालेल्या दधिमुख वानराने राम, लक्ष्मण व सुग्रीव यांना अभिवंदन केलें. नंतर महाबलाढ्य रामलक्ष्मणांना व सुग्रीवाला अभिवंदन केल्यावर, त्या दधिमुखाने आपल्या शूर वानरांसह आकाशामध्येंच उड्डाण केलें. ज्या त्वरेनें तो पूर्वी आला होता, त्याच त्वरेनें परत गेला आणि गगनांतून भूमीवर उतरला व त्या वनामध्यें आला. मधुवनामध्यें आल्यावर ते सर्वही वानरसेनाधिपति अमर्याद व मदरहित झालेले होते व ते मधार्तस्त्रावरच मुतत असल्याचें त्यानें पाहिलें. (१-८)

अभिगम्य यथा सर्वे पिबन्ति मधु वानराः २६
न चाप्यदृष्ट्वा वैदेहीं विश्रुताः पुरुषर्षभ ।
वनं दत्तवरं दिव्यं धर्षयेयुर्वनौकसः २७
ततः प्रहृष्टो धर्मात्मा लक्ष्मणः सहराघवः ।
श्रुत्वा कर्णसुखां वाणीं सुग्रीववदनाच्च्युताम् ॥
प्राहृष्यत भृशं रामो लक्ष्मणश्च महायशाः २८
श्रुत्वा दधिमुखस्यैवं सुग्रीवस्तु प्रहृष्य च ।
वनपालं पुनर्वाक्यं सुग्रीवः प्रत्यभाषत २९
प्रीतोऽस्मि सोऽहं यद्भुक्तं वनं तैः कृतकर्मभिः ।
धर्षितं मर्षणीयं च चेष्टितं कृतकर्मणाम् ३०
गच्छ शीघ्रं मधुवनं संरक्षस्व त्वमेव हि ।
शीघ्रं प्रेषय सर्वांस्तान्हनूमत्प्रमुखान्कपीन् ३१
इच्छामि शीघ्रं हनुमत्प्रधानाञ्शाखामृगांस्तान्मृगराजदर्पान् ।
प्रष्टुं कृतार्थान्सह राघवाभ्यां श्रोतुं च सीताधिगमे प्रयत्नम् ३२

सर्वही वानर इकडे येऊन मधुपान करीत आहेत. हे पुरुषश्रेष्ठा, प्रख्यात वानर वैदेही दृष्टीस पडल्यावाचून देवानी आम्हाला वर म्हणून अर्पण केलेल्या या दिव्य वनावर धाड घालणार नाहीत." ( २०–२७ )

नंतर हे कर्णेंद्रियाला सुखावह असे सुग्रीवाच्या मुखातून निघालेलें भाषण ऐकून, राम व धर्मात्म्या लक्ष्मणाला आनंद झाला आणि त्या उभयता महाकीर्तिमान रामलक्ष्मणाना अत्यंत हर्षही झाला. दधिमुखाचें याप्रमाणे भाषण ऐकल्यावर सुग्रीव आनंदित झाला आणि त्या वनपालाला पुनः म्हणाला, घेतलेली कामगिरी बजावलेल्या त्या वानरानी वन फस्त करून टाकलें आहे, याबद्दल मी प्रसन्न झालों आहें; कारण कामें करून आलेल्या वानराचें तें अमर्यादेचें वर्तन मला सहन करणें भाग आहे. यासाठी तूं सत्वर जा; तूंच मधुवनाचें संरक्षण कर आणि हनुमान् आदि सर्व वानराना तूं लवकर इकडे पाठवून दे रघुवंशज रामलक्ष्मणासह मला त्या सिंहतुल्य मानी असलेल्या मारुतिप्रभृति कृतकृत्य वानराना सत्वर प्रश्न करण्याची आणि सीतेच्या प्राप्ती-

प्रीतिस्फीताक्षौ संप्रहृष्टौ कुमारौ दृष्ट्वा सिद्धार्थौ वानराणां च राजा।
अङ्गैः प्रहृष्टैः कार्यसिद्धिं विदित्वा बाह्वोरासन्नामतिमात्रं ननन्द ३३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये सुन्दरकाण्डे त्रिषष्टितमः सर्गः ॥६३॥

चतुःषष्टितमः सर्गः ।	[२६९२]

सुग्रीवेणैवमुक्तस्तु हृष्टो दधिमुखः कपिः ।
राघवं लक्ष्मणं चैव सुग्रीवं चाभ्यवादयत्	१
स प्रणम्य च सुग्रीवं राघवौ च महाबलौ ।
वानरैः सहितः शूरैर्दिवमेवोत्पपात ह	२
स यथैवागतः पूर्वं तथैव त्वरितं गतः ।
निपत्य गगनाद्भूमौ तद्वनं प्रविवेश ह	३
स प्रविष्टो मधुवनं ददर्श हरियूथपान् ।
विमदानुद्धतान्सर्वान्मेहमानान्मधूदकम्	४
स तानुपागमद्वीरो बद्ध्वा करपुटाञ्जलिम् ।

विषयी त्यांनी केलेला प्रयत्न ऐकण्याची इच्छा आहे." आनंदामुळें ज्याचे नेत्र विकसित झाले आहेत, असे ते राजकुमार रामलक्ष्मण आपले मनोरथ सिद्धीस गेल्याप्रमाणें आनंदित झालेले पाहून, आणि आपल्या शरीरावर आनंदानें उठलेल्या रोमांचावरून आपलें अंगीकृत कार्य सिद्धीस जाण्याची वेळ अगदी जवळच आली असल्याचें जाणून, त्या वानरराज सुग्रीवाला अतिशय हर्ष झाला. ( २८—३३ )

याप्रमाणें महर्षि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडांतील त्रेसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६३ ॥

सुग्रीवानें असें सांगितल्यानंतर, आनंदित झालेल्या दधिमुख वानरानें राम, लक्ष्मण व सुग्रीव यांना अभिवंदन केलें. नंतर महाबलाढ्य रामलक्ष्मणांना व सुग्रीवाला अभिवंदन केल्यावर, त्या दधिमुखानें आपल्या शूर वानरांसह आकाशामध्येच उड्डाण केलें. ज्या त्वरेनें तो पूर्वी आला होता, त्याच त्वरेनें परत गेला आणि गगनांतून भूमीवर उतरला व त्या वनामध्ये आला. मधुवनामध्यें आल्यावर ते सर्वही वानरसेनाधिपति अमर्याद व मदरहित झालेले होते व ते मधातील उदकच मुतत असल्याचें त्यानें पाहिलें. ( १–८ )

उवाच वचनं श्लक्ष्णमिदं हृष्टवदङ्गदम् ५
सौम्य रोषो न कर्तव्यो यदेभिः परिवारणम् ।
अज्ञानाद्रक्षिभिः क्रोधाद्भवन्तः प्रतिषेधिताः ६
श्रान्तो दूरादनुप्राप्तो भक्षयस्व स्वकं मधु ।
युवराजस्त्वमीशश्च वनस्यास्य महाबल ७
मौर्ख्यात्पूर्वं कृतो रोषस्तद्भवान्क्षन्तुमर्हति ।
यथैव हि पिता तेऽभूत्पूर्वं हरिगणेश्वरः ८
तथा त्वमपि सुग्रीवो नान्यस्तु हरिसत्तम ।
आख्यातं हि मया गत्वा पितृव्यस्य तवानघ ९
इहोपयानं सर्वेषामेतेषां वनचारिणाम् ।
भवदागमनं श्रुत्वा सहैभिर्वनचारिभिः १०
प्रहृष्टो न तु रुष्टोऽसौ वनं श्रुत्वा प्रधर्षितम् ।
प्रहृष्टो मां पितृव्यस्ते सुग्रीवो वानरेश्वरः ११
शीघ्रं प्रेषय सर्वांस्तानिति होवाच पार्थिव ।
श्रुत्वा दधिमुखस्यैतद्वचनं श्लक्ष्णमङ्गदः १२

नंतर तो वीर त्याच्याजवळ गेला आणि हात जोडून आनंदाने अंगदास मृदु शब्दाने म्हणाला की, " हे सौम्य, यांनी तुम्हाला अडथळा केला, याबद्दल तुम्ही राग मानूं नका अज्ञानामुळे वनरक्षकांनी तुमचा निषेध केला आहे हे महाबलाढ्य अंगदा, तूं लांबून आल्यामुळे फार दमला आहेस यासाठी तूं स्वतःचा मध भक्षण कर कारण तूं युवराज असल्यामुळे या वनाचा अधिपतीच आहेस. पूर्वी आम्ही मूर्खपणामुळे तुमच्यावर रागवलों, त्याची तूं आम्हाला क्षमा कर. पूर्वी ज्याप्रमाणे तुझा पिता वानरसमुदायाचा अधिपति होता, तसा तूंही वानरसमुदायाचा अधिपतीच आहेस. हे वानरश्रेष्ठा, तूं सुग्रीवच आहेस, कोणी परका नाहीस. हे निष्पापा, अंगदा, मी तुझ्या पितृव्याकडे जाऊन, हे सर्व वानर येथे आल्याचें त्याला सांगितलें, तेव्हा वानरांसह तुझें आगमन झाल्याचें ऐकून, त्याला तुमच्या या कृत्याचा राग आला नाही-उलट त्याला फार आनंद झाला आहे. वनाची तुम्ही नासाडी केल्याचें ऐकल्यावरही तुझा पितृव्य वानराधिपति राजा

अब्रवीत्तान्हरिश्रेष्ठो वाक्यं वाक्यविशारदः ।
शङ्के श्रुतोऽयं वृत्तान्तो रामेण हरियूथपाः १३
अयं च हर्षादाख्याति तेन जानामि हेतुना ।
तत्क्षमं नेह नः स्थातुं कृते कार्ये परन्तपाः १४
पीत्वा मधु यथाकामं विक्रान्ता वनचारिणः ।
किं शेषं गमनं तत्र सुग्रीवो यत्र वानरः १५
सर्वे यथा मां वक्ष्यन्ति समेत्य हरिपुङ्गवाः ।
तथास्मि कर्ता कर्तव्ये भवद्भिः परवानहम् १६
नाज्ञापयितुमीशोऽहं युवराजोऽस्मि यद्यपि ।
अयुक्तं कृतकर्माणो यूयं धर्षयितुं बलात् १७
ब्रुवतश्चाङ्गदस्यैवं श्रुत्वा वचनमुत्तमम् ।
प्रहृष्टमनसो वाक्यमिदमूचुर्वनौकसः १८
एवं वक्ष्यति को राजन्प्रभुः सन्वानरर्षभ ।

सुग्रीव आनंदित होऊन मला म्हणाला, " त्या सर्वांना इकडे पाठवून दे." दधिमुखाचें हें मधुर भाषण ऐकून तो संभाषणचतुर वानरश्रेष्ठ अंगद त्या वानरांना म्हणाला " हे वानरसेनाधिपतींनो, रामाच्याही कानावर हा वृत्तांत गेला असावा, अशी मला शंका वाटत आहे; कारण हा दधिमुख हर्षानें असें आपल्याशीं बोलत आहे, यावरून माझें असें अनुमान आहे. याकरतां हे शत्रुतापन वानरहो, कार्यसिद्धि झाल्यावर येथें राहणें आपणाला योग्य नाही. ( ६-१४ )

पराक्रमी वानरांनीं यथेष्ट मधुपान केल्यानंतर, मग शिल्लक काय राहिलें ? सुग्रीव वानर जिकडे आहे तिकडे जाणें, एवढेंच आता अवशिष्ट कार्य राहिलेलें आहे. सर्व वानरश्रेष्ठ एकत्र जुळून जसें मला सांगतील, तसें मी करीन; कारण पुढें काय करावयाचें, याविषयीं मी सर्वस्वीं तुमच्यावर अवलंबून आहें. मी जरी युवराज असलों, तरी तुम्हाला आज्ञा करण्यास समर्थ नाहीं. तुम्ही काम शेवटास नेलें असल्यानें तुम्हाला सत्तेच्या जोरावर चाकविणें कदापि योग्य नाहीं." ( १५-१७ )

अशा प्रकारें बोलत असलेल्या अंगदाचें, तें उत्कृष्ट भाषण ऐकून सर्व वानर मनामध्यें आनंदित झाले आणि म्हणाले,"हे वानरश्रेष्ठा, राजा, स्वतः सर्वांचा प्रभु

ऐश्वर्यमदमत्तो हि सर्वोऽहमिति मन्यते १९
तव चेदं सुसदृशं वाक्यं नान्यस्य कस्यचित् ।
सन्नतिर्हि तवाख्याति भविष्यच्छुभयोग्यताम् २०
सर्वे वयमपि प्राप्तास्तत्र गन्तुं कृतक्षणाः ।
स यत्र हरिवीराणां सुग्रीवः पतिरव्ययः २१
त्वया ह्यनुक्तैर्हरिभिर्नैव शक्यं पदात्पदम् ।
क्वचिद्गन्तुं हरिश्रेष्ठ ब्रूमः सत्यमिदं तु ते २२
एवं तु वदतां तेषामङ्गदः प्रत्यभाषत ।
साधु गच्छाम इत्युक्त्वा खमुत्पेतुर्महाबलाः २३
उत्पतन्तमनूत्पेतुः सर्वे ते हरियूथपाः ।
कृत्वाकाशं निराकाशं यन्त्रोत्क्षिप्ता इवोपलाः २४
अङ्गदं पुरतः कृत्वा हनूमन्तं च वानरम् ।
तेऽम्बरं सहसोत्पत्य वेगवन्तः प्लवङ्गमाः २५
विनदन्तो महानादं घना वातेरिता यथा

असून, असें कोण बरें म्हणणारा आहे ? कोणीही झाला तरी ऐश्वर्यमदानें मत्त होऊन, मी-मीच म्हणत असतो असें भाषण करणें तुलाच योग्य आहे, दुसऱ्या कोणालाही योग्य नाही. तसा हा विनयच पुढें तुला मोठी योग्यता प्राप्त होणार, हें सुचवीत आहे जेथे तो वानरवीरांचा अक्षय अधिपति सुग्रीव आहे, तेथे जाण्यास आम्ही येथे आलेले सर्वही उत्सुक आहोंत हे वानरश्रेष्ठा, तुझ्या आज्ञेवाचून कोठेही एक पाऊलदेखील टाकण्यास वानर समर्थ नाहीत, हें आम्ही तुला अगदी खरेंखरें सांगतों " ( १८–२२ )

याप्रमाणे त्यांनी सांगितल्यावर अंगदानेही त्यांना समयोचित उत्तर दिलें आणि नतर " ठीक अहे, आपण तिकडे जाऊं, " असें म्हणून त्या महाबलाढ्य वानरांनी आकाशामध्ये उड्डाण केलें, अंगद उड्डाण करून जाऊं लागला, त्याबरोबर ते सर्वही वानरसेनाधिपति आकाश व्याप्त करून, यंत्रांतून सुटलेल्या पाषाणाप्रमाणे सत्वर उड्डाण करून निघाले अगद आणि हनुमान् वानर यांना पुढे करून त्या वेगवान् वानरांनी आकाशामध्ये एकदम उड्डाण केलें आणि वायूचा तडाखा

अङ्गदे समनुप्राप्ते सुग्रीवो वानरेश्वरः २६
उवाच शोकसंतप्तं रामं कमललोचनम् ।
समाश्वसिहि भद्रं ते दृष्टा देवी न संशयः २७
नागन्तुमिह शक्यं तैरतीतसमयैरिह ।
अङ्गदस्य प्रहर्षाच्च जानामि शुभदर्शन २८
न मत्सकाशमागच्छेत्कृत्ये हि विनिपातिते ।
युवराजो महाबाहुः प्लवतामङ्गदो वरः २९
यद्यप्यकृतकृत्यानामीदृशः स्यादुपक्रमः ।
भवेत्तु दीनवदनो भ्रान्तविप्लुतमानसः ३०
पितृपैतामहं चैतत्पूर्वकैरभिरक्षितम् ।
न मे मधुवनं हन्यादृदृष्ट्वा जनकात्मजाम् ३१
कौसल्या सुप्रजा राम समाश्वसिहि सुव्रत ।
दृष्टा देवी न संदेहो न चान्येन हनूमता ३२

असलेल्या मेघाप्रमाणे ते उच्च स्वराने गर्जना करूं लागले. इकडे अंगद निघाल्यावर वानराधिपति सुग्रीव, शोकमग्न झालेल्या कमलनयन रामाला म्हणाला," तुझें कल्याण असो, धीर धर. देवी दृष्टीस पडली यात मुळीच संशय नाही (२३-२७)

वानरास दिलेल्या कालमर्यादेचें उल्लंघन झालें असल्यामुळे, त्याच्या हातून जर तें कार्य झालें नसतें, तर ते येथे येणेंच अशक्य होतें, परंतु हे शुभदर्शना, अंगदाला झालेल्या आनंदावरून आपलें कार्य शेवटास गेलें असावें, असें माझें अनुमान आहे. कारण वानरामध्ये श्रेष्ठ असलेला हा महापराक्रमी युवराज अंगद कार्य शेवटास गेलें नाही, तर माझ्याकडे कदापि येणार नाही. हातून कार्यसिद्धि झाली नसतानाही इतर वानरानी कदाचित् अशा प्रकारचें चाळे आरंभिले असते, परंतु अंगद मात्र दीनवदन होऊन मनामध्ये अगदी गोंधळून गेला असता वाडवडिलापासून चालत आलेल्या आणि पूर्वजानी रक्षण करून ठेविलेल्या या मधुवनाचा, जनककन्या दृष्टीस पडल्याशिवाय तो नाश करणारच नाही. (२८-३१)

हे सुव्रता रामा, कौसल्या सुपुत्रवती आहे तूं धीर धर. देवी दृष्टीं पडली, यात संशयच नाही आणि ती एका हनुमानाच्याच दृष्टीस पडली आहे, यातही

न ह्यस्य कर्मणो हेतुः साधने तद्विधो भवेत् ।
हनूमतीह सिद्धिश्च मतिश्च मतिसत्तम ३३
व्यवसायश्च शौर्यं च श्रुतं चापि प्रतिष्ठितम् ।
जाम्बवान्यत्र नेता स्यादङ्गदश्च हरीश्वरः ३४
हनूमांश्चाप्यधिष्ठाता न तस्य गतिरन्यथा ।
मा भूश्चिन्तासमायुक्तः संप्रत्यमितविक्रम ३५
यदा हि दर्पितोदग्राः संगताः काननौकसः ।
नैषामकृतकार्याणामीदृशः स्यादुपक्रमः ३६
वनभङ्गेन जानामि मधूनां भक्षणेन च ।
ततः किलकिलाशब्दं शुश्रावासन्नमम्बरे ३७
हनूमत्कर्मदृप्तानां नदतां काननौकसाम् ।
किष्किन्धामुपयातानां सिद्धिं कथयतामिव ३८
ततः श्रुत्वा निनादं तं कपीनां कपिसत्तमः ।
आयताञ्चितलाङ्गूलः सोऽभवद्धृष्टमानसः ३९

संदेह नाही हें कार्य सिद्धीस नेणारा त्याच्यासारखा दुसरा कोणीही नाही हे श्रेष्ठ बुद्धिमन्ता, या वानरसैन्यामध्ये हनुमानाचेच ठिकाणीं बुद्धि, सिद्धि, उद्योग, शौर्य आणि ज्ञान हीं वास्तव्य करीत आहेत. अरे, जाम्बवान् आणि वानराधिपति अंगद हे जेथे पुढारी आहेत आणि हनुमान् जेथे मुख्य आहे, तेथे कार्यसिद्धीवाचून दुसरा भलताच प्रकार कधीही व्हावयाचा नाही. याकरितां हे अतुलपराक्रमी रामा, सांप्रत तुला काळजी करण्याचें प्रयोजन नाही ज्या अर्थी वानर गर्वाने चढून जाऊन एकत्र जुळलेले आहेत, त्या अर्थी कार्यसिद्धि झाल्याशिवाय त्यांच्या हातून असा प्रकार कधीं घडणार नाही वनभंग आणि मधुभक्षण, यावरून कार्य सिद्धि झाली असावी, असें मी समजत आहें " ( ३२–३७ )

इतक्यात हनुमानाच्या पराक्रमामुळे गर्वयुक्त झालेल्या आणि कार्यसिद्धि झाली, हें समजाविण्याकरितांच की काय गर्जना करीत करीत किष्किंधेनजिक आलेल्या अरण्यवासी वानरांचा शब्द सुग्रीवाने ऐकला व तो मनामध्ये आनंदित झाला आणि त्याचें पुच्छ दीर्घ व रोमांचयुक्त झालें इतक्यांत अंगद

आजग्मुस्तेऽपि हरयो रामदर्शनकाङ्क्षिणः ।
अङ्गदं पुरतः कृत्वा हनूमन्तं च वानरम् ४०
तेऽङ्गदप्रमुखा वीराः प्रहृष्टाश्च मदान्विताः ।
निपेतुर्हरिराजस्य समीपे राघवस्य च ४१
हनूमांश्च महाबाहुः प्रणम्य शिरसा ततः ।
नियतामक्षतां देवीं राघवाय न्यवेदयत् ४२
दृष्टा देवीति हनुमद्वदनादमृतोपमम् ।
आकर्ण्य वचनं रामो हर्षमाप सलक्ष्मणः ४३
निश्चितार्थं ततस्तस्मिन्सुग्रीवं पवनात्मजे ।
लक्ष्मणः प्रीतिमान्प्रीतो बहुमानादवैक्षत ४४
प्रीत्या च परमोपेतो राघवः परवीरहा ।
बहुमानेन महता हनूमन्तमवैक्षत ४५

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे चतुःषष्टितमः सर्गः ॥६४॥

पञ्चषष्टितमः सर्गः । [२७३०]

ततः प्रस्रवणं शैलं ते गत्वा चित्रकाननम् ।

---

आणि हनुमान् वानर यांना पुढे करून रामदर्शनाकरिता ते सर्व कपीहि तेथे आले. (३८—४०)

ते अंगदप्रभृति उत्साही व आनंदित झालेले वीर वानरराज सुग्रीव आणि राम यांच्याजवळ येऊन पोचल्यावर, महापराक्रमी हनुमानाने त्यांना मस्तकाने प्रणाम करून, रामाला सीतादेवी शुद्ध आणि क्षतरहित असल्याचें कळवलें. "सीतादेवी दृष्टीस पडली," हें अमृततुल्य वाक्य हनुमानाच्या मुखांतून ऐकताक्षणीं रामलक्ष्मणांना हर्ष झाला. नंतर त्या वायुपुत्र हनुमानाचे पराक्रमाविषयीं ज्यानें निश्चयपूर्वक सांगितलें होतें, त्या सुग्रीवाकडे आनंदित झालेल्या लक्ष्मणानें बहुमानानें प्रेमपूर्वक पाहिलें आणि शत्रुपक्षीय वीरनाशक रामही अतिशय संतुष्ट होऊन, त्यानें मोठ्या आदरपूर्वक नजरेनें हनुमानाकडे नजर टाकली (४१-४५)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील सुंदर-काण्डांपैकीं चौसष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६४ ॥

प्रणम्य शिरसा रामं लक्ष्मणं च महाबलम् १
युवराजं पुरस्कृत्य सुग्रीवमभिवाद्य च ।
प्रवृत्तिमथ सीतायाः प्रवक्तुमुपचक्रमे २
रावणान्तःपुरे रोधं राक्षसीभिश्च तर्जनम् ।
रामे समनुरागं च यथा च नियमः कृतः ३
एतदाख्याय ते सर्वं हरयो रामसंनिधौ ।
वैदेहीमक्षतां श्रुत्वा रामस्तूत्तरमब्रवीत् ४
क्व सीता वर्तते देवी कथं च मयि वर्तते ।
एतन्मे सर्वमाख्यात वैदेहीं प्रति वानराः ५
रामस्य गदितं श्रुत्वा हरयो रामसंनिधौ ।
चोदयन्ति हनूमन्तं सीतावृत्तान्तकोविदम् ६
श्रुत्वा तु वचनं तेषां हनूमान्मारुतात्मजः ।
प्रणम्य शिरसा देव्यै सीतायै तां दिशं प्रति ७
उवाच वाक्यं वाक्यज्ञः सीताया दर्शनं यथा ।

नंतर अनेक चित्रविचित्र वनें असलेल्या प्रस्रवण पर्वतावर जाऊन त्या वानरांनी महाबलाढ्य रामलक्ष्मणांना मस्तकानें प्रणाम केला आणि युवराज अंगदाला पुढें करून व सुग्रीवाला अभिवादन करून, त्यांना सीतेचा वृत्तांत सांगण्यास आरंभ केला. रावणाच्या अंतःपुरामध्यें सीतेचा निरोध, राक्षसींकडून तिला मिळत असलेली धमकी, रामाचे ठिकाणीं असलेलें तिचें प्रेम आणि रावणानें दिलेली मुदत, हें सर्व त्यांना निवेदन करून, ते वानर रामाचे संनिध उभे राहिले. तेव्हां सीता सुरक्षित आहे, असें ऐकून राम त्यांना म्हणाला (१–४)

" हे वानरहो, सीतादेवी आहे कोठें ? आणि माझ्याविषयीं तिचें आचरण कसें आहे ? सीतेसंबंधीं ही सर्व माहिती तुम्ही मला सांगून कथन करा " हें रामाचें म्हणणें ऐकून त्याचे संनिध असलेल्या वानरांनी, सीतेचा सर्व वृत्तांत जाणणाऱ्या हनुमानाला, तो सविस्तर सांगण्याची विनंती केली. तेव्हां त्यांची विनंती ऐकून घेऊन, वायुपुत्र हनुमानानें प्रथम त्या दक्षिण दिशेकडे असलेल्या सीतादेवीला मस्तकानें प्रणाम केला आणि सीतेचें दर्शन कसें झालें, या विषयीं तो हनुमान्

तं मणिं काञ्चनं दिव्यं दीप्यमानं स्वतेजसा　८
दत्त्वा रामाय हनुमांस्ततः प्राञ्जलिरब्रवीत् ।
समुद्रं लङ्घयित्वाहं शतयोजनमायतम्　९
अगच्छं जानकीं सीतां मार्गमाणो दिदृक्षया ।
तत्र लङ्केति नगरी रावणस्य दुरात्मनः　१०
दक्षिणस्य समुद्रस्य तीरे वसति दक्षिणे ।
तत्र सीता मया दृष्टा रावणान्तःपुरे सती　११
त्वयि संन्यस्य जीवन्ती रामा राम मनोरथम् ।
दृष्टा मे राक्षसीमध्ये तर्ज्यमाना मुहुर्मुहुः　१२
राक्षसीभिर्विरूपाभी रक्षिता प्रमदावने ।
दुःखमापद्यते देवी त्वया वीर सुखोचिता　१३
रावणान्तःपुरे रुद्धा राक्षसीभिः सुरक्षिता ।
एकवेणीधरा दीना त्वयि चिन्तापरायणा　१४
अधःशय्या विवर्णाङ्गी पद्मिनीव हिमागमे ।

रामाशीं भ पण कहूं लागला. प्रथमतः तें स्वत-च्या तेजाने झळकत असलेलें दिव्य सुवर्णरत्न रामाला दिल्यावर, हनुमान् हात जोडून म्हणाला, "शंभर योजनें विस्तीर्ण असलेल्या समुद्राचें उल्लंघन करून, मी जनककन्या सीतेचें दर्शन घेण्याच्या उद्देशानें, सर्वत्र इकडेतिकडे पहात पहात तिच्यासमीप गेलों. त्या ठिकाणीं समुद्राच्या दक्षिण तीरावर दुरात्म्या रावणाची लंका नांवाची एक नगरी आहे. तेथे रावणाच्या अंतःपुरांत साध्वी सीता माझ्या दृष्टीस पडली. (५-११)

हे रामा, ती सुंदरी सीता आपल्या सर्व मनोरथाचा भार तुमच्यावर ठेवूनच जिवंत राहिली आहे. मी जेव्हा तिला पाहिलें, तेव्हा ती राक्षसींमध्यें होती व तिला वारंवार त्या दटावीत होत्या. अक्राळविक्राळ राक्षसींनी प्रमदावनामध्ये त्या तेला बंदोबस्तांत ठेविलें असल्यामुळे, हे वीरा, सुख भोगण्यासच योग्य असलेल्या त्या देवीला असह्य दुःख होत आहे. रावणाच्या अन्तःपुरामध्ये तिला अडकावून ठेविलें आहे. राक्षसींनी तिचा फारच बंदोबस्त ठेविला आहे आणि त्या दीन सीतेने आपल्या केसांची एक वेणी बांधली असून, ती मनामध्ये एकसारखें

रावणाद्विनिवृत्तार्था मर्तव्यकृतनिश्चया १५
देवी कथंचित्काकुत्स्थ त्वन्मना मार्गिता मया ।
इक्ष्वाकुवंशविख्यातिं शनैः कीर्तयतानघ १६
सा मया नरशार्दूल शनैर्विश्वासिता तदा ।
ततः संभाषिता देवी सर्वमर्थं च दर्शिता १७
रामसुग्रीवसख्यं च श्रुत्वा हर्षमुपागता ।
नियतः समुदाचारो भक्तिश्चास्याः सदा त्वयि १८
एवं मया महाभाग दृष्टा जनकनन्दिनी ।
उग्रेण तपसा युक्ता त्वद्भक्त्या पुरुषर्षभ १९
अभिज्ञानं च मे दत्तं यथावृत्तं तवान्तिके ।
चित्रकूटे महाप्राज्ञ वायसं प्रति राघव २०
विज्ञाप्यः पुनरप्येष रामो वायुसुत त्वया ।

---

तुझेंच चिंतन करीत आहे. ती भूमीवर पडली आहे, थंडीचे दिवस असले असता निस्तेज होऊन जाणाऱ्या कमलिनीप्रमाणे ती निस्तेज झाली आहे आणि रावणापासून मनाने पराङ्मुख असलेली ती सीता यापुढे मरणाचाच निश्चय करून बसलेली आहे. हे कुकुत्स्थकुलोत्पन्ना, निष्पापा, रामा, इक्ष्वाकु-वंशाची कीर्ति मी हळूहळू गऊं लागलों, त्या वेळीं मोठ्या प्रयत्नाने तुझे ठिकाणींच मनाचें लय लावून राहिलेली ती सीतादेवी मोठ्या प्रयासाने माझ्या दृष्टीस पडली. ( १२–१६ )

हे पुरुषश्रेष्ठा, माझी व तिची दृष्टादृष्ट झाल्यावर मी तिला हळूहळू धीर दिला आणि तिच्याशीं संभाषण करून, माझे सर्व उद्देश मी तिला कळवेले. राम आणि सुग्रीव यामध्ये सख्य झाल्याचें ऐकून, तिला फार हर्ष झाला. तिचें सदाचरण अगदी अव्याहत टिकलें असून, तिची तुझेच ठिकाणीं भक्ति अखंड आहे. हे महाभाग्यवान् पुरुषश्रेष्ठा रामा, याप्रमाणे तुझ्याविषयी प्रेम आणि उग्र तपश्चर्या करीत असलेली जनकनंदिनी सीता माझ्या दृष्टीस पडली. शिवाय, हे महाप्राज्ञ रघुवंशज रामा, चित्रकूटपर्वतावर तुझ्यासमक्ष कावळ्यासंबंधाने घडलेला एक दृष्टांत खूण पटण्याकरिता तिने मला सांगितला आहे आणि "हे वायुपुत्रा, तूं

अखिलेन यथा दृष्टमिति मामाह जानकी २१
अयं चास्मै प्रदातव्यो यत्नात्सुपरिरक्षितः ।
ब्रुवता वचनान्येवं सुग्रीवस्योपशृण्वतः २२
एष चूडामणिः श्रीमान्मया ते यत्नरक्षितः ।
मनःशिलायास्तिलकं तत्स्मरस्वेति चाब्रवीत् २३
एष निर्यातितः श्रीमान्मया ते वारिसंभवः ।
एनं दृष्ट्वा प्रमोदिष्ये व्यसने त्वामिवानघ २४
जीवित धारयिष्यामि मासं दशरथात्मज ।
ऊर्ध्वं मासान्न जीवेयं रक्षसां वशमागता २५
इति मामब्रवीत्सीता कृशाङ्गी धर्मचारिणी ।
रावणान्तःपुरे रुद्धा मृगीवोत्फुल्ललोचना २६
एतदेव मयाख्यातं सर्वं राघव यद्यथा ।
सर्वथा सागरजले संतारः प्रविधीयताम् २७

जशी ही माझी स्थिति अवलोकन केली आहेस, ती जशीच्या तशी रामाला तू पूर्णपणें निवेदन कर ' असेंही मला तिने सांगितलें आहे " (१७-२१)

असें बोलतां बोलताच, सुग्रीव ऐकत असताना हनुमान् म्हणाला, " यत्नानें संरक्षण करून ठेविलेला हा मणि याला द्यावयाचा आहे " नंतर तो म्हणाला, " सीतेनें सांगितलें आहे कीं, ' हा भव्य चूडामणि मी आपणाकरितां मोठ्या यत्नानें जतन करून ठेविला आहे, हा आपण पहा आणि मनःशिळेचा तिलक आपण मला केला होता, त्याचीही आठवण करा. उदकामध्यें उत्पन्न झालेला हा भव्य चूडामणि मी आपणाकडे परत पाठविला आहे. ही आपण पाठविलेली अंगठी पाहून, संकटामध्यें आपलेंच दर्शन झाल्याप्रमाणें आहे. हे निष्पाप, ती पाहूनच मी आपल्या मनांत आनंद मानीन. हे दशरथनंदना, यापुढें एक महिनापर्यंत मी जीव ठेवीन. मी राक्षसांच्या ताब्यांत सांपडलें आहें, म्हणून मी एक महिन्यानंतर जीव ठेवणार नाहीं ' याप्रमाणें त्या शरीरानें कृश, सद्धर्मानें वागणारी आणि हरिणीप्रमाणें विकसितनेत्र असून, सांप्रत रावणाच्या अंतःपुरामध्यें अडकून राहिलेल्या सीतेनें मला सांगितलें आहे. असो हे राघवा, हें जसें झालें,

**तौ जाताश्वासौ राजपुत्रौ विदित्वा तच्चाभिज्ञानं राघवाय प्रदाय।**
**देव्या चाख्यातं सर्वमेवानुपूर्व्याद्वाचा संपूर्णं वायुपुत्रः शशंस २८**

इत्यार्षे श्रीमद्रा॰ वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे पञ्चषष्टितमः सर्गः ॥ ६५॥

षट्षष्टितमः सर्गः। [२७;५]

एवमुक्तो हनुमता रामो दशरथात्मजः।
तं मणिं हृदये कृत्वा रुरोद सहलक्ष्मणः १
तं तु दृष्ट्वा मणिश्रेष्ठं राघवः शोककर्शितः।
नेत्राभ्यामश्रुपूर्णाभ्यां सुग्रीवमिदमब्रवीत् २
यथैव धेनुः स्रवति स्नेहाद्वत्सस्य वत्सला।
तथा ममापि हृदयं मणिश्रेष्ठस्य दर्शनात् ३
मणिरत्नमिदं दत्तं वैदेह्याः श्वशुरेण मे।
वधूकाले यथा बद्धमधिकं मूर्ध्नि शोभते ४
अयं हि जलसंभूतो मणिः प्रवरपूजितः।

---

तसें सर्व मी तुला निवेदन केलें आहे आता हरप्रयत्न करून समुद्राच्या पाण्यातून तरून पलीकडे जाण्याचा विचार कर " ( २२–२७ )

सारांश, त्या राजकुमार रामलक्ष्मणांना धीर आला आहे, असें समजून व राघवाला ती सीतेने दिलेला खूण देऊन, वायुपुत्र हनुमानाने सीतादेवीने सांगितलेलें सर्व काही पूर्णपणें यथाक्रम वर्णन करून रामाला सांगितलें ( २८ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडापैकी पासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६५ ॥

याप्रमाणे हनुमानाचा निरोप ऐकून, लक्ष्मणाशेजारी बसलेला दशरथपुत्र राम तो मणि हृदयावर ठेऊन रडू लागला याप्रमाणे तो श्रेष्ठ मणि पाहिल्यावर दुःखी झालेल्या रामाचे नेत्र अश्रूंनी भरून आले व तो सुग्रीवाला म्हणाला, "ज्याप्रमाणे वत्साच्या प्रेमामुळे दयाळु गाईला पान्हा फुटतो, त्याप्रमाणे या श्रेष्ठ रत्नाच्या दर्शनाने माझ्या हृदयाला पाझर फुटू लागले आहेत माझ्या श्वशुराने हा मूल्यवान् मणि विवाहसमयी वैदेहीला दिलेला होता आणि त्या वेळीं हा जेव्हा तिने मस्तकीं धारण केला होता, तेव्हा तिला तो फारच शोभत होता उदकामध्ये उत्पन्न

यज्ञे परमतुष्टेन दत्तः शक्रेण धीमता ५
इमं दृष्ट्वा मणिश्रेष्ठं तथा तातस्य दर्शनम् ।
अद्यास्म्यवगतः सौम्य वैदेहस्य तथा विभोः ६
अयं हि शोभते तस्याः प्रियाया मूर्ध्नि मे मणिः ।
अद्यास्य दर्शनेनाहं प्राप्तां तामिव चिन्तये ७
किमाह सीता वैदेही ब्रूहि सौम्य पुनःपुनः ।
परासुमिव तोयेन सिञ्चन्ती वाक्यवारिणा ८
इतस्तु किं दुःखतरं यमिमं वारिसंभवम् ।
मणिं पश्यामि सौमित्रे वैदेहीमागतं विना ९
चिरं जीवति वैदेही यदि मासं धरिष्यति ।
क्षणं वीर न जीवेयं विना तामसितेक्षणाम् १०
नय मामपि तं देशं यत्र दृष्टा मम प्रिया ।
न तिष्ठेयं क्षणमपि प्रवृत्तिमुपलभ्य च ११

---

झालेला व देवतांनाही पूज्य असलेला हा मणि यज्ञामध्ये अतिशय संतुष्ट झालेल्या विचारी इंद्राने त्याला दिला होता. हा श्रेष्ठ मणि पाहिल्यामुळे आज मला, हे विनयसंपन्न सुग्रीवा, पित्याचें आणि त्याचप्रमाणे प्रभु विदेहाधिपति जनकाची आठवण होत आहे. अशा त्या माझ्या प्रियेच्या मस्तकीं हा मणि शोभत असतो आणि याचें आज दर्शन झाल्यामुळे, ती प्रियाच मला प्राप्त झाल्यासारखें वाटत आहे ( १–७ )

हे सौम्य, मृतप्राय झालेल्या मला, आपल्या संभाषणरूपी उदकानें सिंचन करणारी ती विदेहराजकन्या सीता काय म्हणाली, तें तूं मला फिरून एकदा सांग. हे लक्ष्मणा, सीता येथे नसताना उदकामध्ये-उत्पन्न झालेला मणि आज माझ्या दृष्टीस पडत आहे, यापेक्षा अधिक दुःखदायक तें काय असणार? सीता एक महिनाभर जिवंत राहील, तर ती चिरंजीविनीच आहे, असें मी समजतों; कारण हे वीरा, कृष्णवर्ण नेत्र असलेल्या त्या सीतेवाचून यापुढे एक क्षणभरही जिवंत राहण्यास मी समर्थ नाही. जेथें माझी प्रिया दृष्टीस पडली, त्या ठिकाणीं तूं मलाही घेऊन जा. तिची ही माहिती समजल्यावर, एक क्षणभरही मला तिच्यावाचून

कथं सा मम सुश्रोणी भीरुभीरुः सती तदा ।
भयावहानां घोराणां मध्ये तिष्ठति रक्षसाम् १२
शारदस्तिमिरोन्मुक्तो नूनं चन्द्र इवाम्बुदैः ।
आवृतो वदनं तस्या न विराजति सांप्रतम् १३
किमाह सीता हनुमंस्तत्त्वतः कथयस्व मे ।
एतेन खलु जीविष्ये भेषजेनातुरो यथा १४
मधुरा मधुरालापा किमाह मम भामिनी ।
मद्विहीना वरारोहा हनुमन्कथयस्व मे १५
दुःखाद्दुःखतरं प्राप्य कथं जीवति जानकी १६

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुंदरकाण्डे षट्षष्टितमः सर्गः ॥६६॥

सप्तषष्टितमः सर्गः । [२७८१]

एवमुक्तस्तु हनुमान्राघवेण महात्मना ।
सीताया भाषितं सर्वं न्यवेदयत राघवे १

राहणार नाही. भित्र्यातली भित्री असलेली ती माझी सुंदरी भयंकर आणि घोर-कर्मी अशा राक्षसामध्ये कशी बरें राहिली ! अंधकारापासून मुक्त झालेला, शरदृतूं-तील चंद्र, मेघानी व्याप्त्यानंतर ज्याप्रमाणे प्रकाशत नाही, त्याप्रमाणे सांप्रत तिचें मुख खरोखरच प्रकाशत नसेल. हे हनुमाना, सीता काय म्हणाली, तें तूं मला खरें खरें सांग, कारण रोगग्रस्त पुरुष ज्याप्रमाणे औषधाच्या बळावर जिवंत राहण्याची इच्छा धरीत असतो, त्याप्रमाणे त्या निच्या शब्दाच्याच योगानें खरोखर मला जगण्याची आशा आहे. हे हनुमाना, त्यानें मनोहर आणि मधुर भाषण करणारी, ती माझा वियोग झालेली सुंदर स्त्री मला काय म्हणाली, तें तूं मला सांग. वनवासाच्या दुःखाहून अधिक दुःसह दुःख प्राप्त झालें असून, ती जानकी जिवंत तरी कशी राहिली आहे !" ( ८–१६ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदर-कांडांतील सहासष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६६ ॥

• याप्रमाणे महात्मा राम हनुमानाला म्हणाला, तेव्हा सीतेचें सर्व काही भाषण हनुमानानें रामाला सांगितलें, तो म्हणाला "हे पुरुषश्रेष्ठ, चित्रकूटपर्वतावर पूर्वी

इदमुक्तवती देवी जानकी पुरुषर्षभ ।
पूर्ववृत्तमभिज्ञानं चित्रकूटे यथातथम् २
सुखसुप्ता त्वया सार्धं जानकी पूर्वमुत्थिता ।
वायसः सहसोत्पत्य विददार स्तनान्तरम् ३
पर्यायेण च सुप्तस्त्वं देव्यङ्के भरताग्रज ।
पुनश्च किल पक्षी स देव्या जनयति व्यथाम् ४
ततः पुनरुपागम्य विददार भृशं किल ।
ततस्त्वं बोधितस्तस्याः शोणितेन समुक्षितः ५
वायसेन च तेनैवं सततं बाध्यमानया ।
बोधितः किल देव्या त्वं सुखसुप्तः परन्तप ६
तां च दृष्ट्वा महाबाहो दारितां च स्तनान्तरे ।
आशीविष इव क्रुद्धस्ततो वाक्यं त्वमूचिवान् ७
नखाग्रैः केन ते भीरु दारितं वै स्तनान्तरम् ।
कः क्रीडति सरोषेण पञ्चवक्त्रेण भोगिना ८

घडलेली ही एक गोष्ट खुणेकरिता देवी जानकीने तुला सांगण्यासाठी अगदी जशी घडली, तशी सांगितली आहे जानकी एकदा तुझ्यासह गाढ निद्रिस्थ झाली असता उठून पाहू लागली, तों काकपक्ष्याने तिच्यावर एकाएकी झडप घालून, तिचें वक्षस्थल ओरखाडलें नंतर तू, भरताग्रज, आपल्या पाळीप्रमाणे सीतादेवीच्या अंकावर निद्रिस्थ झालास, तेव्हा पुन तो पक्षी तेथे येऊन, देवीला पीडा देऊ लागला अशा रीतीने त्याने पुन झडप घालून तिचें वक्ष स्थल खरोखर अतिशयच ओरखाडलें व तिचें रक्त अंगावर पडल्यामुळे तू जागा झालास सारांश, हे शत्रुतापना रामा, तो काकपक्षी याप्रमाणे एकसारखा येऊन, तिला पीडा देऊ लागला, तेव्हा तू गाढ निद्रिस्थ होतास, तेव्हा त्या देवीने उठविलं नंतर, हे महापराक्रमी रामा, तिचें वक्ष स्थल ओरखडलेलें पाहून, तू सर्पाप्रमाणे क्रुद्ध झालास आणि तिला म्हणालास (१-७)

'हे भीरु, नखाच्या टोकानी तुझ्या वक्ष स्थलावर ओरखडे कोणी काढले आहेत ? अरे, क्रुद्ध झालेल्या पंचमुखी नागाबरोबर कोण हा असा अतिप्रसंग करीत आहे ?

निरीक्षमाणः सहसा वायसं समुदैक्षथाः ।
नखैः सरुधिरैस्तीक्ष्णैस्तामेवाभिमुखं स्थितम् ९
सुतः किल स शक्रस्य वायसः पततां वरः ।
धरान्तरगतः शीघ्रं पवनस्य गतौ समः १०
ततस्तस्मिन्महाबाहो कोपसंवर्तितेक्षणः ।
वायसे त्वं व्यधाः क्रूरां मतिं मतिमतां वर ११
स दर्भसंस्तराद्गृह्य ब्रह्मास्त्रेण न्ययोजयः ।
स दीप्त इव कालाग्निर्जज्वालाभिमुखं खगम् १२
स त्वं प्रदीप्तं चिक्षेप दर्भं तं वायसं प्रति ।
ततस्तु वायसं दीप्तः स दर्भोऽनुजगाम ह १३
भीतैश्च संपरित्यक्तः सुरैः सर्वैश्च वायसः ।
त्रीँल्लोकान्संपरिक्रम्य त्रातारं नाधिगच्छति १४
पुनरप्यागतस्तत्र त्वत्सकाशमरिन्दम ।
त्वं तं निपतितं भूमौ शरण्यः शरणागतम् १५

असें म्हणून तूं जेव्हा इकडेतिकडे पाहूं लागलास, तेव्हा रक्ताने तीक्ष्ण नखें भरलीं आहेत, असा व तिच्याचसमोर असलेला काकपक्षी एकाएकीं तुझ्या दृष्टीस पडला तुला पाहताच इंद्राचा पुत्र असलेला तो पक्षिश्रेष्ठ वायस, गतीमध्ये वायूची बरोबरी करणारा असल्यामुळे, सत्वर पातालांत गेला तेव्हा हे बुद्धिमानामध्ये श्रेष्ठ, महापराक्रमी, रामा, त्या काकपक्ष्याबद्दल तुझ्या मनामध्ये क्रूर विचार आला व दर्भाच्या आस्तरणांतील एक दर्भ घेऊन, तूं तो ब्रह्मास्त्राने अभिमंत्रित केलास व तो संमुख असलेल्या पक्ष्याला अनुलक्षून प्रलयकालच्या प्रदीप्त अग्नीप्रमाणे जळूं लागला तू तो प्रदीप्त दर्भ त्या काकपक्ष्याला उद्देशून टाकलास, तेव्हा तो दर्भ त्या पक्ष्याच्या मागोमाग जाऊ लागला. हें पाहून सर्व देवानींही भयभीत होऊन आश्रयास आलेल्या त्या काकपक्ष्याचा त्याग केला अणि अशा रीतीने त्रैलोक्यामध्ये हिंडूनही त्या काकपक्ष्याला कोणी त्राता आढळला नाही. ( ८—१४ )

तेव्हा, हे शत्रुदमना, तो काकपक्षी पुनः तुझ्याकडे आला भूमीवर पडून

वधार्हमपि काकुत्स्थ कृपया परिपालयः।
मोघमस्त्रं न शक्यं तु कर्तुमित्येव राघव　　१६
ततस्तस्याक्षि काकस्य हिनस्ति स्म स दक्षिणम् ।
वायसस्त्वां नमस्कृत्य राज्ञो दशरथस्य च　　१७
विसृष्टस्तु तदा काकः प्रतिपेदे स्वमालयम् ।
एवमस्त्रविदां श्रेष्ठः सत्त्ववाञ्छीलवानपि　　१८
किमर्थमस्त्रं रक्षःसु न योजयसि राघव ।
न दानवा न गन्धर्वा नासुरा न मरुद्गणाः　　१९
तव राम रणे शक्तास्तथा प्रतिसमासितुम् ।
तव वीर्यवतः कश्चिन्मयि यद्यस्ति संभ्रमः　　२०
क्षिप्रं सुनिशितैर्बाणैर्हन्यतां युधि रावणः ।
भ्रातुरादेशमादाय लक्ष्मणो वा परन्तपः　　२१
स किमर्थं नरवरो न मां रक्षति राघवः ।
शक्तौ तौ पुरुषव्याघ्रौ वाय्वग्निसमतेजसौ　　२२

---

खोटागणें घालीत असलेल्या व वधालाही योग्य असलेल्या त्या काकपक्ष्याचें, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तूं कृपावन्त होऊन परिपालन केलेंस हे राघवा, तू सोडलेलें अस्त्र व्यर्थ होणें शक्य नाही, एवढ्याचकरिता त्या काकपक्ष्याचा उजवा डोळा त्या बाणानें नाहींसा केलास नंतर तूं मुक्तपणें सोडून दिल्यावर तो काकपक्षी तुला व दशरथराजाला नमस्कार करून, आपल्या निवासस्थानाकडे निघून गेला सारांश, याप्रमाणे तूं अस्त्रवेत्त्यामध्ये श्रेष्ठ, धैर्यवान् आणि सुशील असूनही, हे राघवा, राक्षसावर तू अस्त्रप्रयोग का करीत नाहीस? दानव, गंधर्व, असुर आणि मरुद्गण यापैकी कोणीही, हे रामा, संग्रामामध्यें तुझ्याशीं युद्ध करण्यास समर्थ नाही यासाठी तुजसारख्या माझ्याविषयी जर तुजसारख्या बलवानाला कांही काळजी असेल, तर चांगल्या निश्चित बाणानी संग्रामामध्ये तूं रावणाचा सत्वर वध कर ही भ्रात्याची आज्ञा आहे, असें समजून, तो पुरुषश्रेष्ठ व रघुवंशज शत्रुतापन लक्ष्मण तरी काय कारणानें माझें रक्षण करीत नाही? तेजामध्ये वायु आणि अग्नि यांची बरोबरी करणारे, ते दोघे पुरुषश्रेष्ठ माझें रक्षण करण्या

सुराणामपि दुर्धर्षौ किमर्थं मामुपेक्षतः ।
ममैव दुष्कृतं किंचिन्महदस्ति न संशयः २३
समर्थौ सहितौ यन्मां न रक्षेते परन्तपौ ।
वैदेह्या वचनं श्रुत्वा करुणं साश्रुभाषितम् २४
पुनरप्यहमार्यां तामिदं वचनमब्रुवम् ।
त्वच्छोकविमुखो रामो देवि सत्येन ते शपे २५
रामे दुःखाभिभूते च लक्ष्मणः परितप्यते ।
कथंचिद्भवती दृष्टा न कालः परिशोचितुम् २६
इदं मुहूर्तं दुःखानामन्तं द्रक्ष्यसि भामिनि ।
तावुभौ नरशार्दूलौ राजपुत्रौ परन्तपौ २७
त्वद्दर्शनकृतोत्साहौ लङ्कां भस्मीकरिष्यतः
हत्वा च समरे रौद्रं रावणं सहबान्धवम् २८
राघवस्त्वां वरारोहे स्वपुरीं नयिता ध्रुवम् ।

स समर्थ असून, प्रत्यक्ष देवानाही अजिंक्य आहेत. मग ते माझी का बरें उपेक्षा करीत आहेत ? ज्या अर्थी ते दोघेही शत्रुतापन भ्राते समर्थ असूनही माझें रक्षण करीत नाहीत, त्या अर्थी माझेंच कांहीतरी पाप आड आलें आहे, यात संशय नाही.' सीतेने दीनपणाने केलेलें हें उत्कृष्ट भाषण ऐकून घेऊन मी त्या साध्वीला पुन. असें म्हणालों की, ' हे देवि, तुझ्या वियोगाच्या दु खामुळे रामाला दुसरें काहीएक सुचेनासें झालें आहे, हें मी तुला शपथपूर्वक खरें सागतों. ( १५—२५ )

रामच नुसता दु खी आहे, असें नाही; राम दु खाकुल झाल्यामुळे लक्ष्मणही शोकग्रस्त झाला आहे, परंतु आता यापुढे शोक करण्याची वेळ राहिली नाही, कारण तुझें कसेंतरी दर्शन झालें आहे अ ता, हे भ मिनि, तुझी इच्छा असल्यास या घटकेलाच सर्व दु खाचा शेवट झाला आहे, असें तू पाहशील, ते दोघे शत्रुतापन व पुरुषश्रेष्ठ राजपुत्र तुझ्या दर्शनाविषयी उत्सुक झाल्यामुळे, एका क्षणात लंका भस्म करून टाकतील, इतकेंच नव्हे, तर संग्रामामध्ये क्रूर रावणाचा त्याच्या बांधवासह वध करून, हे सुंदरी, राघव निःसंशय तुला आपल्या राजध -

यत्तु रामो विजानीयादभिज्ञानमनिन्दिते　२९
प्रीतिसंजननं तस्य प्रदातुं त्वमर्हसि ।
साभिवीक्ष्य दिशः सर्वा वेण्युद्ग्रथनमुत्तमम्　३०
मुक्त्वा वस्त्राद्ददौ मह्यं मणिमेतं महाबल ।
प्रतिगृह्य मणिं दोर्भ्यां तव हेतो रघुप्रिय　३१
शिरसा संप्रणम्यैनामहमागमने त्वरे ।
गमने च कृतोत्साहमवेक्ष्य वरवर्णिनी　३२
विवर्धमानं च हि मामुवाच जनकात्मजा ।
अश्रुपूर्णमुखी दीना बाष्पगद्गदभाषिणी　३३
ममोत्पतनसंभ्रान्ता शोकवेगसमाहता ।
मामुवाच ततः सीता सभाग्योऽसि महाकपे　३४
यद्द्रक्ष्यसि महाबाहुं रामं कमललोचनम् ।
लक्ष्मणं च महाबाहुं देवरं मे यशस्विनम्　३५
सीतयाप्येवमुक्तोऽहमब्रुवं मैथिलीं तथा ।

---

तीला परत घेऊन जाईल म्हणून हे अनिंदिते, रामाला पटेल व त्याल आनंद देईल, अशी त्याची खूण तूं माझ्यापाशी दे ' मी असें म्हटल्यावर तिनें चोहोंकडे पाहून, वेणीमध्येच गुंफण्यास योग्य असा हा उत्कृष्ट मणि वस्त्रांतून सोडून, हे महापराक्रमी रामा, माझे हातीं दिला, आणि हे रघुप्रिय रामा, तुझ्याकरतां तो मणि हातांत घेऊन व तिला मस्तकानें प्रणाम करून मी इकडे येण्याविषयीं त्वरा करूं लागलों परत जाण्याविषयीं उत्सुक होऊन, मी उद्विग्न होऊं लागलों व मजबरोबर तीं सुंदरी दीन जनककन्या बोलूं लागली त्या वेळीं तिचें मुख अश्रूंनीं भरून गेलें होतें आणि कंठ दाटून आला असल्यामुळे तिच्या मुखांतून शब्दही कंपयुक्तच निघत होते ( २९-३३ )

प्रचंड शोकामुळे व्याप्त झालेली आणि मी क्षणार्धांत उड्डाण करून जाईन कीं काय, म्हणून गोंधळून गेलेली ती सीता मला म्हणाली, ' हे महाकपे, तू भाग्यवान् आहेस, कारण कमलनयन राम आणि माझा यशस्वी दीर, महापराक्रमी लक्ष्मण यांना तूं आता भेटशील ' याप्रमाणें सीतेनें म्हटल्यावर, मी त्या मैथिलीला

पृष्ठमारोह मे देवि क्षिप्रं जनकनन्दिनि ३६
यावत्ते दर्शयाम्यद्य ससुग्रीवं सलक्ष्मणम् ।
राघवं च महाभागे भर्तारमसितेक्षणे ३७
साब्रवीन्मां ततो देवी नैष धर्मो महाकपे ।
यत्ते पृष्ठं सिषेवेऽहं स्ववशा हरिपुङ्गव ३८
पुरा च यदहं वीर स्पृष्टा गात्रेषु रक्षसा ।
तत्राहं किं करिष्यामि कालेनोपनिपीडिता ३९
गच्छ त्वं कपिशार्दूल यत्र तौ नृपतेः सुतौ ।
इत्येवं सा समाभाष्य भूयः संदेष्टुमास्थिता ४०
हनूमन्सिंहसंकाशौ तावुभौ रामलक्ष्मणौ ।
सुग्रीवं च सहामात्यं सर्वान्ब्रूया अनामयम् ४१
यथा च स महाबाहुर्मां तारयति राघवः ।
अस्माद् दुःखाम्बुसंरोधात्त्वमाख्यातुमर्हसि ४२
इदं च तीव्रं मम शोकवेगं रक्षोभिरेभिः परिभर्त्सनं च ।

---

म्हणालों, 'हे देवि, हे जनकनंदिनी, तूं माझ्या पाठीवर बैस कशी, म्हणजे हे कृष्णनयने, महाभाग्यवती साते, मी आजच्या आजच तुला सुग्रीव आणि लक्ष्मण यासह रामाचें दर्शन करवितों.' यानंतर ती देवी मला म्हणाली, 'हे महावानरा, हे वानरश्रेष्ठा, मी स्वतंत्र होऊन, तुझ्या पृष्ठभागावर आरोहण करणें, हा माझा धर्म नव्हे. हे वीरा, पूर्वी माझ्या शरिराला राक्षसाचा स्पर्श झाला आहे खरा, परंतु त्या वेळी काळाच्या तावडींत सापडल्यामुळें माझा तेथें काय उपाय होता? याकरतां हे वानरश्रेष्ठा, जिकडे ते राजकुमार आहेत, तिकडे तूं जा.' याप्रमाणें मला सांगून ती पुनरपि आपला निरोप सांगण्यास तयार झाली आणि म्हणाली ( ३४-४० )

हे हनुमान, हे सिंहतुल्य उभयतां रामलक्ष्मण आणि अमात्यांसह सुग्रीव या सर्वांना तूं माझ्या वतीनें कुशल प्रश्न कर आणि ज्या रीतीनें तो महापराक्रमी रघुनंदन राम मला या दुःखसागरांतून वाचवून तारील, त्या रीतीनें तूं त्याला माझा सर्व वृत्तांत सविस्तर सांग. हे वानरश्रेष्ठा, हा माझा अति तीव्र

श्रुयास्तु रामस्य गतः समीपं शिवश्च तेऽध्वास्तु हरिप्रवीर ४३
एतत्तवार्यां नृप संयता सा सीता वचः प्राह विषादपूर्वम् ।
एतच्च बुद्ध्वा गदितो यथा त्वं श्रद्धत्स्व सीतां कुशलां समग्राम् ४४
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डे सप्तषष्टितम. सर्ग ॥४७॥

अष्टषष्टितमः सर्ग । [ २८२५ ]

अथाहमुत्तरं देव्या पुनरुक्तः ससंभ्रमम् ।
तव स्नेहान्नरव्याघ्र सौहार्दादनुमान्य च १
एवं बहुविधं वाच्यो रामो दाशरथिस्त्वया ।
यथा मां प्राप्नुयाच्छीघ्रं हत्वा रावणमाहवे २
यदि वा मन्यसे वीर वसैकाहमरिन्दम ।
कस्मिंश्चित्संवृते देशे विश्रान्तः श्वो गमिष्यसि ३
मम चाप्यल्पभाग्यायाः सान्निध्यात्तव वानर ।

---

शोकवेग आणि या राक्षसांकडून होत असलेली ही माझी निर्भर्त्सना तूं रामाकडे गेल्यावर त्याला सांग. तुझा मार्ग तुला सुखावह होवो ' हे राजा आचरणाने शुद्ध असलेल्या त्या साध्वी सीतेने खेदपूर्वक तुला हा निरोप सांगितला आहे, म्हणून याचा तूं विचार कर आणि मी तुला सांगितल्याप्रमाणे सीता अगदी सर्वस्वी कुशल आहे, असा माझ्या बोलण्यावर तूं विश्वास ठेऊन समजून चाल (४१-४४)

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडांतरी सदुसष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६७ ॥

नंतर हे पुरुषश्रेष्ठा, मला इकडे येण्याला परवानगी दिल्यावर, तुझे ठिकाणीं अनुपम प्रेम असल्यामुळे, ती देवी पुनरपि घाई-घाईने मला म्हणाली, " दाशरथी रामाला माझा निरोप पुष्कळ प्रकाराने तूं सांग आणि संग्रामामध्ये रावणाचा वध करून ज्या रीतीने तो सत्वर मला भेटेल, अशी तूं तजवीज कर अथवा हे शत्रुदमना वीरा, तुला येथे राहण्याची इच्छा असेल, तर एक दिवस येथे गाहीनास का ? एखाद्या गुप्त ठिकाणीं राहून, विश्रांति घेऊन उद्या जा, म्हणजे झालें हे वानरा, असें केलेंस तर तुझ्या सान्निध्यामुळे या भाग्यहीन स्त्रीची एक

*

अस्य शोकविपाकस्य मुहूर्तं स्याद्विमोक्षणम् ४
गते हि त्वयि विक्रान्त पुनरागमनाय वै ।
प्राणानामपि संदेहो मम स्यान्नात्र संशयः ५
तवादर्शनजं चापि भयं मां परितापयेत् ।
दुःखाद् दुःखपराभूतां दुर्गतां दुःखभागिनीम् ६
अयं च वीर संदेहस्तिष्ठतीव ममाग्रतः ।
सुमहांस्त्वत्सहायेन हर्यृक्षेषु असंशयः ७
कथं नु खलु दुष्पारं तरिष्यन्ति महोदधिम् ।
तानि हर्यृक्षसैन्यानि तौ वा नरवरात्मजौ ८
त्रयाणामेव भूतानां सागरस्येह लङ्घने ।
शक्तिः स्याद्वैनतेयस्य वायोर्वा तव चानघ ९
तदस्मिन्कार्यनियोगे धीरैवं दुरतिक्रमे ।
किं पश्यसि समाधानं ब्रूहि वाक्यविदां वर १०

घटकाभर तरी या प्रचंड शोकापासून मुक्तता होईल. नाही तर, हे महापराक्रमी हनुमाना, आता तूं एकदा येथून निघून गेलास, म्हणजे तुम्ही फिरून येईतोपर्यंत माझे प्राण राहतील की नाही, याचीच मला शंका आहे. हे वीरा, तूं दृष्टिआड झालास, म्हणजे मी एका दुःखातून सुटून दुसऱ्या दुःखात पडेन व यामुळे दुर्दशेस पोचलेल्या या दुःखभागिनीला फारच भीति वाटूं लागेल. हे वीरा, तूं जरी रामाचा सहाय्यकर्ता आहेस, तरी वानर आणि ऋक्ष याविषयी माझ्या डोळ्यापुढे एक फारच मोठी शंका उभी आहे आणि ती शंका निःसंशय मला खरीही दिसत आहे. ( १—७ )

तीं ऋक्षवानराची सैन्यें अथवा ते राजपुत्र खरोखर मध्यांतील दुस्तर असा महासागर कसे लंघून येतील ? हे निष्पापा, गरुड, वायु आणि तूं या तीनच प्राण्यांचे ठिकाणी या जगतामध्ये समुद्र उल्लंघन करण्याचें सामर्थ्य आहे. म्हणून हे वीरा, हे उपायवेत्त्यांमध्ये श्रेष्ठ, पुढे येऊन पडलेल्या या दुस्तर कार्यातून पार पडण्याचा तुला काय उपाय दिसत आहे, तो तूं मला सांग. हे शत्रुपक्षीय वीर-

कामामस्य त्वमेवैकः कार्यस्य परिसाधने ।
पर्याप्तः परवीरघ्न यशस्यस्ते बलोदयः ११
बलैः समग्रैर्यदि मां हत्वा रावणमाहवे ।
विजयी स्वपुरीं रामो नयेत्तत्स्याद्यशस्करम् १२
यथाहं तस्य वीरस्य वनादुपधिना हृता ।
रक्षसा तद्भयादेव तथा नार्हति राघवः १३
बलैस्तु संकुलां कृत्वा लङ्कां परबलार्दनः ।
मां नयेद्यदि काकुत्स्थस्तत्तस्य सदृशं भवेत् १४
तद्यथा तस्य विक्रान्तमनुरूपं महात्मनः ।
भवत्याहवशूरस्य तथा त्वमुपपादय १५
तदर्थोपहितं वाक्यं प्रश्रितं हेतुसंहितम् ।
निशम्याहं ततः शेषं वाक्यमुत्तरमब्रुवम् १६
देवि हर्यृक्षसैन्यानामीश्वरः प्लवतां वरः ।
सुग्रीवः सत्त्वसंपन्नस्त्वदर्थे कृतनिश्चयः १७

घातक, हें कार्य पार पाडण्यास तूंच एकटा खरोखर समर्थ आहेस व तुझें बल प्रशंसनीय आहे; परंतु संपूर्ण सैन्यांसह संग्रामामध्यें रावणाचा वध करून आणि म्हणूनच विजयी होऊन जर राम मला आपल्या राजधानीमध्यें घेऊन जाईल, तर तें करणें त्याला कीर्तिवर्धक होईल. ज्याप्रमाणें राक्षसानें कपट करून त्या वीराच्या वनांतून मला हरण करून आणिलें, त्याप्रमाणें त्याच्या भीतीनें मला तशाच रीतीनें गुप्तपणें घेऊन परत नेणें रामाला शोभणार नाही. शत्रुसैन्याचा नाश करणारा तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम आपल्या सैन्यानिशीं ही लंका भरत करून, जर मला घेऊन जाईल, तर तें त्याच्या योग्यतेला शोभेल. यासाठीं त्या रणशूर महात्म्याला त्याच्या कीर्तीला अनुरूप असा पराक्रम त्याच्या हातून होईल, अशी वाही तूं व्यवस्था कर." ( ८–१५ )

हें अर्थ आणि हेतुपूर्ण व विनययुक्त भाषण ऐकून, मी तिला शेवटचें उत्तर सांगितलें को, " हे देवि, वानर आणि ऋक्ष यांच्या सैन्यांचा अधिपति

तस्य विक्रमसंपन्नाः सत्त्ववन्तो महाबलाः ।
मनःसंकल्पसदृशा निदेशे हरयः स्थिताः १८
येषां नोपरि नाधस्ताच्च तिर्यक्सज्जते गतिः ।
न च कर्मसु सीदन्ति महत्स्वमिततेजसः १९
असकृत्तैर्महाभागैर्वानरैर्बलसंयुतैः ।
प्रदक्षिणीकृता भूमिर्वायुमार्गानुसारिभिः २०
मद्विशिष्टाश्च तुल्याश्च सन्ति तत्र वनौकसः ।
मत्तः प्रत्यवरः कश्चिन्नास्ति सुग्रीवसंनिधौ २१
अहं तावदिह प्राप्तः किं पुनस्ते महाबलाः ।
न हि प्रकृष्टाः प्रेष्यन्ते प्रेष्यन्ते हीतरे जनाः २२
तदलं परितापेन देवि मन्युरपैतु ते ।
एकोत्पातेन ते लङ्कामेष्यन्ति हरियूथपाः २३

---

वानरश्रेष्ठ सुग्रीव धैर्यवान् असून, तुला नेण्याविषयी त्याने आपल्या मनाचा ठाम निश्चय केलेला आहे. पराक्रमी, धैर्यवान, महाबलाढ्य आणि मनोरथाप्रमाणें वेगवान् असे वानर त्याच्या आज्ञेत आहेत. ऊर्ध्वभागी, अधोभागी अथवा आजूबाजूस कोणत्याही दिशेस त्यांची गति कुंठित होत नाही आणि मोठी-मोठी कार्ये पुढे येऊन पडली असतानाही त्या अतुल तेजस्वी वानरांचें धैर्य कधी खचत नाही. आकाशमार्गानें गमन करणाऱ्या त्या बलाढ्य महाभाग्यवान् वानरांनी अनेक वेळां पृथ्वीला प्रदक्षिणा केली आहे. ( १६-२० )

तेथे माझ्यापेक्षा अधिक आणि माझ्याबरोबरीचे अनेक वानर आहेत. माझ्याहून कमी असा कोणीही वानर सुग्रीवाजवळ नाही. आता य:कश्चित् गणला जाणारा मी जर येथे आलों आहें, तर त्या कपींच्या महाबलाढ्य वानरांची गोष्ट पाहिजे कशाला? हलक्यासलक्या कामाकरितां मोठमोठ्यांना पुढे पाठविणे योग्य नसतें, क्षुल्लक कामाला साधारणच सेवक पाठवीत असतात. म्हणून मी य:कश्चित् येथे आलों आहें. म्हणून या कारणानें हे देवि, तुला काळजी करण्याचें कारण नाहीं. तूं चिंता करूं नकोस. ते वानरसेनाधिपति एका उडीसरसे लंक-

मम पृष्ठगतौ तौ च चन्द्रसूर्याविवोदितौ ।
त्वत्सकाशं महाभागे नृसिंहावागमिष्यतः २४
अरिघ्नं सिंहसंकाशं क्षिप्रं द्रक्ष्यसि राघवम् ।
लक्ष्मणं च धनुष्मन्तं लङ्काद्वारमुपागतम् २५
नखदंष्ट्रायुधान्वीरान्सिंहशार्दूलविक्रमान् ।
वानरान्वारणेन्द्राभान्क्षिप्रं द्रक्ष्यसि संगतान् २६
शैलाम्बुदनिकाशानां लङ्कामलयसानुषु ।
नर्दतां कपिमुख्यानां न चिराच्छ्रोष्यसे स्वनम् २७
निवृत्तवनवासं च त्वया सार्धमरिन्दमम् ।
अभिषिक्तमयोध्यायां क्षिप्रं द्रक्ष्यसि राघवम् २८
ततो मया वाग्भिरदीनभाषिणी शिवाभिरिष्टाभिरभिप्रसादिता ।
उवाह शान्तिं मम मैथिलात्मजा तवातिशोकेन तथातिपीडिता २९

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये सुन्दरकाण्डेऽष्टषष्टितमः सर्गः
॥ ६८ ॥ [ २८५४ ]

॥ इति श्रीरामायणे सुन्दरकाण्डं समाप्तम् ॥ ५ ॥

---

मध्ये वेताल ( २१-२३ )

हे महाभाग्यवती, उदय पावलेल्या चंद्रसूर्याप्रमाणे ते पुरुषश्रेष्ठ माझ्या पाठीवर बसून तुझ्यासमीप येतील शत्रुघातक, सिंहतुल्य राम आणि धनुर्धारी लक्ष्मण लंकेच्या द्वाराशी आले असे यांचे दृश्य, लवकरच तुझ्या दृष्टीस पडेल नख आणि दात हींच ज्यांचीं आयुधें आहेत, सिंह आणि व्याघ्र यांप्रमाणे ज्यांचे पराक्रम आहेत आणि गजेंद्राप्रमाणे जे धिप्पाड आहेत, असे वानरवीर एकत्र जमून आलेले लवकरच तुझ्या दृष्टीस पडतील पर्वताप्रमाणे आणि मेघाप्रमाणे असलेले वानरश्रेष्ठ लंकेतील मलयपर्वताच्या शिखरावर गर्जना करू लागले असल्याचा ध्वनि लवकरच तुझ्या कानीं येईल आणि शत्रुदमन करणाऱ्या रघुवंशज रामाला वनवास संपून अयोध्येमध्ये तुझ्यासह राज्याभिषेक झालाचे तुला लवकरच दृष्टोत्पत्तीस येईल " याप्रमाणे गोड व इष्ट अशा भाषणांनी मी निर्वें

सांत्वन केलें. त्या वेळीं तुझ्या विरहामुळें अतिशय शोकाकुल झालेली ती मिथिलराजकन्या सीता दैन्यरहित झाली आणि माझें म्हणणें ऐकून, तिनें दुःख करण्याचें अजिबात सोडून दिलें. ( २३–२९ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील सुंदरकांडापैकीं अडुसष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६८ ॥

॥ या ठिकाणीं सुंदरकांडही संपूर्ण झालें ॥ ५ ॥



श्री वाल्मीकि-रामायणांतील

# सुन्दर काण्डाचें

# निरीक्षण

## रावणाची लंका.

रावणाची लंका कोणती असावी, यसंबंधीं सध्या अन्याच कल्पना जनतेच्या पुढें आलेल्या आहेत. कित्येक लोक 'आस्ट्रेलिया' ही लंका आहे, असें प्रतिपादन करीत आहेत, दुसरे कित्येक मध्यहिंदुस्थानातच लंका आहे, असें म्हणत आहेत व सनातनी लोक सध्या जें सिलोन आहे, त्यालाच लंका समजत आहेत. *लंकेसंबंधानें असे हे तीन पक्ष सध्या आहेत.*

### (१) सिलोन 'लंका'

यामध्ये सिलोन बेटाला लंका मानणारे लोक परंपरेच्या समजुतीचा आधार देत असतात. रामेश्वराजवळ धनुष्कोटी बंदरातून सीलोनला सध्या आगबोटी जात असतात. हा मार्ग सर्वांच्या परिचयाचा आहे. धनुष्कोटी हें भरतखंडाचें टोंक सोडलें की, लंकेचें टोंक गाठण्यास चोवीस तासहि लागत नाहींत. आज रामेश्वर, धनुष्कोटी व सीलोनची यात्रा करणारे पुष्कळ लोक असल्यामुळें व हे सर्व सिलोनलाच लंका मानीत असल्यानें या लोकांच्या समजुतीसंबंधानें अधिक *लिहिण्याचें कारण नाहीं.*

सिलोन, सिंहलद्वीप किंवा लंका ही हिंदुस्थानच्या दक्षिणेस आहे व नकाशात ही अगदीं दक्षिणेस दिसत असते. रामेश्वरचा सेतु काशीस व काशीची गंगा रामेश्वरास पोंचवण्याचा परिपाठ बराच प्राचीन आहे.

आता आपण आस्ट्रेलियाला लंका मानणारांचीं प्रमाणें पाहूं-

## (२) आस्ट्रेलिया-लंका.

श्रीयुत दिवाणबहादुर सी एन् मेहता, रिटायर्ड डिस्ट्रिक्ट जज, नडियाद (सध्या मुक्काम अहमदाबाद) यानीं आस्ट्रेलिया ही लंका असावी, अशाविषयींचे पुरावे वाल्मीकि-रामायणातून काढून साडेतीनशें पानाचें पुस्तक लिहून तें प्रकाशित केलें आहे. हें पुस्तक इंग्रजीमध्यें आहे ज्याना इंग्रजी येत असेल, त्यानीं हें पुस्तक वाचावें या पुस्तकात शेवटीं पाच नकाशे दिले आहेत व एका नकाशात मारुती कोणत्या मार्गानें गेला, तें दाखवलें आहे याच्या मतानें मारुती हा सुग्रीवाच्या वायुयानाच्या चालिल्याचा मुख्य असून तो मलयगिरीवरून वायुयानातून आस्ट्रेलियाकडे गेला होता यासाठीं समुद्र पार करताना त्याची म्हणजे त्याच्या वायुयानाची छाया समुद्रावर पडत होती, असें वर्णन सुंदरकाण्डात आहे, तें योग्य आहे त्याचा ग्रंथ फार मोठा आहे त्याचा सारांश वाचकाच्या माहितीसाठीं आम्ही येथें देत आहों—

"रामायणातील लंका, किष्किंधा किंवा अयोध्या याचीं वर्णनें वाचीत असता असें वाटतें कीं, या शहराचीं जीं वर्णनें रामायणात आहेत, तीं जमिनीवरून हिंडून जशीं शहरें दिसतात, तशीं तीं केलेलीं नसून, विमानातून जशीं शहरें दिसतात, तशीं ही वर्णनें लिहिलेलीं आहेत यावरून या काळीं विमानातून प्रवास केला जात असे, असें दिसतें रामायणातील वरील शहराचीं वर्णनें पहा

स नगाग्रे स्थितां लंकां ददर्श पवनात्मजः। ( सु २ । ८ )
ततस्तु संप्राप्य समुद्रतीरं समीक्ष्य लंकां गिरिवर्यमूर्ध्नि ।
( सुं १ । २०३ )

मारुतीने लंका पर्वताच्या शिखरावर पाहिली या लंकेत त्याला उपवनें उद्यानें, वनें आणि उपवनें दिसलीं—

योजनानां शतस्यान्ते वनराजीं ददर्श सः ॥ १९४ ॥
ददर्श च पतन्नेव विविधद्रुमभूषितम् ।
द्वीपं शाखामृगश्रेष्ठो मलयोपवनानि च ॥ १९५ ॥ ( सु १ )

शंभर योजनें अन्तर तें ओलांडल्यावर त्याला वनाची शोभा दिसली तो उडता

असता त्यास अनेक ■ डागीं सुशोभित व अनेक उपवनें असलेलें द्वीप दिसलें असें हृदय पाण्यातून पोहून जाणारास दिसणें शक्य नाहीं. महासागराच्या पार लंकानगरी त्याला अत्यंत सुंदर दिसली, ती अशी—

निपत्य तीरे च महोदधेस्तदा लंकां ददर्श अमरावतीमिव ।
(सुं. १।२०४)

(निपत्य) खाली उतरत असतां समुद्राच्या तीरावर अमरावतीसारखी लंका त्यानें पाहिली. येथें (निपत्य) शब्दावरून तो आकाशातून उतरत होता, त्या वेळीं त्याला लंका दिसली, असें म्हणावें लागतें. या नगरीमध्यें उद्यानें, विहिरी, तलाव वगैरे त्यास दिसलीं. तीं जमिनीवरून दिसणें शक्य नाहींत, ती त्यास आकाशातूनच दिसणें शक्य आहेत, पहा—

पादपान् विहगाकीर्णान् पवनाधूतमस्तकान् ।
पुष्पभारनिबद्धांश्च तथा मुकुलितानपि ॥ ११ ॥
वापी पद्मोत्पलावृताः ।
आक्रीडान् विविधान् रम्यान् विविधांश्च जलाशयान् ॥१२॥
उद्यानानि च रम्याणि ददर्श कपिकुञ्जरः ॥ १३ ॥
(सुंदर० २)

मोठमोठे वृक्ष, त्यावर पक्ष्यांचे बहार असलेले आहेत, फांद्यांवर कळ्या आल्या होत्या, विहिरी व सरोवरें होतीं, लहानमोठे जलाशय होते, रम्य क्रीडास्थानें होतीं, विविध उद्यानें होतीं, असें त्यानें पाहिलें.

समुद्रांतून तरून जाणारास हें दिसणें शक्य नाहीं. जो विमानांतून एखादें शहर पाहील, त्यासच हें दिसणें शक्य आहे. तसेंच—

लंकां रावणपालिताम् ।
परिखाभिः सपद्माभिः सोत्पलाभिरलंकृताम् ॥ १४ ॥
काञ्चनेनावृतां रम्यां प्राकारेण महापुरीम् ।
गृहैश्च गिरिसंकाशैः शारदाम्बुदसन्निभैः ॥ १५ ॥
पाण्डुराभिः प्रतोलीभिरुच्चाभिरभिसंवृताम् ।
अट्टालकशताकीर्णां पताकाध्वजशोभिताम् ॥ १७ ॥

तोरणैः काञ्चनैर्दिव्यैर्लतापङ्क्तिविराजितैः ॥ १८ ॥
गिरिमूर्ध्नि स्थितां लंकां पाण्डुरैर्भवनैः शुभैः ॥ १९ ॥
प्लवमानामिवाकाशे ददर्श हनुमान् कपिः ॥ २० ॥
वप्रप्राकारजघनां विपुलाम्बुनवाम्बराम् ।
शतघ्नीशूलकेशान्तां अट्टालकवतंसकाम् ॥ २१ ॥
(सुं० २)

रावणानें पालन केलेल्या लंकेंत चारही बाजूला किल्ल्याचे तट लागून राहिले आहेत, त्याच्याबाहेर खंदक जलानें भरलेले आहेत, मध्यें मोठमोठी गगनचुंबित घरें आहेत, स्वच्छ गच्च्या लागलेल्या आहेत, जिकडे तिकडे ध्वजपताका उभारल्या आहेत, सोन्याचीं तोरणें उभारलेलीं आहेत, अशी ही लंका पर्वतशिखरावर विराजत असलेली, आकाशांत तरंगत असलेली मारुतीनें पाहिली.

लंकेचा उत्तर दरवाजा अति उंच होता, तो मोठ्या वाड्यापेक्षाही मोठा होता. पहा—

द्वारमुत्तरमासाद्य...कैलासनिलयप्रख्यम् ।
आलिखन्तमिवाम्बरम् ।
ध्रियमाणमिवाकाशं उच्छ्रितैर्भवनोत्तमैः ॥ (सुं. २।२२-२३)

कैलासपर्वतासारख्या भवनापेक्षाही हें द्वार अति उंच होतें. जणूं काय त्यानें आकाशाला आधार दिला आहे, असें वाटत असे.

अशा प्रकारचीं वर्णनें पाहिलीं म्हणजे हीं वर्णनें आकाशांतून जात असतांना नगरीचें अवलोकन करून केलेलीं असावीं, असें वाटतें. नाहींतर सर्व परिखा, खंदक, तट वगैरे पाहणारास एकदम दिसणें कधींहि शक्य नाहीं यावरून मारुती हा वायुयानांतून लंकेस गेला, असें वाटतें व म्हणूनच त्याची छाया पाण्यावर पडल्याचा उल्लेख ठिकठिकाणीं समुद्रोल्लंघनाच्या वर्णनामध्यें सुंदरकाण्डांत आहे, तो सार्थ वाटतो.

## सुन्दरकाण्ड कीं सुन्दकाण्ड ?

या काण्डाचें नांव 'सुंदर' कां? असें नांव या काण्डाला कां मिळालें

असावें ? वास्तविक पाहतां हनुमानानें जें सीतेचें अन्वेषण केलें आहे, तें मनोरम किंवा सौंदर्ययुक्त आहे, असें म्हणण्यापेक्षां तें करुणरसपूर्ण आहे, असें म्हणणें अधिक योग्य होईल. मारुतीला जीं संकटें भोगावीं लागलीं, सीतेची जी दया टाम्यविण्याजोगी अवस्था झालेली होती, रामाला जी खबर मारुतीनें पोंचवली, हीं सर्व दृश्यें करुणाजनक आहेत. यात 'सुंदर' शब्दाला साजेल असें कांहींच दृश्य नाहीं. हें पाहतांक्षणींच असें वाटूं लागतें कीं, या नावामध्यें कांहीतरी चूक झाली असावी.

सर्व काण्डांचीं नावें स्थानामुळें किंवा प्रतिपादिलेल्या विषयामुळें मिळालेलीं आहेत. पहा— बालकाण्डामध्यें कवीनें रामाच्या बालपणांतील प्रसंगाचें वर्णन केलेलें आहे. अयोध्याकाण्ड, अरण्यकाण्ड व किष्किंधाकाण्डात त्या त्या स्थानात घडलेल्या कथा कवीनें वर्णिल्या आहेत. तसेंच युद्धकाण्डात युद्धाचें वर्णन आहे. याप्रमाणें विचार केला, तर सुंदरकाण्ड हें नाव न स्थानवाचक आहे, न प्रसंग-वर्णनपरक आहे व ना काव्यप्रदर्शक भावदर्शक आहे. काव्यदृष्ट्या सौंदर्य म्हणावें, तर तें सर्वत्र काण्डात आहे. मग याच काण्डास 'सुंदर' काण्ड असें नाव का बरें दिलें असावें !

आम्हाला असें वाटतें कीं, या काण्डाचें मूळचें नाव '**सुन्दकाण्ड**' असावें कारण यात वर्णिलेल्या घटना सुन्दनामक द्वीपावर घडलेल्या आहेत; पण पुढें लेखकांच्या अमनस्कपणामुळें '**सुन्द**' शब्दाचें अजाण लेखकानें '**सुन्दर**' केलें असावें व एकदा 'सुंदर' बनलें, तेंच पुढें रूढ झालें असावें. रामायणामध्यें 'सुन्द' राक्षसाचा वृत्तात आलेला आहे. सुन्दराक्षसाचें द्वीप 'सुन्दद्वीपमप्रूह' म्हणून जें आहे, तेंच होय. कवीचें लक्ष्य '**सुन्दकाण्ड**' हें नामाभिधान करण्याकडेच असावें व जर असें मानता आलें, तर आस्ट्रेलिया हीच लंका मानावी लागेल, कारण सुन्दद्वीप तिकडेच आहे

## पूर्वकथेचें अनुसंधान.

सुग्रीवानें अंगद आदि जे वानर सीतेच्या शोधार्थ पाठवले होते, ते सरळ दक्षिण दिशेला त्रावणकोर–मंगलोरपर्यंत पोंचले, पण तिकडे सीता किंवा लंका

. यासंबंधीं काहीं शोध त्यास लागला नाहीं

यानंतर स्वयंप्रभेनें त्यास विन्ध्यपर्वताच्या बाजूला पाठवलें. आग्नेय दिशेला संपाति त्यास भेटला. त्यानें त्यास सांगितलें कीं, विजगापट्टमजवळ असलेल्या महेन्द्रपर्वतापासून अभिजित् नक्षत्रासमोर तुम्ही जा, अर्थात् हा कोण दक्षिण-दिशेशीं सुमारें २० किंवा २० अंशावर होत आहे. भूगोलामध्यें या महेन्द्रगिरी-संबंधानें कोणकोणतीं वर्णनें आहेत, तीं पाहिलीं पाहिजेत.

महेन्द्रपर्वत ४९२० फूट उंच आहे येथून अंदमान व निकोबार हीं बेटें अठरों किंवा हजार मैल दूर आहेत. येथून पुढें जावा, सुमात्रा, बाली, सुम्ब, सुन्दद्वीपसमूह, सुन्दसमुद्र, न्यूगिनी हीं बेटें आहेत यामध्यें सुंदर सरोवरें आहेत, झाडी उत्तम आहे व सुंदरकाण्डातील दृश्यासारखीं दृश्यें येथें आहेत

## मैनाकपर्वत.

येथें आता हा विचार केला पाहिजे कीं, मैनाकपर्वत कोठें असावा ? हा पर्वत समुद्रात बुडाला होता, पण नतर तो पुनः वर आला. आम्हाला असें वाटतें कीं, " अन्द-मान्+निको-बार " मध्येंच मैनाकपर्वत असावा. याला कारणें अशी दिसतात—

१. बंगालच्या दक्षिणेस आठशें ते हजार मैल दूर अंतरावर म्हणजे शंभर योजनें अंतरावर हें स्थान आहे.

२. 'अन्द-मान्+निको-बार' या शब्दांपैकी मधल्या चार अक्षरांचें उच्चारसाम्य 'मै-नाक' शब्दाशीं स्पष्ट आहे मानिको = मैनाक यांत ध्वनिसाम्य आहे

३ आधुनिक भूशास्त्राच्या मताप्रमाणें पर्वत बुडाले व वर आले, ही संभावना या द्वीपामध्यें झालेली आहे

४ अन्दमान-निकोबार हीं अगदीं भूमध्येरेषेवर असल्यासारखीं आहेत. म्हणजे हें दक्षिण भागामध्यें जाण्याचें प्रवेशद्वार म्हणता येणें शक्य आहे.

जर मैनाकपर्वत हा अन्दमानांतील मानला आला, तर लंका ही यापुढची

आस्ट्रेलियाच मानावी लागेल.

## सुरसा कोण असावी ?

( मारुतीला लंकेत जाताना सुरसेनें अडविलें, तेव्हां त्यानें तिच्या मुखात प्रवेश केला व तेथून तो पुढें निघून गेला, अशी कथा सुंदरकाण्डात आहे. ही सुरसा कोण असावी, याचा शोध झाला पाहिजे.

सुमात्रा व जावा या द्वीपांमध्यें ज्वालामुखीपर्वताची रांग आहे. सुमात्रा बेटापेक्षा जावामधील पर्वत अधिक उंच आहेत. काहींची उंची १२००० फुटांहूनही अधिक आहे. जावा-द्वीपात हिंदूंची वसती होती. त्यापैकीं नागाची माता सुरसा आहे, असें वर्णन आहे, म्हणून हिला ' **सुरसा माता** ' असें म्हणत असावें. **सुरसामाता, सुरसामेया, सुरसायेया, सुरयाया,** असा अपभ्रंश हे क्रम ही रूपें होणें भाषाशास्त्राच्या दृष्टीनें शक्य आहे सुमात्रामध्यें ' **सुरयाया** ' हें एक बंदर आहे. यावरून ' सुरसा ' ही या ठिकाणची असावी, असें दिसतें. येथें प्रचण्ड ज्वालामुखी आहेत. ज्वालामुखीचें तोंड उघडें असतें. सुरसेनें आपलें तोंड पसरून मारुतीस आपल्या जबड्यात घेतलें, त्याचा अर्थ मारुती या ज्वालामुखीच्या जबड्यात प्रविष्ट होऊन पुढच्या मार्गानें बाहेर पडला असा दिसतो. ज्वालामुखी शान्त झालेले असले, म्हणजे त्यातून असा पोकळ्या असतात व आरपार मार्ग झालेला असतो. ज्वालामुखीचा उंच पर्वत हा मारुतीच्या प्रवासातील मोठा अडथळा होता त्याचें उल्लंघन त्यानें वर लिहिल्याप्रमाणें केलें असावें, असें दिसतें. )

सुरसाचा असा संबंध ' सुरयाया ' शीं स्पष्ट दिसत आहे व हें स्थान आस्ट्रेलियाच्या मार्गावर आहे, म्हणून आस्ट्रेलिया ही लंका होय

## सिंहिका.

सुरसेच्या तावडींतून सुटल्यानंतर मारुती ' **सिंहिका** ' राक्षसीच्या तावडीत सांपडला किष्किंधा-काण्डाच्या ४१ व्या सर्गामध्यें **सिंहिकेला ' अंगारका '** असें म्हटलेलें आहे. हें स्थान ' **न्यूगिनी** ' हें असावें, कारण सिंहिकेचा आकार घोरपडीसारखा वर्णिला आहे. तसाच न्यूगिनी या द्वीपाचा आकार आहे! भयंकर

प्राणी-भयंकर घोरपड मारून तो समुद्रात टाकावा, असें, वरून हें न्यूगिनी बेट पाहिलें म्हणजे, वाटतें. मारुती आकाशयानातून जात असता त्यास हें स्थान घोरपडीमारखें वाटलें, यात काहीं आश्चर्य नाहीं.

सिंहिका सोडल्यानंतर मारुतीचा प्रवेश लंकेजवळ झालेला आहे दक्षिणेच्या बाजूला लंका आहे तो लंका याप्रमाणें विचार केला असता आस्ट्रेलियाच असावी, असें वाटते आस्ट्रेलियाच्या पूर्वभागामध्यें त्रिकूट, तीन शिखरें असलेला पर्वत आहे यावर लंका वसलेली असावी

## मारुतीचा वायुमार्ग.

मारुती जात असताना त्याची प्रचण्ड छाया समुद्रावर पडत होती, यावरून तो आकाशयानातून जात होता, असें म्हणणें भाग आहे त्याचा मार्ग महेन्द्रपर्वत, पुरी, विजगापट्टम्, मैनाक ( अन्दमान-निकोबर ), सुमात्रा, जावा, सुरबाय ( सुरसा ), बाली, सुब, न्यूगिनी (सिंहिका) व येथून आस्ट्रेलिया ( लंका ) असा दिसत आहे वरीलतील स्थाने याच मार्गावर आजही दिसत आहेत, म्हणून आस्ट्रेलिया हें लंकाद्वीप आहे, असें म्हणणें योग्य दिसते

याप्रमाणें या सद्गृहस्थानी आस्ट्रेलियाला लंका ठरविलें आहे, याचा वाचकानी विचार करावा आता श्रीयुत परमशिव ऐयरनी मध्यभारतातच लंका आहे, असें ठरविलें आहे त्याचें मत थोडक्यात सांगतों—

## ( ३ ) सागरांतील लंका.

श्री. टी परमशिव ऐयर यानी इंग्रजीमध्यें ' **रामायण आणि लंका** ' या नावाचें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे पृष्ठसंख्या १५२ असून, मूल्य ४ रु आहे या पुस्तकात यानी असें सिद्ध केलेलें आहे कीं, विन्ध्यपर्वत आणि नर्मदा नदी यांच्या मध्यें कोठेंतरी लंका असली पाहिजे, कारण रामानें नर्मदा नदी उल्लंघन केली, असा उल्लेख नाहीं व हनुमान आदि वानरांनींहि नर्मदा नदी उल्लंघिल्याचा उल्लेख नाहीं. या कारणानें नर्मदेच्या वर कोठेंतरी लंका असली पाहिजे

या पुस्तकाबरोबर यानीं एक मोठा नकाशा व काहीं लहान नकाशे दिले असून, त्यावर त्यानी लंकेचें स्थान दाखविलें आहे पुण्याच्या नियतकाल्या Poona-

Orientalist च्या जुलै १९४१ च्या अंकात या पुस्तकाची समालोचना केली आहे हें पुस्तक बंगलोरच्या 'बंगलोर-प्रेस' मध्ये छापलें आहे. डॉ. न. गो. सरदेसाई ( ओरिएन्टल बुक-एजन्सीचे संचालक, पुणें. ) यांनी या नकाशावर निर्दिष्ट केलेल्या स्थानामध्यें स्वत. जाऊन, त्या ठिकाणी नकाशात दिलेली लंका आदि स्थानें जशीच्या तशीं आहेत, हें समक्ष पाहिलें आहे, यासाठीं आम्हीं या ग्रंथातील माहिती अति संक्षेपानें येथें देत आहों. शोध करणाऱ्या वाचकांनी समक्ष या प्रांतात जाऊन अधिक शोध करावा व श्री. ऐयर यांचें इंग्रजी पुस्तक घेऊन अधिक विचार करावा. श्री. परमशिव ऐयर लिहितात—

या जगामध्यें जीं जीं मोठी युद्धें झालीं आहेत, उदाहरणार्थ महाभारताचें युद्ध, ग्रीसचें ट्रोजन युद्ध, रामरावणाचें भीषण युद्ध, यांपैकीं पहिल्या दोनही युद्धाचीं स्थलें निश्चित करणें कठीण नाहीं. जवळजवळ या युद्धाचीं दोनही स्थलें निश्चितच आहेत, पण ज्या लंकानगरीमध्यें रामानें रावणाचा पराभव केला, ती नगरी कोठें आहे, या संबंधींचा निर्णय करणें थोडें कठीण कार्य आहे समुद्रानें वेष्टिलेला, त्रिकूट पर्वतावर वसलेली, व चार महाद्वारांनीं युक्त असलेली लंकानगरी कोठें होती, तसेंच किष्किंधानगरीही कोठें होती ! याचा शोध करणें इष्ट आहे.

शेंकडों वर्षांपासून चालत आलेली व दंतकथेत मानलेली लंका म्हणजे रामेश्वरजवळील सेतुबंधाच्या पुढें समुद्राच्या पार असलेली 'सिंहलद्वीप' असें जीस सध्या म्हणतात तीच होय. रामाचा सेतु हा रामेश्वरापासून मानारद्वीपापर्यंत असलेली रेताड पहाडाची रांगच आहे. हिची लांबी सुमारें ३० मैल असून ही रांग वायव्य ते आग्नेयी दिशेनें जाणारी आहे लंका समुद्रामध्यें असल्यानें तेथें पोचण्यासाठीं रामाला समुद्रावर पूल बांधावा लागला. हा पूल *महेन्द्रगिरीपासून तो तहत सुवेलाचलापर्यंत पसरलेला होता याची लांबी शंभर योजनें होती. या १०० योजनाचा अर्थ ११॥ मैल असा आहे ( पृ. ३८ )

जरी सर्व लोक सिलोन किंवा सिंहलद्वीपालाच लंका मानीत आले आहेत, तरी रामायणातील लंका ही पर्वतशिखरावर वसलेली होती, पण सिंहलद्वीप कांहीं गरू नगरी नाहीं व पर्वतशिखरावरहि वसलेली नगरी तेथें कोठें नाहीं

वाल्मीकीनें जें भूगोलाचें वर्णन केलेलें रामायणात आहे, तें खरें वर्णन आहे-त्या भौगोलिक वर्णनात अत्युक्ति नाहीं, हें सिद्ध करता येणें शक्य आहे श्रीरामचन्द्रानें वत्सदेशापर्यंत जो प्रवास केला, त्या प्रदेशाचें भूवर्णन वाल्मीकीनें यथार्थ केलेलें आहे लंकेचें जें वर्णन वाल्मीकीनें केलेलें आहे, तें पाहिलें म्हणजे, असे स्पष्ट दिसतें कीं, हेंही वर्णन यथार्थ वर्णनच असावें हें काहीं काल्पनिक नसेल. लंकेचा नाश झाला असला, तरी त्रिकूटपर्वत, सुवेलाचल जर खरे असतील, तर ते अजूनही उपलब्ध झाले पाहिजेत

संस्कृतमध्यें ' लंका ' शब्दाचा अर्थ रावणाची राजधानी असा आहे व ही त्रिकूटपर्वतावर वसलेली होती व समुद्रानें वेष्टित होती नद्यांचे पाणी साठून जीं मोठमोठीं सरोवरें बनतात व त्यांत जीं मध्यें बेटें बनतात, त्यास लंका असें म्हणत असावें, असें वाटतें, पण संस्कृत-कोशकारांनीं लंका शब्दाचा असा अर्थ दिलेला नाहीं, हें मात्र खरें आहे

रामायण वाचीत असता असें वाटतें कीं, वाल्मीकि काळजीपूर्वक भौगोलिक वर्णन करीत आहे. केवळ काल्पनिक वर्णनें त्यांच्या लेखात नाहीत, यासाठीं यांच्या वर्णनावरून सुवेलाचल व त्रिकूट पर्वत यांचें स्थान निश्चित केलें पाहिजे व पंपासरोवर कोठें आहे व त्याचा उत्तर तट कोणता, तेंहि ठरवलें पाहिजे पंपासरोवराच्या पश्चिमेकडे, ऋष्यमूक पर्वताच्या अवरून व महेन्द्रपर्वताच्या पायथ्यावरून त्रिकूटाला पोंचण्याचा मार्ग जातो, हें वाल्मीकीच्या वर्णनावरून स्पष्ट दिसतें लंकेला जाण्याचा हाच मार्ग आहे, यात शंका नाही जर पंपासरोवर व त्रिकूट पर्वत हीं स्थानें निश्चित करता आलीं व तीं रामायणाच्या वर्णनाशीं जुळलीं, तर रामायणातील वर्णन सत्यास धरून आहे व रामायण इतिहासिक काव्य आहे, असें सहज ठरवता येईल

इन्द्राण पर्वत १९३२ फूट उंच आहे याच्या तानही बाजूना हिरण ही नदी वहात आहे इन्द्राणपर्वतच त्रिकूटपर्वत आहे, इव्हेलीनामक एक समतल स्थान त्यावर आहे याची उंचा ६७० फूट असून, येथूनच ही नदी वहात आहे लंका त्रिकूटपर्वताच्या शिखरावर आहे, असें वर्णन आहे—

**सागरेण परिक्षिप्ता निविष्टा गिरिमूर्धनि ।** (अरण्य ४७।२९)

सागरानें वेष्टित व पर्वतावर वसलेली लंका आहे व येथें ' सागर '

शब्द आहे. हाच ' सागर ' मध्यप्रांतांत याच नांवानें सध्यां प्रसिद्ध आहे सध्यां हिरण नदीच्या दक्षिण तटावर व इन्द्राणपर्वताच्या विरुद्ध दिशेस सिंहलद्वीप नावाचें स्थान आहे. ज्याला सध्या सागर असें नांव आहे, तेथें पूर्वी पाणी सांठत असावें, म्हणून त्याचें हें नाव सार्थ असलें पाहिजे. याच सागराचा उल्लेख वरील श्लोकामध्यें आलेला आहे

जबलपूर ग्याझेटियरमध्यें असें लिहिलें आहे कीं, या हवेली मैदानांत पाणी सांठत असे व तें सरोवरासारखें दिसत असे व येथून मध्यें कांहीं न दिसतां मध्यें नुसतें पाणीच असल्यानें सरळ विन्ध्य पर्वत दिसत असे.

या ठिकाणीं गोंड नावाच्या जातीचें प्राधान्य असून, त्यांना रावणाचे वंशज असें सध्याही मानस्थान येत असतें. या त्रिकूटपर्वतावर वृक्षांचें मोठें वन असून तें फारच सुंदर आहे

जर रामायणांतील वर्णन खरें असेल, तर जेथें हनुमान व अंगद यांनीं सीतेचा शोध केला तेथेंच लंकेचा शोध केला पाहिजे. किष्किंधा व प्रस्रवण यांच्या दक्षिणेस यांनीं शोध केला होता. किष्किंधेच्या जवळच प्रस्रवण पर्वत आहे. राम व सुग्रीव यांचा निश्चयच होता कीं, रावणाचें स्थान दक्षिण दिशेलाच आहे, म्हणूनच दक्षिण दिशेला जणाऱ्या वानरांना सुग्रीवानें असें सांगितलें होतें कीं, सहस्र शिखरें असलेल्या विंध्यपर्वतामध्यें व दुर्गम नर्मदा नदीच्या कांठाला शोध करा. विन्ध्यपर्वत व नर्मदा नदी तर अगदीं प्रसिद्ध स्थानें आहेत, पण हनुमान् जो लंकेंत पोंचला, त्यास नर्मदा पार करावी लागली, असें वर्णन कोठेंहि रामायणांत नाहीं रामचंद्रानें आपल्या सेनेसह जी दक्षिणयात्रा केली, त्यानेंहि नर्मदा पार केलेली नाहीं. नर्मदा नदी अत्यंत प्रसिद्ध नदी आहे व जर हनुमान् अथवा राम यांनीं ती पार केली असती, तर वाल्मीकीनें तसें वर्णिलें असतें. यावरून हें उघड होतें कीं, विन्ध्यपर्वत व नर्मदा नदी यांच्यामध्यें असलेल्या सागरनामक प्रान्तांतच कोठेंतरी लंका असली पाहिजे

किष्किंधाकाण्ड सर्ग ४८–४९ यांच्या अवलोकनानें असें स्पष्ट दिसतें कीं, विन्ध्यपर्वतापर्यंतच शोध करण्याच्या स्थलाची मर्यादा होती, कारण वानरांच्या माहितीप्रमाणें रावणाचें स्थान विन्ध्याच्या आसपास कोठेंतरी होतें सुग्रीवाच्या

आहेनें विन्ध्यपर्वतातच शोधाचा प्रारंभ झाला. वानरांनी सर्व विन्ध्य पर्वत शोधला व या टोंकापासून त्या टोंकापर्यंत ते शोध करीत पोचले. विन्ध्याचा शोध करतांना ग्राम, नगर किंवा मानवी वसाहतींचा सुद्धा उल्लेख झालेला नाहीं पण धबधबे, पर्वताचीं पठारें, गुहा, नद्या व दुर्गम वन्य स्थानाचा पुष्कळच उल्लेख आहे. महेन्द्रगिरीचें जें वर्णन आहे व जें जबलपूर-ग्याझेटीयरमध्ये या स्थानाचें वर्णन आहे, तें तंतोतंत जुळत आहे

जबलपुरापासून दमोहपर्यंत ६६ मैलाचें अन्तर आहे या ठिकाणीं मोटारीची सडक आहे व या मार्गावर जनस्थानापासून लंकेपर्यंतचीं सर्व मुख्य स्थानें सध्याहि दिसत आहेत जबलपुरापासून २४ मैलावर कटनी गाव आहे. हें स्थान कैमूर पर्वताच्या उत्तरेजवळ आहे या पर्वताला वाल्मीकींनें महेन्द्रपर्वत म्हटलेले आहे जबलपुरच्या उत्तरेस १५ मैलावर 'लंका' हें स्थान आहे. या लंकेपासून ९ मैलावर जगन्नाथाचें देवालय आहे रामचंद्रानें ज्या जगन्नाथाचा उल्लेख केला, तो हाच जगन्नाथ होय. बिभीषणाला जगन्नाथी पूजा रामानें सांगितली, तीच हा जगन्नाथ होय (आराधय जगन्नाथं। उत्तर० १०८।३०) येथून ८ मैलावर ऋष्यमूक व प्रस्रवण पर्वत आहेत

## लंकेचा विचार.

याप्रमाणें यांनी मध्यप्रांतातील 'सागर' जिल्ह्यातील एका टेकडावर लंका आहे, असें ठरविलें आहे पहिले विद्वान् 'आस्ट्रेलिया' ला लंका ठरवतात व मारुतीचा प्रवास विमानातून अस्मानरस्त्याने झाला, असें म्हणतात, तर दुसरे विद्वान् तीच लंका मध्यप्रांतातच आहे, असें म्हणतात व हनुमान् अथवा राम यांनी नर्मदा पार केलीच नाहीं, असें म्हणतात

दोघेही विद्वान् असून, आपल्या पक्षाच्या पुष्टीसाठी त्यांनीं भरपूर प्रमाणें दिलेलीं आहेत मारुतीनें समुद्र उल्लंघिला, त्या वेळच्या वर्णनांत मारुतीची छाया समुद्रावर पडली व मारुती आकाशातून चालला, अशीं वर्णनें आहेत, पण या काव्यमय वर्णनावरून मारुतीनें विमानातून प्रवास केला, असें म्हणता येईल, असें वाटत नाहीं मारुती रावणाच्या पाठीवरून मानेला अशोकवनातून जेव्हा आणूं

इच्छित होता, त्या वेळीं सीता म्हणत आहे कीं, मी तुझ्या पाठीवरून घसरून समुद्रात पडून मरेन व तुझ्या उड्डाणाचा वेग मला सहन होणार नाहीं. जर मारुतीजवळ विमान असतें व मारुती नुसता विमान चालवणारा असता, तर सीतेला भिण्याचें कारण नव्हतें, कारण विमानाच्या एखाद्या खोलींत सीता बसली असती व मारुतीनें विमान चालवलें असतें, तर सीता पडलीही नसती व सीतेला परपुरुषाच्या स्पर्शाची भीतीही वाटली नसती. अशीं जीं अनेक वर्णनें आहेत, त्यावरून असें वाटतें कीं, मारुती हा विमानमार्गें आस्ट्रेलियाइतक्या दूरच्या देशात गेला नव्हता व हिंदुस्थानातून आस्ट्रेलियाला पोंहून जाणेंहि शक्य नाहीं. यासाठीं कांहीं विधानें जरी भ्रम उत्पन्न करणारीं वाटलीं, तरी आस्ट्रेलिया ही लंका म नता येईल, इतका पुरावा कांहीं सापडलेला नाहीं काव्यातील वर्णनाचा असा उपयोग न केलेला बरा.

दुसरे लेखक मध्यप्रांतातील सागर जिल्ह्यातच लंका आहे, असें म्हणत आहेत व त्याचें बलवत्तर प्रमाण नर्मदा नदी पार केल्याचा पुरावा रामायणात नाहीं, व सागरजिल्ह्यातील हिरण नदीच्या वळणामध्ये लंका-स्थान आहे व लंकेच्या आजूबाजूचीं स्थानें आहेत, हे त्याचे पुरावे आहेत त्यानीं या स्थानाचा पुरावा मोठ्या चातुर्यानें दिलेला आहे, हें खरें आहे, पण ऋष्यमूकपर्वतापासून २५।३० मैल अंतरावर याची ही लंका आहे. २५।३० मैलावर एका लहानशा गावात राहणाऱ्या आटदाट भिल्ल किंवा गोंडवंशीय रावणानें चोरून नेलेली सीता शोधण्यासाठीं सुग्रीवाच्या लोकास इतके प्रयास पडण्याचें कारण नाहीं.

यानीं दाखविलेलीं स्थानें या ठिकाणीं म्हणजे सागर-जिल्ह्यात आहेत, हें खरें आहे; पण याचा उलगडा असा होऊ शकतो कीं, सर्वसाधारण आपल्या आवडत्या स्थानाला आवडतीं नावें दिलीं जातात घरोघर नावें ठेवतात, तींहि प्राचीन पुण्यपुरुषाच्या नावाप्रमाणेंच ठेवण्यात येतात राम नावाचा पुरुष आपल्या बायकोचें सीता नाव ठेवतो व शंकर नावाचा पुरुष आपल्या बायकोला पार्वती म्हणतो. त्याचप्रमाणें पाच वडाचीं झाडें असलीं, म्हणजे त्या जागेस पंचवटी म्हणतात व आपल्या घराजवळच्या नदीस गंगा म्हणतात त्याचप्रमाणें सागरमधील कोणतरी मोठ्या पुरुषानें या स्थानास हीं नावें परिस्थितीच्या सादृश्यानें

दिलेलीं असं वीं अशीं नावें जवळ जवळ आहेत व परिस्थिति समान आहे, म्हणून हीच लंका असें म्हणता येणार नाहीं रामलक्ष्मण व वानर यांनीं एकदर जो प्रदेश धुंडाळला व जे परिश्रम केले, तो १० मैलाच्या प्रदेशापुरताच मर्यादित होता, असें हे म्हणतात, पण त्यावर विश्वास ठेवणें कठीण आहे

औंधगावानजीक पचवटी, केदार अशीं नावें असलेलीं स्थानें आहेत. हीं नावें जशा येथील थोर पुरुषानीं ठेवलीं व त्यामुळें प्रचलित झाला, त्याचप्रमाणें सागर जिल्ह्यातील या स्थानासंबधानें मानणें योग्य दिसतें

नर्मदा नदीचा उल्लेख नाहीं, हा मुद्दा विचार करण्यासारखा आहे पण अनुल्लेख हा भरपूर पुरावा होऊ शकत नाहीं

तसेंच जर लंका ही सागरजिल्ह्यातील एक टेकडीपासून तों आस्ट्रेलिया पर्यंत मानता येणें शक्य असेल, तर ती सिंहलद्वीपाला मानीत आहेत, ती तरी का मानू नये ? सेतु, रामेश्वर, धनुष्कोटी वगैरे ठिकाणचे धार्मिक आचार जे अनादि कालापासून चालत आले आहेत, ते खोटे मानावे व दुसरीकडे लंका मानावी, असें करण्यास सबळ पुरावा अजून मिळाला नाहीं, असेंच आम्हास वाटतें तथापि या सज्जनानी जे हे प्रयत्न केले आहेत ते स्तुत्य व विचारार्ह आहेत, असेंच आम्हास वाटत आहे

शोधकानीं शोध करीत रहावें, नव्या नव्या लंका शोधाव्या, जर सिंहल ही लंका खरोखर नसेल, तर शोधता शोधता खरी लंका अशा प्रयत्नानीं सापडेल ती सापडेपर्यंत अपण सिलोन— सिंहलद्वीपालाच-लंका समजू, कारण या स्थानाला सर्व हिंदुस्थानभर फैलावलेल्या हिंदूंच्या अन्तःकरणात रुजमूल झालेल्या धार्मिक आचाराचें भरपूर पाठबळ आहे

या लंकेंत जावें व तेथे सतेचा शोध करावा असा विचार करून मारुती निघाला तो निघाला त्यावेळी त्याच्या उड्डाणानें महेन्द्रपर्वतावर जो हलकल्लोळ झाला, त्याचें वर्णन पहा—

## विद्याधरांची धांदल.

प्रस्ता विद्याधरास्तस्मादुत्पेतुः स्त्रीगणैः सह ॥ ११ ॥

पानभूमिगतं हित्वा हैममासन भाजनम् ।
पात्राणि च महार्हाणि करकांश्च हिरण्मयान् ॥ २३ ॥
लेह्यानुचावचान् भक्ष्यान् मांसानि विविधानि च ।
आर्षभाणि च चर्माणि खड्गांश्च कनकत्सरून् ॥ २४ ॥
कृतकण्ठगुणाः क्षीबा रक्तमाल्यानुलेपनाः ।
रक्ताक्षाः पुष्कराक्षाश्च गगनं प्रतिपेदिरे ॥ २५ ॥
हारनूपुरकेयूरपारिहार्यधराः स्त्रियः ।
विस्मिताः सस्मितास्तस्थुराकाशे रमणैः सह ॥ २६ ॥
इति विद्याधरा वाचः श्रुत्वा तेषां तपस्विनाम् ।
तमप्रमेयं ददृशुः पर्वते वानरर्षभम् ॥ २९ ॥
(सुदर० सर्ग १)

मारुतानें उड्डाण केल्याबरोबर जो हल्लकल्लोळ झाला, त्याबरोबर विद्याधर आपल्या स्त्रीगणासह त्या महेन्द्रपर्वतावरून आकाशमार्गानें निघून गेले. त्या पर्वतावरील पानभूमीवर असलेलीं मूल्यवान् पात्रें, आसनें, सुवर्णाचीं भांडीं, सुवर्णाचीं उदकपात्रें, नाना प्रकारचीं खाद्यपेयें, मांसें, ढाली, तलवारी वगैरे सर्व तेथल्या तेथें टाकून, कंठामध्यें माला धारण करणारे व शरीरावर रंगीबेरंगी फुलें व उट्या धारण करणारे, कमलासारख्या नेत्रांनीं युक्त हे बलवान् विद्याधर आकाशमार्गानें गडबडीनें गमन करूं लागले तेव्हां चंद्रहार, तोरड्या, बाजूबंद, गोट वगैरे अलंकार धारण करणाऱ्या स्मितमुखी त्यांच्या स्त्रियाही विस्मित झाल्या व त्याही आकाशामध्यें आपल्या प्रियकराऱ्याजवळ जाऊन उभ्या राहिल्या. विद्याधरांनीं तेथील तपस्वी लोकांचीं जेव्हां भाषणें ऐकलीं, तेव्हां ते खालीं पाहूं लागले, त्या वेळीं तो मोठा देह धारण करणारा वानर त्यांच्या दृष्टीस पडला.

विद्याधर आपल्या रमण्यांसह कसा विहार करीत असत, तें येथें स्पष्ट दिसतें खावें, प्यावें, मजा करावी, एवढेंच याच कार्य येथे दिसत आहे. बाँबहल्ला होताच तरुणतरुणांनी 'लकी रेम्बॉरट' म्हणून गडबडीनें जीव वाचवण्यासाठीं कोठेंतरी जीव घेऊन जावें, तसा प्रकार या विद्याधराचा येथें दिसत आहे! सुवर्णपात्रें व सुवर्णासनें असल्यामुळें या विद्याधरांचें–पदवीधरांची–चैन कशी चालत

होती, तें उघड दिसतें.

## रामेश्वर व लंका

रामेश्वराहून मारुती निघाला, तो मध्यें असलेल्या लंघवट्यावर विश्रांति घेत घेत लंकेस पोंचला. अन्तर १०० योजनाचें होतें–

**योजनानां शतं चापि कपिरेष समाप्लुतः ।**
**तच सानुषु विश्रान्तः शेषं प्रक्रमतामिति ॥ १०८ ॥**

(सुंदर० १)

शंभर योजनें समुद्र तरून जाण्यासाठीं या मारुतीनें उड्डाण केलें आहे. मैनाकपर्वताच्या (सानुषु) अनेक शिखरावर विश्रांति घेत घेत तो हें अन्तर तोडणार आहे.

मैनाकपर्वताला अनेक शिखरें होतीं व तीं शिखरें लंका व भरतखण्ड यामध्यें समुद्रपृष्ठावर थोडीं वर डोकावीत होतीं. मारुतीनें मधूनमधून या पर्वतशिखराचा आश्रय केला, तेथें थोडी विश्रांति घेतली व ताजेतवाने होऊन पुढील प्रवास केला. अशा रीतीनें मारुतीनें हें समुद्राचें उल्लंघन केलें.

वीस–पचवीस मैलपर्यंत पोहणारे सध्याहि आहेत. तेव्हां मारुतीनें अशा रीतीनें प्रवास केला, तो अशक्य मानण्याचें कारण दिसत नाहीं. तथापि इंग्लिश खाडीचें २२ मैलांचें अन्तर तोडणाऱ्या स्त्रियाही आहेत. शिवाय यांही योगासनें घालून पाण्यावरही दोनदोन व तीनतीन तास विश्रांति घेणारे आम्ही प्रत्यक्ष पाहिले आहेत. हे पाण्यावर अशा आसनांनी तरंगत रहात व ध्यान करीत. तेथें मत्स्यासनासारख्या आसनांनी पाण्यावर तासदोन तास तरंगता येतें व विश्रांति घेतां येते. अनुभव विचारांत घेणें योग्य आहे.

मारुती लंकेस गेला, तदा वेळीं समुद्रपृष्ठापेक्षा उंच असलेले कांहीं भूभाग मध्यें असावे, असें वरील वर्णनावरून दिसतें व योगासनांनींहि पाण्यावर तरंगत राहून विश्रांति घेतां येणें शक्य आहे. ही विश्रांति व मधील उंचवट्यावर मिळणारी विश्रांति घेऊन वाटेल तेवढा पोहणारा अशा योजनेनें समुद्र तरून जाणें शक्य आहे, असें वाटतें. हें काम केवळ वानराचें काम आहे, यांत शंका नाहीं.

मैनाकपर्वतावरील लोकांनीं मारुतीच्या आतिथ्याची मोठी तयारी केली होती, ती पाहून त्यास मारुती म्हणतो–

> प्रीतोऽस्मि, कृतमातिथ्यं, मन्युरेषोऽपनीयताम् ॥ १२४ ॥
> त्वरते कार्यकालो मे अहश्चाप्यतिवर्तते ।
> प्रतिज्ञा च मया दत्ता न स्थातव्यमिहान्तरा ॥ १२५ ॥
> इत्युक्त्वा पाणिना शैलं आलभ्य हरिपुंगवः ।
> जगामाकाशमाविश्य वीर्यवान् प्रहसन्निव ॥ १२६ ॥
> ( सुंदर० १ )

'तुमच्या या आदरातिथ्यानें मी संतुष्ट झालों आहें. तुम्ही माझें योग्य आतिथ्य केलें आहे. तुमच्या म्हणण्याप्रमाणें मला येथें फार वेळ राहता येत नाही, म्हणून रागाऊं नका वेळ थोडा शिल्लक आहे. दिवस जात चालला आहे. मध्यें थांबणार नाहीं अशी मी प्रतिज्ञाही केली आहे.' असें म्हणून हनुमानानें त्या ठिकाणीं थोडा हाताने स्पर्श केल्यासारखें केलें व पुन. पुढचा मार्ग आक्रमण करण्यास हंसतमुखानें प्रारंभ केला

कार्य करणारे स्वयंसेवक असे असले, तरच कार्य होतें. खऱ्या स्वयंसेवकाचें लक्ष्य विश्रांतीकडे नसून कार्य करण्याकडे असतें. असेच सेवक धन्य होत.

## सिंहिकाराक्षसीचा वध.

> छायाग्राहि महावीर्यं तदिदं नात्र संशयः ।
> स तां बुध्यार्थतत्त्वेन सिंहिकां मतिमान् कपिः ॥१८१॥
> ततस्तस्या नखैस्तीक्ष्णैर्मर्माण्युत्कृत्य वानरः ॥ १८७ ॥
> हृतहृत्सा हनुमता पपात विधुराम्भसि ॥ १८९ ॥
> ( सुंदर० १ )

'छायेला पकडून त्याच्या योगानें आकर्षण करणारें तें मोठें जलचर होतें. ती सिंहिका आहे, असें जाणून तिचीं मर्में नखानीं उकरून त्यानें बाहेर काढलीं व तिचें काळीज फाडलें, तेव्हा ती मरून पाण्यात पडली.'

येथें सिंहिकेला 'छायाग्राही' असें म्हटलें आहे. मारुतीची जी छाया

पण्यावर पडली होती, ती या राक्षसीनें पकडल्यामुळें मारुती ओढला गेला ' ही कविकल्पना आहे, हें उघड आहे प्रचंड सिंहिणीसारख्या जलचराला पकडून नखानीं तिचीं मर्में उकरून बाहेर काढलीं व काळीज फाडून तिला ठार केलें. हें प्रचण्ड शक्तीवाचून होणें शक्य नाहीं परराष्ट्रात एकटेंच जावयाचें असलें, तर अशी प्रचण्ड शक्ति असली पाहिजे

## न थकतां प्रवास.

स सागरमनाधृष्यमतिक्रम्य महाबलः ।
त्रिकूटस्य तटे लंकां स्थितः स्वस्थो ददर्श ह ॥ १ ॥
योजनानां शतं श्रीमांस्तीर्त्वाप्युत्तमविक्रमः ।
अनिश्वसन् कपिस्तत्र न ग्लानिमधिगच्छति ॥ ३ ॥
(सुंदर० २)

शंभर योजनें सागर तरून जाऊन हनुमान् लंकेला पोंचला, तेव्हां त्रिकूट पर्वताच्या शिखरावर असलेली लंका त्याला दिसली एवढा महासागर तो तरून गेला, तरी त्यास ( अ–निश्वसन् ) श्वास लागला नव्हता व तो थकलाही नव्हता, इतकेंच काय पण ( स्वस्थः ) जसा तो तरण्यापूर्वी होता, तसाच निकोप आताही होता इतके परिश्रम करनही तो थकला नाहीं

परराष्ट्रात जाणाराम्यें कशी शक्ति असली पाहिजे, तें यावरून समजतें शक्ति व युक्ति दोनही पाहिजेत

# लंकानगरी.

## मारुतीची चिंता

दर्दर्श स कपिः श्रीमान् पुरीं आकाशगां इव ॥ १९ ॥
पालितां राक्षसेन्द्रेण निर्मितां विश्वकर्मणा ॥ २० ॥
वप्रप्राकारजघनां विपुलांबुवनाम्बराम् ।
शतघ्नीशूलकेशान्तां अट्टालकवतंसकाम् ॥ २१ ॥
तस्याश्च महतीं गुप्तिं सागरं च निरीक्ष्य सः ।

रावणं च रिपुं घोरं चिन्तयामास वानरः ॥ २४ ॥
आगत्यापीह हरयो भविष्यन्ति निरर्थकाः ।
न हि युद्धेन वै लंका शक्या जेतुं सुरैरपि ॥ २५ ॥
इमां त्वविषमां लंकां दुर्गां रावणपालिताम् ।
प्राप्यापि सुमहाबाहुः किं करिष्यति राघवः ॥ २६ ॥
अवकाशो न सान्नस्तु राक्षसेष्वभिगम्यते ।
न दानस्य न भेदस्य नैव युद्धस्य दृश्यते ॥ २७ ॥

( सुंदर० २ )

मारुती जेव्हां लंकेजवळ पोंचला, तेव्हा त्याला ती लंका आकाशांत पोंचली आहे, अशी दिसली; कारण ती पर्वतावरच वसली होती. 'विश्वकर्म्यानें' ती निर्माण केली होती व रावणाचें तेथें राज्य होतें. त्या लंकेच्या चारही बाजूंला मोठमोठे तट होते व त्याबाहेर मोठे खंदक लागून राहिले होते. मध्येमध्ये मोठमोठे बुरूज असून, त्यावर तोफा व इतर मारा करण्याची सर्व शस्त्रास्त्रें सज्ज होतीं. मोठीं वनें व भरपूर पाणी यांची तेथें समृद्धि होती. दुरून शत्रूची देहेलणी करण्याच्या जागा होत्या व सर्वत्र अगदीं कडेकोट बंदोबस्त असून, सर्वत्र अगदीं जागता पाहरा होता. हें सगळें पाहून, मारुतीला फार काळजी वाटूं लागली.

मारुती हा सुग्रीवाचा मुख्य सेनापति होता व रावणाचा पराभव करून त्यास कैद करणाऱ्या वालीबरोबर असताना त्यानें अनेक विजयही मिळविले होते. तथापि लंकेंतील हा प्रचंड बंदोबस्त पाहून, त्याचें हृदय कांपूं लागलें व तो म्हणाला कीं, 'येथें वानर येऊन काय करूं शकतील बरें ? येथें इतका कडेकोट बंदोबस्त आहे कीं, देवांनाही येथें जय प्राप्त करणें दुर्घट आहे. मग वानरांची येथें काय स्थिति होईल ? राम येथें आला, तरी त्यास या रावणाचा पराभव कसा बरें करतां येणार ? आधीं येथें येणें कठीण ( दुःर्गा ), आणि रावणाच्या या बंदोबस्तामुळें त्याचा पाडाव होणें हे तर त्याहीपेक्षा कठीण आहे ! राक्षस आपल्या शक्तीच्या घमेंडींत असल्यामुळें ते सामोपचारानें वश होणें शक्य नाहीं. ते पुष्कळच श्रीमंत असल्यामुळें देणगी देण्यानें ते वश होणें अशक्य आहे. ते एकोप्यानें वागत असल्यामुळें त्यांत ( भेदः ) फितुरीही करतां येणार नाहीं व

युद्ध करून यास जिंकणें, हें तर यांच्या या कडेकोट बंदोबस्तामुळें अगदींच अशक्य आहे '

राक्षसांचें राज्य व वानरांचें राज्य या दोन राज्यांमध्यें धन, ऐश्वर्य, थाटमाट व बंदोबस्त या दृष्टींनीं इतका फरक होता लंकेचा थाटमाट पाहून, मारुतीवर जो परिणाम झाला, तो पाहण्यासारखा आहे. राक्षसांचा बाहेरचा देखावा गमलेल्या वीरासहि गांगरून सोडण्यासारखा होता वानरांचा मुख्य मंत्री व चतुर सेनापति हा गांगरून गेला आहे, हें येथे पहावें

## वेषान्तर करून प्रवेश.

मारुतानें वेषान्तर करून लंकेंत आपला प्रवेश करून घेतला होता पहा—

अनेन रूपेण मया न शक्या रक्षसां पुरी।
प्रवेष्टुं राक्षसैर्गुप्ता क्रूरैर्बलसमन्वितैः ॥ ३१ ॥
महौजसो महावीर्या बलवन्तश्च राक्षसाः।
वञ्चनीया मया सर्वे जानकीं परिमार्गता ॥ ३० ॥
(सुंदर० २)

या माझ्या वेषानें मला लंकेंत प्रवेश मिळणें कठिण आहे येथें कडेकोट (गुप्त) पहारा आहे व हे राक्षस शूर आहेत या राक्षसांना (वञ्चनीया) फसवूनच मला आंत प्रवेश करून घेतला पाहिजे व येथे सीतेचा शोध लावला पाहिजे.

वेषान्तर करून पहारेकऱ्यांस चुकवून व फसवून हनुमान लंकेंत गेला असें दिसतें पहा-

लक्ष्यालक्ष्येण रूपेण रात्रौ लंकापुरी मया।
प्राप्तकालं प्रवेष्टुं मे कृत्यं साधयितुं महत् ॥ ३३ ॥

'दिसलें तरी कोणास ओळखतां येऊं नये व कोणी पाहिलें तरी त्याच्या मनांत संशय येऊं नये अर्थात् कोणास आपला संशय येऊं नये, असें रूप धारण करून, कोणास ओळखतां येऊं नये असा वेषानें, रात्रीच्या वेळीं लंकेंत प्रवेश करावा ' असा विचार करून नंतर तो रात्रीच्या वेळीं पहारेकऱ्यांची नजर चुक-

वानरवेषांत किंवा दुसऱ्या कोणत्यातरी वेषानें राहिलों तर तेव्हांच ओळखला व पकडला जाईन. सर्व माणसांच्या हालचालींवर राक्षसांची सारखी कडक नजर आहे. तेव्हां यांना न दिसतां कसें वरें येथें रहावें ?"

मारुती असा विचार करूं लागला. या मारुतीच्या बोलण्यावरून लंकेंतील बंदोबस्त दिसावयास किती कडक होता, तें सहज समजेल. पहारेकऱ्यांची सर्व माणसांवर कडक नजर असे. कोण नवा आला, कोण कसा वागतो, कोण कोठें राहतो, तो कशासाठीं आला, काय करणार आहे, किती दिवस राहणार वगैरे सर्व तपास हे राक्षस करीत असल्यामुळें न ओळखतां मारुती लंकेंत राहूं शकेल, हें शक्यच नव्हतें. राक्षसाच्या वेषानें राहिले तरी सुद्धां मारुतीला पकडले जाण्याचें भय होतें, मग तो जर का वानरवेषांत हिंडतांना रस्त्यांत आढळला तर तात्काळ पकडला गेला असता, यांत शंका नाहीं.

मारुतीनें ही सर्व पाहणी केली व रात्र पडल्यानंतर पहारेकऱ्यांना चुकवून त्यानें गुप्तपणानें आपला प्रवेश अंधारांतून लपतछपत करून घेतला.

लंकेच्या आंत जेव्हां मारुती गेला तेव्हां त्यानें जी लंकेची शोभा पाहिली ती काय वर्णावी ? उत्तम, रुंद व प्रशस्त राजमार्ग आहेत, आठ आठ मजल्यांचीं गगनचुंबीत घरें हारीनें लागून राहिलीं आहेत, सर्व घरें चुनेगची असून त्यावर सोन्याचीं शिखरें चमकत आहेत. जिकडेतिकडे श्रीमंतीचा थाट आहे. सोनें, रत्न व ऐश्वर्य जिकडे पहाव तिकडे चमकत असल्याचें दिसत होतें. हें ऐश्वर्य पाहून मारुती चकित झाला ! अशा प्रचण्ड नगरींत सीतेचा शोध कसा लागेल, याची त्यास मोठी चिंता वाटली व तो थोडा उत्साहहीनही झाला.

जेव्हां तो लंकेंत प्रविष्ट झाला तेव्हां सूर्यास्त होऊन फार वेळ झाला नव्हता. सूर्यास्त होऊन तास दीड तासच झाला असावा. इतक्यात चन्द्राचा उदय होऊन शुभ्र चांदणें पडलें. त्या चांदण्यांत भव्य वाड्यांची छाया रस्त्यावर पडल्यामुळें घरांच्या बाजूनें जाणें त्याला शक्य झालें, अशा रीतीनें (चन्द्रोऽपि साचिव्यं कुर्वन् । ५।२।५ ) रामाच्या कार्यामध्यें चन्द्रहि हनुमानाला सहायक झाला !

हा दिवस कृष्ण पक्षांतील द्वितीयेच्या आसपासचा असावा. याच दिवसांत सूर्यास्तानन्तर घटकाभर पडतें व नंतर थोड्या वेळानें चन्द्र प्रकाशानें चकाकतात

मन्द नव्हता, तर चांगला विपुल होता. म्हणूनच हा तृतीया-चतुर्थीपर्यंतचा दिवस असावा असें वाटतें.

## निशाचर.

निचार हे रात्रीं कामें करीत व दिवसा निजत असावे असें वाटतें. रात्रीं २।३ वाजेपर्यंत याचे कार्यक्रम चालत. समारंभेलनें सर्व रात्रीं. मग उशिरां ३।४ वाजता निजत असल्यामुळें हे दुपारीं १०।१२ वाजेपर्यंत निजत असत. याचें मुख्य जेवणही रात्रीचेंच असे. फार लवकर उठले तर हे ९ वाजता किंवा १० वाजता उठत ! असा याचा कार्यक्रम बहुतेक रात्रीचाच असल्यानें यास निशाचर, रात्रिंचर, क्षपाचर अशीं नावें दिलेलीं असावीं असें दिसतें.

## रात्रभर दिवे जळत असत.

रात्रीच सर्व कामें करण्याचा परिपाठ असल्यामुळें लंकेंत रात्रभर दिवे जळत असावे, हें अगदीं स्वाभाविकच आहे.

**तां रत्नवसनोपेतां गोष्ठागारावतंसिकाम् ।**
**यंत्रागारस्तनीमृद्धां प्रमदामिव भूषिताम् ॥ १८ ॥**
**तां नष्टतिमिरां दीपैर्भास्वरैश्च महाग्रहैः ॥ १९ ॥**

( सुंदर० ३ )

त्या लंका-नगरीला रत्नखचित प्राकार होते. मोठमोठीं घरें व सुंदर बुरुज होते, शस्त्रास्त्रें व यंत्रें यांचीं घरें होतीं ही सर्व लंका नटलेल्या स्त्रीप्रमाणे शोभिवंत होती रात्रीं अनेक दीप जळत असल्यामुळें कोठें ही अंधार नव्हता. अशी ही सुंदर लंका मारुतीनें पाहिली.

रात्रभर दिवे जळत असत. हे रस्त्यावर व घरात जळत असल्यामुळें सर्व लंका प्रदीप्त झाल्याप्रमाणें दिसत होती अशा नगरीमध्यें मारुती प्रविष्ट झाला इतक्यात त्यास एका स्त्री पहारेकरणीनें हटकलें—

**कस्त्वं, केन कार्येण इह प्राप्तो वनालय ?**
**कथयस्वेह यत्तत्त्वं यावत्प्राणा धरन्ति ते ॥ २३ ॥**

( सुंदर० ३

ती म्हणाली- 'तूं कोण आहेस, कशासाठीं येथें आला आहेस! हे रानटी माणसा! लवकर बोल, नाहींतर प्राणाला मुकशील '

ही नगरसंरक्षक दलाची मुख्य अधिकारीण होती राक्षसांच्या राज्यांत या वेळीं स्त्रियास (Civil guard) नगरसंरक्षणाचें कार्य सांगत असत, असें यावरून वाटतें हीं स्त्री निर्भय होऊन रात्रीच्या वेळीं पहारा करीत होती व सर्व लंकानगरी हिच्याच स्वाधीन होती, म्हणजे सर्व नगरसंरक्षक दल हिच्याच आधीन होतें.)

मारुती लंकेंत प्रविष्ट होऊन तास दोन तास झाले असतील, इतक्यांत नगरसंरक्षक दलाच्या मुख्य अधिकारीण बाईनेंच हटकलें व 'तूं कोण आहेस?' असा दरडावून प्रश्न केला! मारुतीनें आपल्यापरी वेषान्तर वगैरे करून आपल्या गुप्ततेची सर्व तयारी केली होती व मांजराच्या पायानींहि तो आंत शिरला होता. पण लंकेचा बंदोबस्त असा होता कीं, त्यातून तो दोन तास सुद्धा न ओळखता राहू शकला नाहीं. येथें मारुती व लंकाधिकारीण यांच्यामध्यें झालेला संवाद पहाण्यासारखा आहे—

**लंकाधिकारीण**- ( कस्त्वं, केन कार्येण इह प्राप्तः ? ) तूं कोण व येथें का आलास ? जर तूं योग्य उत्तर न देशील, तर तत्काळ प्राणास मुकावें लागेल. लक्ष्यांत ठेव

**मारुती**- ( का त्वं विरूपनयना पुरद्वारेऽवतिष्ठसे ? ). हे कुरूप नेत्र असलेल्या स्त्रिये ? मी तुझ्या प्रश्नाचीं उत्तरें देईन, पण अधीं तूं मला हें सांग की, या नगरीच्या दारांत उभी राहणारी तूं कोण आहेस व येथें रस्ता आडवून का उभी राहिली आहेस ?

**लंका**- ( क्रोधानें ) मी महामति रावणानें लंकेचें संरक्षण करण्यासाठीं नेमलेली नगरसंरक्षक दलाची मुख्य अधिकारीण आहे माझी अवज्ञा करून तुला आंत जातां येणें शक्य नाहीं. ( दुर्धर्षाऽहं इमां नगरीं रक्षामि। मामवज्ञाय नगरीं प्रवेष्टुं न शक्यं । मया निहतः अद्यैव प्राणैः परित्यक्तः स्वप्स्यसे । ) संशयित माणसाला एकदम ठार मारण्याचा मला अधिकार आहे, हें लक्ष्यांत ठेव. त्यामुळे उन्मत्त होऊन बोलूं नकोस.

**मारुती**- हे स्त्रिये ! ही सुंदरी लंकानगरी पहावी एवढ्याच उद्देशानें मी

येथें आलों आहे माझा दुसरा काहीं मुद्दा उद्देश नहीं राजवाडे, उद्यानें व रमणीय स्थलें पाहून मी परत जाईन ( **द्रष्ट्यामि नगरीं लंकां साट्टप्राकारतोरणां । इत्यर्थमिह संप्राप्तः परं कौतूहलं हि मे ।** )

**लंका**– माझ्या परवानगीशिवाय तुला लंकेंत प्रवेश होणार नाहीं (**मामनिर्जित्य न शक्यं द्रष्टुं नगरम् ।** )

**मारुती**– बाईसाहेब ! बरें तर मला परवानगी द्या, मी नगरी पाहून परत जाईन ( **भद्रे ! दृष्ट्वा पुरीं पुनर्यास्ये यथागतम् ।** सु ३ )

इतकें भाषण होत आहे, इतक्यात लंकेनें त्या मारुतीच्या अगावर येऊन त्याच्या श्रीमुखात भडकविली, मारुतीहि तयारच होता त्यानेंहि तशाच त्वरात ओरडून तिच्यावर वज्रमुष्टीचा असा प्रहार केला कीं, ती तेथेंच चक्कर येऊन पडली तरी स्त्रीहत्या होऊं नये म्हणून मारुतीनें हलकेंच मुष्टिप्रहार केला होता, न होतर तिचा तेथें प्राणच गेला असता ( **कृपा चकार तेजस्वी मन्यमानः स्त्रियं च ताम् ।** )

मूर्छेतून शुद्धीवर आल्यानतर ती राक्षसी मारुतीला म्हणाली, ' असला पुरुष मी आजपर्यंत पाहिला नव्हता ( **पुरीं प्रविश्य सर्वकार्याणि विधत्स्व.**) आता या नगरींत जा व काय करावयाचें असेल तें कर व जेव्हा परत जाणें असेल तेव्हा जा तुला आता मोकळीक आहे मला माहीत आहे कीं रावणानें सीता चोरून आणल्यामुळें हें अरिष्ट या नगरीवर आलें आहे व यानें राक्षसाचा नाश व्हावयाचा आहे. ( सुदर ३)

लंकेच्या सरक्षणदलाच्या मुख्य अधिकारीण बाईशीं अशी ही पहिला भेट मारुतीची झाली ! या बाईला ' एकदम सशयितास ठार मारण्याचा अधिकार होता ' हें येथें लक्षात ठेवण्यासारखें आहे मग अटक करणें, ताकीद देऊन सोडणें, हे अधिकार त्यांच्या ओघास आले मारुतीसारख्या वीर पुरुषा थोबाडीत मारणारी ही स्त्री काहीं सर्वाच सुकुमार स्त्री असल, असें समजण्याचें कारण नाहीं त्यांच्या पथक त किती स्त्रिया होत्या, किती पुरुष होते, हें सागवत नाहीं, पण सर्व नगरीचें सरक्षण होण्य इतकें दल त्यांच्या ताब्यात होतें यात शक्य नाहीं

( मारुती जो लंकेंत गेला तो कोठें गल्ल्यांतून, कोठें ( **भवनात् भवनं** ) एका घरावरून दुसऱ्या घरावर उडी मारून, जशा रीतिनें जाता व हिंडतां आलें तशा रीतिनें गेला आहे. उत्तर हिंदुस्थानांतील लाहोर-अमृतसरचीं घरें ज्यानीं पाहिलीं असतील, त्यास एका घरावर चढलेला मनुष्य सर्व नगरभर एका घरावरून दुसऱ्या घरावर उड्या मारीत कसा हिंडूं शकतो, तें सहज समजू शकेल, मुंबईंत मात्र ठिकठिकाणीं हें शक्य आहे, पण उत्तर हिंदुस्थानांतील घरावरून जाण्या रीतीनें उडत जाणें अगदीं सहज होण्यासारखें तऱ्हा आहे. )

## लंकेंतील वेदघोष.

मारुती जेव्हा लंकेंत संचार करूं लागला, तेव्हा त्यानें तेथें स्त्रियाचें (**काञ्ची-निनदं, नूपुराणां नि:स्वनं शुश्राव । सुं० ४।११** ) नूपुराचें शब्द, तोरड्याचे शब्द ऐकले ( **सोपाननिनादान्** ) पायऱ्यावरून खालीं-वर जाताना होणारे आवाज ऐकले, ( **आस्फोटित-निनदान्, क्ष्वेडितान्** ) टाळ्याचे आवाज व तसेंच राक्षसाची आरडाओरडही त्यानें ऐकली, त्याबरोबरच—

> **शुश्राव जपतां तत्र मन्त्रान् रक्षोगृहेषु वै ।**
> **स्वाध्यायनिरतांश्चैव यातुधानान् ददर्श सः ॥** ( सुंदर ४-१३ )

राक्षस लोक मंत्राचा जप करीत होते, घरात वेदघोष चालले होते व वेदाचा स्वाध्याय चालू होता, हे मंत्रघोषही त्यानें ऐकले याबरून राक्षसामध्यें वेद-पाठी राक्षस होते, हें उघड होतें व हे राक्षस वैदिक धर्मी होते असें हि वाटतें. तसेंच पहा—

लंकेंत गेल्यावर सीतेचा शोध करीत करीत मारुती हिंडत होता ( **किंचित् शेषा निशाऽभवत् ।** ( सु० १८।१ ) पहाट होण्याची वेळ झाली. तेव्हा—

> **षडंगवेदविदुषां क्रतुप्रवरयाजिनाम् ।**
> **शुश्राव ब्रह्मघोषान् स विरात्रे ब्रह्मरक्षसाम् ॥**
> ( सुं. १८।२ )

षडंगवेदाध्यायी व यज्ञ करणाऱ्या राक्षसांतील ब्राह्मणाचा वेदघोष होऊं लागला तो वेदघोष मारुतीनें ऐकला

याप्रमाणें पहिल्या दिवशीं मारुती रात्रभर जागतच होता व त्यानें प्रारंभीं व शेवटीं म्हणजे रात्र पडताच व पहाट होताच लंकेंतील राक्षसांनीं केलेला वेदघोष ऐकला

यावरून उघड होत आहे कीं, रामरावणाचें भांडण हें वैदिकधर्म मानणाऱ्या दोन राष्ट्रांतील भांडण होतें सध्याचें युरोपमधील महायुद्ध असें ख्रिस्तधर्मी दोन राष्ट्रांतील आहे, तसेंच हें महायुद्ध वैदिकधर्मी दोन राष्ट्रांतील होतें

## चवाठ्यावर राक्षस.

लंकेंतील चवाठ्यावर राक्षस जमावानें पहारा करीत होते—

राजमार्गं समावृत्य स्थितं रक्षोगणं महत् ॥ १४ ॥
ददर्श मध्यमे गुल्मे राक्षसस्य चरान् बहून् ।
दीक्षितान् जटिलान् मुण्डान् गोजिनाम्बरवाससः ॥ १५ ॥
दर्भमुष्टिप्रहरणान् अग्निकुण्डायुधांस्तथा । ( सुंदर० ४ )

राजमार्गावरील चवाठ्यावर राक्षसांचे समुदाय उभे होते मधल्या मोठ्या चौकावर राक्षसांचे दूत उभे होते. तेथें कांहीं दीक्षा घेतलेले, कांहीं केंस वाढविलेले, व कांहीं मुण्डन केलेले होते कांहींनीं चामडीं पांघरलीं होतीं, कांहींच्या हातांत दर्भासारखीं आयुधें होतीं, कांहींच्या हातांत अग्निकुण्डासारखीं आयुधें होतीं, कांहींजवळ धनुष्यें, तलवारी, खड्गें व इतर आयुधें होतीं कांहीं उंच होते तर कांहीं ठेंगू होते, कांहीं लठ्ठ होते तर कांहीं कृश होते, कांहीं गोरे होते तर कांहीं काळे होते, कांहीं सुंदर होते तर कांहीं कुरूप होते असे पहारेकरी तेथें होते. ( सुंदर० स ४।१४–२४ पहा )

## रावणाचें शयनगृह.

रावणाचें शयनगृह जवळच मारुतीच्या दृष्टीस पडलें अनेक बलाढ्य राक्षस त्याचें रक्षण करीत होते अन्तःपुराचें रक्षण करणारे राक्षस तर विशेषच दक्ष होते द्वारीं पहारेकरी येथें उभे होते रावणाच्या अन्तःपुराच्या चहूंकडच्या प्राकाराच्या बाहेर जो खंदक होता, त्यांत पांढरीं कमळें फुललेलीं होतीं चारही

बाजूंनीं अगदीं कडेकोट बंदोबस्त होता. त्याच्या आंत हत्ती, घोडे, वाहनें, पाल-ख्या, उपवनें, उपवनांतील पशुपक्षी यांनीं तें स्थान फारच सजलेलें होतें. कोठेंही कशाचीहि न्यूनता नव्हती. जिकडे–तिकडे हिरे, मोती, मूल्यवान् रत्नें, चन्दन व कृष्णागरु यांची शोभा व यांचा थाट दिसत होता. ( सुंदर० ४।२३–३० )

( **लाघवेन समन्वितः कपि लंकां विचचार** ) हनुमान् हळूच लंकेंत गुप्तपणानें हिंडूं लागला. तो रावणाच्या (**राक्षसेन्द्रनिवेशनं** । सुं. ६।२,१०) महालाकडे गेला. त्यापुढें त्यानें रावणाच्या सरदारांचीं घरें पाहिलीं.

## रावणाचें उद्यान.

लंकेंतील शोभा काय वर्णावी ? जिकडे पहावें तिकडे ऐश्वर्य, शोभा, रमणीयता, सुंदरता भरलेली होती. कोठें काहीं सुद्धां उणें नव्हतें. ( **लतागृहाणि** ) वेलीचींच घरें बागामध्यें बनवलेलीं होतीं, ( **चित्रशालागृहाणि** ) चित्र-विचित्र व चित्रें ठेविलेलीं कांहीं घरें ( **म्यूझियम्स** ) होतीं; ( **क्रीडागृहाणि** ) खेळ खेळण्याचीं गृहें होतीं, वाटेल त्या ऋतूंत हवा तो खेळ खेळता यावा अशी योजना येथें होती; ( **दारुपर्वतकानि** ) लांकडी कृत्रिम पर्वत केलेले होते; ( **कामस्य गृहकं** ) रतिगृह होतें, ( **दिवागृहकं** ) दिवसाची क्रीडा करण्यासाठीं एक निराळें घर होतें. बागेमध्यें मोर होते, अनेक पशुपक्षी होते व त्या त्या पशुपक्ष्यासाठीं जशी जशी योजना करणें आवश्यक होतें, तशी तशी योजना तेथें केलेली होती.

रावणाच्या घराण्यांत तर सर्वच ( **जाम्बूनदमयानि शयनासनानि, भाजनानि** ) सोन्याचें सामान होतें, आसनें, पलंग, इतर पात्रें हें सर्वच सोन्याचें व हिऱ्यामोत्यांचें होते.

आसवें, मद्यें व सुरा यांसाठीं विचित्र भांडींही तशींच मूल्यवान होतीं. रावणाच्या या शयनमंदिरांत शेंकडों स्त्रीरत्नें शोभत होतीं. अशा रावणगृहामध्यें मारुती प्रविष्ट झाला. [ सुंदर० ६ ]

हें सर्व ऐश्वर्य पाहून [ **महीतले स्वर्ग** ] पृथ्वीवर हा स्वर्गच उतरला आहे कीं काय, असें मारुतीस वाटलें. [ सुं० ७ ]

रावणाचा वाडा एक योजन लांब व अर्धे योजन रुंद असून, त्या वाड्याच्या चारही बाजूस [ बहुप्रासादसंकुलं ] अनेक वाडे लागून राहिले होते. [ सु० ९ ] येथें जवळच पुष्पकविमान होतें त्याच्या आत पुष्कळ खोल्या होत्या, व त्या आतून प्रकाशित होत्या. ( कूटागारैः शुभागारैः ) त्यात काही कूटगृहें व काहीं क्रीडा करण्याचीं शुभगृहें होतीं. हें विमान शोभेनें (प्रदीप्तं इव श्रिया ) प्रकाशित होत होतें.

रावणाच्या अन्तःपुरात ( सहस्रं नरनारीणां ) हजारों सुंदर व श्रेष्ठ स्त्रिया होत्या. यांचें ऐश्वर्य खोळे दिपून जाण्याजोगें होतें खान, पान, क्रीडा व चैन यांची जिकडे तिकडे रेलचेल होती.

## रावणाच्या स्त्रिया.

त्या मंदिरामध्यें त्या स्त्रिया अस्ताव्यस्त निजलेल्या होत्या. त्या कशा तेथें आल्या होत्या, तें ही पहा—

राजर्षिविप्रदैत्यानां गंधर्वाणां च योषितः ।
रक्षसां चाभवन् कन्यास्तस्य कामवशंगताः ॥ ६८ ॥
युद्धकामेन ताः सर्वा रावणेन हृताः स्त्रियः ।
समदा मदनेनैव मोहिताः काश्चिदागताः ॥ ६९ ॥
न तत्र काश्चित् प्रमदाः प्रसह्य
वीर्योपपन्नेन गुणेन लब्धाः ।
न चान्यकामापि न चान्यपूर्वा
विना वराहीं जनकात्मजां तु ॥ ७० ॥

( सुंदर० ९ )

श्रेष्ठ क्षत्रिय, विप्र, दैत्य, राक्षस, गंधर्व यांच्या मुली स्वतः रावणावर लुब्ध हेऊन त्याच्या भार्या झाल्या होत्या. काहीं स्त्रिया रावणानें युद्धात जिंकून आण-लेल्या होत्या, व कांहीं त्याच्यावर मोहित होऊन आल्या होत्या रावण जरी सामर्थ्यवान् होता, तरी त्यानें त्या स्त्रिया बलात्कारानें आणल्या नव्हत्या. बहुतेक स्त्रिया त्याच्यावर अनुरक्त होऊन आल्या होत्या. दुसऱ्यानें पाणिग्रहण केलेली

अशी एखादी स्त्री तेथे नव्हती व दुसऱ्या पुरुषाची इच्छा करणाराहि स्त्री तेथें कोणी नव्हता. त्या लंकेत फक्त एकटी सीताच अशी होती कीं, जिचें दुसऱ्यानें पाणिग्रहण केलें होतें व जी दुसऱ्यावर प्रेम करीत होता बाकीच्या सर्व स्त्रिया रावणावर लुब्ध व अनुरक्त होऊनच त्याच्या जवळ राहिल्या होत्या

शत्रूला जिंकून त्याच्या मुली रावणानें आणल्या होत्या. अशा रीतिनें शत्रुचा पराभव केल्यानंतर तेथील स्त्रीरत्नें आणलीं तर तो दोष समजण्यात येत नसे असें वाटतें बाकीच्या स्त्रिया त्यावर अनुरक्त होऊन आल्या होत्या व त्या रावणाबरोबर आनंदानें राहू इच्छीत होत्या म्हणून, जिची इच्छा नसताना तिला जबरदस्तीनें आणली असें म्हणता येईल, अशी एकच स्त्री या वेळीं लंकेमध्यें होती व तीच 'सीता' होय बाकीच्या सर्व स्त्रिया स्वसुखानें रावणाच्या भार्या झालेल्या होत्या व म्हणून बहुपत्नीत्वाचा दोष सोडला तर रावणानें स्त्री-जातीवर अत्याचार केला नव्हता, असें येथें सर्वांचें सांगणें आहे

सीतेला रावणानें चोरून आणली, हा रावणाचा दोष झाला हें खरें, पण हा त्याचा पहिलाच दोष आहे अशी एखादी दुसरी स्त्री त्यानें चोरून आणलेली नव्हती सीता चोरून आणली हें खरें व हा दोषहि खरा आहे, पण सामर्थ्य असूनहि रावणानें सीतेवर बळजबरी केली नाहीं, तर उलट त्यानें तिचें मन वळवण्याचा प्रयत्न चालविला होता वश न झाली, तर 'सीतेला सकाळच्या न्याहारीला मारून खाईन,' असें तो म्हणत होता, पण अबलेवर बलात्कार करीन, असें तो म्हणत नव्हता म्हणजे त्याच्या पापकृत्यातहि थोडी मर्यादा होती या रावणाच्या मर्यादावृत्तीमुळेच सीता रावणाच्या तावडीत सापडली असताहि शुद्ध राहू शकली आज बायका चोरणारे काहीं कमी नाहींत; पण हे सध्याचे रावण या पूर्वीच्या रावणापेक्षा पुष्कळच अधः पतित आहेत, असें म्हटल्यावाचून येथें रहावत नाहीं

## रावणाचें छत्र.

रावणाचें पांढरें शुभ्र छत्र (पाण्डुरं छत्रं) त्याच्या सोन्याच्या पलंगावर सळकत हातें त्या चिन्हावरून हा पलंग रावणाचा आहे, असें मारुतीनें ओळखलें.

(सु १०)

जवळच **मंदोदरीचा** पलंग होता. मंदोदरी फार सुंदर (**गौरीं कनकवर्णाभां**) गोरी, सोन्यासारख्या उज्ज्वल कान्तीनें युक्त होती. त्यामुळें तीच **सीता** असावी, असें मरुतीस वाटलें. (सं १०।५०-५४) असा विचार मनात येताच मरुतीला फार वाईट वाटलें, पण लगेच सीता कधींहि परपुरुषाला वश होणार नाहीं—

> न रामेण वियुक्ता सा स्वप्तुमर्हति भामिनी ।
> न भोक्तुं नाप्यलंकर्तुं न पानमुपसेवितुम् ॥ २ ॥ (सं० ११)

रामाचा विरह झालेली सीता अलंकार कधींहि घालणार नाहीं. भोजन करणार नाहीं. रसपान करणार नाहीं व दुसऱ्या पुरुषाबरोबर राहूंही शकणार नाहीं, तिला झोपही येणार नाहीं.

असें म्हणून त्यानें पहिला विचार आपल्या मनातून दूर केला. या रावणाच्या अन्तःपुरामध्यें सुमारें दोन हजार स्त्रिया होत्या. (सं ११।७,९) पण यात सीता नाहींच नाहीं, कारण या स्त्रिया येथें सुखानें निजल्या आहेत, आनंदित दिसत आहेत, हृष्टपुष्ट दिसत आहेत, यावरूनच यात सीता नाहीं असें ठरतें, असें तो म्हणाला.

साध्वी सीतेसंबंधीं किती विश्वास मारुतीच्या मनात होता हें यावरून समजतें. मारुतीनें मनाशीं खूणगाठ बांधली होती कीं, जर सीता येथें कोठें असेल, तर ती उपवासानें कृश झालेली, चाचण्यानें तारवटलेली, अस्वच्छतेनें मलीन झालेली, त्रासल्यानें दीन दिसणारी, पण रामावरील निष्ठेच्या आत्मिक तेजानें चमकणारी व निश्चयानें संबीर असीच असेल. अशा सीता तो हुडकीत होता. ही त्याची सीतेविषयींची कल्पना बरोबर होती व पुढें तशीच ती त्याला सांपडलीही आहे. रावणाच्या अन्तःपुरात ज्या स्त्रिया होत्या, त्या तुमच्या विचाराच होत्या.

## एक धार्मिक शंका.

रावणाच्या अन्तःपुरांत प्रवेश करून, मारुतीनें हजारों स्त्रिया अस्तव्यस्त निजलेल्या पाहिल्या, त्यात दिसूं नये ते अवयव त्याच्या दृष्टीस पडले. परस्त्रियांना

अशा स्थितींत परपुरुषानें पाहूं नये व मारुतीसारख्या ब्रह्मचाऱ्यानें तर असे निद्रिस्त स्त्रियांचें अवलोकन करणें वाईटच, कारण मारुती हा अविवाहित होता. म्हणूनच त्याच्या मनात अशी शंका आली—

परदारावरोधस्य प्रसुप्तस्य निरीक्षणम् ।
इदं खलु ममात्यर्थं धर्मलोपं करिष्यति ॥ ३९ ॥
न हि मे परदाराणां दृष्टिर्विषयवर्तिनी ॥ ४० ॥
न तु मे मनसा किंचिद्वैकृत्यमुपपद्यते ॥ ४२ ॥
मनो हि हेतुः सर्वेषां इंद्रियाणां प्रवर्तने ।
शुभाशुभास्ववस्थासु तच्च मे सुव्यवस्थितम् ॥ ४३ ॥
नान्यत्र हि मया शक्या वैदेही परिमार्गितुम् ।
स्त्रियो हि स्त्रीषु दृश्यन्ते सदा संपरिमार्गणे ॥ ४४ ॥
न शक्यं प्रमदा नष्टा मृगीषु परिमार्गितुम् ।
तदिदं मार्गितं तावत् शुद्धेन मनसा मया ॥ ४५ ॥

( सुंदर० ११ )

मारुती विचार करतो– 'मी या अंतःपुरात या इतक्या निजलेल्या स्त्रिया पाहिल्या, यामुळें माझ्या ब्रह्मचर्यरूपी धर्माचा लोप तर होणार नाहीं ना? परस्त्रिया या निजल्या असता त्यास असें निरखून पाहणें योग्य नव्हे, पण यांना पहात असतांना माझी दृष्टि विषयी बनलेली नव्हती. माझ्या मनात यत्किंचितही वटपित विचार उत्पन्न झालेला नाहीं. मनाच्या भावनेनेंच धर्माधर्म ठरत असतात तें माझें मन अगदीं शुद्ध आहे अहो! तर या स्त्रियांत सीतेला शोधावयाची नाहीं, तर ती काय हरिणींमध्यें दिसणार आहे? स्त्रिया या स्त्रियांमध्येंच सांपडणें शक्य आहे यासाठीं शुद्ध मनानें मी जें हें केलें, त्यामुळें धर्माचा लोप होणें शक्य नाहीं'

मारुतीच्या मनात लैंगिक कुविचार मुळींच उत्पन्न झाले नव्हते, तर तो आपलें कर्तव्य शुद्ध मनानें करीत होता, म्हणूनच तो शुद्ध होता.

## सीता मेली कीं काय?

जेव्हा मारुतीनें सर्व वाडे, घरें, उद्यानें, उपवनें, मार्ग, वगैरे सर्व पाहिले व

सीता त्यास दिसली नाहीं, तेव्हां तो मनांत म्हणूं लागला कीं—

**स्वशीलसंरक्षणतत्परा सती**
**हता भवेत् आर्यपथे परे स्थिता ॥ ३ ॥** (सुंदर १२)

'सीता आपलें चारित्र्य रक्षण करीत असल्यामुळें म्हणजे ती रावणाला वश न झाल्यामुळें राक्षसांनीं तिला ठार मारली असावी' असे विचार मारुतीच्या मनांत येऊं लागले व तो म्हणूं लागला कीं, (**सुतीक्ष्णदण्डो बलवांश्च वानरः**) सुग्रीव बलवान् आहे व त्याची शिस्त कडक आहे, सीतेचा शोध केल्याशिवाय मी परत गेलों, तर तो मला कठोर दण्ड केल्याशिवाय राहणार नाहीं

## कडक सैनिकशिस्त.

या मारुतीच्या म्हणण्यावरून वानरराज्यांत सैनिकशिस्त कशी होती, तें कळून येईल. या शिस्तीमुळेंच वानरराज्य बलवान् होतें रावणालाही वालीचें भय यामुळेंच वाटत होतें व वानरांचा सेनापतीच प्रत्यक्ष या शिस्तीचें भय वर्णन करीत आहे. उदयोन्मुख राष्ट्रांत अशीच शिस्त राहिली पाहिजे

## सीतेचें काय झालें असेल ?

१ रावणाला भिऊनच ती मेली असेल,
२ रावणाचा पळण्याचा वेग सहन न झाल्यानें तिनें प्राण सोडला असेल,
३ ती रावणाच्या हातातून निसटून मध्येंच कोठेंतरी पडली व मेली असेल,
४ ती समुद्रांतच पडली असेल,
५ रावणानें ती खाऊनही टाकली असेल,
६ किंवा रावणाच्या स्त्रियांनीं खाली असेल,
७ किंवा ती कोठें (**भृशं लालप्यते बाला**) 'राम राम' म्हणत बसली असेल (सु सर्ग १३)

आतां हीं अशी जर नाना पत्रिकी असली, तर मी परत जाऊन रामाला काय सांगूं ? हें रामाकडे सांगूं ही वाईट व न सांगूं ही वाईट सीतेसंबंधीं दुर्वार्ता जर मी सांगितली, तर राम मरेल व नंतर लक्ष्मण, सुग्रीव वगैरे सर्वच मरतील, तिकडे

कौसल्या, सुमित्रा वगैरे ह्या सर्वच दुःखानें मरतील. या सर्वांच्या मृत्यूस ( **घोर-मारोदनं मन्ये गते मयि भविष्यति । १३।३५** ) मी तेथें गेलों तर मी कारण होणार आहें, म्हणून येथेंच प्रायोपवेशन करून मरावें हे बरें, असें मारुतीनें ठरविलें.

## सीता संध्या करण्यासाठीं येईल.

अशोकवनामध्यें एक नदी होती, ती पाहून हनुमान म्हणतो कीं—

**संध्याकालमनाः श्यामा ध्रुवमेष्यति जानकी ।**
**नदीं चेमां शुभजलां संध्यार्थे वरवर्णिनी ॥ ४९ ॥**
**यदि जीवति सा देवी ताराधिपनिभानना ।**
**आगमिष्यति सावश्यं इमां शीतजलां नदीम् ॥ ५१ ॥**
(सुंदर० १४)

'जर सीता जिवंत असेल, तर ती संध्या करण्यासाठीं या नदीवर अवश्य येईल.' मारुतीला सीता संध्या करीत होती कीं काय, तें माहीत नव्हतें, पण आर्यस्त्रिया संध्या करीत असत, हें त्यानें पाहिलें असावें व सीता ही धार्मिक वृत्तीची सदाचारसंपन्न साध्वी स्त्री आहे, यासाठीं ती संध्या करावयास येथें अवश्य येईल, असें तो म्हणत आहे. यावरून या वेळच्या द्विजस्त्रिया सकाळ-संध्याकाळ संध्या करीत असत, असें दिसतें. यासंबंधीं विशेष शोध करणें इष्ट आहे. मारुती स्वतः वेदवेदांगपारंगत होता व स्त्रिया संध्या करतात कीं नाहीं, तें त्यास नक्की माहीत असलें पाहिजे. यासाठीं हें प्रमाण या दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे

## उत्साह हें यशाचें मूळ आहे.

**अनिर्वेदः श्रियो मूलं अनिर्वेदः परं सुखम् ।**
**भूयस्तत्र विचेष्यामि न यत्र विचयः कृतः ॥ १० ॥**
**अनिर्वेदो हि सततं सर्वार्थेषु प्रवर्तकः ।**
**करोति सफलं जन्तोः कर्म यच्च करोति सः ॥ ११ ॥**
(सुंदर० १२)

सीता त्यास दिसली नाहीं, तेव्हां तो मनात म्हणूं लागला कीं—

**स्वशीलसंरक्षणतत्परा सती**
**हृता भवेत् आर्यपथे परे स्थिता ॥ ३ ॥** (सुंदर १२)

' सीता आपलें चारित्र्य रक्षण करीत असल्यामुळें म्हणजे ती रावणाला वश न झाल्यामुळें राक्षसानीं तिला ठार मारली असावी ' असे विचार मारुतीच्या मनात येऊं लागले व तो म्हणूं लागला कीं, (**सुतीक्ष्णदण्डो बलवांश्च वानरः**) सुग्रीव बलवान् आहे व त्याची शिस्त कडक आहे, सीतेचा शोध केल्याशिवाय मी परत गेलों, तर तो मला कठोर दण्ड केल्याशिवाय राहणार नाहीं

## कडक सैनिकशिस्त.

या मारुतीच्या म्हणण्यावरून वानरराज्यात सैनिकशिस्त कशी होती, तें कळून येईल. या शिस्तीमुळेंच वानरराज्य बलवान् होतें रावणालाही वालीचें भय यामुळेंच वाटत होतें व वानराचा सेनापतीच प्रत्यक्ष या शिस्तीचें भय वर्णन करीत आहे. उदयोन्मुख राष्ट्रांत अशीच शिस्त राहिली पाहिजे

## सीतेचें काय झालें असेल ?

१ रावणाला भिऊनच ती मेली असेल,
२ रावणाचा पळण्याचा वेग सहन न झाल्यानें तिनें प्राण सोडला असेल,
३ ती रावणाच्या हातातून निसटून मध्येच कोठेंतरी पडली व मेली असेल,
४ ती समुद्रातच पडली असावी,
५ रावणानें ती खाऊनही टाकली असेल
६ किंवा रावणाच्या स्त्रियानीं खाल्ली असेल,
७ किंवा ती कोठें (भूमौ लालप्यते बाला) 'हा राम' म्हणत बसली असेल (सुं सर्ग १३)

आता ही अशी जर नाश पावली असली, तर मी परत जाऊन रामाला काय सांगू ? हें सांगणेंही बरें व न सांगणेंही बरें या संबंधीं दुसरें जर मी सांगितलें, तर राम मरेल व नंतर लक्ष्मण, सुग्रीव वगैरे सर्वच मरतील. तिकडे

कौसल्या, सुमित्रा वगैरे हा सर्वच दुःखानें मरतील. या सर्वांच्या मृत्यूस ( **घोरमारोदनं मन्ये गते मयि भविष्यति। १३।३५** ) मी तेथें गेलों तर मी कारण होणार आहें, म्हणून येथेंच प्रायोपवेशन करून मरावें हे बरें, असें मारुतीनें ठरवलें.

## सीता संध्या करण्यासाठीं येईल.

अशोकवनामध्यें एक नदी होती, ती पाहून हनुमान म्हणतो कीं–

**संध्याकालमनाः श्यामा ध्रुवमेष्यति जानकी।**
**नदीं चेमां शुभजलां संध्यार्थे वरवर्णिनी ॥ ४९ ॥**
**यदि जीवति सा देवी ताराधिपनिभानना।**
**आगमिष्यति सावश्यं इमां शीतजलां नदीम् ॥ ५१ ॥**
( सुंदर० १४ )

'जर सीता जिवंत असेल, तर ती संध्या करण्यासाठीं या नदीवर अवश्य येईल.' मारुतीला सीता संध्या करीत होती कीं काय, तें माहीत नव्हतें; पण आर्यस्त्रिया संध्या करीत असत, हें त्यानें पाहिलें असावें व सीता ही धार्मिक वृत्तीची सदाचारसंपन्न साध्वी स्त्री आहे, यासाठीं ती संध्या करावयास येथें अवश्य येईल, असें तो म्हणत आहे. यावरून या वेळच्या द्विजस्त्रिया सकाळसंध्याकाळ संध्या करीत असत, असें दिसतें यासंबंधीं विशेष शोध करणें इष्ट आहे. मारुती स्वतः वेदवेदांगपारंगत होता व स्त्रिया संध्या करतात कीं नाहीं, तें त्यास नक्की माहीत असलें पाहिजे. यासाठीं हें प्रमाण या दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे

## उत्साह हें यशाचें मूळ आहे.

**अनिर्वेदः श्रियो मूलं अनिर्वेदः परं सुखम्।**
**भूयस्तत्र विचेष्यामि न यत्र विचयः कृतः ॥ १० ॥**
**अनिर्वेदो हि सततं सर्वार्थेषु प्रवर्तकः।**
**करोति सफलं जन्तोः कर्म यच्च करोति सः ॥ ११ ॥**
( सुंदर० १२ )

या यशाचें मूळ उत्साह आहे. सुखाचें मूळही उत्साहातच आहे. उत्साहानेंच सर्व कार्यें करता येतात. मनुष्याचा जन्म उत्साहानेंच सफल होतो. यासाठीं हताश न होता आतापर्यंत जे भाग मी शोधले नाहींत, ते आता शोधून काढतों.

असा निश्चय करून मारुतीनें पुनः पुष्पगृहें, लतागृहें, चित्रशाळा (म्यूजियम्स) नीचगृहें, भूमिगृहें (तळघरें), चैत्यगृहें (देवळें किंवा उंच घरें), (गृहातिगृहकान्) घरावरचीं लहान घरें, तात्पर्य जें काय तेथें पाहण्यासारखें होतें, तें सर्व त्यानें पाहिलें.

## सीता कशी दिसली ?

**(मलिनसंवीता)** मलिन वस्त्र नेसलेली, **(राक्षसीभिः समावृता)** राक्षसींनीं घेरलेली, **( उपवासकृशा )** उपवासामुळें कृश झालेली, **( दीना )** दीन झालेली, **( पुनः पुनः निःश्वसन्तीं )** पुनः पुन सुस्कारे टाकणारी, **( अश्रुपूर्णमुखी )** डोळ्यात आसवें असलेली, **( शोकध्यानपरा )** वियोगाचा शोक व रामाचें ध्यान यांत तत्पर **( नित्यं दुःखपरायणा )** नित्य दुःख करणारी **( वेण्या जघनं गतयैकया )** जांघेपर्यंत जिची एकच वेणी सुटलेली आहे अशी, अशी एक स्त्री मारुतीनें अशोक वनामध्यें पाहिली. या स्त्रीच्या *या स्थितीवरून हीच सीता आहे, असा मारुतीनें निर्णय केला*. कारण या स्थितीवरून हीच साध्वी स्त्री आहे, असं ठरलें व अशा जिकडे तिकडे चैनच चैन चाललेल्या लंकेंत अशी दुःखी स्त्री दुसरी कोण घरें असणार ? शिवाय हनुमानानें पूर्वी रावण तिला नेत असता एक वेळ सीता पाहिली होती.

**यथारूपा हि सा दृष्टा तथारूपेयमंगना ॥ १८ ॥**

( सुंदर १५ )

जशी सीता रावण पळवून नेत असता मारुतीनें पाहिली होती, तशीच ही दिसत आहे, म्हणून हीच सीता आहे, असें त्यानें ठरवलें. मारुती म्हणतो—

**इदं चिरगृहीतत्वाद् वसनं क्लिष्टवत्तरम् ।**
**तथाप्यनून तद्वर्णं तथा श्रीमद् यथेतरत् ॥ ४७ ॥**

( सुंदर, १५ )

हिच्या अंगावरचें हें वस्त्र तेंच तेंच वापरत असल्यानें फारच मलीन झालें आहे, हें खरें, पण आम्हाला जें हिचें दुसरें लुगडें सापडलें होतें, त्याच्या रंगाशीं या वस्त्राचा रंग जुळत आहे

इयं कनकवर्णांगी। (सु १५।४८)
नवहेमाभां। (सु १६।६)

ही सुवर्णाप्रमाणें कान्तीनें युक्त आहे. तसाच वर्ण रावणानें नेलेल्या स्त्रीचा होता, म्हणून हीच ती सीता आहे रामाचें मन हिच्यावर आहे व हिचें मन रामावर स्थिर आहे अशा स्थितींत राम जिवंत आहे, हें सुद्धा एक आश्चर्यच आहे!

दुष्करं कृतवान् रामो हीनो यदनया प्रभुः।
धारयत्यात्मनो देहं न शोकेनावसीदति॥

(सु० १५।५३, १६।२०)

अशा सीतेचा वियोग झाला असता राम जिवंत राहिला आहे, हें एक खरोखर आश्चर्यच आहे! अशा थोर लोकांना असलीं भयंकर दुःखें भोगावीं लागत आहेत यावरून (कालो हि दुरतिक्रमः। १६।३) कालाचें उल्लंघन करणें अशक्य आहे, हेंच खरें

## चक्रवाकी

सीता मारुतीस कशी दिसली, याचें वर्णन करीत असतां मारुती म्हणतो—

सहचररहितेव चक्रवाकी ॥ ३० ॥
(सु १६)

सहचर चक्रवाक पक्षी दूर झाला असतां जशी चक्रवाकी दिसावी, तशी सीता दिसली हीच दम्पतीला उपमा अथर्ववेदामध्यें आलेली आहे —

इहेमौ इन्द्र सं नुद चक्रवाकेव दम्पती।
प्रजयैनौ स्वस्तकौ विश्वमायुर्व्यश्नुताम्॥

(अथर्व० १४।२।६४)

हे इंद्र! (इमौ) या पतिपत्नींना चक्रवाकाच्या जोड्याप्रमाणें राहण्यास

( सं नुद ) प्रेरणा कर. याना सुप्रजा होवो. याना उत्तम घर लाभो व याना पूर्ण आयुष्याचा लाभ होवो.

अथर्ववेदामधील दंपतींची उपमाच या सुंदरकाण्डात तशीच्या तशी आली आहे.

## एक वेणी.

सीता लंकेंत असताना तिची एक वेणी होती.

**एकया दीर्घया वेण्या शोभमानां ०।**

**( सुंदर० १९।१९ )**

एक दीर्घ वेणी पाठीवर लोंबत होती व त्या वेणीमुळें सीता शोभत होती. एक वेणी होती, याचा अर्थ असा दिसतो कीं, इतक्या दिवसात केंस विंचरून दुसरी वेणी घातली नव्हती. वेणीच होती, पण बुचडा नव्हता. वेणी स्त्रियाना केंस विंचरून जिची तिलाही घालता येते, पण विंचरण्यास फणी वगैरे साधन पाहिजे. तें येथे सीतेला मिळालें असतें, पण सीताच रावणाकडचें हें शृंगारसाधन वापरूं इच्छीत नव्हती. म्हणून अशी वेणी पहिल्या दिवशी होती, तशीच ती तिने शेवटपर्यंत ठेवलेली होती रामाचा विजय झाला व आपली सुटका झाली, तरच शृंगार करीन, नाहीं तर जशी स्थिति होईल, तशी होवो, अशी सीतेची मनःप्रवृत्ति सतीला योग्य अशीच झालेली होती व ती योग्यच होती.

**एकवेणी अधःशय्या ध्यानं मलिनं अंबरम् ।**
**अस्थानेऽप्युपवासश्च नैतान्यौपयिकानि ते ॥ ( सुं० २०।८ )**
**एकवेणीधरा । ( सुं०५८।६० )**

' एकच वेणी कायम ठेवणें, जमिनीवरच पडून राहणें, चिंता करणें, मळकें वस्त्र नेसणें, कारण नसताना उपवास करणें, यापासून तुला काहींसुद्धा लाभ होणार नाहीं '

असें रावण सीतेला म्हणत आहे व तो उपभोगास तयार हो, असें तिला सांगत आहे, पण सीता त्याचें म्हणणें ऐकून घेण्यास तयार नव्हती. सीतेला वश करण्याकरितां रावणानें अनेक युक्त्या योजल्या होत्या, तिला भय दाखवलें, ऐश्वर्य दाख-

घले, रामाची प्राप्ति होणें शक्य नाहीं, असें सांगितलें. इतकें करून ती काहीं वश होत नाहीं, असें पहाताच हा आम्हां राक्षसांचा धर्मच आहे व मी हें आमच्या धर्माप्रमाणेंच करीत आहें असेंहि रावण सीतेला बजावीत आहे–

## राक्षसांचा धर्म.

स्वधर्मो रक्षसां भीरु सर्वदैव न संशयः ।
गमनं वा परस्त्रीणां हरणं संप्रमथ्य वा ॥ ५ ॥
एवं चैवं अकामां त्वां न च स्प्रक्ष्यामि मैथिलि ।
कामं कामः शरीरे मे यथाकामं प्रवर्तताम् ॥ ६ ॥ ( सुं० २० )

रावण मोठ्या पहाटेच उठून अशोकवनांत येऊन सीतेसमोर उभा राहिला, बरोबर अनेक स्त्रियाही त्यानें आणल्या होत्या. ऐश्वर्याचा थाटमाटही बरोबर होताच. रावण आल्याचें दुरून मारुति पहात होता. या वेळीं रावण सीतेची समजूत करण्याची खटपट करीत असतां म्हणत आहे—

' हे सीते ! परस्त्रीशीं गमन करणें व परस्त्रीचें हरण करणें, हे राक्षसाचे धर्मच आहेत. राक्षस हीं कामें करीतच असतात; पण हे सीते ! तुझें मन मला अनुकूल झाल्याशिवाय मी मात्र तुला स्पर्श सुद्धा करणार नाहीं. मला कामविकाराचा त्रास कितीहि झाला, तरी तुझी इच्छा नसतांना मी तुला स्पर्शही करणार नाहीं. '

चलाख राक्षस असूनहि रावण असें बोलत आहे. यावरून पुलस्त्य ऋषींच्या आश्रमांत असतांना लहानपणीं झालेले शुभ संस्कार अगदींच लोपले नव्हते असें दिसतें. रावणाच्या अन्तःपुरांतील स्त्रियाही त्याच्यावर अनुरक्त झाल्या असल्यामुळें त्यानें आपल्या अन्तःपुरांत त्यांस ठेवलें होतें. सीता अनुरक्त झाली नाहीं, म्हणून तिला एका उद्यानांत ठेविली होती. आपल्या घरांत सुद्धा तिला ठेवलें नव्हतें !

अधर्म करीत असल्याहि अंशतः धर्माकडे कल असतो, तो असा ! नाहींतर रावणासारख्याला एखाद्या स्त्रीवर बलात्कार करणें काहीं अशक्य नव्हतें; पण अनुरक्त झाल्याशिवाय कोण त्याही स्त्रीला अन्तःपुरांत घालवयाची नाहीं,

असा त्याचा परिपाठ होता म्हणूनच सीतेस एका उद्यानात त्यानें ठेवली होती॰ आपल्या घरात ठेवली, असें सुद्धा कोणी म्हणवयास नको. पाप करीत असताही पापभीरुता असते, ती अशी !

( रावण सीतेचें स्वतः मन वळवी, आपलें ऐश्वर्य दखवी, सुखाचें प्रलोभन दाखवी, राम मिळण्याची आशा नाही, अशी तिची खात्री पटवी, इतर स्त्रियांकडून तिचें मन वळवण्याचा यत्न करी, पण हें सर्व करीत असता काही मर्यादेच्या पलीकडे जात नसे तो सीतेपासून थोड्या अन्तरावर उभा रहात असे, त्यापेक्षा जवळ येत नसे वश झाली नाहीस, तर कापून खाईन, असाही धाक घाली, पण जवळ येऊन तिला स्पर्श करीत नसे ! रावणानें ही मर्यादा पालन केली होती इतर राक्षस अशी मर्यादा पाळीत नव्हते रावणामध्येच ही पापभीरुता वसत होती, याचें कारण त्याचें कुमारपण ऋषि–आश्रमात गेलें होतें, हेंच असावें. बालपणा घडलेले संस्कार नष्ट होत नाहीत असें म्हणतात, तें या ठिकाणी खरें दिसत )

सध्याही कित्येक धर्मपंथात परस्त्रीला जबरदस्तीनें उचलून आणून आपल्या ज्ञानानात घालण्याची प्रथा आहे या पंथाचे लोक प्रत्यही स्त्रियांना उचलून नेण्याचें कुकर्म स्वधर्म म्हणूनच करीत असतात पण यापेक्षा रावण बरा असें वाटतें )

## सीतेची समजूत.

इदं ते चारु संजातं यौवनं ह्यतिवर्तते ।
यद्‍तीतं पुनर्नैति स्रोतः स्रोतस्विनामिव ॥ १७ ॥
नहि रूपोपमा ह्यन्या तवास्ति शुभदर्शने ॥ १९ ॥
यद्यानां उत्तमस्त्रीणां ममाग्रमहिषी भव ॥ १६ ॥
इच्छ मां क्रियतामद्य प्रतिकर्म तवोत्तमम् ॥ २१ ॥
भुंक्ष्व भोगान् यथाकामं पिब भीरु रमस्व च ।
निक्षिप्तविजयो रामो गतश्रीर्वनगोचरः ।
व्रती स्थण्डिलशायी च शंके जीवति वा न वा॥ २६ ॥
( सुदर॰ २० )

'हे सीते! हें तुझें अनुपम सौंदर्य आहे व तुझें तारुण्य जात चाललें आहे. हें तारुण्य गेलें, तें पुनः भोगावयास सापडणार नाहीं. माझ्या उत्तम स्त्रियामध्यें तूं मुख्य राणी हो. माझी इच्छा कर व माझ्यावर अनुरक्त होऊन वाग. हवे ते भोग भोग, हवें तें खानपान तुला मिळेल. तुझा राम तापसी होऊन, वनांत हिंडत आहे, तो जिवंत असेल, अथवा नसेलही.'

रावण सीतेला असा रीतीनें बळवीत आहे; पण जबरदस्ती करीत नाहीं. निरुपाय झाल्यामुळें हताश होऊन तरी तिनें वश व्हावें, हा याचा हेतु आहे. हा पापहेतु तर आहेच; पण त्यात थोडी मर्यादा आहे! राक्षसराज्यात जो कांहीं वैदिकधर्म शिल्लक राहिला होता, त्यानें पापी रावणामध्यें ही अल्पशी मर्यादा उत्पन्न केलेली होती.

निदान कशालातरी रावण भीत होता व त्यामुळें तो स्त्रियांवर बळजबरी करण्यास धजत नव्हता, एवढें खरें आहे. बलाढ्य लोकामध्यें काहीं अन्धविश्वासही असतात, तसाच रावणामध्यें असेल; पण त्याचा फायदा सीतेस मिळत होता, हें मात्र खरें.

सध्याचे रावण मात्र कशालाही भीत नाहींत. रावणाच्या राज्यातही इतर राक्षस इतर स्त्रियावर बळजबरी करणारे हे ते असतील; पण येथें रावणाच्या आचरणाचा विचार चालू आहे व तो वश झाल्यावाचून स्त्रीशरीरावर हात टाकीत नव्हता, असें यावरून दिसतें. हा त्याचा गुण निःसंशय प्रशंसेस योग्य आहे, यात शंका नाहीं.

## सीतेचें रावणाला उत्तर.

सती स्त्रिया परपुरुषावरोबर बोलत नसतात. मध्यें कोणीतरी तिसरा ठेऊन बोलत असतात. आता येथें तर सीतेच्या वतीनें बोलणारा कोणीहि नव्हता, तेव्हा शास्त्रमर्यादेप्रमाणें—

तृणमन्तरतः कृत्वा प्रत्युवाच शुचिस्मिता ।
निवर्तय मनो मत्तः स्वजने प्रीयतां मनः ॥ २ ॥
(सुं० २

मध्यें गवताची काडी धरली व त्या गवताच्या काडीस सांगावें, त्याप्रमाणें सीता रावणास म्हणाली कीं, माझ्यावर मन ठेवूं नकोस व आपल्या स्त्रियांवर मन ठेव.

कोणत्याही ठिकाणीं परक्या पुरुषाबरोबर स्त्रियांनीं संभाषण करूं नये, हंसणें-खेळणें करूं नये, विहार करूं नये. हें घरात एकान्तातच करूं नये असें नव्हे, तर बागेंत, उद्यानांत किंवा उघड्या जागेंतही परपुरुषाशीं बोलताना दोघांतरीं तिसरा तेथें असावा. सीतेसारख्या परिस्थितींत सीतेनें आपद्धर्म म्हणून गवताची काडी मध्यें धरली होती. सुदैवानें सीतेचा पाठीराखा मारुती गुप्तपणानें तेथें होता. तो आहे हें सीतेला माहीत नव्हतें, पण जर का रावणानें अधिक अमर्यादा करण्यास आरंभ केला असता, तर मारुतीनें तेथल्या तेथें रावणास ठार करण्यास कमी केलें नसतें; पण या परिस्थितीची जाणीव सीतेस किंवा रावणास मुळींच नव्हती.

आधून रावणाचें व सीतेचें भाषण मारुतीनें ऐकलें, हें अगदीं योग्यच झालें. त्यामुळें सीतेची ओळख पटण्यास एक उत्तम साधन झालें.

परका पुरुष कितीहि सलगीचा असला, तरी घरांत एकटी स्त्री असेल, तर त्या घरांत तो रहात नाहीं व निजत तर नाहींच; पण बागेंतही परपुरुषाबरोबर चव्हाट्यावर पिटींत बसण्याची आर्यमर्यादा नाहीं. येथें तर रावणासंबंधीं सीतेच्या मनांत तुच्छ बुद्धीहि होती. तेव्हां तिला मर्यादा पालन करणें, हें आवश्यकच होतें.

मध्यें गवताची काडी धरून, इतकें बोलल्यावर सीतेनें रावणाकडे पाठ केली व पुढील भाषण केलें—

रावणं पृष्ठतः कृत्वा भूयो वचनमब्रवीत् । ( सुं. २१।५ )

' मी तुझी भार्या नाहीं, दुसऱ्याची स्त्री आहें व पतिव्रता आहे हें लक्षांत ठेव व चांगल्या लोकोंप्रमाणें आचरण कर. जशा तुझ्या स्त्रिया रक्षिल्या जाव्या असें तुला वाटतें, तसेंच दुसऱ्यांच्या स्त्रियांचें रक्षण तूं केलें पाहिजे. सद्धर्माचा उपदेश करणारे येथें कोणी नाहींत किंवा तूं तरी त्यांच्या सांगण्याचा आदर करीत नसतील, पण या तुझ्या वागण्यानें सर्व राक्षसांचा नाश होईल, यांत संशय

नाहीं तुझ्या या अशा आचरणानें तुझ्या या राज्याचा नाश होईल ऐश्वर्यानें किंवा दुसऱ्या कशानें माझें मन वळविता येणें शक्य नाहीं मी त्या जगतीपति प्रभु रामचंद्राची बायको आहें म्हणून मला रामाकडे पोंचव यातच तुझें हित आहे जेव्हां रामाच्या धनुष्याचा शब्द येथें तू ऐकशील, त्या वेळेला तुझा व इतर सर्व राक्षसांचा नाश होईल '

हें सीतेचें भाषण ऐकून रावण रागावला व क्रोधानें म्हणाला– ' हे सीते ! जों जों स्त्रियांशीं शांतिनें व सौजन्यानें वागण्याचा यत्न करावा, तों तों स्त्रिया जास्तच चंचलपणानें वागू लागतात ! तुझ्या सहवासानें माझ्या मनात काम विकार उत्पन्न झाला आहे याच कारणासाठीं तुला मी असें उर्मटपणाचें भाषण केल्याबद्दल ठार मारीत नाहीं नाहींतर तुझ्या या प्रत्येक वाक्याबद्दल तुला ठार मारण्याचा दण्ड देणेंच योग्य आहे पण मी अजून थोडें थांबत आहे दोन महिन्यांचा अवधि तुझी समजूत घालण्यासाठीं मी ठरवला आहे तें माझें वचन गेलें असल्यानें आजच तुझा वध मी करीत नाहीं, पण जर का दोन महिन्यानंतर तू स्वखुषीनें माझ्यावर अनुरक्त झाली नाहींस तर सकाळच्या न्याहारीला तुझा खांडोळी केली जाईल, हें लक्ष्यात ठेव ! '

रावणाचें असें भाषण ऐकल्यानंतर त्याच्याजवळ असलेल्या देवगंधर्वांच्या कन्यांना फार वाईट वाटलें, पण त्या बिचाऱ्या करणार काय ? तथापि त्यांनीं सहानुभूतिपूर्वक सीतेचें समाधान करण्यासाठीं खुणांनीं तिला सक्त केलें व सीतेचें सांत्वन करण्याचा यत्न केला

अशा रीतिनें सीतेशीं सहानुभूति बाळगणाऱ्या स्त्रिया रावणाच्या अंतःपुरातहि होत्या, हें उघड झालें कोणत्याही स्त्रीला आपल्या पावित्र्यावर असा घाला घातलेला मनापासून सहन होणें शक्य नाहीं यामुळें सीतेविषयीं सहानुभूति रावणाच्या अंतःपुरवासी स्त्रियांमध्यें उत्पन्न होणें अगदीं स्वाभाविक आहे अशी सहानुभूति उत्पन्न होणें, म्हणूनच रावणाचें बळ कमी होत जाणें होय

अंतःपुरातील स्त्रियांचें मत हळूहळू गावात पसरतें व गावातील सज्जन रावणाला दूषण देऊं लागतात अशा रीतिनें रावणाची शक्ति कमी होत जात राव

णाची शक्ति अशा रीतीनें कमी होत चालली होती, हें यावरून दिसतें. रावणाच्या स्त्रियांनीं सहानुभूति दाखवण्यासाठीं सीतेला खुणा केल्या, तेव्हां सीतेला थोडें बरें वाटलें व नतर ती रावणाला म्हणाली–

'अरे राक्षसाधमा ! तेजस्वी रामाच्या साध्वी धर्मपत्नीला तू असें बोलत आहेस, पण राम येथें आल्यानतर तुझें कोण बरें रक्षण करील ? हत्तीपुढें जसा ससा, तसा रामापुढें तू आहेत. या तुझ्या वर्तणुकीवरून तुझ्या नाशाचा समय जवळ येऊन ठेपला आहे, असें दिसतें. ( सुदर० २२ )

रामस्य दास्येऽपि न युज्यसे । ( सुं० ५८।७३ )

हे रावणा ! रामाचा सेवक होण्याचीहि तुझी योग्यता नाही.'

हे सीतेचें टोचणारें भाषण ऐकून रावण रागावला व तेथील सर्व राक्षसींना म्हणाला कीं, 'ही लवकर मला वश होईल असें करा.' असें येऊन नेथून तो निघून गेला.

रावणाचें सर्व लक्ष्य सीतेवर केंद्रित झाल्यामुळें अन्तःपुरातील स्त्रियांकडे त्याचें दुर्लक्ष्य होणें स्वाभाविक आहे. या कारणानें हि सीता येथून गेली, तर बरें असें वाटून त्यांची सहानुभूति सीतेकडे झाली असेल. तात्पर्य, अशा रीतिनें सीतेसंबधानें सहानुभूति जशी अन्तःपुरास, तशीच नगरांत इतक्या दिवसांत उत्पन्न झाली असली पाहिजे. रावणानें चोरून सीता आणली, या गोष्टीला प्रतिकूल कांहीं स्त्रिया व कांहीं जनता झाली होती, असें येथें स्पष्ट दिसतें. याच कारणानें बिभीषण रावणाचा निषेध करण्यास धजला, हें अप्रत्यक्ष याच काण्डांत दिसून येतें. लंकेमध्यें जनतेच्या स्त्रेवेंच हात विरुद्ध झाला होता व जनमत रावणाविरुद्ध झालेलें होतें. यांतच त्याच्या नाशाचें बीज आहे.

## निकुम्भिला देवी.

मानुषं मांसमासाद्य नृत्यामोऽथ निकुम्भिलाम् । (सु० २४।४७)

या सीतेचें मांस खाऊन ( पेय आनीयतां ) व दारू पिऊन आम्ही निकुम्भिला देवीच्या पुढें यथेष्ट नाच करूं, असें सीतेच्या पहाऱ्यावर असले दा राक्षसिणी म्हणत आहेत.

रावणही सकाळच्या न्याहारीला सीतेच्या मांसाचा आहार केला जाईल, असें म्हणत आहे. यात आलंकारिक भाग असेल. पण राक्षसांपैकीं कांहीं राक्षस तरी नरमांसभोजी असावे, असें वाटतें. रावणाच्या म्हणण्यात अत्युक्ति असेल. पण 'नरमांस खाऊन व दारू पिऊन कुलदेवतेपुढें खूप नाचूं' असें जें या पहारेकरणी म्हणत आहेत, त्यात अत्युक्ति दिसत नाहीं. हा राक्षसांचा परिपाठच दिसत आहे.

राक्षस मांसाहार करीत असत. ते सर्वच राक्षस नरमांस खात नसतील, पण त्यांतल्या हीन जातीचे लोक नरमांस खातही असतील, असें यावरून वाटतें.

## सीतेचें शेवटचें उत्तर.

चरणेनापि सव्येन न स्पृशेयं निशाचरम् ।
रावणं किं पुनरहं कामयेयं निशाचरम् ॥ ८ ॥
छिन्ना भिन्ना प्रभिन्ना वा दीप्ता वाग्नौ प्रदीपिता ।
रावणं नोपतिष्ठेयं किं प्रलापेन वश्चिरम् ॥ १० ॥ (सुंदर० २६)

'अहो राक्षसांनो ! मी रावणाला डाव्या पायानेंहि स्पर्श करणार नाहीं मग त्याच्यावर प्रीति करण्याची गोष्ट कशाला विचारतां ? मला तुम्हीं कापलें, मोडलें, तुकडे करून टाकलें, अग्निमध्यें भाजलें किंवा जाळलें, तरी मी रावणाकडे पाहणारही नाहीं, मग तुमच्या या प्रलोभनाचा काय बरें उपयोग होणार आहे ?'

असें स्पष्ट सांगितल्यावर राक्षसींचा निरुपाय झाला. राक्षसींच्या आधीन झालेल्या व त्यांच्या रात्रंदिवस पाहऱ्यात असलेल्या सीतेनें पातिव्रत्याचें तेज कसें प्रखर असतें, हें त्यांना जेव्हां दाखवलें, तेव्हां सीतेचा निर्धार किती आहे, तें त्यांच्या प्रत्ययास आलें.

## रावण सीतेला मारावयास धांवतो.

मारुती स्वतः अंगद, जांबवान् वगैरे वानरांना आपल्या लंकेच्या प्रवासाचा वृत्तांत सांगतो, त्यांत तो म्हणतो कीं, सीतेनें रावणाची निर्भर्त्सना केली व म्हटलें-

न त्वं रामस्य सदृशो दास्येऽप्यस्य न युज्यसे ।
(सुंदर. ५८।७३)

' तूं रामाचें दास्य करण्याच्या योग्यतेचाही नाहींस ' हें ऐकताच रावण रागावला व—

विवृत्य नयने क्रूरे मुष्टिमुद्यम्य दक्षिणम् ।
मैथिलीं हन्तुमारब्धः स्त्रीभिर्हाहाकृतं तदा ॥
( सुं ५८।७५-७६ )

' डोळे वटारून, उजव्या हाताची मूठ वळून सीतेला रावण मारावयास धांवला, तेव्हां रावणाच्या स्त्रियांनीं हां-हां असें म्हणून त्यास निवृत्त केलें. ' रावणाची स्त्री मंदोदरी पुढें झाली व आपल्या स्त्रियांशीं रममाण हो, ' या सीतेमध्यें विशेष काय आहे, असें म्हणून—

उत्थाप्य सहसा नीतो भवनं स्वं निशाचरः ।
( सुं. ५८।८० )

' त्यास तेथून उठवून त्या स्त्रियांनीं त्यास आपल्या घरीं नेलें ! ' हा वृत्तांत भारतीच्या या म्हणण्यांत अधिक आहे. या वेळीं ' उत्थाप्य ' शब्दावरून रावण दारू पिऊन झिंगलेला होता की काय, अशी शंका येते. लंकेंतील वृत्तांत सर्ग २०-२१ मध्यें आलेला आहे. तेथील वृत्तांताशीं हा वृत्तांत कांहीं अंशीं जुळत नाहीं, पहा- ( सुं. २२।४-५ ) या ठिकाणीं रावण सीतेला म्हणतो कीं- ' सीते ! काम हा ज्या माणसासंबंधानें उत्पन्न होतो, त्या माणसाबद्दल दया उत्पन्न होते. तुझ्यासंबंधीं जर माझ्या मनांत काम उत्पन्न झाला नसता, तर तुझ्या या प्रत्येक कठोर वाक्याबद्दल मी तुझा वध केला असता. ' सीतेला हाणमार किंवा सीतेचा वध न करण्याचें कारण देणारा रावण येथें म्हणत आहे कीं ' जसा सारथी घोड्यांचें नियंत्रण करतो त्याप्रमाणें हा तुझ्या विषयींचा काम मला नियंत्रण करीत आहे. ' ( सुं २२।६ ) हाच रावण ' दांतओंठ खाऊन, डोळे वटारून, मूठ वळून सीतेवर आघात करण्यास धांवला ' असें भारतीय ( सुं ५८।७५-७६ ) सांगत आहे ( सुं. २२।१५ मध्यें) रावण सीतेला म्हणत आहे कीं, ' तूं मर्यादा सोडून वागत आहेस, म्हणून मी तुझा अन्त नाश करून टाकीन ' असें म्हणून रावणानें तेथील पहारेकरणी राक्षसीकडे पाहून असें सांग भागितलें कीं, ' ही मला लवकर वश

होईल असें करा.' ( सुं० २२।३७-३८ ) यानंतर धान्यमालिनी राक्षसीनें पुढें होऊन 'माझ्याशीं रममाण हो, या मानवीमध्यें विशेष काय आहे?' असें म्हणून रावणाला आपल्या राजवाड्याकडे परत फिरण्यास वळवलें, असें म्हटलें आहे. पण हनुमानाच्या नाटकात मंदोदरीनें रावणास परत फिरवलें असें आहे

हें मारुतीचा काहीं गैरसमज रावणस्त्रियांच्या नावाबद्दल झाला असला, तर तो क्षम्य आहे, कारण मारुतीचा लंकेंत मुक्काम फक्त दोनच दिवस होता. तेवढ्यात त्याला सर्वांच्या नावाचा परिचय होणें शक्य नाहीं, पण रावणानें सीतेवर मुष्टी मारण्याचा आविर्भाव केला कीं नाहीं, हें त्यानें तेथें पाहिलेलें होतें. मारुतीनें कदाचित् अत्युक्ति केली नसेल.

नाशयाम्यहमद्य त्वां सूर्यः संध्यामिवौजसा ।

( सुंदर. २२।२१ )

'जसा सूर्य प्रातःकालच्या संध्याप्रकाशाचा नाश करतो, त्याप्रमाणें मी तुझा नाश करून टाकतों' असें तो म्हणाला त्याच वेळीं त्यानें मूठ वळून एखादें पाऊल पुढें टाकलेंहि असेल ते कविनें सर्ग २२ मध्यें न लिहिता सर्ग ५८ मध्यें मारुतीच्या वर्णनांत घातलें असेल रावणानें मूठ वळून मारण्याचा आविर्भाव करण्यापेक्षा जास्त काहीं केलें नसलें पाहिजे जरी 'मैथिलीं हन्तुं आरब्धः' ( सुं ५८।७६ ) असा प्रयोग कविनें केलेला असला, तरी हा फक्त रावणाच्या आविर्भावाचा द्योतक आहे. सीतेच्या इतक्या जवळ तो पोचला नव्हता व रावणानें मुष्टी मारण्याचा यत्न केलाच असता, तर मारुती गप्प बसलाही नसता. तुमुल शब्दाशब्दी मारुती ऐकत होता तें ठीकच होतें पण प्रत्यक्ष रावणानें सीतेवर प्रहार करण्याची खटपट केली असती तरी मारुतीनें रावणाला तेथेंच लोळवलें असतें म्हणून सीतेवर आघात झाला नाहीं, हें निर्विवाद होय

## स्वभावर विश्वास.

राक्षसांचा स्वभावर विश्वास होता, असें दिसतें. जेव्हा राक्षसी सीतेला छळूं लागल्या, तेव्हा त्रिजटा नावाची एक म्हातारी व समंजस राक्षसी त्या सर्व राक्षसींना म्हणाली—

'बायांनो ! या सीतेला असें छळूं नका बरें; कारण मला एक फारच भयंकर असें राक्षसांच्या नाशाचें स्वप्न पडलें ! तें जर तुम्ही ऐकाल, तर तुमच्या अंगावर शहारे येतील. सुंदर रथामध्यें बसून रामाची स्वारी येत होती. लक्ष्मणही त्यांच्या बरोबर होता. सीतेनें शुभ्रवस्त्रें परिधान केलीं होतीं व सीता त्या रामाला जाऊन मिळाली, असें मी काल स्वप्नांत पाहिलें ! रावणाचा पराभव करून राम सीतेला घेऊन पुष्पक विमानांतून उत्तर दिशेकडे गेल्याचें मी स्वप्नांत पाहिलें. तसेंच रावणाच्या अंगावर तेल चोपडून त्याच्या अंगावर लाल फुलांच्या माळा घातल्या आहेत व तो तेल पीत असून गाढवावरून दक्षिण दिशेस चालला आहे. तसेंच रावणाचा शिरच्छेद झाल्याचेंही मी या स्वप्नांत पाहिलें ! कुंभकर्णाचीहि तशीच स्थिति झाली, असें मी स्वप्नांत पाहिलें, लंका उध्वस्त झाली आहे व सर्व राक्षसांचा नाश झाला आहे, असें मी स्वप्नांत पाहिलें. यासाठीं हे राक्षसीनों ! या सीतेला त्रास देऊं नका. तर या सीतेला तुम्ही सर्व मिळून शरण जा व आमचें सर्वांचें रक्षण कर, अशी हिची प्रार्थना करा म्हणजे हिला दया आली, तरच या संकटांतून ही तुमचें रक्षण करील. या सीतेला हे शुभशकुन होत आहेत व आम्हांला हीं अशीं दुश्चिन्हें व असीं भयंकर स्वप्नें पडत आहेत ! राक्षसांच्या विनाशाची वेळ जवळ आली आहे, असें यावरून वाटतें. ' ( सुंदर. २७ )

प्रणिपातप्रसन्ना हि मैथिली जनकात्मजा ॥ ९० ॥
अलमेषा परित्रातुं राक्षस्यो महतो भयात् ।
ततः सा ह्रीमती बाला भर्तुर्विजयहर्षिता ॥ ९१ ॥
अवोचद्यदि तत्तथ्यं भवेयं शरणं हि वः ॥ ९२ ॥
( सुं. २७।४०, ४८, सुं ५८।९०–९२ )

सीतेनें हें भाषण ऐकलें, तेव्हां तिला ही त्यामुळें बरें वाटलें. ती म्हणाली ' जर तुम्ही म्हणतां तसें घडून आलें, तर तुमचें मी रक्षण करीन. '

लंकेमध्यें अशीं स्वप्नें पडूं लागलीं होतीं "मनीं वसे तेंच स्वप्नीं दिसे" या नियम असल्यामुळें या स्वप्नावरून हें उघड होत आहे कीं, लंकेमध्यें रावणाच्या या कृत्याचा चहूंकडे निषेध होत होता व यापासून पुढें लंकेवर मोठी आपत्ति येईल असेंही सर्वांस वाटूं लागलें होतें. चहूंकडे असा बोलाचाली होऊं

लागली, म्हणजेच अशक्त मनाच्या माणसांना धास्ती वाटूं लागते व त्यांस त्या ध्यासामुळें अशीं स्वप्नें पडूं लागतात. तात्पर्य, अशीं स्वप्नें पडणें म्हणजे जन-समाजाच्या मनांत अशी धास्ती दृढमूल झालेली होती, असें समजण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं.

रावणापुढें बोलण्यास कोणी धजत नसलें तरी आपसांत जी बोलणीं चालत होतीं, ती अशक्त मनाच्या लोकांच्या स्वप्नांत मूर्त रूप घेत ! लोक व विशेषतः राक्षसांच्या स्त्रिया यावेळीं फारच घाबरून गेल्या होत्या, असें या स्वप्नाच्या वृत्तांतावरून म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

मागें-पुढें जनतेंत मुळींच विचार चालू नसता एकदम एखाद्या स्त्रीच्या स्वप्नांत अशीं दृश्यें दिसणें शक्य नाहीं. संघ-मनावर आघात झाले व तें मन भेदरून गेलें, म्हणजेच असलीं स्वप्नें पडणें शक्य असतें. हें संघ-मनासंबंधीं ज्यांस माहिती आहे, त्यास सांगण्याची आवश्यकता नाहीं. यावरून लंकेंत सीतेला अनुकूल जनमत किती झालें होतें व रावणाच्या प्रतिकूल किती लोक-मत होतें तें समजेल.

## सीता जीव देण्याची तयारी करते.

राक्षसींच्या छळामुळें सीता त्रासली. उपवास, भूमीवर पडून राहणें, राक्ष-सींचा त्रास, सुखाचा शब्द बोलणारा कोणी नाहीं, रामाची प्राप्ति होईल अशी आशा नाहीं, अशा स्थितींत दिवस किती व कसे कंठावे, असें म्हणून सीता या झाडाच्या फांदीस टांगून घेऊन प्राण द्यावा ( **उद्बध्य वेण्युद्ग्रथनेन शीघ्रं गमिष्यामि यमस्य मूलं ।** सुं० २८।१७ ) असा विचार करूं लागली. या वेळीं कंटाळल्यामुळें राम अन्य स्त्रियांबरोबर रमेल ( **स्त्रीभिः मन्ये संरंस्यते रामः ।** सुंदर० २८–१४ ) असा ही संशय सीतेच्या मनात येऊन गेला, तो इतक्या त्रासामुळेंच होय. राम एकपत्नी आहे व हें व्रत तो कडक्पणानें पाळीत आहे, हें सीतेस पक्कें माहीत असतांही, तिच्या मनांत रामाविषयीं असा संशय आला, हा मानवी स्वभावच होय. मन निराश झालें व कोणत्याच प्रकारची उन्नतिची आशा उरली नाहीं, म्हणजे जिवलगाच्या संबंधानें हि असे विपरीत विचार मनांत येतात.

## शुभशकुन.

सीता फास लाऊन घेऊन जीव देण्यास तयार झाली, अशा वेळीं तिला शुभ शकुन होऊं लागले. पूर्वी त्रिजटेनें आपलें स्वप्न सांगितलें, तेव्हा वामांगाचें स्फुरण होऊं लागलेंच होतें. पण आता हीं शुभचिन्हें अगदीं स्पष्टपणानें होऊं लागलीं. डावा डोळा स्फुरण पाऊं लागला, वाम बाहु स्फुरण पाऊं लागला, पायामध्यें स्फुरण होऊं लागलें. राम आपल्यासमोर उभाच आहे, असेंहि तिला वाटूं लागलें. ( सुंदर० २९।१-८ )

असे शुभशकुन होऊं लागल्यानें तिचा फास लाऊन प्राण देण्याचा विचार दूर झाला व तिच्या मनाला आनंदहि वाटूं लागला ॥

हें काही कारण नसताना झालेलें नाहीं. मारुती तिचें हित करण्यासाठीं तेथेंच झाडावर बसला होता. त्याच्या शुभ मनोलहरी तिच्या मनांत शुभ प्रेरणा करण्यासाठीं सारख्या उचंबळत होत्या व त्या सीतेच्या मनावर आदळत होत्या. एका मनाचा परिणाम दुसऱ्याच्या मनावर होतो व त्या वेळीं अशीं चिन्हें होऊं लागतात.

## पहाटेची वेळ.

हनुमान व सीता याची भेट सर्वांत प्रथम पहाटेच्या वेळीं झाली. ( रात्रिशेषेण । सु ३०।१२ )

## मारुतीचा विचार.

रावण आला, सीतेचें व त्याचें भाषण झालें त्यानें सीतेला धमकी दिली, सीतेनें रावणाची निर्भर्त्सना केली, राक्षसींनीं सीतेचें मन वळविण्याची पराकाष्ठा केली, त्रिजटेनें आपलें स्वप्न राक्षसींना सांगितलें, राक्षसींनीं सीतेला शरण जाण्याचा विचार केला, सीतेनें सर्व राक्षसींचें रक्षण करीन, असें त्यांस आश्वासन दिलें, सीतेनें फांस लाऊन आत्महत्या करण्याचा विचार केला, इतक्यांत तिला शुभशकुन होऊं लागले, इतक्या सगळ्या गोष्टी मारुतीसमोरच घडल्या व त्या अगदीं जवळून त्यानें पाहिल्या व ऐकल्या हा वृत्तांत समोरच घडल्यामुळें मारुतीची ' सीता ही पवित्र असल्याची ' खात्री झाली व तिला शक्य तितकें

लवकर धारण आल्याचें वृत्त कळवलेंच पाहिजे, नाहींतर ती आपल्या जिवाचा घात केल्याशिवाय राहणार नाहीं, अशी त्याची खात्री झाली. पण तिला 'मी अमूक आहें' हें कसें पटवावें, तिचा विश्वास संपादन करून तिचा निरोप रामाला देण्यासाठीं कसा प्राप्त करावा, याचा विचार तो करूं लागला.

## भाषेचा प्रश्न.

(कोणत्या भाषेंत बोललें असतां सीतेचा विश्वास बसेल, हा विचार प्रथमतः मारुतीच्या मनांत आला. मारुतीला कित्येक भाषा येत असाव्या, असें यावरून वाटतें. तो वेदवेदांगपारंगत असल्यामुळें उत्तम शास्त्रीय प्रौढ संस्कृत तर त्यास येत होतेंच; पण लौकिक बोलीचें संस्कृतही त्यास येत होतें. याशिवाय '**मनुष्यवाणी**' म्हणजे लोकबोली, ग्रामीण बोली ही त्यास येत होती. वानरांची व राक्षसांची भाषाही त्यास येत होती. म्हणून तो विचार करूं लागला कीं—

**वाचं चोदाहरिष्यामि मानुषीमिह संस्कृताम् ॥ १७ ॥**
**यदि वाचं प्रदास्यामि द्विजातिरिव संस्कृताम् ॥**
**रावणं मन्यमाना मां सीता भीता भविष्यति ॥ १८ ॥**
**अवश्यमेव वक्तव्यं मानुषं वाक्यमर्थवत् ।**
**मया सान्त्वयितुं शक्या नान्यथेयमनिन्दिता ॥ १९ ॥**

(सुं० स० ३०)

'उत्तम, प्रौढ संस्कृत भाषेंत मी बोललों, तर रावणाची [illegible] मला ती रावणच समजेल व ती अधिकच घाबरून जाईल, म्हणून 'लोक-बोली' मध्येंच जें काय मला मागावयाचें आहे, तें मागणें उचित आहे. दुसरा कांही मार्ग नाहीं.'

संस्कृत भाषेंत बोलूं शकत होता, हें मारुतीनें प्रत्यक्ष पाहिलेंहि होतें, म्हणून त्यानें प्रौढ संस्कृत भाषेंत बोलण्याचें टाळलें.

वानरांची भाषा सीतेस समजणें शक्य नसेल व राक्षसबोलीहि तिला नीटशी समजत नसेल; कारण तिला लंकेंत येऊन थोडेच दिवस झाले होते, म्हणून लौकिक आर्यबोलींमध्यें आपणास काय सांगावयाचें तें सांगावें, असें जें त्यानें ठरवलें, तें अगदीं योग्य होतें. मी रावण नाहीं, एवढें सीतेला पटवणें, हें त्याचें पहिलें काम होतें व तें या बोलीनें साधणें शक्य होतें.

## दूतकार्य.

भूताश्चार्था विरुध्यन्ति देशकालविरोधिताः ।
विक्लवं दूतमासाद्य तमः सूर्योदये यथा ॥३७॥
अर्थानर्थान्तरे बुद्धिर्निश्चितापि न शोभते ।
घातयन्ति हि कार्याणि दूताः पण्डितमानिनः ॥ ३८ ॥
(सुंदर० ३० )

' कार्य घडून येत असताहि दूताच्या मूर्खपणानें तें बिघडून जातें. देशकाल-विरोधी असें काहींहि कर्म दूतानें करतां नये. स्वामीनें जरी योग्य निर्देश दिलेले असले, तरी अयोग्य दूत तें सर्व बिघडवून टाकतो, म्हणून घमेंडखोर दूत चांगले नव्हेत. ' *मजकडून रामाचें कार्य बिघडूं नये, ही मारुतीची प्रबल इच्छा होती.*

या सदिच्छेनें सीतेशीं बोलावयास प्रारंभ करण्याच्यापूर्वी पुष्कळच साधक-बाधक विचार तो या वेळीं करीत होता. आपला हेतु साधावा व हातीं घेतलेलें कार्य फसूं नये, यासाठीं जेवढा सावधपणा धारण करणें आवश्यक होतें, तेवढा तो धरण्याची तयारी करीत होता.

## मारुतीचा उपक्रम.

मारुतीनें लोकभाषेमध्यें बोलण्याचा निश्चय करून रामवृत्तांत प्रारंभापासून सीतेला नीट ऐकूं येईल, अशा आवाजामध्यें झाडावर बसल्या बसल्याच बोलण्यास प्रारंभ केला. ( सुंदर. ३१ ) सीतेनें तो गोड वृत्तांत ऐकला, तेव्हां तिला अपूर्व

थानंद वाटला ! ती इकडेतिकडे पाहूं लागली, तेव्हां पांढऱ्या वस्त्रांत वेष्टि-लेला व झाडाच्या खांदीवर पल्लवामध्यें दडलेला मारुती दिसला. ( **शाखामृगः शाखागणैर्निषिद्धः । सुं. ३२।१०** ) वानराचें दर्शन अशुभ आहे, असें शास्त्रांत सांगितलें आहे व आज तर सकाळींच या वानराचें दर्शन घडलें, तेव्हां आज काय अशुभ होणार आहे, कोण जाणें, अशा भीतीनें सीता रडूं लागली. रामलक्ष्मणाचें कल्याण होवो, अशी तिनें ईश्वराची करुणा भाकली

हा वानर मला समजावें, म्हणूनच लोकबोलींमध्यें स्पष्ट शब्दांनीं बोलत आहे. ( **सुव्यक्तरूपश्च वदत्ययं मां । सुं ३२।१४** ) असेंहि तिला वाटलें. कदाचित् हा रावणही रूप बदलून आला असेल, असेंहि तिला वाटलें व ती भ्यालीहि

इतक्यांत मारुती झाडावरून खालीं उतरला ( **प्रणिपत्य, उपसृत्य,** (१), **शिरसि अञ्जलिं आधाय** सु ३३।२ ) नमस्कार करून, जरा जवळ जाऊन, हात जोडून मधुर शब्दांनीं तो तिला म्हणाला कीं– ' रावणानें जनस्थानांतून जी रामचन्द्रांची कपटवेषानें चोरून आणली व जी रामचन्द्राची पट्टराणी सीता म्हणतात, तीच आपण आहांत ना !' असे प्रेमाचे मारुतीचे शब्द ऐकताच इतक्या दिवसांत कोणीहि प्रेमाचा माणूस न भेटल्यामुळें प्रेमाच्या शब्दाची तहानलेली सीता हर्षित होऊन हनुमानाशीं बोलूं लागली ! तिनें आपला लग्नापासूनचा सर्व वृत्तान्त त्याला निवेदन केला व ' आतां फक्त दोन महिन्यांचा अवधि रावणानें दिला आहे, तेवढ्यांत रामानें यावें व माझी सुटका करून मला न्यावें, ' असेंहि त्यास तिनें थन्त करणाला पीळ पडेल, अशा रीतिनें सांगितलें ( सुंदर ३३ )

नंतर मारुती तिला म्हणाला— ' हे सीतादेवी ! राम खुशाल आहे, लक्ष्मणानें मस्तक लववून तुम्हांस प्रणाम सांगितला आहे ' हें ऐकून सीतेचा आनन्द गगनांत मावेना ती म्हणाली—

**एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि ।**

( सु ३४।६ )

' जगला मनुष्य तर केव्हांतरी त्याला आनन्द मिळूं शकतो. ' म्हणून आत्महत्या करून घेऊं नये, असें म्हणतात तेंच खरें. ' स्वप्नांत वानर दिसणें

तर त्याचा अभ्युदय होत नाहीं, पण या वानरानें तर ही आनंदाची बातमीच आणली आहे ! ( सुं. ३४।२२ )'

सीतेचें भाषण ऐकून मारुतीनें रामाचें वर्णन केलें व अशा थोर रामानें तुझी खुशाली विचारली आहे, असेंहि तिला सांगितलें व आपण (**कृत्वा मूर्ध्नि तदा न्यासं रावणस्य दुरात्मनः** । सुं. ३४।३९ ) दुरात्म्या रावणाच्या डोक्यावर पाय ठेवून येथें तुला पाहण्यासाठीं आलों आहे, असेंहि सीतेला तो म्हणाला.

हें ऐकून ( **नराणां वानराणां च कथं समागमः** । सुं. ३५।२ ) नर-वानराची मैत्री कशी झाली, असें तिनें विचारलें असता मारुतीनें तें सर्व वृत्त तिला सांगितलें.

## रामाचें वर्णन.

## राम यजुर्वेदी होता.

मारुतीनें रामाचें ( सुं. ३५ मध्यें ) फार उत्तम वर्णन केलें आहे त्यात—

**ज्ञानवान् शीलसंपन्नो विनीतश्च परंतपः ॥ १३ ॥**
**यजुर्वेदविनीतश्च वेदविद्भिः सुपूजितः ।**
**धनुर्वेदे च वेदे च वेदांगेषु च निष्ठितः ॥ १४ ॥**
( सुंदर. ३५ )

राम ज्ञानी, शीलवान्, नम्र, तपस्वी, ( **यजुर्वेदविनीत** ) यजुर्वेदाचें अध्ययन केलेला, वेदवेत्त्याकडून सन्मान होण्यास योग्य, धनुर्वेद, वेद व वेदांगें यांत प्रवीण असल्याचें मारुतीनें सांगितलें आहे.

हा यजुर्वेद बहुधा शुक्लयजुर्वेद असेल. मग तो कण्व कीं वाजसनेय याचा निर्णय करतां येणें कठीण आहे शकुंतला कण्वाच्या आश्रमांत होती, त्यामुळें कण्वाशीं सूर्यवंशाचा संबंध दिसतो वाजसनेयी संहिता सूर्याकडून प्राप्त झाली, हाही संबंध सूर्यवंशाशीं लागेल कीं काय, तें समजत नाहीं, पण रामाची माता कैकेयी तैत्तिरीय शाखेच्या ब्राह्मणाला आश्रय देत होती, असें वर्णन अयोध्याकाण्ड सर्ग ३२।१५ मध्यें आहे; म्हणजे रामचन्द्राच्या आईजवळ तैत्तिरीयांचा

आचार्यच रहात होता जर राम शुक्लयजुर्वेदी होता, असें मानलें, तर हें कौसल्येचें वर्णन त्याच्या विरुद्ध होतें. रामानें जें आपलें धन ज्या ज्या शाखाच्या ब्राह्मणाम वाटलें, त्यात आपल्या आईजवळ असणारा **तैत्तिरीयांचा आचार्य,** तसेंच 'कठ व कलाप' या यजुःशाखाचे ब्राह्मण उल्लेखिले आहेत, पण वाजसनेयी किंवा काण्व याचा उल्लेख नाहीं यावरून राम शुक्लयजुर्वेदी नव्हता, असेंहि म्हणता येईल तैत्तिरीयाचें प्राबल्य उत्तरेकडे कोणत्या काळात होतें, तें शोधलें पाहिजे सध्या तैत्तिरीय शाखा दाक्षिणात्यात आहे व उत्तरीयात शुक्लयजु आहे कदाचित् रामचन्द्राच्या वेळीं तैत्तिरीयाचें प्राबल्य उत्तरेकडेही असेल. हा सर्व विषय अन्वेषणीय आहे, म्हणून आजच याचा निर्णय करता येणें शक्य नाहीं

## मारुतीचा परिचय.

मारुतीनें रामलक्ष्मणाचा सर्व वृत्तांत सांगितला आपण दक्षिण दिशेकडे कसें आलों व आपण स्वत लंकेंत कसें प्रविष्ट झालों, तें सर्व त्यानें सांगितलें व आपलें येणें व्यर्थ झालें नाहीं, असेंहि तो म्हणाला, तेव्हा सीतेच्या नेत्रातून आनंदाश्रु निघाले ! ( सुं. ३५ )

पुढें 'मी रामानें पाठवलेला दूत आहे त्यानें दिलेली ही आंगठी घे' ( सु. ३६।१-२ ) असें म्हणून त्यानें आपल्याजवळील रामानें दिलेली आंगठी सीतेच्या हातात दिली व आता तुझें दुःख संपलें, असें समज, असेंहि तो तिला म्हणाला

हें ऐकून तिला फारच आनंद वाटला व तिनें मारुतीला धन्यवाद दिला तो एकटाच या राक्षसाच्या राष्ट्रांत कसा येऊं शकला, यावद्दल तिला फार आश्चर्यही वाटलें ! व असें धाडस यानें केलें, याबद्दल तिला मारुतीबद्दल मोठा आदरहि वाटला ( सुं ३६।१-१२ )

## राजकारणाचे प्रश्न.

मारुती हा रामाकडूनच आला आहे, असें निश्चित झाल्यावर रामाच्या राजकारणाची माहिती मिळावी म्हणून तिनें मारुतीला पुढील प्रश्न विचारले आहेत,

ते फार महत्त्वाचे असल्यानें त्याचा थोडासा विचार येथें करणें आवश्यक आहे, तो असा—

**कच्चिन्न व्यथते रामः कच्चिन्न परितप्यते ।**
**उत्तराणि च कार्याणि कुरुते पुरुषोत्तमः ॥१५॥**

" राम फार दुःख तर करीत नाहीं ना ? त्याचा संताप तर फार झालेला नाहीं ना ? म्हणजे दुःख व संताप यामुळें तो हताश तर झाला नाहीं ना ? आलेल्या अपत्तींतून सुटण्यासाठीं यापुढें करावयाचे उद्योग तो मन लाऊन करीत आहे ना ?

**कच्चिन्न दीनः संभ्रान्तः कार्येषु च न मुह्यति ।**
**कच्चित्पुरुषकार्याणि कुरुते नृपतेः सुतः ॥१६॥**

राम दीन बनून गोंधळून तर गेला नाहीं ना ? त्याला कांहीं सुचत नाहींसें तर झालेलें नाहीं ना ? वीर पुरुषानें करण्यास योग्य अशीं अचाट कर्में तो राजपुत्र करीत आहे ना ?

**द्विविधं त्रिविधोपायं उपायमपि सेवते ।**
**विजिगीषुसुहृत्कच्चित् मित्रेषु च परंतपः ॥१७॥**

( द्विविधं ) सैन्य व खजिना अशा दोन उपायांचा अवलंब करून, ( त्रिविधोपायं ) धर्म, अर्थ आणि काम हे त्रिविध पुरुषार्थ प्राप्त करण्याचे उपाय तो करीत आहे ना ? तसेंच साम–दाम–दण्ड–भेदादि शत्रुनाशाचे उपाय तो करीत आहे ना ? त्याच्या मित्रांमध्यें जयिष्णु मित्र आहेत ना ? त्याचप्रमाणें मित्रासाठीं तो आनंदानें कष्ट सहन करीत आहे ना ?

**कच्चिन्मित्राणि लभते मित्रैश्चाप्यभिगम्यते ।**
**कच्चित्कल्याणमित्रश्च मित्रैश्चापि पुरस्कृतः ॥१८॥**

रामाला मित्र मिळत आहेत ना ? मित्रांमध्यें त्याचा मान आहे ना ? त्याचे मित्र त्याचें कल्याण करण्यास तत्पर आहेत ना ? व त्याचा मित्रांमध्यें तो पुढारी होऊन रहात आहे ना ?

कच्चिद्दाशास्ति देवानां प्रसादं पार्थिवात्मजः ।
कच्चित् पुरुषकारं च दैवं च प्रतिपद्यते ॥१९॥

देवतांचा कृपाप्रसाद प्राप्त करण्यासाठीं राजपुत्र यत्न करीत आहे ना ? प्रयत्न व दैव यांचें तो अवलंबन करीत आहे ना ?

कच्चिन्न विगतस्नेहो विवासान्मयि राघवः ।
कच्चिन्मां व्यसनादस्मान्मोक्षयिष्यति राघवः ॥२०॥

मी दूर झाल्यामुळें मजविषयींचें प्रेम तर कमी नाहीं ना झालें ? तसेंच या संकटांतून तो माझी मुक्तता करील ना ?

या प्रश्नांमध्यें रामाचें बल वाढत आहे की नाहीं, हें समजून घेण्याचा सीतेचा हेतु स्पष्ट दिसत आहे. स्वराज्य प्राप्त करूं इच्छिणारांनीं या प्रश्नांचा विचार केला, तर त्यांस आपलें बल वाढत आहे कीं काय, तें समजून येईल. यापुढें हे प्रश्न तिनें विचारले आहेत.

दुःखामुळें तो उदासीन तर नाहीं ना झाला ? कौसल्या व सुमित्रेची खुशाली त्यास समजत आहे ना ? दुसऱ्या कोणावर त्याचें मन तर बसलेलें नाहीं ना ? ( **कच्चिन्नान्यमनाः रामः ॥ २३ ॥** ) भरत अक्षौहिणी सेना पाठवून मदत करील काय ? सुग्रीव आपल्या सैन्यासह मदतीला येईल ना ? लक्ष्मण तर मदत करीलच, पण रामानें रावणाचा त्याच्या बांधवांसह वध केला आहे, हें दृश्य मला लवकरच पहावयास सापडेल ना ?

सीतेनें रावणाची शक्ति केवढी आहे तें पाहिलें होतें. राम उत्तम तयारी करून आला तरच त्याचा येथें तरणोपाय आहे हें तिला पक्कें माहित होतें. रामाची शक्ति वाढावी, रामाला यश मिळावें व त्याच्या पराक्रमानें आपली सुटका व्हावी, ही तळमळ तिच्या मनांत सारखी लागून राहिली होती. रामाचें बल वाढावें व त्यानें येथें येऊन राक्षसांचा फडशा उडवून रावणाचा वध करावा व अपमानाचा पूर्ण सूड घ्यावा, असें तिला वाटत होतें.

या प्रश्नांतील वैयक्तिक प्रश्न सोडले, तरी जे सर्वसामान्य प्रश्न आहेत, ते मनन करण्यासारखे आहेत व जयेच्छु वीरांनीं या प्रश्नांच्या अनुरोधानें

आपले प्रयत्न पारखून पहावे, ही योग्यता या प्रश्नामध्यें आहे म्हणूनच या प्रश्नाचा थोड्या विस्तारानें येथें विचार केला आहे.

सीतेचे हे प्रश्न ऐकून मारुतीनें रामाची कशी तयारी चाललेली आहे व सुग्रीवाचा केवढी सुसज्ज सेना रामाला मिळाला आहे, हें सर्व निवेदन केलें व लवकरच राम येईल व तुझा सुटका करील असेंहि सांगितलें (सुंदर० ३६।३९-४०)

## राम मांस खात नाहीं.

राम कसा वागत आहे, हें सांगत असताना तो (**न मांसं भुंक्ते**) राम मांस खात नाहीं (**न मधु सेवते**) तो मधुचें सेवन करीत नाहीं (***भक्तं अश्नाति पंचमं***) *संध्याकाळी थोडासा भात खात असतो* (सु ३६-४१)

येथें राम मांस खात नाहीं किंवा मधु पीत नाहीं, असें म्हटलें आहे जर हें वर्णन खरें मानलें तर सीता हरण होण्यापूर्वी तो यांचें सेवन करीत होता, असें *मानावें लागेल पण त्याच्या पहिल्या प्रतिज्ञेप्रमाणें तो तसें करीत असावा असें वाटत नाही यासंबधीं अयोध्याकाण्ड प्रथम भागाच्या उपसंहारांतील* (पृ० ५३२ ते ५३८ पर्यंत) लेख वाचकांनी अवश्य पहावा

राम पत्नीच्या वियोगामुळें मांस खात नाहीं, म्हणजे चैनीच्या वस्तु सेवन करीत नाहीं, असें येथें मारुती म्हणत आहे चैनीचे सर्व आचार रामानें सोडले होते राम मांस खात होता, असें मानलें तर रावण मांस खात होता, यांत शंका रहात नाहीं पण तो नरमांसभोजी होता की काय, एवढाच शंका शिल्लक राहते 'सीतेची न्याहारी करीन' या उद्गाराशिवाय रावणाच्या नरमांसाशनाचा दुसरा पुरावा सर्व रामायणांत नाहीं

## बिभीषणाचा प्रयत्न.

लंकेतील जनतेमध्यें रावणाच्या सीताहरणाच्या या दुष्ट कृत्याचा चहूंकडे निषेध होत होता [illegible] विभीषण [illegible] सज्जनांनी मुत्सद्दी म्हणून [illegible] [illegible] [illegible] व दुसरहा [illegible] रावणाची [illegible] [illegible] केला, तेव्हा ते

पुष्कळच मोठ्या प्रमाणांत होत असलें पाहिजेत. कारण या वेळीं सीता कडक पहाऱ्यात होती व तेथपर्यंत या वार्ता पोंचून त्या तिला कळल्या होत्या. यावरून ही चर्चा केवढी मोठी होत होती, हें समजूं शकेल. यासंबंधीं सीता मारुतीस म्हणत आहे—

'राक्षसाचा वध व रावणाचा निःपात करून माझी सुटका लवकर होईल असें रामानें केलें पाहिजे. आतां फार वेळ उरलेला नाहीं. फार तर दोन महिनेच आहेत. इतक्यात हें सर्व उरकलें पाहिजे. यापेक्षां अधिक वेळ लागला तर मी जिवंत मिळेनच असा नियम नाहीं.'

> वर्तते दशमो मासो द्वौ तु शेषौ प्लवंगम ।
> रावणेन नृशंसेन समयो यः कृतो मम ॥ ८ ॥
> विभीषणेन च भ्रात्रा मम निर्यातनं प्रति ।
> अनुनीतः प्रयत्नेन न च तत् कुरुते मतिम् ॥ ९ ॥
> मम प्रतिप्रदानं हि रावणस्य न रोचते ॥ १० ॥
> ज्येष्ठा कन्या कला नाम विभीषणसुता कपे ।
> तया ममैतदाख्यातं मात्रा प्रहितया स्वयम् ॥ ११ ॥
> अविन्ध्यो नाम मेधावी विद्वान् राक्षसपुंगवः ।
> धृतिमान् शीलवान् वृद्धो रावणस्य सुसंमतः ॥ १२ ॥
> रामक्षयं अनुप्राप्तं रक्षसां प्रत्यचोदयत् ।
> न च तस्य स दुष्टात्मा शृणोति वचनं हितम् ॥ १३ ॥
>
> (सुंदर. ३७)

'हा मारुते! हा दहावा महिना आहे, आता फक्त दोनच महिन्याची मुदत आहे. या मुदतीच्या आत माझी सुटका झाली नाहीं, तर रावण मला कापून टाकील. येथें रावणाचा एक भाऊ बिभीषण या नावाचा आहे. तो फार सज्जन आहे त्यानें माझ्या मुक्ततेविषयीं रावणाकडे पुष्कळच खटपट चालवली आहे. पण रावण त्याचें अजून ऐकत नाहीं. एकदा चोरून आणलीं, त्या मला पुन. परत रामाकडे नेऊन पोंचव वीं, यात रावणाला कमीपणा वाटत आहे या बिभीषणाची ज्येष्ठ कन्या कला या नावाची आहे ती मला केव्हा केव्हा येथें येऊन भेटते.

तिची आई, म्हणजे बिभीषणाची बायको, कलेला मजकडे केव्हा केव्हा पाठवते बिभीषण अशी खटपट करीत आहे, ही बातमी मला या कलावतीकडून कळली तसेंच येथें एक अविंध्य नावाचा फारच विद्वान्, शीलसंपन्न व धर्मसंपन्न असा वृद्ध राक्षस आहे रावणाजवळ त्याच्या शब्दाला मान आहे हा ही माझ्याविषयीं रावणाचें मन वळवीत आहे याशिवाय या वृद्ध अविंध्यानें रावणास असेंहि सांगितलें आहे कीं, या सीतेला सोडवून नेण्यासाठीं राम सैन्यासह येईल व त्यामुळें राक्षसांचा फार मोठा संहार होईल यासाठीं सीतेला परत करावी, हेंच योग्य आहे पण याचें सांगणें हि दुष्टबुद्धि रावणानें ऐकलें नाहीं.'

असें सीतेनें मारुतीला सांगितलें व ती रडूं लागली या सीतेच्या सांगण्यांत दोन मोठे राक्षस- बिभीषण व अविन्ध्य- हे सीतेच्या मुक्ततेसाठीं खटपट करीत होते, हा गोष्ट उघड झाली आहे बिभीषणाची बायको व मुलगी या दोन थोर स्त्रिया सीतेला सहाय्य करीत होत्या व सीतेची मुक्तता व्हावी असें मनापासून इच्छीत होत्या या थोर स्त्रिया व हे थोर पुरुष कधींहि एकएकटे नसणार, हें तर अगदीं उघडच आहे एकएकाचे अनुयायी, इष्टमित्र, सहविचाराचे शेंकडो लोक असणें संभवनीय आहेत संस्थानांत राजाच्या बंधूचा व त्याच्या बायकामुलींचा केवढा घोळका असतो, तें पाहिलें म्हणजे एक बिभीषण अनुकूल आहे व त्याची बायको व मुलगी सीतेला अनुकूल आहे, असें म्हणताच अशा विचाराचे हजारपांचशें स्त्रीपुरुष लंकेमध्यें होते, असें म्हटलें, तर तें अत्युक्तिचें मुळींच होणार नाहीं

इतकी चर्चा या विषयाची लंकेंत होत होती, म्हणूनच मृदु अंत:करणाच्या त्रिजटेसारख्या राक्षसीला 'राक्षसांचा नाश झाला, रावण मेला, रामाचा जय झाला, रामानें रावणाचा पराभव करून सीता पुष्पक विमानांत बसवून नेली' अशीं दृश्यें स्वप्नांत दिसूं लागलीं होतीं जर बिभीषणाचे प्रयत्न बिभीषणापुरतेच मर्यादित असते व अविंध्याचे विचार त्याच्या अन्तःकरणांतच राहिले असते, तर त्रिजटेसारख्या राक्षसीला अशा स्वप्नें पडण्याचें कारण नव्हतें

जनमनाच्या पातळींत खळबळ चालली होती, रावणाचा निषेध गुप्तपणें पण जनतेच्या अन्तस्तलामधून होत होता स्त्रीपुरुष गुप्तपणानें हा निषेध करीत

होते. बिभीषण व अविंध्य यांनीं असे यत्न केले, पण रावणानें त्याचें ऐकलें नाहीं. या गोष्टी चवाठ्याचा विषय झाल्या होत्या. अविंध्यानें यामुळें राक्षसांचा संहार होईल, असें जें रावणास सांगितलें, तेंही चवाठ्यापर्यंत पोंचलें होतें. आता राक्षसांचा संहार होणार, असें जो तो बोलूं लागला होता. रावणाच्या दराऱ्यानें जो तो हळूहळू बोलत होता, पण लोकांच्या मनांत हा विचार घोळत असे व लोकमतामध्यें फार खोलपर्यंत या संबंधाची भीति जाऊन बसली होती.

असे जनमनांत विचार घोळत होते, म्हणूनच त्रिजटेच्या स्वप्नांत तें घोर दृश्य उमटलें. जनमनामध्यें काय विचार घोळत होते, हें यावरून सहज समजण्यासारखें आहे.

बिभीषण हा रावणाचा प्रत्यक्ष भाऊ व त्याची मुलगी कला, हिला सर्व घडामोडी कळत असत. सीतेच्या पहाऱ्यांतून उघडपणानें येऊन सीतेची भेट घेणें, हें कलेला शक्य होतें. बिभीषणाच्या मुलीला नको भेटूं, म्हणून सांगण्याची कोणत्या पाहरेकरणीला छाती होणार ? कलेचा हा अधिकार असणें स्वाभाविक आहे. म्हणूनच कलेकडून या सर्व गोष्टी सीतेला कळत व तिला थोडा धीर हि त्यामुळें मिळत असे.

बिभीषणाची बायको आपल्या मुलीला मुद्दाम ही पुष्कळ वेळां सीतेकडे पाठवीत असे व पुष्कळ मदतही करीत असे.

## मारुतीची तयारी.

मारुतीनें निरोप घ्यावयाच्या वेळीं सीतेस असें विनविलें कीं, तूं माझ्या पाठीवर बस म्हणजे मी तुला रामाकडे सत्वर पोंचती करतो. पण सीतेनें तसें करण्याचें नाकारलें. '**परपुरुषाचा स्पर्श**' करणें सतीला योग्य नव्हे ( सुं० ३७।६२-६३), हें कारण मुख्य म्हणून तिनें सांगितलें व रामानें येथें यावें, रावणाचा वध करावा, राक्षसांचा नाश करावा व मला सोडवून न्यावें, यांत **रामाचें यश** आहे ( सुं०३७।६४ ). हीं कारणें सीतेनें दिलीं, हीं तिच्या सतीत्वाची साक्ष देत आहेत.

मारुतीनें सीतेला सोडवून आणलें, असें होण्यापेक्षां, रामानें आपल्या पौरुषानें

सीतेची मुक्तता केली, असें झालें तरच त्यात रामाला यश मिळेल. साध्वी स्त्री आपल्या पतिच्या यशासाठीं कशी तत्पर असते, तें येथें दिसतें. हाच विचाराचा आदर्श येथें पाहण्यासारखा आहे. )

## सीतेचा निरोप.

सीतेनें आपणाकडचा चूडामणि रामाला ओळख पटावी म्हणून मारुतीजवळ दिला ( सुं ३८।६६ ) खूण पटावी, म्हणून एक कावळ्याची गोष्टही सांगितली व " रावणाला ठार मारून लवकर माझी सुटका करा " असाही निरोप तिनें रामाला मारुतीबरोबर पाठवला ( सु ३९।१-१६ )

मारुतीला पाहून व रामवृत्तांत ऐकून सीतेला अतिशय आनंद झाला होता प्रेमाचें माणूस कोणी आढळत नव्हतें, अशा स्थितांत रामदूत मारुती भेटला, म्हणून सीता त्याला म्हणते, ( **वस एकाहं विश्रान्तः श्वो गमिष्यसि ।** सुं ३९।२०,५६।३ ) बाबा ! एक दिवस रहा, विश्रांति घे व उद्या जा, मज-सारख्या भाग्यहीन स्त्रीला क्षणभर विसावा मिळेल असा सीतेनें त्याला आग्रह केला; पण लवकर परत जाऊन तूं सुखरूप असल्याची वार्ता शक्य तितकी लवकर रामाला कळविली पाहिजे असें म्हणून व पुन लवकर सेनेसह व रामासह येईन, असें आश्वासन देऊन मारुतीनें तिचा निरोप घेतला

## कांहींतरी पराक्रम करून जावें.

सीतेचा निरोप घेऊन मारुती निघण्याचा विचार करू लागला तेव्हां त्याच्या मनात विचार आला कीं, कांही तरी विशेष पराक्रम केल्याशिवाय व रावणाची भेट घेतल्याशिवाय परत जाणें बरें नाहीं. तेव्हा तो विचार करूं लागला कीं—

**न साम रक्षःसु गुणाय कल्पते**
**न दानमर्थोपचितेषु युज्यते ।**
**न भेदसाध्या बलदर्पिता जनाः**
**पराक्रमस्त्वेव ममेह रोचते ॥**

( सु ४१।३ )

**अवकाशो न सान्त्वस्तु राक्षसेष्वभिगम्यते ।**
**न दानस्य न भेदस्य नैव युद्धस्य दृश्यते ॥**

(सुं. ३१२७)

सामोपचारानें राक्षस वश होणार नाहींत, त्यांच्याजवळ ऐश्वर्य विपुल असल्या-नें त्यांना वश करणें अशक्य आहे, राक्षस बलानें गर्विष्ठ झाले असल्यानें त्यांच्यात भेद होणार नाहीं; यासाठीं पारक्रम करूनच त्यांना ताळ्यावर आणलें पाहिजे.'

असा विचार करून त्यानें कांहींतरी कुरापत काढावी, असा निश्चय केला व रावणाची आवडती बाग विध्वंसून टाकावी असा त्यानें बेत केला.

## बागेचा विध्वंस.

मारुतीच्या मनात येण्याचा उशीर, कीं कामाला सुरुवात झालीच म्हणून समजावें. रावणाच्या आवडत्या बागेंत जाऊन त्या बागेचा विध्वंस करण्यास त्यानें प्रारंभ केला. बागेचा नाश करावयास कितीसा वेळ लागणार ? त्यात मारुती-सारखा महाबलाढ्य वीर त्या विध्वंसनाच्या कामास लागलेला, मग काय विचा-रता ? हा हा म्हणता म्हणता सर्व उद्यान उध्वस्त होऊन गेलें ?

हें पाहून सीतेच्या पहारेकरणी राक्षसी सीतेला म्हणाल्या— 'अहो सीता-बाई ! तुमच्याबरोबर आज सकाळीं ज्या वानरानें भाषण केलें, तो या बागेचा विध्वंस करीत आहे तो कोण आहे बरें ?' (सुं. ४२।५-६)

यावर सीता म्हणाली— 'मला हो काय माहीत ? सर्पाचीं पावलें सर्पालाच जाणता येतात. ( **अहिः एव अहेः पादान् विजानाति** । सुं. ४२।९ ) तो कोणीतरी राक्षस असेल त्याबद्दल मला कांहीं माहिती नाहीं.'

सीतेनें असें कानावर हात ठेवले, तेव्हां कांहीं राक्षसिणी तेथून उठल्या व त्यांनी वानरानें उद्यान-विध्वंसन केल्याचें वृत्त रावणास निवेदन केलें. त्या म्हणा-ल्या—

'हे राक्षसश्रेष्ठा ! कोणी वानर आज सकाळीं सीतेजवळ आला, त्यानें तिच्या-बरोबर पुष्कळ गोष्टी केल्या तो कोण आहे, तें सीता जाणत आहे, पण आम्ही विचारलें तेव्हां तिनें आपणास कांहीं माहित नाहीं असें सांगितलें. त्या वानरानें

होतें जेथें बसली होती तेवढा वृक्ष जसाचा तसा ठेवून बाकीचें सर्व उद्यान उध्वस्त करून टाकलें आहे. महाराजांनीं याचा काय तो विचार करावा ' ( सु. ४२।१०-२० )

रावणाला अत्यंत राग आला व त्यानें आपल्या किंकर नामक राक्षसांना या वानराचें पारिपत्य करण्यासाठीं पाठविलें. ( **किं-कर** ) काय हवें तें करावयास सांगितलें असता विचार न करता सांगितल्याप्रमाणें काम करून सोडणारे ते किंकर होत. आज्ञा होतांत ते मारुतीवर चालून आले ( **स्वामिसंदेशनिःशंकाः** । सुं ४२।२८ )

मारुतीनें यांचा संहार केला. रावणानें आणखी जे जे सैनिक पाठवले त्यांना त्यांना मारुतीनें ठार केलें व लंकेमध्यें मोठ्यानें अशी घोषणा केली की- ' हे राक्षस हो ! माझ्यासारखे हजारों वीर येऊन तुमच्या या नगरीचा, तुमचा व रावणाचा नाश करतील, लक्ष्यांत ठेवा ! '

ही घोषणा ऐकून लंकानिवासी अधिकच घाबरून गेले रावणापासून सर्वसाधारण जनतेस फोडावी, व रावणाला मिळणारें जनतेचें पाठबळ नष्ट व्हावें, हाच मारुतीचा उद्देश अशी घोषणा करण्यांत होता व तो या घोषणेनें बराच साधला ही

नाहीं, तर रावणाच्या सैन्यास व सेनापतींस लढाईचा अनुभव तरी येणार कसा ? अशा परिस्थितीमुळें रावणाचे सैनिक व सेनापति गर्वानें नुसते ताठलेले, पण लढाईच्या अनुभवाच्या दृष्टीनें अगदीं कोरे असे होते; कारण पुष्कळच वर्षे ते नुसते बसूनच खात होते.

रावणाच्या सैनिकांनी पन्नास वर्षांपूर्वी आम्ही असे पराक्रम केले, अशा गप्पा मारीत रहावें व आयती चैन भोगावी, राजकारण नाहीं, कीं लढाईचा अनुभव नाहीं, अशी स्थिति राक्षसांची झालेली असल्यामुळें सर्वत्र लंकेमध्यें शिथिलता आलेली होती.

लंकेचें संरक्षण करण्याच्या कामाला स्त्रिया नियुक्त झाल्या होत्या. या कामास पुरुष ठेवावे, याची आवश्यकताच उरलेली नव्हती. राक्षसींचा दराराही असा होता कीं, एकट्या त्राटिकेनें भारतामध्यें यावें व हव्या तेवढ्या प्रदेशावर अधिकार चालवावा, कोणी विचारणारा नव्हता. यामुळें घमेंड वाटली असून राक्षसांमध्यें त्या घमेंडीमुळें अत्यंत शैथिल्य मात्र फार वाढलेलें होतें.

इकडे वानरांनीं युद्धाचे नवे पेंच शोधून काढले होते व वैयक्तिक सामर्थ्य शक्य तितकें पराकाष्ठेचें वाढवलें होतें. सिंहांना उचलून ठार मारावें, हत्तींना भाले भोसकून ठार करावें, वृक्ष उपटून काढावे, हत्तीचे सुळे व पहारी त्यांना झोडपून शत्रूच्या सैनिकांस ठार करावें, असे नवे नवे लढण्याचे प्रकार, जे फार मोठ्या शक्तिनें साध्य होणें शक्य आहे, असे यांनी प्रचारांत आणले होते.

रावणाचे सैनिक गुबालचेंडू व चैनीस लालचावलेले, तर वानर काटक व महाशक्तिमान्, असा हा या दोघांमध्यें जो फरक पडला होता, तो राक्षसांना माहीत ही नव्हता. यामुळें प्रारंभापासूनच पराभवांची मालिका रावणाच्या सैनिकांस अनुभवावी लागली !

मारुतीनें सर्वांत प्रथम रावणाच्या किंकरांचा नाश झाडाच्या बुंध्यानें त्यांस झोडपून केला. झाडाचा बुंधा कोणी उपटील व तो गरगर फिरवून आमच्यावर हाणील, याची त्यांना कल्पना ही नव्हती.

या मारामारींत कोणी केव्हां कोणावर काय मारलें व त्याचा परिणाम काय

सीता जेथें बसली होती तेवढा वृक्ष जसाचा तसा ठेवून बाकीचें सर्व उद्यान विध्वंसून टाकलें आहे. महाराजांनीं याचा काय तो विचार करावा.' (सुं- ४२।१०-२० )

रावणाला अत्यंत राग आला व त्यानें आपल्या किंकर नामक राक्षसांना या वानराचें पारिपत्य करण्यासाठीं पाठविलें. ( किं-कर ) काय हवें तें करावयास सांगितलें असता विचार न करता सांगितल्याप्रमाणें काम करून सोडणारे ते किंकर होत. आज्ञा होतात ते मारुतीवर चालून आले. ( स्वामिसंदेशनिःशंकाः । सुं ४२।३८ )

मारुतीनें याचा संहार केला. रावणानें आणखी जे जे सैनिक पाठवले त्यांना त्यांना मारुतीनें ठार केलें व लंकेमध्यें मोठ्यानें अशी घोषणा केली कीं- 'हे राक्षस हो ! माझ्यासारखे हजारों वीर येऊन तुमच्या या नगरीचा, तुमचा व रावणाचा नाश करतील, लक्ष्यात ठेवा !'

ही घोषणा ऐकून लंकानिवासी अधिकच-घाबरून गेले रावणापासून सर्वसाधारण जनतेस फोडावी, व रावणाला मिळणारें जनतेचें पाठबळ नष्ट व्हावें, हाच मारुतीचा उद्देश अशी घोषणा करण्यात होता व तो या घोषणेनें बराच साधलाही.

पुढें आणखी सैनिक रावणानें मारुतीवर पाठवले, पण त्याचाही संहार मारुतीनें केला. हें समजताच रावणालाहि अन्त करणात भय वाटलें रावणाला आपल्या सेनेचा कधीं पराजय झाल्याचा अनुभव नव्हता. रावणाचा दरारा असा होता कीं, रावणानें जावें व जय मिळवून परत यावें. लढाई न करताही त्यानें कित्येकांचीं राज्यें खालीं होतीं रावणाचा पराभव होईल, असें कोणालाच वाटत नव्हतें. रावण आला असें समजताच सर्व लोक भीत व तो जें म्हणेल तें करीत. इतका दरारा त्याचा वाटलेला होता !

अशा दराऱ्यानेंच सर्वत्र रावणाचा जय होत असल्यानें, प्रथमतः त्यानें ज्या २१४ लढाया केल्या, तेवढाच लढाईचा अनुभव त्याच्या सैन्यास फारच पूर्वी आलेला होता, तेवढाच लढाईचा अनुभव त्यास होता. यानंतर लढाईच झाली

नाहीं, तर रावणाच्या सैन्यास व सेनापतीस लढाईचा अनुभव तरी येणार कसा ?
अशा परिस्थितीमुळें रावणाचे सैनिक व सेनापति गर्वानें नुसते ताठलेले, पण लढाईच्या अनुभवाच्या दृष्टीनें अगदीं कोरे असे होते; कारण पुष्कळच वर्षे ते नुसते बसूनच खात होते.

*रावणाच्या सैनिकांना पन्नास वर्षांपूर्वी आम्हीं असे पराक्रम केले, अशा गप्पा मारीत रहावें व आयती चैन भोगावी, राजकारण नाहीं, कीं लढाईचा अनुभव नाहीं, अशी स्थिति राक्षसांची झालेली असल्यामुळें सर्वत्र लंकेमध्यें शिथिलता आलेली होती.*

*लंकेचें संरक्षण करण्याच्या कामाला स्त्रिया नियुक्त झाल्या होत्या. या कामास पुरुष ठेवावे, याची आवश्यकताच उरलेली नव्हती. राक्षसांचा दराराही असा होता कीं, एकट्या त्राटिकेनें भारतामध्यें यावें व हव्या तेवढ्या प्रदेशावर अधिकार चालवावा, कोणी विचारणारा नव्हता. यामुळें घमेंड वाटली असून राक्षसांमध्यें त्या घमेंडीमुळें अत्यंत शैथिल्य मात्र फार वाढलेलें होतें.*

इकडे वानरांनीं युद्धाचे नवे पेंच शोधून काढले होते व वैयक्तिक सामर्थ्य शक्य तितकें पराकाष्ठेचें वाढवलें होतें. सिंहांना उचलून ठार मारावें, हत्तींना भाले भोसकून ठार करावें, वृक्ष उपटून काढावे, हत्तीचे सुळे व पहारी त्यांनी झोडपून शत्रूच्या सैनिकांस ठार करावें, असे नवे नवे लढण्याचे प्रकार, जे फार मोठ्या शक्तिनें साध्य होणें शक्य आहे, असे यांनीं प्रचारांत आणले होते.

रावणाचे सैनिक सुखालचेंट्र व चैनीस लालचावलेले, तर वानर काटक व महाशक्तिमान, असा हा या दोघांमध्यें जो फरक पडला होता, तो राक्षसांना माहीत ही नव्हता. यामुळें प्रारंभापासूनच पराभवांची मालिका रावणाच्या सैनिकांस अनुभवावी लागली !

मारुतीनें सर्वांत प्रथम रावणाच्या किंकरांचा नाश झाडाच्या बुंध्यानें त्यांस झोडपून केला. झाडाचा बुंधा कोणी उपटील व तो गरगर फिरवून आमच्यावर हाणील, याची त्यांना कल्पना ही नव्हती.

या मारामारींत कोणी केव्हां कोणावर काय मारलें व त्याचा परिणाम काय

झाला, या तपशीलामध्यें जाण्याचें येथें कारण नाहीं. एका बाजूला चैनींत व घमेंडींत वाढलेले सैनिक व दुसऱ्या बाजूनें प्राणाचा पण लाऊन आपली शिकस्त करणारे वीर असले म्हणजे कसा चमत्कार घडतो, तेंच येथें पहाव-याचें आहे. अभेद्य किल्ले सुभेद्य होतात व पराभूत न होणारे वीर पराभूत होऊन नामशेष होतात. हें आपण इतिहासांत पाहतों. तोच प्रकार येथें लंकेंत झालेला आपण पहात आहों !

रावणाच्या राज्यात वरवर पाहणारास बंदोबस्त फार मोठा आहे, असें दिसत होतें, पण लंकेच्या दारावरच लंकेची सर्वांत वरिष्ठ संरक्षक अधिकारीण मारुतीस ' तूं कोण आहेस. ' म्हणून विचारते, मारुती परवान्याशिवाय आत घुसतो व थोड्याशा बोलाचाली नंतर तिनें एक थोबाडींत मारल्यानंतर मारुती तिला बुक्की मारून अर्धमेली करतो. पण इतकें झाल्यावर कोणी मारुतीला पकडण्याचा यत्नही करीत नाहीं !

त्यानंतर चांदण्या रात्रीं लपतछपत मारुती शहरभर हिंडतो. शहरात चहूंकडे गस्त घालणारे लोक दिसतात, पण ते मद्य पिऊन झिंगलेले असतात, आरडाओरड पुष्कळ करतात, पण मारुतीस कोणी हटकत सुद्धा नाहीं !

त्यापुढें रावणाच्या अन्तःपुरावर हजारों राक्षसांचा पहारा असतो, पण ते सर्व आपल्या घमेंडींत गर्क असतात. मारुती रावणाचें सर्व अन्त-पुर धुंडा-ळतो, तरी त्यास कोणीहि पकडत नाहीं !

हे सर्व प्रकार पाहिले म्हणजे रावणाचा बंदोबस्त हा नुसता वरवरचा देखावा शिल्लक राहिलेला होता, हें ध्यानीं येईल. चैनी, चैनी, घमेंडी, अरेराव, पूर्वीच्या विजयानें फुगलेले असले लोक वेळेवर कामास येत नाहींत, हें इतिहासज्ञास माहित आहे.

दिल्लीपति मोंगलाच्या लाखों सैनिकास थोड्याशा मराठे मावळेवीरांनीं ३० वर्षे जेरीस आणलें होतें, [redacted] शिवाजीनंतरचा इतिहास पहावा; त्यानंतर पेश-व्याच्या हजारों सैनिकास इंग्रजांचे क्वाइती थोडेसे सैनिक कसे पराभूत करीत, तें ही पेशवाईच्या अखेरच्या सामन्यात पहावें व इंग्रजांना अप्रदेश कसा लढाई

न करता घेतला, तें ही पहावें, म्हणजे रावणाचे सैनिक भराभर कसे पराभूत झाले, याची मीमांसा चटकन करता येईल.

एक माणूस सिंहाला उचलून आपटू शकतो हें खडगसिंहानें दाखवलें, एक एक माणूस दोनशें माणसास भारी असतो, हें नीकरसिंगानें सिद्ध केलें, एक माणूस तीन हत्तींस चीत करतो, हें तानाजीनें दाखवलें. या इतिहासिक घटनांनीं अजिंक्य वीर एकटा असला, तरी किती कार्य करूं शकतो, हें समजू शकेल तोच प्रकार मारुतीनें लंकेंत केला

रावणाच्या विरुद्ध लोकमत आधाच तयार होत त्यात रावणाचा भाऊ व गुरही सामील होता. स्त्रिया ही सीतेला सहाय्य करण्यास तयार होत्या सीतेला परत करावी, अशा विचाराचे लोक लंकेंत होते, एवढा पाठिंबा न कळत मारुतीच्या पाठीशीं होता त्यामुळें लंकेंतील लोक मारुतीविरुद्ध खवळून उठले नाहींत, तर पोटार्थी भाडोत्री सैनिकच मारुतीवर आले पण ते चैनी असल्यानें कणखर मारुतीपुढें टिकाव धरू शकले नाहींत

शत्रुचा निरोप घेऊन आलेला दूत अवध्य असतो, हा राष्ट्रान्तरीय युद्ध नीतीचा नियम मारुतीचे प्राण सुरक्षित ठेवण्यास पुरेसा होता लंकेंतील बंदोबस्त शिथिल होता, सर्व लोक चैनी, घमेंडी, गर्वानें फुगलेले, आयतखाऊ बनलेले होते त्याचा पराभव मारुतीसारख्या मुद्दाम तयार झालेल्या वीरानें केला, तर त्यात कांहीं आश्चर्य नाहीं

वानरवीर तयार केले गेले होते व त्या वानर-तरुणापुढें (**दशग्रीव-वधोद्यताः** । वाल० स० १७।१८ ) रावणाचा पराभव करण्याचें एकच ध्येय ठेवलेलें होतें या एकाच ध्येयानें वानरवीर तयार झालेले होते राक्षस पाहिले कीं, याचे बाहू स्फुरण पावत असत मारुती जो लंकेंत आला, तो सीतेचा शोध करण्यासाठींच केवळ आलेला होता सीतेचा शोध लावून त्यानें वास्तविक परत गेलें पाहिजे होतें, तें न करता त्यानें उद्यानाचा विध्वस केला आपण सुग्रीवाचा संदेश घेऊन दूत आलों असल्याचा जो बहाणा त्यानें केला, तसला संदेश त्यास मिळालेला नव्हता, पण मारुतीसारख्या सेनापतीस जेव्हा वाटलें कीं, येथील

बदोबस्त शिथिल आहे व सगळे लोक चैनी आहेत, तेव्हां मारुतीचा आत्मविश्वास वाढला व त्यानें पुढचा कार्यक्रम स्वत च आखला, दूत असल्याचा बहाणा केला, आत्मरक्षणार्थ इतक्या लोकास मारलें, असेंही रावणासमोर सागून तो मोकळा झाला इतकेंच नव्हे तर लंकेलाही त्यानें आग लावून दिली! शेपटास चिंध्या बाधून आग लाऊन द्या, ही रावणाची आज्ञा झाली, तीसुद्धा अन्यायाचीच होती दूताशीं असें वर्तन करणें, त्यास मुळींच योग्य नव्हतें, पण पेटलेल्या शेपटानें सर्व लंका नगरीस आग लावून, गाई, ब्राह्मण, स्त्रिया व बालक याची जी राखरागोळी मारुतीनें केली, त्यात झाला तरी दूतधर्म कसोशीनें पाळला गेला, असें थोडेंच झालें आहे ' पण सीता चोरल्यामुळें रावणानें जें युद्धास कारण उपस्थित केलें त्यामुळें ' अघोषित युद्ध ' सुरु झालेंच होतें, त्याचा पुरेपुर फायदा तरी मारुतीनें का घेऊ नये ?

( एकटा शिवाजी अवरंगजेबाच्या दरबारात गेला व तसाच त्याच्या कैदेंतून सुटून सुरक्षित स्वराज्यात परत आला आपल्या सैनिकाना आधीं घालवून देऊन, एकट्यानें आपल्या लहान मुलासह आग्र्यातून निसटणें, हें केवढें अवघड कार्य आहे हें ज्या मानसशक्तीच्या बलानें शिवाजानें साधलें, त्याच मानसिक बल नें एकट्या मारुतीनें लंकादहन करुन पुन सुखरूप स्वदेशीं आगमन केलें ! ! )

तपशीलामध्यें काव्य व अत्युक्ति असली तरी तिच्याकडे पाहण्याचें आपणास कारण नाहीं, एकदर घटना कशी घडली, तेवढेंच आपणास येथें पहावयाचें आहे व त्यावरून वानर व राक्षस याच्या सामाजिक व राष्ट्रीय शक्तींची तुलना करावयाची आहे ती केली असता असें स्पष्ट दिसतें कीं, राक्षसाचें साम्राज्य ल्याला चाललें होतें व तरुण आर्य व वानर-राष्ट्र नव्या उत्साहानें वर चढत होतें यामुळें या दोन राष्ट्रामध्यें शक्तीचें असें अन्तर पडत चाल्लें होतें व तें पुढें प्रत्येक सामन्यामध्यें स्पष्टपणानें दिसून आलें आहे

## रावणाच्या मनांत शंका होती.

रावणाला ही गोष्ट माहीत होती कीं, विष्णु, यम, इन्द्र, वैश्रवण कुबेर, वरुण वगैरे देवराजे आपणाविरुद्ध मोठा कट करीत आहेत व आपलें साम्राज्य उल-

च्यून पाडावें, असें त्यांच्या मनांत आहे. (सुं. ५०।३; ९।१०) पण या यांच्या कटाचा एवढा मोठा व्याप वाढला असेल, हें मात्र त्यास माहीत नव्हतें; पण हे लोक आपणाविरुद्ध खटपटी करीत असतात, हें रावणास माहीत होतें. या कट-वाल्यांनींच कोणास तरी वानरवेषानें पाठवलें असावें, असें या वेळीं रावणास वाटलें! आपल्याविरुद्ध कारस्थानें चहूंकडे चालू आहेत, याची चांगली जाणीव रावणास होती व तें खरेंही होतें; कारण देव, आर्य, ऋषि व वानर यांचा याच दृष्टीनें कट फार दिवसांपूर्वी झाला होता व सुमारें चाळीस वर्षें रावणाचें साम्राज्य उलथून पाडावें, म्हणून याचे अविरत प्रयत्न चालू होते. पण रावणाच्या घमेंडीनें त्यानें याकडे फारसें लक्ष्य दिलें नव्हतें, त्यामुळेंच पराभवाची मालिका त्याच्या वाट्यास आली.

## मारुती व रावण यांची भेट.

मारुतीनें उद्यानाचा नाश केला, तेव्हां कांहीं पहारेकरी त्यावर धावून आले. त्या वेळीं त्यानें त्या राक्षसाच्या डोक्यात प्रहार हाणून त्यास ठार केलें. त्यानंतर बरेच राक्षस मारुतीला पकडण्यासाठीं आले; पण तेहि मारले गेले. शेवटीं रावणाचा मुलगा इंद्रजित् आला व त्यानें मारुतीला ब्रह्मपाशानें बांधलें.

ब्रह्मपाशातून आपली सोडवणूक कशी करून घ्यावी, तें ब्रह्मदेवानें मारुतीला शिकविलें होतें (**पितामहानुग्रहं**॥ सुं. ४८।४३). पण आपली सोडवणूक करून न घेता त्यानें आपण पूर्णपणें बांधलों गेलों आहें, असेंच राक्षसांना भासविलें; कारण रावणाला भेटावें, असें मारुतीच्या मनामध्यें होतें! आपणांला बांधून रावणाकडे नेतील, तेव्हा समोरासमोर रावणाशीं बोलतां येईल, यासाठीं आपण बांधले गेलों आहें, असें दाखवणेंच योग्य आहे, असें मारुतीनें ठरवलें याप्रमाणें त्या इन्द्रजितानें बांधून मारुतीला रावणापुढें नेऊन उभें केलें. रावणाची, रावण-मंत्र्याची व मारुतीची तेथें थोडी बोलाचाली झाली. शेवटीं मारुतीनें रामाचा संदेश सांगण्यासाठीं जें भाषण केलें, तें असें—

## मारुतीचें भाषण.

'मी वानरराज सुग्रीव महाराजाच्या आज्ञेवरून तुझ्याजवळ आलों आहें.

तुझा भाऊ वानरराज सुग्रीव तुला खुशाली विचारीत आहे या तुझ्या भावासारख्या राजा सुग्रीवाचा संदेश ऐक राजा दशरथ म्हणून मोठा राजा होता, त्याच्या आज्ञेनें त्याचा ज्येष्ठ पुत्र दण्डकारण्यात आला त्याच्याबरोबर त्याचा भाऊ लक्ष्मण व पत्नी सीता, हीं हि वनामध्यें आलीं या रामाची भार्या सीता जनस्थानामध्यें हरवली राम व लक्ष्मण तिचा शोध करीत करीत ऋष्यमूक पर्वताघर आले व तेथें त्याची सुग्रीवाशीं मैत्रा जमली.

'पुढें रामानें एका बाणानें वालीचा वध केला हें रावणा! वालीची तुला चागलीच माहिती आहेच! त्याचा वध करून रामानें वानरराज्य सुग्रीवास दिलें नतर सुग्रीवानें सीतेचा शोध करण्यासाठीं हजारों वानर सर्व दिशामध्यें पाठवले त्यापैकीं मीं समुद्राचें उल्लघन करून या लंकेत आलों व तुझ्या घरीं सीतेला पाहिली! तुझ्यासारख्या सुज्ञानीं परदारापहरणाचें पाप करू नये हें चागलें रामाचें शत्रुत्व केल्यावर तुला जगणें अशक्य आहे, हें तू लक्ष्यात ठेव!

'वा रावणा! तू तप सामर्थ्यानें पुष्कळच शक्ति प्राप्त केली आहेस, ती या पापापायीं नष्ट करू नकोस सुग्रीव वानर आहे व राम मनुष्य आहे यांच्या समोर तुझें रक्षण कसें कोण करील बरें?

'हें पहा रावणा! रामानें जनस्थानातील तुझें सर्व राक्षससैन्य ठार मारलें, वालीचा वधही त्यानेंच केला राम व सुग्रीवाचें सख्य झालेलें आहे तेव्हा तुझें हित कशात आहे, तें तू जाण मी एकटा सुद्धा तुझा ही लंका नष्ट करून टाकू शकतों मग सर्व सैन्यासह राम येईल, तेव्हा तुझें कोण बरें रक्षण करील?'
(सुदर ५१)

हें मारुतीचें भाषण ऐकून रावण फारच रागावला व त्याचा वध करा, अशी आज्ञा त्यानें केली

मारुतीनेंही आपल्या भाषणात रावणाला लागताल, असेच शब्दप्रयोग मुद्दाम केलेले होते! वालीची तुलना माहिती आहेच त्या वालीचा वध रामानें 'फक्त एकाच बाणानें केला' असें मारुती बोलला हें वाक्य रावणाच्या हृदयांत बाणासारखें बोचलें असेल, कारण रावणाचा पराभव वालीनें केला होता व या

वालीच्या बन्दिवासात रावण राहिलेला होता. या बन्दिवासाचें व पराभवाचें स्मरण भर दरबारात यानें करुन दिलें, तें मानी रावणास कसें बरें सहन व्हावें ?

जनस्थातील १४००० राक्षससैन्याचा वध रामानें केला, हें सांगण्याचा हेतु असा कीं, जी राक्षससैन्याची पाचर रावणानें आर्य व वानर यांची संघटना होऊं नये, यासाठीं या दोन देशामध्यें मारली होती, ती रामानें नष्ट केली व आर्य व वानर यांची संघटना रामानें बनवली आहे तसेंच राक्षस आणि वानर यांची परस्पर मैत्री आता नष्ट झाली असून, यापुढील कालात वानरांचें सहाय्य राक्षसांना मिळणार नाहीं, हें येथें मारुतीनें रावणास सुचविलें !

हें समजण्यासाठीं थोडा पूर्वेतिहास येथें सांगणें इष्ट आहे आर्यराष्ट्र उत्तर भारतामध्यें व वानरराष्ट्र दक्षिण भारतामध्यें प्रबल होतें रावणानें वालीशीं अनाक्रमणाचा व मित्रत्वाचा तह करुन, वालीचें सख्य संपादन केलें होतें व युक्तीनें वानरराष्ट्राच्या उत्तरेस म्हणजे आर्य व वानर या दोन राष्ट्राच्या मध्यभागीं जनस्थानामध्यें १४००० राक्षसांचें एक पथक रावणानें ठेऊन दिलें होतें. याचा हेतु असा होतो कीं, आर्य व वानर यांची संघटना कधींहि होऊ नये आर्यांना व नरराष्ट्रापासून पीडण्यानें व दोघास न मिळूं देण्यानें, रावणानें आपली शक्ति वाढवली होती

रामानें दक्षिणेंत उतरताच प्रथम या १४००० राक्षससैन्याचा फडशा उडविला व आर्य व वानर यांच्या संघटनेमधील अडचण कायमची दूर केली. नंतर रावणाचा मित्र बनलेला वालि हा आर्यांच्या वानरांशीं होणाऱ्या सख्यात अडचण उत्पन्न करणारा होता, कारण तो रावणाशीं तह करुन त्याला मदत करण्यास बांधला गेला होता यासाठीं त्यास ठार करून, तो काटाही रामानें दूर केला व वानराच्या राज्यावर सुग्रीव स बसवून त्याशीं मित्रत्वाचा तह रामानें केला.

याप्रमाणें रामानें रावणाचा एक मित्र नाहींसा करुन, रावणाची अर्धी शक्ति खची केला व आर्यांची वानरांशीं मित्रता घडवून आणून, आर्यांची शक्ति वाढवली

हे सर्व राजकारण रावणास सांगावें, म्हणूनच मारुतीनें रावणास सांगितलें कीं, जनस्थानातील राक्षसैन्याचा रामानें वध केला असून, वालीचाही त्यानच

नाश केला आहे. रावणाला कैद करणाऱ्या वालीचा रामानें वध केला, असें सांगण्यानें रामाची शक्ति केवढी आहे, तें रावणास मारुतीनें सांगितलें. अर्थात् हें भाषण रावणास आवडणें शक्यच नव्हतें.

मारुती किती चातुर्यानें या वेळीं बोलला आहे, तें येथें वाचकांनीं पहावें. याच भाषणामध्यें ( सुं. ५१।२७ ) मारुतीनें रावणास असेंही सांगून टाकलें कीं, '**राम हा मनुष्य आहे व सुग्रीव हा वानर असून**, यांपैकीं कोणीहि देव, यक्ष किंवा राक्षस नाहीं.' असें सांगण्याचें कारण असें होतें कीं, वरानें रावणाची अवध्यता देव, यक्ष व राक्षसांच्या द्वारें निश्चित झालेली होती. याशिवाय इतराकडून रावण हा वध्यच होता. *रावणाला या परिस्थितीची भर सभेमध्यें मारुतीनें* आठवण करून दिली. यामुळें हें भाषण रावणास आवडलें नाहीं.

या ठिकाणीं ( **मानुषो राघवः, न देवः** । सु. ५१।२७ ) राम हा मनुष्य आहे, देव नव्हे असें स्पष्ट सांगितलें आहे. म्हणूनच रामाला मनुष्य समजूनच रामायण वाचलें पाहिजे. तो देव आहे, असें समजून रामायण वाचता नये; कारण येथें ( **राघवः न देवः** ) राम देव नाहीं, असें मुद्दाम स्पष्ट केलें आहे

*रावणाला या मारुतीच्या भाषणानें फार राग आला व त्यानें मारुतीचा वध* करावयास आज्ञा केली

## दूत अवध्य आहे.

मारुतीच्या भाषणानें रावण रागावला, कारण त्याच्या भाषणांत रावणाला टोंचण्यासारखें बरेंच होतें व मारुतीचा वध करण्याची आज्ञा त्यानें दिली. हें रावणाचें करणें राष्ट्रांतरीय कायद्याच्या विरुद्ध होत होतें, म्हणून रावणाचा भक्त विभीषण नम्रतेनें त्यास म्हणाला—

' हे राक्षसराजा ! मला क्षमा करा व मी म्हणत आहें, त्याचा आपण विचार करा. मागचापुढचा विचार करणारे राजे शत्रूच्या दूताचा वध करीत नसतात; कारण दूत अवध्य आहे. आपल्यासारखे ज्ञानी जर कोपाला वश होऊन शास्त्रविरुद्ध आचरण करूं लागले, तर मग शास्त्रें शिकण्याचें प्रयोजनच काय राहिलें ? शास्त्राचा विचार करून दूताला काय अन्यान्य देहदण्ड करणें असेल, तर

त्यो करावा; पण अवध्य दूताचा वध येथें होऊं नये. ( सुं ५२।१-९ )

हें ऐकून रावण म्हणाला –' पाप्याला ठार मारणेंच योग्य आहे.' हें रावणाचें शास्त्रविरुद्ध भाषण ऐकून दूत नेहेमीं अवध्यच आहे, हें स्पष्ट करण्याच्या उद्देशानें बिभीषण पुनः बोलला–( सुं ५२।१० )

' राक्षसश्रेष्ठा ! सर्वदा दूत हा अवध्यच आहे. या दूतानें दूतधर्माच्या विरुद्ध पुष्कळच अयोग्य आचरण केलें आहे हें जरी खरें असलें, तरी सुद्धा दूताचा अशा कारणानें वध होणें योग्य नाहीं. अवयव छेदावा, फटके मारावे, मुण्डन करावें, शरीरावर डाग द्यावा, असे दण्ड दुष्ट दूताला द्यावे, असें शास्त्रांत सांगितलें आहे, पण दूताचा वध करावा, असें कोठेंही सांगितलेलें आढळत नाहीं. हे रावणा ! तुझ्यासारखा शूर वीर व विद्वान् दुसरा कोणीहि या जगांत नाहीं. यासाठीं निदान आपणाकडून तरी येथें दूतवध होऊं नये. हा दूत अगदीं वाईट असला, तरी हि त्याचा येथें वध होणें योग्य नव्हे. वरें, जर यास येथें ठार केला, तर तुमचा निरोप घेऊन रामाकडे जाईल, असा येथें दुसरा कोणीहि नाहीं. यासाठीं याचा वध न करतां यास सोडलें, तर हा आपला निरोप शत्रुला कळवील व ते शत्रु येथें येतील व तुम्हा आपला पराक्रम दाखविण्याचा एक अवसर तरी मिळेल.' ( सुं ५२।१२-२५ )

बिभीषणाचें हें भाषण ऐकून रावणाची खात्री झाली कीं, दूत हा अवध्य आहे. यानंतर रावणानें आपली पहिली आज्ञा फिरविली व वानराला पुच्छ प्रिय असतें, म्हणून त्यास चिंध्या गुंडाळून, त्यावर तेल घालून तें पेटवून द्या व अशा रीतीनें त्यास विरूप करून सोडून द्या, असें आज्ञापिलें.

## लंका-दहन.

रावणाची आज्ञा होतांच राक्षसांनीं चिंध्या व तेल आणिलें. मारुतीला धक्काबुक्क्या मारीत ते सर्व त्याच्या पुच्छाला बांधूं. होतें तसें अपशब्द ते राक्षस त्या वेळीं त्याला बोलूं लागले. हें ऐकून मारुती मनांत म्हणाला, ' मला रामाचें कार्य करावयाचें असल्यानें हा सगळा अपमान सहन करणें, या वेळीं मला भाग आहे.'

( रामस्य प्रीत्यर्थं विषहिष्येऽहमीदृशं । सुं ५३।१३ )

चिन्ध्या शेपटीस बांधल्या, त्यावर तेल ओतलें व त्या मारुतीस दौंडी पिटवीत लंकेंतून हिंडवूं लागले, ( **घोषयन्ति स्म्रापि सर्वे चार इत्येव राक्षसा ।** सुं ५३।२२ ) तेव्हां राक्षस आरडून-ओरडून घोषणा करूं लागले कीं, 'हा पहा शत्रूचा दूत पकडला आहे पहा याची आता कशी व्यवस्था होते ती ! '

राक्षसींनीं हा सर्व वृत्तान्त सीतेला कळविला, तेव्हां तिला फारच वाईट वाटलें व ती देवाचा धावा करूं लागली. शेवटीं लंकेंत सर्वत्र हिंडवून राक्षसांनी मारुतीची शेपटी पेटविली, तेव्हां आपल्या मनांत मारुती म्हणाला कीं,'या लंकेंत मी रात्रीं हिंडलों होतों पण त्या वेळीं नीट लंका दिसली नव्हती, ती आता पाहतां येईल व माझें पुच्छ पेटलें, म्हणजे मग आपण लंकेला आगही लावून देऊं म्हणजे थोडेसें रामाचें कार्य केलें असें होईल आतापर्यंत थोडे वीर मारले आहेत, आता लंकेचा किल्लाच जाळूं, म्हणजे बरें होईल ( **शेष दुर्गविनाशनं ।** सुं० ५४।३ ) एवढें लंकेचा किल्ला जाळण्याचें काम केलें, म्हणजे आमच्या सैन्याला या भगदाडातून आत येण्यास सोपें जाईल,' असें मनांत ठरवून ( **गृहाद् गृहं ।** सुं० ५४।७ ) राक्षसांच्या या घरावरून त्या घरावर उड्या मारीत, तेथें जळण्याजोगें होतें, त्यास आग लावीत तो सुटला, त्या वेळीं वारा अनुकूल असल्यामुळें ही आग फारच लवकर भडकली

बिभीषणानें रावणाच्या सभेंत दूताचा वध करूं नये, असें रावणास सांगून आपले प्राण वाचवले होते, म्हणून त्याच्या वाड्याला तेवढी आग मारुतीनें लावली नाहीं सीतेच्या अशोकवनाकडे तो वळलाही नाहीं बाकीच्या लंकेत जें काय जळण्यासारखें होतें, त्यास त्यानें आग लावली व अनुकूल वारा असल्यामुळें ही आग लवकरच भयंकर भडकली

> **क्रन्दन्त्यः सहसा पेतुः स्तनन्धयधराः स्त्रियः ।**
> **काश्चिदग्निपरीताङ्ग्यो हर्म्येभ्यो मुक्तमूर्धजा ॥ २६ ॥**
> **पतन्त्यो रेजिरेऽभ्रेभ्यः सौदामिन्य इवाम्बरात्॥ २७ ॥**
>
> ( सुंदर ५४ )

या आगामध्यें बालकांना दूध पाजीत असलेल्या स्त्रिया ओरडत-आरडत आपल्या मुलांना हृदयाशीं कवटाळून घेऊन जळून मेल्या ! कांहीं तर वरच्या

मजल्यावरून जळत्या घरांतून ओरडत-आरडत खालीं पडल्या. त्या वेळीं त्या मेघांतून जशा विजा पडाव्या तशा दिसल्या !

अशा रीतीनें लंकेमध्यें हाहा:कार झाला. कोणी बापाला हाक मारतो, तर कोणी पोराच्या नांवानें ओरडत आहे, तर कोणी स्त्री आपल्या प्रियकराच्या नांवानें ओरडत आहे. तर दुसरा कोणी मित्राला हाक मारीत आहे. जिकडे तिकडे अशी आरडा-ओरड व रडारड लंकेंत सुरू झाली !

अशा अग्नि भडकलेला पाहून, मारुतीनें आपलें शेंपूट समुद्रांत बुडवून विझविलें व जळत्या लंकेकडे पाहून समाधान मानलें ! या वेळीं जर कोणी मारुतीस विचारलें असतें कीं, ' अजून रामानें रावणबरोबर युद्ध सुरू केल्याची घोषणा केलेली नाहीं, अशा स्थितींत तूं लंका जाळलीस, हें कसें काय ? ' तर मारुतीनें असेंच उत्तर दिलें असतें- ' अहो ! ज्या वेळीं रावणानें सीता चोरून आणली, त्याच वेळीं युद्धाची घोषणा झालेली आहे व मीं तरी लंकेला आग लावली आहे कोठें ? राक्षसांनीं माझी शेपटी पेटवली व मी ती विझविण्यासाठीं समुद्राकडे निघालों. वाटेंत क्वचित् कोठें अग्नि पडला असेल, त्याची सर्व जबाबदारी राक्षसावर आहे, ती कांहीं मजवर नाहीं माझी इच्छा लंका जाळावी, अशी नव्हती. '

लंका जळली, हें पाहून सिद्ध, चारण, ऋषि व देव यास बरें वाटलें. ( सुं. ५५। २८-३५ ) कारण रावणानें यांना फार छळलें होतें. यामुळें या सर्वांना बरें वाटलें व त्यांनीं मारुतीचें अभिनंदनहि केलें !

एवढा अग्नि भडकला, तेव्हां सीता असलेलें अशोकवनही जळलें असेल व त्यांत सीताही जळून मेली असेल, असें प्रथम मारुतीस वाटलें, पण जाणाऱ्या-येणाऱ्याचीं भाषणें ऐकून मारुतीस कळलें कीं, अशोकवन व सीता हीं सुरक्षित आहेत तेव्हां मारुतीस आनंद झाला. तो पुन: सीतेजवळ गेला. तिला नमस्कार करून त्यानें तिचा निरोप मागितला तेव्हां तिनें पुन: त्यास एक दिवस रहा थोडी विश्रांति घे व उद्यां जा ( सु० ५६।३-१० ) असें म्हटलें; कारण या वेळीं सीतेशीं ममतेनें बोलणारें माणूस येथें कोणीही नव्हतें. अशा स्थितींत मारुतीनें येथें एक दिवस तरी रहावें, असें सीतेला वाटणें अगदीं स्वाभाविक होतें

## कांहीं समजुती.

**क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति।**

क्षीण पुण्य झालें, म्हणजे स्वर्गांतून तारका पतन पावतात—

**क्षीणपुण्यां च्युतां भूमौ तारां निपतितामिव।**

(सुं. १७।१९)

पुण्यसंचय असला, म्हणजे तारा बनून स्वर्गांत राहता येतें किंवा तारकेवर राहता येतें. आकाशात तारागण दिसतात, तो स्वर्ग आहे व त्यातील तारा या पुण्यपुरुष राहण्याचीं स्थानें किंवा पुण्यपुरुषच आहेत. ज्याचा पुण्यसंचय संपतो, त्याला इन्द्र स्वर्गांतून भूलोकावर खालीं ढकलून देतो. रात्रौ उल्का पडतात, ते क्षीणपुण्य झालेले लोकच होत; यासाठीं तारका पडलेल्या पाहूं नये. पुण्यपुरुषाची अधोगति पाहूं नये

अशा कल्पना या वेळीं लोक मानीत होते, असें वाटतें. सध्या आकाशाला कोणी स्वर्ग मानीत नाहींत व उल्कानाही 'क्षीणपुण्य जीव' असेंहि कोणी मानीत नाहींत वर लिहिलेली कल्पना एक वेळ काहीं मतमतांतरामध्यें प्रचलित होती; पण पुढें वेदान्तज्ञानाच्या फैलावामुळें ती कल्पना मागें पडली.

**क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति।** (गी. ९।२१)

असें गीताही म्हणते, पण गीता (**पतितां तारकां**) उल्कापाताशीं याचा संबंध जोडीत नाहीं, हें पाहण्यासारखें आहे

## पांचमुखी सर्प.

**तस्याम्बरगतौ बाहू ददृशाते प्रसारितौ।**
**पर्वताग्राद्विनिष्क्रान्तौ पञ्चास्याविव पन्नगौ ॥५४॥**

(सुंदर. १)

मारुतीनें उड्डाण केलें, त्या वेळीं त्याचे दोनही हात आकाशात पसरले होते, ते पर्वताच्या शिखरातून पंचमुखी दोन सर्पच आहेत कीं काय असें दिसलें.

मारुतीचें शरीर हा मोठा पर्वत असून, त्याचे दोन हात हे दोन सर्प व हाताचीं

पाच कोटें हीं त्या नागाचा प्रत्येक पाच तोंडें होत.

पंचमुखी नाग होते, असें मानलें जात असे कीं, हो पंचमुखी नागाची केवळ कविकल्पना आहे, हें समजत नाहीं. पंचमुखी सर्पाचा उल्लेख रामायणात अनेक वेळा आलेला आहे.

## स्त्रियांच्या अवयवांचें वर्णन.

सध्या आपण कोणत्याही स्त्रीशीं बोलताना तिच्या अवयवाचें वर्णन करून निश्चयाचा म पण करीत नाहीं कोणी तसें केलें, तर त्यानें सभ्यतेच्या मर्यादेचें उल्लंघन केलें, असें समजतों, पण रामायण-महाभारताच्या काळामध्यें स्त्रीच्या समक्ष किंवा असमक्ष तिच्या शरीरावयवाचें वर्णन करून बोलण्याची चाल सध्याप्रमाणें असभ्य समजली जात नव्हती, तर उलट वरपासून खालपर्यंतच्या सर्व थरातील लोक स्त्रीशीं किंवा पुरुषाशी बोलताना शरीराच्या अवयवाचें वर्णन करीत व परस्परांशी बोलत असत, असें दिसतें. यासंबंधाची काहीं ठळक उदाहरणें येथें देतों—

( १ ) केसांचें वर्णन—

सुकेशी ( सुं० २५।२,३१।१६ ) घनकेशान्ता ( सु ३१।१६ ) अशोक वनात मारुतीला सीता जरी दिसली, त्या वेळच्या वर्णनात हे शब्दप्रयोग कर्त्यानें प्रयुक्त केलेले आहेत

( २ ) मुखाचें वर्णन—

शुभानना ( अयो. ७।३१ ) कैकेयीचें कवि वर्णन करतो

विमलेन्दुसम ( अयो ९।४३ ) मन्थरेच्या मुखाचें वर्णन कैकेयी करते

पूर्णचन्द्रानना ( सुं १५।२८ ), पूर्णचन्द्रनिभानना ( सुं ३०।७,३७।१ ), वरानना ( सु ३३।६ ) मारुती सीतेच वर्णन करतो 'वरानने' हा शब्द तर मारुतीनेंच सीतेला संबोधन करताना वापरला आहे.

( ३ ) डोळ्यांचें वर्णन—

विशालाक्षी ( बाल ११।३० ) शान्तेच कवि वर्णन करतो. ( अयो ६।१ )

(६) कण्ठाचें वर्णन—

**नीलकण्ठी** ( १५।२९ ) सीतेचें वर्णन कवि करतो

(७) स्तनांचें वर्णन—

**सुपीनौ पयोधरौ** ( अयो ९।४२ ) कैकेयी आपल्या दासीचें वर्णन करते

**चारुवृत्तपयोधरा** ( सु १५।२८ ) मारुतीला सीता कशी दिसली, त्याचें कवि वर्णन करतो

(८) कमरेचें वर्णन—

**सुमध्यमा** ( बाल २१।१५ ) जया व सुप्रभा याचें वर्णन करीत असता वसिष्ठ म्हणतात. ( बाल ३५।१४ ) मेनेचें वर्णन विश्वामित्र करतो ( बाल ७७। १० ) कैकेयीचें कवि वर्णन करतो. ( सु १५।२९, ३०।१३ ) मारुतीला सीता कशी दिसली, तें कवि वर्णितो ( सु. २३।९ ) मारुती सीतेस संबोधितो

(९) जांघांचें वर्णन—

**सुश्रोणी** ( बाल ४८।२२ ) इन्द्र अहल्येस संबोधितो

**वरारोहा** ( बाल ६३।७ ) कवि अप्सरेचें वर्णन करतो ( सु ३३।६, ३५।६७, २६।१८, ५८।६६ ) मारुती सीतेस संबोधितो **शुभश्रोणी** ( अयो. ३०।४२ ) राम सीतेला संबोधितो

या वर्णनामध्यें कवीनें केलेलीं वर्णनें कवीच्या निरंकुशत्वामुळें सोडून द्यावीं नवऱ्यानें आपल्या बायकोसंबधानें केलेलें भाषणही आपण विचारात घेऊं नये जरी स या नवरा हा आपल्या बायकोचें असें वर्णन करून बोलत नाहीं, हें खरें असलें, तरी नवऱ्याला थोडी अधिक मुभा असावी, असें काहीं अशीं म्हणता येणें शक्य आहे म्हणून नवऱ्याच्या वर्णनातील प्रयोग आपण सोडून देऊं, पण मारुती आपल्या परमपूज्य महाराजासंबधीं, प्रभु रामचंद्राच्या परमपूजनीय सती धर्मपत्नी सीतेसंबधीं जें म्हणत आहे तें विचारात घेणें भाग आहे. मारुती सुग्रीवाचा सेनापति, रामाचा भक्त व सेवक, रामाला व सीतेला परमपूज्य मानणारा होता सीतेचा अपमान त्याच्याकडून जाणूनबुजून होणें शक्यच नाहीं. अशा मनोवृत्तीच्या मारुतीच्या तोंडीं सीतेला प्रत्यक्ष संबोधलेलीं वचनें आलीं आहेत तीं हीं अशीं आहेत—

कवि सातेचें वर्णन करतो ( अयो ९१।५ ) कवि कैकेयीचें वर्णन करतो ( सु २४।१९, २७।१६, २७।४१, ३०।२१, ३५।८७) सीतेचें वर्णन करतांना हा शब्दप्रयोग येथें झालेला आहे पहिला व शेवटचा कवीनें केला आहे दुसरा व तिसरा त्रिजटा राक्षसीनें केला आहे व चवथा मारुतीनें सीतेला उद्देशूनच केलेला आहे

**कमलपत्राक्षी** ( अयो १०।२७ ) कवि कैकेयीस उद्देशून म्हणतो व ( सु ३५।६, ५८।५७ ) मारुती समक्ष सीतेला संबोधून म्हणतो.

**शुभलोचना** ( अयो १२।२४ ) तसेंच 'आयतलोचना' ( अयो ३६।११ ) हे शब्द दशरथ कैकेयीस उद्देशून म्हणतो

**प्रफुल्लनयना** ( अयो ३८।८ ) दशरथ सीतेस म्हणजे आपल्या सुनेस उद्देशून म्हणतो

**शुभापाङ्गा** ( अयो ३०।३४ ) राम सीतेला संबोधितो

**सुभ्रू** ( सु. १५।२८, २९।६ ) मारुती सीतेस उद्देशून बोलतो

**हरिणलोचना** ( सु ४२।१४ ) **मदिरेक्षणा** ( सु २४।२६ ) **हरिण-शावाक्षी** ( सु २४।४० ) या शब्दांनी राक्षसी सीतेचें वर्णन करतात **मृग-शावाक्षी** ( सु ५८।६१ ) या शब्दानें मारुती सीतेचें वर्णन करतो **कमललोचना** ( सु २७।१५ ) त्रिजटा सीतेचें वर्णन करते.

**अतुलाक्षी** (सु. २९।५ ) कवि सीतेचें वर्णन करतो

**विशालनेत्रा** (सु ३२।६) कवि सीतेचें वर्णन करतो **पद्मपत्रविशालाक्षी** (सु २७।४१ ) कवि म्हणतो, **पद्मपलाशाक्षी** ( सु ३३।२ ) मारुती सीतेला संबोधितो

**असितेक्षणा** ( सु ३३।८ ) मारुती सीतेला संबोधितो.

**( ४ ) दांतांचें वर्णन—**

**सितशुक्लदंष्ट्रं मुख** ( सु २९।७ ) कवि सीतेचें वर्णन करतो

**( ५ ) ओठांचें वर्णन—**

**बिम्बोष्ठी** ( सु १५।२९ ), **बिम्बफलोपमोष्ठ** ( सु २९।४ ) कवि सीतेचें वर्णन करतो

(६) कण्ठाचें वर्णन—

**नीलकण्ठी** (१५।२९) सीतेचें वर्णन कवि करतो

(७) स्तनांचें वर्णन—

**सुपीनौ पयोधरौ** (अयो ९।४२) कैकेयी आपल्या दासीचें वर्णन करते

**चारुवृत्तपयोधरा** (सु १५।२८) मारुतीला सीता कशी दिसली, त्याचें कवि वर्णन करतो

(८) कमरेचें वर्णन—

**सुमध्यमा** (बाल ११।१५) जया व सुप्रभा याचें वर्णन करीत असता वसिष्ठ म्हणतात. (बाल ३५।१४) मेनेचें वर्णन विश्वामित्र करतो (बाल ७७। १०) कैकेयीचें कवि वर्णन करतो. (सु १५।२९, ३०।१३) मारुतीला सीता कशी दिसली, तें कवि वर्णितो (सु २१९) मारुती सीतेला संबोधितो

(९) जांघांचें वर्णन—

**सुश्रोणी** (बाल ४८।२२) इन्द्र अहल्येस संबोधितो

**वरारोहा** (बाल ६३।७) कवि अप्सरेचें वर्णन करतो (सु ३३।६, ३५।६७, २६।१८, ५८।६६) मारुती सीतेस संबोधितो **शुभश्रोणी** (अयो ३०।४२) राम सीतेला संबोधितो

या वर्णनामध्यें कवीनें केलेलीं वर्णनें कवीच्या निरंकुशत्वामुळ सोडून द्यावीं नवऱ्यानें आपल्या बायकोसंबधानें केलेलें भाषणही आपण विचारात घेऊ नये जरी सध्या नवरा आपल्या बायकोचें असें वर्णन करून बोलत नाहीं, हें खरें असलें, तरी नवऱ्याला थोडी अधिक मुभा असावी, असें कांहीं अंशी म्हणता येणें शक्य आहे, म्हणून नवऱ्याच्या वर्णनांतील प्रयोग आपण सोडून देऊ, पण मारुती आपल्या परमपूज्य महाराजांसंबधीं प्रभु रामचंद्राच्या परमपूजनीय सती धर्मपत्नी सीतेसंबधीं जें म्हणत आहे, तें विचारात घेणें भाग आहे. मारुती सुग्रीवाचा सेनापति, रामाचा भक्त व सेवक, रामाला व सीतेला परमपूज्य मानणारा होता सीतेचा अपमान याच्याकडून जाणूनबुजून होणें शक्यच नाही. अशा मनोवृत्तीच्या मारुतीच्या तोंडीं सीतेला प्रत्यक्ष संबोधलेलीं वचनें आलीं आहेत तीं हीं आहेत—

का त्वं ··· वरारोहे वरानने ? ( सुं ३३।६ )
त्वां आह स वरारोहे। ( सुं. ३५।६७ )
त्वां आदाय वरारोहे स्वां पुरीं प्रति यास्यति। ( ५६।१८ )
वरारोहा सीता। ( ५८।६२ )
को नु भर्ता ते सुमध्यमे ? ( सुं. ३३।९ )
भर्तारं असितेक्षणे। ( सुं ३३।८ )
का त्वं पद्मपलाशाक्षि ? ( सुं. ३३।३ )
भर्तु. कमलपत्राक्षि ··· विशालाक्षि शृणु। ( सुं. ३५।६-७ )

या वचनांत मारुती प्रत्यक्ष सीतेला संबोधित असता हे शब्द प्रयुक्त झाले आहेत। हे सुंदर मुख असलेल्या स्त्रिये। हे बारीक कमर असलेल्या स्त्रिये। हे सुंदर डोळे असणाऱ्या स्त्रिये। हे ( वरारोहे ) उत्तम जांघा असणाऱ्या स्त्रिये। असे शब्दप्रयोग आज कोणीहि परका पुरुष परक्या स्त्रियेस एकदम बोलूं शकणार नाहीं, इतकेंच नव्हे तर परिचित पुरुषही असें विशेषणें बोलणार नाहीं व एखादा नोकर राणीस तर असें म्हणणारच नाहीं; पण असे शब्दप्रयोग अपरिचित पुरुषानें केलेले ऐकून, मारुतीला तो स्वतः च बोलणारा असल्यानें कांहीं वाटलेलें नाहीं व सीतेलाही त्याबद्दल कांहीं वाटलेलें दिसत नाहीं. यावरून असे शब्दप्रयोग स्त्रियांविषयीं स्त्रियांसमोर करणें, हें या वेळीं सभ्य व्यवहाराचें दर्शक समजलें जात होतें, हें उघड होत आहे

बाईसाहेब। तुमची कमर अगदीं सिंहासारखी बारीक आहे. तुमचे डोळे कमळासारखे किंवा हरिणासारखे आहेत. असें परपुरुषानें बोलणें सध्या कोणाही स्त्रीस अवडणार नाहीं मारुती व सीता यांची ही पहिलीच भेट आहे व या पहिल्या भेटीतच मारुती सीतेस अशा शब्दांनीं संबोधीत आहे।

या सर्व शब्दांत 'वरारोहे' हा शब्द विशेषच विचार करण्यासारखा आहे. ( वर- आरोहा ) उत्तम जघन भाग असलेली स्त्री, असा याचा अर्थ दिसत आहे ( आरुह्यते इति आरोहः ) या शब्दांत जो मूळचा स्पष्ट अर्थ आहे, तो ब्रह्मचारी हनुमानानें साध्वी सीतेला संबोधणास योग्य आहे, असें सध्यातरी आम्हांस वाटत नाहीं.

पण शब्दातील मूळचे अर्थ कालान्तरानें लुप्त होतात. मूळचे अर्थ पुढें राहत नाहींत व नवीनच अर्थ उत्पन्न होतात. यामुळें मूळचा अर्थ जो आज आपणास या शब्दात दिसत आहे, तो वाल्मीकीच्या वेळेस राहिलाही नसावा व याचा दुसरा कोणता तरी उदात्त अर्थ त्या ठिकाणीं रूढ झाला असेल. असें नसेल तर ब्रह्मचारी मारुतीच्या तोंडीं सीतेसारख्या सतीला संबोधताना ' वरारोहे ' असा शब्द प्रयुक्त झाला नसता असा शब्दप्रयोग हा थोडा आश्चर्यकारकच वाटतो, पण शब्दाचा रूढ अर्थ बदलला, तर असें होणें शक्यही आहे

उदाहरणार्थ 'कुशल' शब्दाचा मूळचा अर्थ (कुश+ल) दर्भ तोडणारा असा आहे, पण हा अर्थ लोपून त्याचा अर्थ कौशल्ययुक्त ( Skilful ) असा बनला व आता मूळचा अर्थ कोणाच्या ध्यानींहि येत नाहीं, इतका तो लोपला गेला आहे त्याच प्रकारचा अर्थभेद ' वर+आरोह ' या शब्दाचा झाला असावा. संस्कृत शब्दाचा असा एक कोश बनला पाहिजे व त्यात प्रत्येक शताब्दीमध्यें त्याचा अर्थ कसा होता, तें सोदाहरण दाखवलें पाहिजे. असा कोशामध्यें या ऐतिहासिक अर्थांतराचा विचार होणें शक्य आहे. तोंपर्यन्त याविषयीं नक्की निर्णय होणें कठीण दिसतें

रामायण- महाभारताच्या किंवा संस्कृत वाङ्मयाच्या कालामध्यें स्त्रीपुरुषाच्या अवयवाचें सौष्ठव अथवा सौंदर्य पाहून तें प्रशंसावें, त्यातील सौंदर्याचें अभिनंदन करावें, असा प्रघात होता, असें वरील शब्दप्रयोगावरून दिसतें. विधात्यानें जें रचनाकौशल्य दाखवलें आहे, तें पहावें व त्याचें अभिनंदन करावें, अशा वृत्तीचा तो काल होता, पण पुढें लज्जा व मर्यादा फार वाढली, त्या प्रमाणानें शरिराच्या वर्णनाकडे कमी कमी प्रवृत्ति होऊं लागली सध्याची मर्यादशील वृत्ति ही चांगली कीं पूर्वीची चांगली, हा निर्णय करणें, हें येथें अप्रस्तुत आहे

सध्या युरोप-अमेरिकेंतील लोकामध्यें असें अवयवाचें वर्णन करून परस्परांशीं बोलण्याचा प्रघात आहे. प्रघातच नव्हे तर तो प्रत्यक्ष बोलण्यातही आहे. असाच परिपाठ आपणाकडे पूर्वी होता, असें दिसतें. सृष्टिसौंदर्य पहावें,

तें वर्णावें, असें या काळच्या लोकांस वाटत असे. सध्यां या बाबतींत लज्जा उत्पन्न झाली आहे.

सीतेचें जें वर्णन मारुतीनें केलें आहे, तें अलैंगिक भावनेनेंच केलेलें आहे. एक तर मारुती ब्रह्मचारी व संयमी होता व सीता ही त्याच्या प्रभूची धर्मपत्नी सती होती. तेव्हां लैंगिक किंवा वैषयिक भाव मारुतीच्या मनात येणें शक्यच नव्हतें. अशा अवैषयिक भावनेनें उच्चारलेले मारुतीचे शब्द आहेत.

आपणांकडे सध्या असें कोणी बोलूं लागलें, तर हाणामारीचे सुद्धां प्रसंग कित्येक ठिकाणीं उद्भवतील, हें कांहीं सिद्ध करून दाखवण्याची आवश्यकता नाहीं.



# वाल्मीकीचें चरित्र.

पूर्वी सुमति नावाचा एक ब्राह्मण होता त्याची कौशिकी नावाची एक स्त्री होती तिला अग्निशर्मा नावाचा एक पुत्र झाला त्यास त्याच्या बापानें वेदाध्ययन करण्याविषयीं पुष्कळ उपदेश केला, परंतु व्यर्थ! शेवटीं कंटाळून सुमति व कौशिकी हीं उभयतां वानप्रस्थाश्रम घेऊन अरण्यांत राहिलीं अग्निशर्मा भिल्लाची संगति धरून चोर्य कर्म करूं लागला एकदा सप्तर्षींची अग्निशर्म्याशीं गांठ पडली तेव्हां अग्निशर्मा म्हणाला कीं, 'तुमच्याजवळ जें कांहीं असेल तें सर्व येथें ठेवा, नाहीं तर तुम्हास ठार करीन.' नंतर अत्रि ऋषि म्हणाले, 'हे अग्निशर्म्या! ज्यांच्याकरितां तू हें घोर कृत्य करून द्रव्य मिळवितोस, ते या तुझ्या पापाचे वांटेकरी आहेत काय?'

असें विचारल्यावर अग्निशर्म्यानें घरा जाऊन, आपल्या बायकोला व मुलांना विचारलें कीं, 'मी जें हें पापकर्म करून, तुमचा उदरनिर्वाह करतों, त्या पापाचे वांटेकरी तुम्ही आहांत कीं नाहीं, तें सांगा' असें विचारल्यानंतर त्याचा बायका-मुलें म्हणालीं कीं, 'पापाचे वांटेकरी आम्ही नाहीं तुमच्या पापाचे वांटेकरी तुम्हीच आहांत' असें घरच्या मंडळींचे उत्तर ऐकताच अग्निशर्म्याला पश्चात्ताप झाला व तो ऋषींजवळ येऊन म्हणाला, 'मी केलेल्या पापाची मला क्षमा करा तुमच्या उपदेशानें मला पश्चात्ताप झाला आहे व मला ज्ञानही प्राप्त झालें आहे आज-पासून तुम्हीं सांगाल त्याप्रमाणें वागेन, माझ्यावर अनुग्रह करा व माझा उद्धार होईल, असा एखादा मार्ग दाखवा' असें म्हटल्यावर इतर सहा ऋषि अत्रीस म्हणाले कीं, ज्यापेक्षां याला अत्र पत्रच उपदेशानें पश्चात्ताप झाला आहे, त्यापेक्षां आपणच याला शिष्य करून पवित्र करा असें म्हटल्यावर अत्रि ऋषींनीं उत्तर दिलें कीं, ठीक आहे व नंतर त्यानीं अग्निशर्म्याला सांगितलें कीं, आम्ही पुन येथें परत येईपर्यन्त या झाडाखालीं बसून 'राम' नामाचा जप करीत रहा असें सांगून सप्तर्षि निघून गेले नंतर अग्निशर्मा रामनामाचा जप करीत बसला असतां त्याच्या अंगावर वारुळें वाढलीं इतकीं वर्षे तेथें जप करण्यांत गेल्यावर पुष्कळ कालानंतर सप्तर्षि पुन अग्निशर्मा जेथें तप करीत बसला होता, तेथें आले व रामनामाचा

निघत असलेला ध्वनि ऐकून त्यांनीं त्याच्या अंगावरचीं वारुळें बाजूस केलीं व अग्निशर्म्याला बाहेर काढिलें. त्या वेळीं तो सप्तर्षींना नमस्कार करून म्हणाला कीं, मी आज आपल्या कृपेनें पापमुक्त होऊन, ज्ञानी झालों आहें, तें ऐकून ऋषि म्हणाले, तूं अतां वारुळांतून बाहेर आल्यामुळें तुझा हा दुसरा जन्म आहे व वारुळापासून म्हणजे वल्मीकापासून तुझा जन्म झाल्यामुळें आजपासून तुला वाल्मीकि असें लोक ओळखतील, नंतर त्या वाल्मीकीनें शंकराची उपासना करून रामायण नावाचें एक महाकाव्य केलें या वाल्मीकीनें ज्या कुशस्थलीचे ठिकाणीं शंकराची उपासना केली, तें स्थान वाल्मीकेश्वर या नावानें प्रसिद्ध झालें व त्याचें पूजन करणारे लोक मुक्त होऊं लागले [स्कंद ५।१।२४,७।१।२७८]

स्कंदपुराणांत याच्यासंबंधीं दुसरी एक कथा आढळते, ती अशी—

पूर्वी एक कृणु नामक ब्राह्मण होता त्यानें पुष्कळ तप केलें तप पूर्ण झाल्यावर त्याला आपल्या स्त्रीचें स्मरण झालें व त्यामुळें त्याचें वीर्यस्खलन झालें. हें वीर्य एका वनचरीनें गिळलें, त्यामुळें तिला एक पुत्र झाला. नंतर त्या पुत्रावर महर्षींचा प्रसाद होऊन, त्याला ब्राह्मण्य लाभलें व पुढें तो वाल्मीकि या नांवानें प्रसिद्धीस आला याची पुढें ऋषींमध्यें गणना होऊं लागली. नंतर त्यानें तमसा नदीच्या तीरावर आश्रम करून, त्या ठिकाणीं आपलें अध्यापनाचें काम चालू ठेविलें. याची शिष्यशाळा फारच मोठी होती, परंतु सर्वांत भरद्वाज ऋषि मुख्य होता एकदा भरद्वाजासह हा नदीवरून स्नान करून परत येत असतां, एका व्याधानें मैथुनरत असलेल्या क्रौंचपक्षाच्या जोडप्यांतील एकास मारलेलें यांनीं पाहिलें, तेव्हां याला फार दया आली व त्याच्या तोंडातून—

> मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ।
> यत्क्रौञ्चमिथुनादेकमवधीः काममोहितम् ॥

(वा. रा. बा २।१५)

अशी छंदोबद्ध वाणी बाहेर पडली. अकस्मात् तोंडांतून निघालेल्या शब्दांचा एक अनुष्टुप् वृत्तांत श्लोक बनलेला पाहून, याला फारच आश्चर्य वाटलें, परंतु आपण त्या निषादाला शाप दिला, हें वाईट केलें, असें वाटून चिंताग्रस्त

देऊन, विचारमग्न झाले असतां, ब्रह्मदेवानें स्वतः येऊन 'तूं म्हटलेला श्लोक यशोरूपच होईल,' असें सांगून त्यांस धीर दिला व रामचरित्र लिहावयास स्फूर्ति दिली. नंतर यानीं रामचरित्राचा चोवीस सहस्र श्लोकांचा ग्रंथ लिहिला.

रामानें सीतेचा त्याग केल्यावर त्यानेंच तिला सांभाळलें. त्या वेळीं सीता गरोदर होती. पुढें यथाकालीं प्रसूत होऊन, तिला लव-कुश असे दोन पुत्र झाले. त्यांचें संगोपन यांनींच केलें व विद्याभ्यासही करवून घेतला. स्वतः रचलेलें रामायण त्यांस शिकविलें.

सीतात्यागानंतर रामानें अश्वमेध यज्ञ केला, त्या वेळीं यज्ञसमारंभास हे आपल्या शिष्यांसह गेले होते. एकदां एका ऋषीबरोबर पाखंडवाद केल्यामुळें याला ब्रह्महत्येचें पातक लागलें व महादेवाच्या उपासनेनें त्याचें निरसन झालें.

वाल्मीकिश्चाह भगवान् युधिष्ठिरमिदं वचः।
विवादे साग्निमुनिभिर्ब्रह्मघ्नो वै भवानिति ॥ ८ ॥
उक्तः क्षणेन चाविष्टस्तेनाधर्मेण भारत।
सोऽहमीशानमनघममोघं शरणं गतः ॥ ९ ॥
मुक्तश्चास्मि ततः पापैः ततो दुःखविनाशनः।
आह मां त्रिपुरघ्नो वै यशस्तेऽग्र्यं भविष्यति ॥ १० ॥

[म. भा. अ. ४१। ८, ९, १०,]

वाल्मीकि हा जातीनें शूद्र असून, पुढें ऋषिप्रसादानें ब्राह्मणत्व पावला. याचें पूर्वीचें नांव वाल्या कोळी असें होतें. या प्रचलित दंतकथेस कोठें आधार नाहीं. उलट वाल्मीकि विद्वान् ब्राह्मण होता, हेंच गोष्ट ज्या ज्या ठिकाणीं रामायणात वाल्मीकीचा उल्लेख आलेला आहे, त्या त्या ठिकाणीं तपस्वी, मुनिपुंगव, द्विज या व यासारख्या इतर विशेषणांनीं प्रमुखत्वानें सांगितली आहे. खुद्द वाल्मीकीनेंच आपली उत्पत्ति कोणापासून झाली, हें पुढील श्लोकात सांगितलें आहे.

प्राचेतसोऽहं दशमः पुत्रो राघवनंदन।

(वा. रा. उ. ९६।१८)

पण महर्षि प्रचेतसाला वंश नसल्यामुळें हा प्रचेतस् दुसरा असावा. वाल्मीकीस

ब्रह्मदेवाच्या वरामुळें रामजन्मापूर्वीच रामचरित्र लिहिता आलें, असा पुष्कळांचा समज आहे व रामचरित्रावर जे ग्रंथ झाले, त्याच्यामध्यें याच समजुतीचा अनुवाद केला असल्यानें ही समजूत दृढ होत चालली आहे, परंतु ती निराधार आहे, कारण रामायणातील सर्व क्रियापदें भूतकालाची असून, राज्यातील पुढें होणारी स्थिति मात्र भविष्यकालीन म्हणून वर्णिली आहे पुढें होणाऱ्या मनुष्याचें वर्णन भूतकालीन पदें घालून तयार करणें, हें असंभवनीय दिसतें वाल्मीकि हा रामाच्या वेळीं अथवा रामानंतर होऊन गेला असावा रामायण हें काव्य रामानंतरच्या एखाद्या वाल्मीकि नावाच्या मनुष्यानें लिहिलें असून, ते रामकालीन वाल्मीकीच्या नावावर दिलें असावें असा कित्येकांचा तर्क आहे पण यासंबंधाचा निश्चय होण्यास जेवढा पुरावा पाहिजे तेवढा अजून सापडलेला नाहीं

वाल्मीकिसूत्र, वाल्मीकिशिक्षा, वाल्मीकिहृदय, व गंगाष्टक हे रामायण-व्यतिरिक्त ग्रंथ वाल्मीकीच्या नावावर आहेत

ब्रह्मदेवानें स्वतः भरद्वाजाबरोबर येऊन, यास रामायण संपूर्ण करण्यास सांगितलें यासंबंधीं योग वासिष्ठांत उल्लेख आला आहे, तो असा—

इत्युक्त्वा स भरद्वाजं परमेष्ठी मदाश्रमम् ।
अभ्यागच्छत् समं तेन भरद्वाजेन भूतकृत् ॥

[ यो वा २-११ ]

वैवस्वत मन्वन्तरांत आतांपर्यंत जे २८ युगांचे २८ व्यास झाले, त्यांत २४ व्या युगांत विष्णुपुराणांतील यादीप्रमाणें वाल्मीकि ऊर्फ ऋक्ष भार्गव होऊन गेला, असा उल्लेख आहे

तसेंच वाल्मीकि या नांवाचा विसर्गसंधिविषयी नियम सांगणारा एक आचार्य होऊन गेला आहे